


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






संपादक-प्रकाशक : रॉय किणीकर. मुद्रक : र. अ. मोरमकर, श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस, ३६७ ठाकुरद्वार, मुंबई २

अनुक्रमणिका










संपादक
रॉय किणीकर : चित्रकार दलाल

●

वि. स. खांडेकर – काकासाहेब गाडगीळ – अनंत काणेकर – मामा वरेरकर – ना. सी. फडके – साने गुरुजी – आ. जोगळेकर – ना. ग. गोरे – र. वा. दिघे – अरविंद गोखले – गंगाधर गाडगीळ – रा. भि. जोशी – प्रभाकर पाध्ये – द्वा. भ. कर्णिक – श्री. म. वर्दे – म. भा. भू. आजगांवकर – द. के. केळकर – महादेवशास्त्री जोशी – दि. के. बेडेकर – ज. नी. कर्वे – व. ल. म्हापणकर – श्री. म. माटे – अज्ञातवासी – यशवंत – बा. सी. मर्ढेकर – बा. भ. बोरकर – वि. म. कुलकर्णी – पु. शि. रेगे – प्रफुल्लदत्त – कुसुमाग्रज – शांता शेळके – सोपानदेव चौधरी – श्री. व्या. रानडे – मंगेश पाडगांवकर – मनमोहन – कृष्णराव मराठे – आणि – पु. भा. भावे.

* * * * * * * * * * * *

| | |
|---|---|
| अनुरक्ति | [ उषा–अनिरुद्ध ] |
| प्रीति | [ राम–सीता ] |
| भक्ति | [ सत्यवान्–सावित्री ] |
| शक्ति | [ शंकर–पार्वती ] |
| विरक्ति | [ नल–दमयन्ती ] |
| मक्ति | [ कृष्ण–चंद्रा ] |



---







स्वातंत्र्य-सूर्य केव्हांच उगवला! - उठा, जागे व्हा आणि अधिक धान्य पिकवा!

## आमचे लेखक

पुणें
दि. २५-९-४९

श्री. रॉय किणीकर व चित्रकार दलाल ह्यांस सप्रेम नमस्कार. वि. वि.

गतवर्षीच्या 'दीपावलीं'त आपण वाचकांना कोणती गोष्ट, कविता, चित्र-कल्पना आवडली व कां ह्याविषयीं पत्रें मागवलीं होतीं. 'यंत्र' ही गोष्ट, आपणांस आलेल्या साडेसातशं पत्रांपैकीं पांचशेंहून अधिक वाचकांना आवडल्याचें वाचून, कोणत्याहि डोकें ठिकाणावर असलेल्या लेखकास वाटावा तेवढा आनंद वाटला. 'यंत्र' या कथेंत प्रेम नव्हतें, 'तंत्र' वगैरेही नव्हतें, तरीही वाचकांनीं तिच्या वतीनें निर्णय दिला. ह्याचा अर्थ इतकाच कीं साकल्यानें पाहतां आमचा वाचक वाटतो तेवढा अरसिक अथवा मूर्ख नाहीं. 'मॅडम पिशो' ह्या माझ्या त्याच अंकांत प्रसिद्ध झालेल्या सुदीर्घ प्रेमकथेचेंही मुक्तमनानें स्वागत झालेलें पाहून तोच वाचक किती सूक्ष्म व चतुर आहे याचीहि खात्री झाली.

पांच वर्षांपूर्वी 'दीपावली' वार्षिक काढण्याची कल्पना मराठींत तरी अगदीं अभिनव होती. आपण आपलें साहित्य अत्यंत रसिकतेनें, कसोशीनें व कौशल्यानें संपादित करीत असतां. आतां आपलें दिवाळी वाङ्मयांतील स्थान अतिशय मानाचें व अगदीं वरचें आहे ह्याविषयीं, 'दीपावली'-वर पडणाऱ्या उड्या पाहतां, मराठी वाचकांनीं शंकेला जागा ठेवलेली नाहीं. परंतु 'दीपावली'च्या उपक्रमाच्या सुरुवातीच्या वर्षीत मी आपणांस थट्टेनें असें म्हटल्याचें आठवतें कीं "आपण आपला हा वार्षिक खटाटोप वर्ष दोन वर्षांतच आटोपणार काय?" माझी वत्तीशी आपणांस चांगल्या शकुनाची लाभल्याचें मी पाहत आहें. आतां उलट सांगणें इतकेंच कीं "यावच्चंद्रदिवाकरौ"—म्हणजेच निदान तुम्हीं आम्हीं आहोंत तोंपर्यंत तरी "दीपावली" प्रकाशनाचा वार्षिक सोहोळा असाच चालू ठेवावा.

आपण निरीक्षणार्थ पाठवलेलीं वाचकांचीं पत्रें सोबत परत पाठवीत आहे. तीं पत्रें इतकीं मनोरंजक आहेत कीं त्यांतूनच तुमच्यासाठीं पुढेंमागें गोष्ट काढीन म्हणतों. बहुत काय लिहिणें?

आपला स्नेहांकित,
गु. भा. भावे

## आणि वाचक

गतवर्षी 'दीपावलींत' आम्ही वाचकांना आवाहन केलें होतें कीं, या अंकांतली कुठली गोष्ट, कविता, अथवा चित्रकल्पना तुम्हांला अत्यंत आवडली तें आम्हाला कळवा, तसें करतांना वाचकांच्याकडून कितपत उत्तरदायित्व मिळेल याविषयीं आम्ही खरोखर साशंक होतो. परंतु वहन् महाराष्ट्राच्या चौफेर बाजूंनीं जीं पत्रें आलीं व ज्या मजकुराचीं आलीं त्यावरून मराठी वाचक जितका रसिक आहे तितकाच तो चोखंदळहि आहे, जसा हळुवार भावनेचा आहे तसाच तो प्रसंगीं प्रहार करणाराहि आहे असा गोड, गंमतीचा आणि गंभीर अनुभव आला. आज 'दीपावली'च्या पांचव्या वर्षी स्पष्ट, निस्संकोच व निसंदिग्ध शब्दांत आम्हाला सांगावेसें वाटतें कीं फावल्या वेळांत घटकाभर करमणूक म्हणून जरी आजचें ललित वाङ्मय वाचलें जात असलें तरी वाटेल तें आणि वाटेल तसलें वाङ्मय वाचायला आमचा वाचक राजी नाहीं आधींच आर्थिक आणि राजकीय विघटनेनें महाराष्ट्र भयमूढ झाला आहे, स्वातंत्र्याच्या रणांगणांत महाराष्ट्रानें जवढे श्वास ओतले तेवढे कुठल्याही बरोबरीच्या प्रांतानें वेचलले नाहींत, आणि म्हणूनच अशा मनःस्थितीच्या भोवऱ्यांत भोवडून निघालेला वाचक म्हणतो, 'लेखकांनो, कवींनो आणि संपादकांनो, आम्हाला तेंच वाङ्मय हवें आहे जें आमच्या थकलेल्या नि संत्रस्त अंतःकरणाला ओलावा आणि उत्तेजन देईल, आम्हाला तेंच वाङ्मय द्या कीं, घरीं आणि घराबाहेरच्या जगांत वावरतांना आम्हाला आमच्या अस्मितेची जाणीव नी अभिमान वाटेल!

आणि त्यांच्या त्याच आदेशानुसार आम्ही या 'दीपावली'साठीं आलेल्या साहित्याची अति कसोशीनं निवड केली. तें करतांना मजकुरांत जेवढी म्हणून विविधता, मनोरंजकता, कलात्मकता आणि प्रबोधकता आणतां येईल तेवढी आणण्याचा आम्ही आमच्या परीनें प्रामाणिक प्रयत्न केला. पण तो कितपत यशस्वी झाला आहे हें ठरविणें वाचकांचें!

या अंकासाठीं ज्यानीं आपलेपणानं नि अगत्यानं आम्हाला सहकार्य दिलें त्या सर्वांचें आभार मानतांना श्रीलक्ष्मी-नारायण मुद्रणालयाचे श्री. मामासाहेब मोरमकर, देशमुख आणि कं. चे श्री. ग. ज. देशमुख, नेरॉय कं. चे श्री. डी. डी. नेरॉय, बॉम्बे प्रोससचे श्री. कामत, चित्रकार चिमुलकर यांचे बंधू श्री. अ. गो. चिमुलकर, मौज प्रिंटिंग प्रेसचे भागवत बंधू, आणि टॉम अँड बे. चे श्री. तांबे यांची आठवण होणें साहजिक आहे. या सर्वांच्या अकृत्रीम लोभामुळेच हा अंक इतका सर्वांगसुंदर निघूं शकला.

असो! ही दीपावली आणि येतें वर्ष लेखक, वाचक, ग्राहक, जाहिरातदार, आणि एजन्ट यांना सुखाचे व उत्कर्षाचें जावो.

अनुक्रमणिका





# घरटें

— वि. स. खांडेकर

काळेबाई वर्गांत आल्या. सुमन खिडकींतून बाहेर पाहूं लागली. काळे बाई तिला मुळींच आवडत नसत. तिला राहून राहून वाटे, आपल्यासारख्या चुका देवाच्याही हातून होत असाव्यात! तसें नसतें तर काळे बाईंना त्यानें गोरें कशाला केलें असतें? सारीं गोरीं माणसें वाईट वाईट असतात. दादा, आक्का आणि ताई–तिघेंही गोरीं आहेत. म्हणूनच तीं आपल्याला अशीं हिडिसफिडिस करतात. कांहीं झालें कीं काळी काळी चिंद्री म्हणून आपल्यामागें लागतात. कोंडा देऊन डोंबारणीकडून विकत घेतलेली मुलगी म्हणून आपल्याला हंसतात. आईसुद्धां तसेंच म्हणते. खरें असेल का हें? हो, तें खरेंच आहे. घरांत आहे ती आपली खरी आई नाहीं. म्हणूनच ती आपल्यावर एकसारखी रागावते! आपली खरी आई ती डोंबारीण– ती कुठें बरें असेल आतां? लांब लांब फिरत गेली असेल. पुणें, मुंबई, दिल्ली—आपण आगगाडींत बसून दिल्लीला गेलों तर ती आपल्याला भेटेल. नाहीं? मग ती आपल्याला घट्ट पोटाशीं धरील, आपले खूप खूप पापे घेईल, 'तुला चिवडा आवडतो ना? हा घे' म्हणून एक डबा आपल्या हातांत देईल. डबा? अं हं! ती खरी आई आहे आपली! ती पीपच देईल चिवड्याचें आपल्याला उचलून!

'सुमन, कुठं आहे तुझं लक्ष?' कावळ्यासारखा कर्कश आवाज सुमनला ऐकूं आला. सुमननें मागें वळून पाहिलें. काळेबाई कुठलें तरी पुस्तक उघडीत होत्या.

सुमननें वांकून हळूच त्या पुस्तकाकडे पाहिलें. कालचेंच पुस्तक होतें तें! कवितेचें. तिला वाटलें, आपण उठावें आणि बाईंना म्हणावें 'आज छान छान गोष्ट सांगा आम्हांला!' गोष्टींत किती किती मजा असते! चल रे भोपळ्या टुणुक टुणुक सारखी! त्या भोपळ्यांत ती लबाड म्हातारी कशी बसली होती? परवां आई भाजीसाठीं भोपळा फोडायला लागली. तिनें तो विळीवर धरला. तेव्हां आपण म्हटलें 'आई, हळू फोड हं! आंतल्या म्हातारीला लागेल.' 'खुळी कुठली!' आई म्हणाली. दादा, ताई आणि आक्का तिघंही हंसली. अगदीं माकडासारखीं! वेडीं आहेत तीं नुसतीं वेडीं नाहींत. दुष्ट आहेत अगदीं! सकाळीं दादाचें फाउंटन पेन शुद्धलेखन लिहायला घेतलें. पांच थेंबांनीं काय शाई संपणार होती त्या दादिटल्याच्या पेनांतली? पण त्यानें आपल्या पाठींत असे धपाटे घातले टांगेवाला घोड्याला चाबूक मारतो ना? तसा तो आपल्याला [illegible]

लागला. आपण ओरडलों, रडलों. पण आई उलट आपल्यावरच रागावली. म्हणाली 'तूं त्याच्या फाउंटनला हात कां लावलास ?' ती आपली खरी आई नाही. म्हणूनच असें म्हणाली ती! फाउंटनपेन दादाचें. कॅरम आक्काचा. साडी ताईची. सारें सारें त्या तिघांचें! आपलें मात्र कांहीं नाहीं या घरांत! आपल्याला कोंडा देऊन विकत घेतलंय्! होय. हेंच खरें! तसें नसतें तर दादानें मारल्यावर आपण बाबांच्याकडे रडत गेलों, तेव्हां त्यांनीं एखादें मलम काढून आपल्या पाठीला चोळलें नसतें का? बाबा नेहमीं फिरत असतात, आगगाडींतून लांब लांब जाऊन ते औषधें विकतात, असें आई सान्यांना सांगते. पण त्यांच्यापाशीं आपल्या पाठीला लावायला औषध दिसेल असेल असें कसें होईल? पण आपण रडत रडत त्यांच्याकडे गेलों, तेव्हां ते आपल्याच अंगावर ओरडले. रस्त्यावरलें कुत्रें घरांत येऊं लागलें म्हणजे दादा 'हॅड्' करतो ना? असेंच तस्से ओरडले. बाबा कांहीं आपले खरें वडील नाहींत. उंच उंच काठीवर चढणारा, ढुम ढुम ढोल वाजवून साऱ्या आळींतली मुलें गोळा करणारा कुणीतरी डोंबारीच आपला बाप आहे. आज आपण त्याच्याबरोबर असतों तर तर गुढीप्रमाणें रस्त्यावर उभ्या केलेल्या त्या काठीवर रोज रोज चढत राहिलों असतों. आणि मग खेळ संपल्यावर दारोदार फिरून आपण खूप पैसे मिळ- विले असते. एक, दोन, सात, अठरा, शंभर, दोनशें!

तें चित्र डोळ्यापुढें उभें राहतांच शाईचे डाग पडलेल्या पिशवींत हात घालून तिनें एक आणेली झटकन् बाहेर काढली. ती झांकल्या मुठींत लप- वितां लपविता ती खुदकन् हंसली. आपल्या पराक्रमाचा तिला अभिमान वाटूं लागला. सकाळचा तो प्रसंग तिला आठवला.

आपण ताईची साडी नेसायचा हट्ट धरला. ताईटली मांजरासारखी गुरगुरत म्हणाली, 'तूं माझ्याइतकी उंच हो. मग आई देईल साडी तुला!' आजच्या आज उंच कसें व्हायचें हें कितीतरी वेळ आपल्याला कळेना! मग सुचली एक युक्ति. अगदीं नामी! गोष्टींतल्या कोल्ह्याला नाहीं कीं सुचत? तशी. हळुच एक खुर्ची आणून आपण तिच्यावर चढलों. खुंट्यांना आणि फळ्यांना आपले हात पोंचूं लागले. कोठीच्या खोलींतल्या फळीवर आई पैसे ठेवते. तिथें सुद्धां हात पोंचतो कीं नाहीं हें आपण पाहिलें. त्या फळीवर हाताला सहज पैसे लागले. किती होते कुणाला ठाऊक! घ्यावेसे वाटले. पण देव पाहील म्हणून–देवाला सारें दिसतें असें पहिल्या यत्तेंतल्या त्या गोष्टींतच होतें कीं!

आपण खुर्चीवरून खालीं उतरणार होतों. इतक्यांत शकिटलीं डोळ्यां- पुढें उभी राहिली. काल शाळा सुटल्यावर वाटेंत एक आण्याचा पेरू घेऊन आपल्याला टुकटुक करून दाखवीत ती घरीं गेली. तिची खोड केव्हां तरी मोडायलाच हवी! आपला हात पुन्हां वर गेला त्यानें चटकन् एक आणेली उचलली. देवानें बहुधा तें पाहिलें नसावें. नि त्यानें तें पाहिलें असलें तर रात्रीं काळोखांत हळूच आपल्या अंथरुणापाशीं तो येईल. त्याला काय बरें सांगायचें? हं! 'ती आणेली या हातानं चोरली. मी नाहीं.' नि आईला हें कळलं तर? छे! ती नेहमीं आजारी असते. तिला कुठली इतकी पैशांची आठवण राहणार आहे?

सुमननें मागें एकी वर्गांत एक फुलपांखरूं पकडलें होतें. तें हातांत धरलें असतांना तिला मोठ्या नाजुक गुदगुल्या झाल्या होत्या. मुठींत लप- विलेल्या आणेलीनें आतां तिला अगदीं तसाच आनंद होत होता.

हा आनंद कुणाला बरें सांगावा? मधेंच तिचें लक्ष बाईंच्याकडे गेलें. त्या पुन्हां पुन्हां म्हणत होत्या 'गोठ्यांतल्या वासरांना। या चाटतात गाई?'

त्या गाईचें शेण काढायला बाईंनीं गोठ्यांत पाठवावें असें सुमनला वाटलें. इतक्यांत तिच्या समोर बसलेल्या शकूनें कांहीं तरी तोंडांत टाकलें असावें. तो आवळा होता कीं चिंच होती? तिचा एक गाल मधेंच फुगला होता. तो काय उगीच?

आतां सुमनला राहवेना! तिनें हातांतली आणेली शकूला दाखविली. आपणही संध्याकाळीं पेरू घेऊन खाणार आहों असा अभिनय करण्यांत ती दंग होऊन गेली. इतक्यांत काळेबाई ओरडल्या. 'काय चाललंय् सुमन?'

बाई अशा मधेंच ओरडल्या कीं सुमनला वर्षापूर्वी पाहिलेल्या सर्कशीची आठवण होई. तिच्यांतला एक वाघ असाच––

काळेबाई विचारीत होत्या, 'कळली का कविता?'

सुमननें मान हालविली.

'मग सांग बघूं अर्थ? स्वामी म्हणजे काय?'

स्वामी–स्वामी–स्वामी–माणसाची चाहूल लागतांच खारीनें सुर्रकन् झाडाच्या अगदीं वरच्या फांदीचें टोंक गांठावें तसा सुमनच्या स्मरणशक्तीनें आपल्या मनाचा तळ गांठला. एका क्षणांत तो सारा तिनें ढवळून काढला. पण तिला तो स्वामी कुठंच सापडेना!

तिनें घाबरून बाईकडे पाहिलें. वाघानें झेंपटी फुलविली होता! आतां- देवा–एकदम तिला आठवण झाली. बरें वाटावें म्हणून आई मधेंच कुठल्या- तरी मठांत अंगारा आणायला जात होती. तिथें एक स्वामी आले होते. ते तिला अंगारा देत. आपण एकदां आईबरोबर तिथें गेलों होतों.

सुमननें ताडकन् उत्तर दिलें 'स्वामी म्हणजे डोक्याचा गोटा केलेला माणूस!'

या उत्तराबद्दल बाई आपल्याला शाबासकी देणार अशी तिची खात्री होती. तिनें मोठ्या ऐटीनें खुर्चीकडे पाहिलें. ताशा वाजवितात तशी बाईंनीं टेबलावर छडी ताडताड आपटली. वाघ अधिकच चवताळलेला दिसला. बाई ओरडल्या 'फाजील कुठली! [illegible]वर उभी रहा.'

ती बाकावर चढूं लागली. [illegible]पाच पोरी फिदफिदी हंसल्या. त्या हंसण्यांतूनही 'फाजील कुठली' हेच आवाज उमटत आहेत असें सुमनला वाटलें. घरीं, दारीं, शाळेंत, वेळीं अवेळीं असल्या शब्दांखेरीज दुसरें कांहीं आपल्याला कां ऐकूं येत नाहीं हें तिला कळेना! 'फाजील कुठली–आठ वर्षांची घोडी–काळी काळी चिचुंद्री–कारटीला चांगली चेचून काढली पाहिजे–हिला डोंबारणीला देऊन टाकायला हवी–' आई, बाबा, दादा, आक्का, ताई, बाई सारीं सारीं माणसें सारखें असेंच बोलत असतात. या साऱ्यांनीं कट केलाय् आपल्याविरुद्ध! अफजुलखान नव्हता का शिवाजीला मारायला आला? तशीं हीं सारीं माणसें—

बस्स! आपण आतां शिवाजी व्हायचें! आणि या साऱ्या अफजुल- खानांना—

सुमन ताठ मान करून बाकावर उभी राहिली. वर्गांत बाई कविता शिकवीत नसून एक वेडी कांहीं तरी बडबडत आहे अशा दृष्टीनें ती चोहीं- कडे पाहूं लागली.

तिची नजर एकदम वर गेली. ती छपराजवळच्या कोपऱ्यावर खिळली. तिथें एक रुंदट फट दिसत होती. त्या फटींतून बारीक बारीक कापूस भुर- भुरत खालीं पडला. तरंगत तरंगत तो जमिनीकडे येऊं लागला. त्या कापसाच्या पाठोपाठ एकदोन गवताच्या काड्या आणि एक दोन काटक्या घरांतून बाहेर आल्या. त्याही खालीं पडल्या. सुमन उत्सुकतेनें पाहूं







लागली. चिमणीनें आपलें घरटें तिथें बांधलें असावें. बाहेर येतां येतां चिऊताईच्या अंगाला लागून तो कापूस, काड्या नि काटक्या खालीं पडल्या असाव्यात ! बाहेर आलेली ती चिमणी पुन्हांपुन्हां त्या फटींत चोंच घालीत होती. आतां ती थोडी दूर झाली. तिचीं नीं इवलीं पिलें फटीपाशीं दिसूं लागलीं.

सुमनचें सारें कुतूहल जागृत झालें. सर्कशींतले वाघसिंह पाहतांना तिला आपण एका नव्याच जगांत प्रवेश केला आहे असा भास झाला होता. आतांही तिला तसेंच कांहींतरी वाटलें. गेल्या दिवाळीला पहाटे काळोखांतून प्रगट होणारें पूर्वेकडलें प्रकाशमय जग पाहून ती भान विसरून गेली होती. पुस्तकांत अचानक सांपडलेल्या मोरपिसाप्रमाणें ती स्मृति तिच्या डोळ्यांपुढें तरळूं लागली. साडी, चिवडा, पेरू, आणेलीं, दादिटला, ताईटली, सार्‍यांचा तिला विसर पडला.

बाई ओरडल्या, " कुठं बघतेहेस सुमन ? इंग्रजी चवथीची कविता मी मुद्दाम मराठी चवथीला शिकवितेय् ! आणि तूं उनाडपणानं–हं म्हण–' उष्टया तव्या मुखाच्या । घेईल चुंबना तो ! ' तो म्हणजे कोण ? आपली आई– हं म्हण उष्टया तशा– "

एखाद्या यांत्रिक बाहुलीनें आपले हातपाय वरखालीं करावे तसे ते शब्द सुमननें आपल्या तोंडांतून बाहेर काढले. पण तिला ते कांहीं केल्या खरे वाटेनात. तिनें समोरच्या कोंपऱ्यांतल्या घरट्याकडे पाहिलें. मघांशीं ती चिमणी कशी पिलांच्या चोंचींत चोंच घालीत होती. पण आईनें कध्धीं कध्धीं आपल्याला तसें–

ती चिमणी या पिलांची खरी आई आहे. आपली आई तशी नाहीं. ती आपली खरीखरी आई असती तर– वर्षांतून दोनदां वाढदिवस करून तिनें आपल्याला लवकर लवकर मोठें केलें नसतें का ? तिला आपल्याला साडी द्यायची नाहीं, कॅरम द्यायचा नाहीं, फाऊंटन द्यायचें नाहीं, कांहीं कांहीं द्यायचें नाहीं. म्हणूनच ती आपल्याला जवळ करीत नाहीं. ती शेजारच्या रमाकाकूंना सांगते, ' मला ही पोरटी मुळींच आवडत नाहीं. मला हवा होता मुलगा. ' मग मी तिच्या पोटांत असतांना तिनें मला मुलगा कां केलें नाहीं ? मी तिच्या पोटांत नव्हतें हेंच खरें. आपल्याला कोंडा देऊन डोंबारणीकडून तिनें विकत घेतलें आहे. म्हणून आपण काळ्या झालों. ही आई आपली नाहीं–हें घर आपलें नाहीं–काय करायचंय् शाळा सुटल्यावर असल्या घरीं जाऊन ?

• • •

घण् घण् घण् घण् ! शाळा सुटल्याची घंटा वाजली. सुमननें टुणकन् बांकावरून खालीं उडी मारली. पिशवी घेऊन ती धांवतच बाहेर आली. तिनें आणेली उजव्या हातांत घट्ट धरली होती. बाहेरच्या पायरीवर माळ्याचा तो काळा काळा बोका दबा धरून बसलेला तिनें पाहिला. मोठा दुष्ट आहे मेला ! नेहमीं पांखरांच्या मागें लागतो. ज्ञानदी दादा आपल्या-मागें लागतो तसा ! एक दगड उचलावा आणि नेम धरून त्याला मारावा, अशी इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली. दगड घ्यायला ती वांकली सुद्धां ! इतक्यांत आपल्या हातांत आणेली आहे, ती खालीं पडेल याची तिला आठवण झाली.

तिनें मान वर केली. पुढें पाहिलें. शकी लगबगीनें चालली होती. तिला तिनें हां हां म्हणतां गांठलें. दोघीही घुमेपणानें गाल फुगवून चालूं लागल्या. जवळजवळच्या कौलांवर बसून एकमेकांकडे रागानें पाहणाऱ्या मांजरासारख्या त्या मधून मधून परस्परांकडे पहात होत्या.

कोंपरा आला. कोलच्या पेरूवाला तिथें होताच. त्याच्या पुढ्यांतले ते हिरवे पिवळे पेरू पाहून सुमनच्या तोंडाला पाणी सुटलें. तिनें एक लहू पिवळाजर्द पेरू उचलला, त्याचा खूप जोरानें वास घेतला. त्या बाग-वानाच्या हातावर आणेली टाकली आणि पुढें निघून गेलेल्या शकूला गांठण्याकरितां ती धांवूं लागली. शकूला गांठून तिला चांगलें फुकटुक केलें तेव्हां कुठें तिचें समाधान झालें.

पेरू किती मोठा, पिवळा, गोड गोड वास येणारा. पण तो खायचा कुठें ? रस्त्यावरून मुलें चालली होतीं. मागून कोई येण्याची संभव होता. घरीं दादा, आक्का, ताई–छे ! अशोकवनांत सीतेभोंवतीं राक्षसिणींचा पहारा होता. आपल्याभोंवती सुद्धां तस्सा–घरीं, दारीं, शाळेंत–

आगगाडीची कर्कश शिटी ऐकूं आली. एखाद्या मैत्रिणीनें जोरानें ओरडून हांक मारावी तसें सुमनला वाटलें. तिचे पाय स्टेशनकडे वळले. हां हां म्हणतां ती तिथें पोंचली.

स्टेशन तिला नेहमींच आवडे. तिथली धांवपळ आणि धांदल पाहिली कीं तिचें मन फुले. तिथल्या हमाली करणाऱ्या पोरांचा तिला हेवा वाटे. आतांही तिच्या मनांत आलें–ही मुलें किती सुखी असतात. त्यांना सारखी आगगाडी पाहायला मिळते. उठल्या सुटल्या आईबापांचा मार खावा लागत नाहीं. इकडचें सामान तिकडे नेलें कीं त्यांच्या हातांत पैसे खुळखुळूं लागतात. आपल्याला मात्र कांहीं–हवें झालें कीं आईपाशीं नाहींतर बाबांच्या-जवळ मागावे लागतें. बाबा सदानकदा रागावतात. ' पैसे झाडाला लागत नाहींत ' असें कांहींतरी सारखें बोलतात. तें ऐकून आई कपाळाला आठ्या घालते. ती बाबांच्याशीं भांडूं लागते. आणि मग–

गाडीची दुसरी शिट्टी झाली. स्प्रिंगवर उडणाऱ्या खेळण्यासारखें स्टेशनवरल्या धांवपळीचें स्वरूप झालें. लांकडी फाटकापाशीं सुमन उभी राहिली. तिनें पेरूचा एक मोठा लचका तोडला. तो तोंडांत कोंबीत ती गाडीकडे पाहूं लागली. डब्याडब्यांतून माणसें डोकावून पहात होतीं. झाडावरल्या वांदरांची तिला आठवण झाली. लगेच तिच्या डोळ्यांपुढें जत्रेंतलें फिरतें पाळणे उभे राहिले. एक एक डबा म्हणजे एक एक पाळणा आहे असें तिला वाटलें. त्या पाळण्यासारखे हे गरगर फिरायला लागले तर–

तिच्या डोळ्यांपुढें आगगाडीचे डबे रहाटगाडग्यासारखे फिरूं लागले. त्यांतलीं माणसें धडपडत होतीं, बाहेर पडूं नये म्हणून एकमेकांना धरत होतीं. एका म्हाताऱ्यानें पडतां पडतां दुसऱ्याची लांब शेंडीच धरली ! एका पोरीनें आईचा पदर पकडला. तो सुटला. आईनें तिच्या मुस्कटांत मारली. एका मोठ्या मुलानें ऐटीनें सदऱ्याच्या खिशाला लावून ठेवलेलें फाऊंटनपेन तिथून उडालें आणि इंजिनांतल्या लाल लाल कोळशांत जाऊन पडलें.

' ए सुमे, पेरू कुठला आणलास तो ? ' हे शब्द तिनें स्पष्ट ऐकले. पण ते आपल्या दादाच्या तोंडांतून बाहेर पडत आहेत हें तिला क्षणभर खरेंच वाटेना ! तिनें डोळे फाडफाडून पाहिलें. तो दादाच होता. त्याच्या बरोबर आणखीही पुष्कळ मुलें आलीं होतीं. त्यांचे कुणी तरी मास्तर बदली होऊन दुसऱ्या गांवाला जायला निघाले होते. त्यांना निरोप द्यायला पोरांचें तें टोळकें आलें असावें !

अंधारांत लुकलुकणाऱ्या मांजराच्या डोळ्यांप्रमाणें हा विचार तिच्या मनांत चमकून गेला. लगेच तो अंधार अधिक दाट झाला. मांजरानें डोळे मिटून घेतले.

ती एकदम पळत सुटली. तिनें स्टेशनाकडे वळूनसुद्धां पाहिलें नाहीं. ' ए पोरी ' म्हणून एक टांगेवाला कर्कश आवाजांत ओरडला. तिचे पा









लटलट कांपूं लागले. दादा आपल्याला पकडण्याकरितां मागून धांवत येत आहे असें तिला वाटलें. तिनें धूम ठोकली. धापा टाकीत ती राधाकृष्णाच्या देवळांत आली. आतां कुठें तिचा जीव भीडयांत पडला. तिथल्या कोंपऱ्यांत बसून तिनें उरलेला पेरू भराभर खाल्ला. पण आतां कांहीं केल्या त्याचा तिला वास येईना. तो तिला गोड लागेना!

पेरू संपला. पण घरीं जायची तिला भीति वाटूं लागली. दादिटला आईपाशीं चहाडी केल्याशिवाय रहायचा नाहीं. आणि मग—

ती गाभाऱ्याच्या दारांत जाऊन उभी राहिली. कृष्णाची मूर्ति हंसत होती. कृष्ण चोरून दूहीं, दूध, लोणी खात असे. यशोदेनें एकदां त्याला उखळाला बांधूनसुद्धां ठेवलें होतें. ही गोष्ट त्यांच्याकडे पाहतां पाहतां सुमनला आठवली. तिला एकदम धीर आला. ती ऐटीनें घरीं जायला निघाली.

घर दुरून दिसूं लागलें. तिचा धीर थेंबाथेंबानें गळूं लागला. ती हलुहलु घरापाशीं आली, पायरीवर चढली आणि तिथंच थांबली. गांवांत जातां येतांना तिनें पुष्कळदां तुरुंग पाहिला होता. आपलें घर त्याच्या-सारखेंच आहे असें तिला वाटलें. दार उघडण्याची इच्छा तिला होईना. ती दाराला कान लावून ऐकूं लागली. कुणीतरी कुणाशीं भांडत होतें. बाबाच ओरडत होते ते! आणि आई? आईही रागारागानें कांहींतरी बोलत होती. बाबांचे शब्द तिला स्पष्ट ऐकूं येऊं लागले. 'तूंच सांग मला. मी मरमर मरतोंय्! पण—ही डॉक्टराची बिलं—जाऊं दे तें— उद्यांच पुन्हां फिरतीवर जातों—चांगला महिनाभर हिंडून येतों—म्हणजे—'

सुमन विचारांत पडली. 'मी मरमर मरतोंय्' असें बाबा आईला वरचेवर सांगतात. ते असें खोटें कां बोलतात? पुष्कळ दिवस आजारी पडावें, खूपखूप औषधें घ्यावीत, तेव्हां कुठें माणूस मरतो! बाबा तर एक दिवस सुद्धां औषध घेत नाहींत. मग ते असें—

खाडकन् दार उघडलें. बाबा बाहेर आले. सुमन दचकली. लगेच तिला वाटलें, त्यांनीं एक गालगुच्चा घेऊन आपल्याशीं कांहींतरी गोडगोड बोलावें! पण 'काय पठाण? सुटली का शाळा? हे नेहमीचे शब्द सुद्धां त्यांनीं तोंडांतून बाहेर काढले नाहींत. तो मुकाटयानें चालूं लागली. तिला असा राग आला त्यांचा!

त्या घुशांतच ती आंत गेली. पाय न धुतां खायला मागूं लागली. आई मारायला उठली तेव्हां ती पाय धुवायला गेली. लगेच पाय न पुसतां तिनें आईपाशीं चिवड्याचा हट्ट धरला. आईनें मघाशीं सगळ्यांसाठीं पोहे केले होते. ती बशी सुमननें दूर सारली. मला चिवडाच हवा म्हणून तिनें आईचा हात धरला. आपल्याला कांहीं हवें असलें म्हणजे दादा असेंच करतो, मग आई तो मागतो तें त्याला देते, हें तिनें पाहिलें होतें. आज आपणही त्याच युक्तीनें चिवडा मिळवायचा असा तिनें निश्चय केला.

आई उठत नाहीं असें पाहून सुमन अधिकच चिडली. गाईचें दूध पितांना वासरूं तिला दुश्या देतें, पण तिला त्याचा राग येत नाहीं, असें कांहीं तरी आजच वर्गांत बाई म्हणाल्या होत्या. तें आठवून सुमन आईच्या अंगाला झोंबूं लागली. इतकें करूनही आई दाद देत नाहीं असें पाहून तिनें तिच्या उजव्या दंडावर डोकें ठेवलें आणि तें जोरानें घांसायला सुरुवात केली. विंचू चावल्यासारखी आई ओरडली. तिला दूर ढकलून देत किंचाळली; 'कारटे, डोळे फुटले वाटते तुझे? सकाळच्या इंजेक्शननं सारखा ठणकतोय्! आणि तूं तिथंच—'

सुमनला तसें कांहीं फार लागलें नव्हतें पण आपण रडलों म्हणजे आई आपल्याला चिवडा देईल या कल्पनेनें ती मुसमुसूं लागली. इतक्यांत दादा सिनेमाला जाण्यासाठीं आईकडे पैसे मागायला आला. आई उठून कोठीच्या खोलीत गेली. तिथल्या फळीवरले पैसे काढून तिनें त्यांतले कांहीं दादाला दिले. गुडघ्यांत मान घालून मुसमुसत असतांनाच सुमननें हें सारें पाहिलें. ती अधिकच जोरानें रडूं लागली. आई हातांतले पैसे मोजीत म्हणाली, 'एक आणा कुठं गेला बाई?' दादा हंसत म्हणाला, 'सुमीला विचार, ती मघाशीं स्टेशनवर पेरू खात उभी होती.'

दादा आग लावून सिनेमाला निघून गेला. आग हलुहलु भडकूं लागली. आई पुनः पुन्हा खरें बोल म्हणून बजावीत होती. सुमन प्रत्येक वेळीं आणेली घेतली नाहीं म्हणून ओक्साबोक्शी रडत सांगत होती. आईनें तिला चारपांच धपाटे घातले, रागारागानें गालांवर चापट्या लगावल्या. उजवा गाल अगदीं काळानिळा झाला.

सुमन कळवळली. चडफडली. पण तिनें दातीं धरलेलें सोडलें नाहीं. आई गोंधळांत पडली. आतां तिनें तिला प्रश्न विचारायला सुरुवात केली.

'शाळा सुटल्यावर कुठं गेली होतीस तूं?'

'स्टेशनावर-'

'का?'

'माझ्या एका मैत्रिणीचं घर आहे तिथं!'

'कशाला गेली होतीस तिच्याकडं?'

'बारसं होतं.'

'बारसं?-तिच्या भावाचं?'

'अं हूं!'

'तिच्या बहिणीचं!'

'अं हूं!'

'मग कुणाचं?'

'तिच्या बाहुलीच्या बाळा'

आईच्या मुद्रेवरलें हंसूं सुमननें निरखून पाहिलें. तिची पाठ दुखत होती. तिला आपले गाल चोळावेसे वाटत होते. पण या लढाईंत शेवटीं आपला जय होणार या आनंदांत ती तें सारें दुःख विसरून गेली. ती आईला सांगूं लागली. 'त्या बारशाचे पेरू दिले तिच्या आईनं आम्हांला! पेरू घेऊन मी घरीं यायला निघालें. स्टेशनावर दादा दिसला. बाबा आत्तांच्या गाडीनं जाताहेत असं मला वाटलं. म्हणून मी स्टेशनकडे गेलें.'

हें सारें झटपट बनवून सांगतां सांगतां सुमनला विलक्षण आनंद होत होता. हुतूतूमध्यें तिला गतवर्षी बक्षिस मिळालें होतें. त्या खेळांत साऱ्या मुलींना हुलकावण्या देतांना तिला जें सुख झालें होतें तेंच आतांही—

पण तें सुख फार थोडा वेळ टिकलें. आईनें दिलेले पोहे खाऊन हात धुवायला जातां जातां तिनें आरशांत पाहिलें. उजवा गाल अजून काळा निळा दिसत होता. आईचीं पांचही बोटें त्याच्यावर उठलीं होतीं.

● ● ●

प्रकाश आणि काळोख यांच्या खेळांत काळोखानें डाव जिंकला होता. बाहेरच्या जगाप्रमाणें तिच्या मनावरही काळसर सावल्या भरभर पसरूं लागल्या. आक्का आणि ताई कॅरम खेळत होत्या. तिथें जाऊन ती उभी राहिली. त्यांनीं वर मान करून सुद्धां तिच्याकडे पाहिलें नाहीं. दादाचा कुणी तरी मित्र त्याची चौकशी करायला आला. 'तो सिनेमाला गेला आहे







म्हणून आईनें त्याला सांगितलें. सुमननें तें ऐकलें. तिचा हात आपल्या उजव्या गालाकडे गेला. दादा, आक्का, ताई, आई सारे सारे आपले शत्रु आहेत असें तिला वाटलें.

उद्यां शनिवार. बाईंनी सांगितलेलीं गणितें करायला हवींत. माडीवर जाऊन तिनें अंकगणित उघडलें. पण तिचें लक्ष त्या व्यवहारी अपूर्णांकांत लागेना. पुस्तक फेंकून देऊन ती उठली. समोरच बाबा आणि आई जवळ जवळ बसलीं आहेत असा एक फोटो होता. दांत ओठ खात त्या फोटोकडे तिनें पाहिलें. बुक्की मारून त्याची कांच फोडावी असें तिच्या मनांत आलें. बाईंचा आणि आईवरली ती कविता लिहिणाऱ्या कवीचा तिला राग आला. त्या दोघांचे फोटोही इथें हवे होते. म्हणजे ते सुद्धां आपण फोडून टाकले असते असें तिला वाटलें. बाईंनीं वर्गांत म्हणायला लावलेल्या त्या ओळी तिला आठवल्या. 'उष्ट्या तशा मुखाच्या। घेईल चुंबना ती.' त्या ओळी अगदीं खोट्या आहेत अशी तिची खात्री झाली. गाल चोळीत ती बाहेरच्या गच्चींत आली. कठड्यावर रेलून ती रस्त्यांतल्या रहदारीकडे पाहूं लागली. तिच्याएवढीच एक मुलगी किती सुंदर साडी नेसून चालली होती. हिरवी मावशीच्या घरांतल्या पोपटासारखी! शाळेच्या बागेतल्या लुसलुशीत गवतासारखी! ती मुलगी आपल्या आईचें बोट धरून चालली होती.

सुमनचा हात नकळत आपला गाल चांचपून पाहूं लागला. तिच्या आईची पांचही बोटें तिथें होती. तिला गुदमरल्यासारखें होऊं लागलें. आंत खोल कुणीतरी आपल्याला डागतंय्, पापडाप्रमाणें आपल्या मनाला उलट सुलट निखाऱ्यावर परतवितंय् असा भास तिला झाला.

तिनें कठड्यावरून खालीं वांकून पाहिलें. आणखी थोडें—आणखी थोडें वांकावें आणि मागचे पाय हळूच वर उचलावें अशी विलक्षण इच्छा तिच्या मनांत निर्माण झाली. मग आपण धाडकन् खालीं पडूं, आपलें डोकें फुटून रक्तबंबाळ होईल, लोक आरडाओरडा करीत धांवून येतील, आपल्याला उचलून घरांत नेतील आणि असें झालें म्हणजे आई आपल्या अंगावरून हळूच हात फिरवील—

त्या स्पर्शाच्या कल्पनेनें तिचें अंग [illegible]कित झालें. त्या विचित्र सुख-स्वप्नांत ती गुंग होऊन गेली. रस्त्यानें [illegible]रीं माणसें तिला अंधुक दिसूं लागलीं. एकदम तिच्या कानांवर शब्द पडले 'कारटे, किती वांकून बघतेहेस? पडशील ना?' बाबाच ओरडत होते ते!

● ● ●

'कारटे किती वांकून बघतेहेस?' या शब्दांनीं घाबरून तिनें डोळे उघडले—इकडे तिकडे पाहिलें. ती एकटीच आपल्या अंथरुणावर होती. आपण बघत होतों आणि ऐकत होतों तें सारें स्वप्न होतें या जाणिवेनें तिला आनंद झाला.

पण तो क्षणभरच टिकला. दुसऱ्याच क्षणीं तिचा हात उजव्या गालाकडे गेला. तो सुजला होता, ठणकत होता. आईनें निजतांना त्याला वेखंडबिखंड लावलें असेल या आशेनें तिनें त्याच्यावरून दोन तीनदां हळूच हात फिरवून पाहिला. पण कसलीच खपली हाताला लागली नाहीं. अगदीं इवली सुद्धां!

रात्रीं झोंपतांना तिला वाटलें होतें, आपल्याला मारलें म्हणून आईला वाईट वाटेल. मग काम संपल्यावर ती आपल्यापाशीं येऊन झोंपेल. रात्री जाग आल्यावर आपण तिच्या कुशींत शिरूं. घरट्यांत पांखरूं अंग चोरून जातें ना? तसें तिथें आपलें डोकें लपवूं आणि आईनें 'माझी बाई ती!' म्हणून आपल्याला अधिकच जवळ ओढलें म्हणजे हळूच विचारूं 'आई तुझा हात कसा आहे ग? इंजेक्शन देतांना डॉक्टर हळु कां ग सुई टोंचीत नाहींत? हात फार दुखतोय् होय? चल, गरम पाण्यानं शेकूं या आपण म्हणजे—'

सुमननें डोळे चोळचोळून पाहिलें. तिथें आई नव्हती, बाबा नव्हते, कुण्णी कुण्णी तिच्याजवळ नव्हतं. पलीकडे बोका गुरगुरल्यासारखा आवाज येत होता दादिटल्याचें घोरणें होतें तें!

ती अंथरुणावर उठून बसली. दृष्टी विस्फारून तिनें चोहींकडे पाहिलें. दादाच्या पलीकडे ताई आणि आक्का खुशाल झोंपल्या होत्या. सुमनचा गाल दुखत आहे याची त्यांना कुठें काळजी होती?

त्यांनाच काय, आईला सुद्धां ती नव्हती. ती असती तर—

ती विचार करूं लागली. हिरवळीवर खेळतां खेळतां खचकन् कांचेचा बारीक तुकडा पायांत जावा तशी तिच्या मनाची स्थिति झाली. ही आई आपली खरी आई नाहीं या कल्पनेपाशीं तें मन थांबलें. आई गोरी आहे. बाबाही कांहीं काळे नाहींत. दादा, आक्का, ताई हीं सारीं गोरीं! आपण तेवढ्या काळ्या. तेव्हां आपली खरी आई आणि खरे वडील दुसरेच असले पाहिजेत! म्हणूनच हीं दोघें आपल्यावर माया करीत नाहींत. हें घर दादाचें आहे; आक्काचें आहे, ताईचें आहे; आपलें नाहीं. मग कशाला रहायचें या घरांत?

विचारांच्या या घसरगुंडीवर तिचें मन किती तरी वेळ खेळत होतें. तिला ध्रुवाची गोष्ट आठवली. तो सिनेमाही तिनें पाहिला होता. आपण त्या ध्रुवासारखेंच करायचें, दूर दूर निघून जायचें असा निश्चय करून ती उठली आणि दरवाजाकडे जाऊं लागली. इतक्यांत घराच्या पुढच्या बाजूनें गस्तवाल्याचा आवाज ऐकूं आला, 'घरवाले, हुष्यार ऽऽऽ!' ती जागच्या जागीं थबकली. तिची छाती धडधडूं लागली. ध्रुव घरांतून बाहेर पडला तेव्हां तो गस्तवाल्याला असा घाबरला होता, कीं नाहीं हें तिला कळेना! गोष्टींत तर तसें कांहीं लिहिलें नव्हतें. आणि त्या सिनेमांतही—

'घरवाले, हुष्यार ऽऽऽ' घराच्या मागच्या बाजूनें मघांचाच आवाज आला. तो गस्तवालाच आहे, भूतबित नाहीं अशी सुमन आपल्या मनाची समजूत घालीत होती. पण तिच्या छातींतली धडधड कमी होईना. उलट आतां तिचें पाय लटलट कांपूं लागले. अस्सें धांवत जाऊन आईच्या कुशींत लपावें असें तिला वाटलें. ती पलीकडच्या खोलींत भीतभीत गेली. तिनें आईचें अंथरूण पाहिलें. तें रिकामेंच होतें. आई कुठें गेली हें तिला कळेना! लगेच तिची दृष्टि बाबांच्या अंथरुणांकडे गेली. तिची भिती कुठल्या कुठें पळून गेली. आतां भीतीची जागा रागानें घेतली. ती चडफडत मनांत म्हणत होती—बाबा कांहीं लहान नाहींत, आईनें कांहीं त्यांना मारलेलें नाहीं, त्यांचा गाल कांहीं सुजलेला नाहीं. मग आपल्याला सोडून आई इथें कशाला येऊन झोंपली?

खोलींत ऊन पाण्याच्या पिशवीजवळ घड्याळ टिक् टिक् करीत बसलें होतें. ते टोके हळूहळू मोठे झाले. घराचा दरवाजा कुणीतरी जोरानें ठोठावीत आहे असें सुमनला वाटलें. लगेच तिच्या मनांत आलें, छे! कुणीतरी लोहार आपली भट्टी पेटवून लोखंड ठोकीत बसला आहे! झोंपलेल्या आईकडे तिरस्कारानें पाहत ती आपल्या खोलीकडे वळली.

खोलींत अंधुक अंधुक दिसत होतें बाहेर मात्र काळोख होता. खकत दबकत ती खिडकीपाशीं गेली. दोन वर्षांपूर्वी मुंबईला जातांना पाहिलेल्या बोगद्याची तिला आठवण झाली. त्यांतही असाच काळोख दाटला होता. तिनें पुन्हां पाहिलें. या बोगद्यांत देवानें लावलेले दिवे मिणमिणत होते.







अनुक्रमणिका

ती विचार करूं लागली. ध्रुव बहुधा राजवाड्यांतून रात्रीं बाहेर पडला नसावा! खिडकी धडधडूं लागली. ती धडपडत आपल्या अंथरुणाकडे आली. तोंडावरून पांघरूण घेऊन ती तें फडफडणें ऐकूं लागली. छे! तें घुबड नव्हतें, वाघुळ नव्हतें! फूल-पांखरूं होतें तें!,

भाऊ तिचा गाल दुखत नव्हता. त्याला कुणीतरी बेखंड लावलें असावें. ती सिनेमा पहायला गेली- एकटी-अगदीं एकटी-दादा, आक्का, ताई त्यांना टुकटुक करीत!

किती गंमतीदार होता तो सिनेमा! त्यांत आक्काला माळीदादाच्या बोक्यासारख्या मिशा फुटल्या होत्या-सुमन त्या कात्रीनें कापीत होती. त्यांत दादा एका सशाचा गळा दाबून प्राण घेत होता—एक शूर काळी मुलगी त्याच्यावर गोळी झाडीत होती. त्यांत आक्काच्या कॅरमबोर्डचा पतंग होऊन तो एका उंच उंच झाडाच्या फांद्यांत अडकून पडला होता-एक खार त्या झाडावर चढून त्या पतंगाशीं खेळत होती. इतक्यांत खालून तिची आई ओरडली 'कार्टे! आठ वर्षांची घोडी झालीस. पण—'

● ● ●

त्या सिनेमांत काळेबाई आल्या. शाळा-सकाळची शाळा-सुमननें धडपडून डोळे उघडून पाहिलें. उन्हें खिडकीतून वेडावून म्हणत होतीं 'वेडी रे वेडी! अजून निजली आहे!'

ती धांवत खालीं आली. बाबा गडबडीनें आंघोळ करीत होते. न्हाणी घरांतूनच ते ओरडले. 'अग, माझ्या ट्रंकेंत ती औषधाची बाटली टाक हं, नाहीं तर विसरशील. ऐकलंस का?'

सुमन कशा बशा चार चुळा भरून आंत गेली. बाबा अंग पुसत पुसतच आले. आईनें त्यांच्यापुढें चहाचा पेला आणि तीन बिस्किटें ठेवलीं. तिनें सुमनला कॉफी आणि एक बिस्किट दिलें. आंघोळीला चाललेल्या ताईनें हळूंच सुमनला चार बोटें दाखविलीं. आईनें बाकीच्यांना चार चार बिस्किटें दिलीं अशी सुमनची खात्री झाली. तिचा गाल एकदम ठणकूं लागला. तिनें पुढ्यांतला पेला दूर लोटला आणि मला चार बिस्किटें हवींत म्हणून भोकांड पसरलें.

आईनें बिस्किटांचा डबा तिला दाखविला. त्यांत एकसुद्धां बिस्किट शिल्लक नव्हतें-दादिटला, आक्किटली आणि ताइटली यांनींच सारा डबा फस्त केला म्हणून सुमननें हातपाय आपटायला सुरवात केली. आई रागारागानें तिची समजूत घालूं लागली. ती काय म्हणत आहे तें सुमनला नीट ऐकूं सुद्धां येत नव्हतें. तो कॉफीचा पेला थाडकन् लाथाडून द्यावा, बशी कोपऱ्यांत फेकून तिचे तुकडे तुकडे करावेत, या इच्छेखेरीज तिच्या मनांत आतां दुसऱ्या कशालाही जागा उरली नव्हती.

बाबांनीं त्यापली बिस्किटांची बशी तिच्यापुढें ओपटली. "मुलखाची नष्ट आहे कारटी. आठ वर्षांची घोडी झाली. पण—" आई पुटपुटली. बाबा तुसता चहा पिऊन घाईघाईनें निघून गेले. दादा आरशापुढें उभा राहून केसांचा भांग पाडीत होता. आक्का तोंडाला पावडर लावीत होती. ताई हातांत साडी घेऊन उभी होती. त्यांना आई म्हणाली 'ऐकलंत का रे? ही मोठी व्हाईट पोरटी झालीय. हिच्याशीं कुण्णी कुण्णी बोलायचं नाहीं हं!'

ती तिघं खो खो करून हंसलीं. सुमनच्या काळजांत तीन सुयांची टोकं अगदीं आंत आंत घुसलीं. आई उठून गेल्यावर ती कुत्यूनें म्हणाली, "एक मोठी जम्मत ठरके आहे मुला. तुम्हांला कुण्णाला सांगणार नाहीं मी ती. भांडी घासायला भागू आली की—"

थोड्या वेळानें भागू आली. इकडे तिकडे कुणी नाहीं असें पाहून सुमन तिच्याजवळ गेली. ती हळूहळू तिला कांहीं सांगत होती. भागू खुसूखुसू हंसू लागली. मधुनच 'खरं?' म्हणून ती विचारी. सुमन 'अगदीं खरं, देवा शप्पथ' म्हणून तिला सांगे. आतां भागूला काहीं केल्या हंसूं आवरेना. तिचें तें खिदळणें पाहून आईला आश्चर्य वाटलें. ती खोद खोदून तिला विचारूं लागली. काय झालें तें भागू सांगेना. पण ती हंसायचेंही सोडीना. आई खूप रागावली तेव्हां भागू म्हणाली, 'सुमाबाईनींच इचारा तुम्ही वैनी.' आतां आईची चांगली फजिती होईल असें वाटून सुमन ताठ मान करून म्हणाली, 'रात्रीं बाबांच्या अंथरुणावर निजली नव्हतीस तूं.'

आई संतापली. तिनें सुमनला फराफरा ओढीत घरांत नेलं. भागू 'पुरे वैनी, पुरे वैनो' म्हणून बसल्या जागेवरून ओरडत होती. पण आई बेभान झाली होती. गालावर पाठीवर जिथें मिळेल तिथें तिनं सुमनला मारलं. दरवाजाकडे तिला ओढून नेत ती उद्गारली 'मुलखावरून ओवाळून टाकली आहे कारटी! चल-जा-चालती हो घरांतनं.' आईनं सुमनला बाहेर ढकललं आणि धाड्कन दार लावून घेतलं.

● ● ●

सुमननें त्या बंद दरवाजाकडे अश्रुपूर्ण डोळ्यांनीं पाहिलें. दार उघडून आंत जावें, 'आई चुकलें मी' असें म्हणावें आणि आईच्या गळ्याला मिठी मारून खूपखूप रडावें अशी इच्छा तिच्या अंतर्मनांत कुठें तरी गुणगुणूं लागली. पण ती क्षणभरच. दुसऱ्याच क्षणीं तिनें आपल्या डोळ्यांत उभें राहिलेलें पाणी पुसलें. लगेच तिथें निखारे फुलूं लागले. त्यांतून उडणाऱ्या ठिणग्या म्हणत होत्या, 'नाहीं, या दुष्ट आईचं तोंड पुन्हां पहायचं नाहीं.'

सुमननें त्या बंद दरवाजाकडे पाहिलें. तुरुंग! या तुरुंगांतून आपण सुटलों-बाहेर पडलों. किती आनंदाची गोष्ट!

ती झपझप चालूं लागली. तिच्या मनानें आपले पंख पसरले. आतां हवें तिथें जावें, हवें तें करावें! कुणी आपल्याला बोलणार नाहीं, कुणी मारणार नाहीं. एखाद्या कोंकराप्रमाणें बागडत ती निघाली. पुढच्या गल्लीच्या कोंपऱ्यावर एक सिनेमाचें थेटर होतें. तिथें कुठला तरी नवा चित्रपट होता. जाणारे येणारे लोक थेटराच्या भिंतीवर लावलेल्या जंगी चित्राकडे पाहत होते. सुमन तिथें थांबली. त्या चित्रांतली बाई मोठी सुंदर होती. ती आपल्या चारपांच वर्षांच्या मुलीला पोटाशीं धरून तिचा मुका घेत होती. आपली आई अशी सुंदर नाहीं, म्हणूनच तिची आपल्यावर माया नाहीं असें कांहींतरी सुमनच्या मनांत आलें. लगेच त्या दुष्ट नष्ट आईची आतां आठवण सुद्धां करायची नाहीं असें मनाला बजावीत ती कोंपऱ्यावरून पुढें वळली.

तिथें एक मोठें उडपी हॉटेल होतें. त्या दुकानांत खूप लोक जात येत होते. ग्रामोफोन गात होता, 'ओ दूर जानेवाले ऽऽऽ वादा न भूल जाना' सुमनचें हें मोठें आवडतें गाणें होतें तिनें दोन महिन्यांपूर्वी या रेकॉर्डचा हट्ट तिनें बाबांच्या पाशीं धरला होता. आणि नेहमींप्रमाणें त्यांनीं उत्तर दिलें होतें, 'पैसे कांहीं झाडाला लागत नाहींत.'

गाण्याच्या गोड सुरांवर तिचें मन तरंगूं लागलें. पण तें पांच दहा क्षणच. लगेच तिला वाटलें; ग्रामोफोनची किल्ली संपली आहे.

किल्ली संपली नव्हती. तिचें नाक दुकानांतून दरवळत येणारा कॉफीचा वास घेत होतें. त्या वासाभोंवतीं तिचें मन घुटमळूं लागलें.

आपण आज कॉफीसुद्धां प्यालों नाहीं हें तिला आतां आठवलें. दुकानांत जायची इच्छा तिच्या मनांत प्रबळ झाली. कालची आपली पेरू पेरूनंत खर्च केली नसती तर फार बरें झालें असतें असें तिला वाटलें.





अनुक्रमणिका

कॉफी नाहीं तर नाहीं. आपण पाणी पिऊन राहूं, असा मनाशीं निश्चय करून ती नदीकडे जायला निघाली. नदी चांगली मैल दीडमैल लांब होती. सुमन घाटावर आली तेव्हां तिला गळून गेल्यासारखें वाटलें. पाणी न पितांच ती एका पायरीवर बसली, आतां मनाबरोबर तिचें अंगहि ठणकूं लागलें. नदीच्या पाण्यांत उभ्या राहून बायका धुणीं धूत होत्या. त्यांच्या धुण्याचे फाट्-फाट् आवाज एकसारखे ऐकूं येऊं लागले. त्यांचें तें कपडे बडवणें सुमनला पाहवेना. तें पाहतां पाहतां आईनें आपल्याला असेंच मारलें ही एकच कल्पना तिच्या मनांत थैमान घालूं लागली. तिनें डोळे मिटून घेतले. फाट्-फाट्- आवाज वाढूं लागले. कुठें तरी सुरुंग लावले होते, दगड हवेंत उडत होते, खोल खोल खड्डा तयार होत होता.

सुमन ताडकन् उठली. झरझर पायऱ्या उतरून खाली गेली. नदीचें पाणी झुळुझुळु वाहत होतें. तें पिण्याकरतां ती वाकली. तिनें तें ओंजळींत घेतलें. पण तिला तें तोंडांत घालवेना. तिच्या डोळ्यांपुढें पाण्यांत बुडून मेलेल्या सुमनचें प्रेत दिसत होतें. त्या प्रेताला मिठी मारून ती दुष्ट आई रडत होती आणि सुमन आनंदानें टाळ्या पिटीत ओरडत होती 'रड–अशीच रड.' पण–पण–प्रेताला आनंदानें टाळ्या पिटतां येतात कां ?

'ए पोरी–' कुणीतरी खसकन् सुमनचा दंड धरून तिला मागें ओढीत खेकसलें. ती एक दांत पडकी म्हातारी बाई होती. 'फुडं कुटं चाललीस' बुडशील ना वया ! काय आईबाप हायत् की न्हाहित तुला ?'

त्या म्हातारीच्या गळ्याला मिठी मारून मनमुराद रडावें, आपलें सारें दुःख तिला सांगावें, असें सुमनच्या मनांत आलें. पण त्या म्हातारीला तिच्याकडे पहायला फुरसद होती कुठें ? ती घाई घाईनें पाण्यांत शिरून खळखळ लागली.

सुमननें घटाघटा पाणी प्यायला सुरवात केली. खूपखूप पाणी प्यावें, अगदीं पोट फुटेपर्यंत पाणी प्यावें—

पाणी पिऊन ती पायऱ्या चढूं लागली. त्याजागेला अलीकडे खेड्यावरला दोन तीन माणसें घाटाच्या एका बाजूला भाकरी खात बसलीं होतीं. एक लुकडें कुत्रें जीभ बाहेर काढून त्यांच्याकडे आशाळभूतपणानें पाहून मधून मधून हळुच पुढें होत होतें. कुणी तरी भाकरीचा एक तुकडा त्याच्याकडे फेंकला. कुत्र्यानें त्याच्यावर अशा चपळाईनें झडप घातली—हा कुत्रा हुतुतू खेळत असला तर त्याला खास बक्षीस मिळालें असतें असें सुमनला वाटलें.

तिचें मन पुढें जाण्याकरतां धडपडूं लागलें. पण पावलें तिथेंच घुटमळत होतीं. फडक्यांत सोडून ठेवलेल्या त्या काळ्या करपट भाकरीवर तिचे डोळे खिळले होते. आरशासारख्या लखलखीत ताटांत आईनें वाढलेल्या कुनकुन भाताची, त्यांच्यावरल्या त्या पिवळ्या जर्द वरणाची, त्या वरणावर घातलेल्या साजुक तुपाची तिला आठवण झाली. त्या लोणकढ्या तुपाचा तो गोड वास तिच्या नाकाला—

तो गोड वास काय ध्रुवाच्या राजवाड्यांत नसेल ? त्यांच्याकडे पण फिरूनच ध्रुव अरण्यांत गेला ना ? बस्स–आपणहि–आपल्या तपश्चर्येलाही










देव पावेल. या कच्च्या देवळांत जाऊन 'नारायण, नारायण,' म्हणत बसायचें ! अगदीं विष्णु प्रगट होऊन आपल्याला वर देईपर्यंत.

तो भरभर पायऱ्या चढून देवळांत गेली. तिथें चिटपाखरू सुद्धां नव्हतें. तें एकें ओकें देऊळ पाहून तिला बरें वाटलें. जाणाऱ्यायेणाऱ्याचा त्रास होऊं नये म्हणून एक अगदीं बाजूचा कोंपरा तिनें गांठला. तिथें बराच काळोख होता. त्या कोंपऱ्यांत ती बसली आणि डोळे मिटून 'नारायण, नारायण' म्हणण्याचा प्रयत्न करूं लागली. पण तिचें मन राहून राहून उडूं लागलें. बाबा गांवाला गेले असतील का ? त्यांचं औषध ट्रंकेंत ठेवायला आई विसरली तर नाहीं ? दादाची शाळा दुपारची आहे. आतां तो काय करीत असेल रे ? ओका आणि ताई शाळेंत गेल्या असतील. तिथें त्यांना आपली आठवण होत असेल का ? आणि आई आतां काय करीत असेल ? आई—आपली आई—

तिचें धुमसणारें मन म्हणत होतें, ती आपली आई नाहीं ! पण ठणकणारें पेंगुळलेलें शरीर निद्रेच्या आधीन होण्याकरतां कुशीवर वळलें. तेव्हां तिच्या तोंडांतून अगदीं अस्फुट आर्त असा एकच उद्गार बाहेर पडला—आई !

● ● ●

आई, आई '

आपण मोठ्यानें आइला हांक मारीत आहों असें सुमनला वाटलें. तिला आपल्या निर्लज्ज्या मनाचा राग आला. तिनें रागारागानें डोळे उघडून पाहिलें. एक लहान मुलगी आपल्या आईला हांका मारीत होती. उंच होऊन घंटा वाजवायची होती तिला. आपण कुठें आहों हें आतां सुमनच्या लक्षांत आलें. ती झटकन् उठली आणि देवळाबाहेर आली. सूर्य अगदीं डोक्यावर आला होता. ऊन रखरखत होतें. तापानें मलूल होऊन पडलेल्या माणसासारखें सारें जग दिसत होतें.

अशा उन्हांत बाहेर जायचें ?

कुठें ?

घरीं ?

अं हं.

सुमन मागें फिरूं इच्छीत होती. पण आतां पोटांत कसेंसेंच होत होतें. अंगाचें ठणकणें, मनाचें जळणें, सारें सारें ती विसरली. तिला कांहीं तरी खायला हवें होतें. बिस्किटें ? चिवडा ? अं हं. कांहींही—

पण तें कुठें मिळणार ? आणि कोण देणार ?

घरीं जायचें ? त्या तुरुंगांत ? मान खालीं घालून ? आईला शरण जायचें ?

छे ! मग कुठल्यातरी मैत्रिणीकडे ? त्या शकीच्या घरीं गेलें तर—

पण त्या शकीला कालच पेरू दाखवून आपण टुक टुक केलें आहे ! मग कुठें जायचें ? हां ! आपल्या शाळेच्या आवारांतच माळीदादा राहतो मागें त्याच्या आजारी असलेल्या मुलीला आईने आपले जुने फ्रॉक दिले होते. आपण दिसलों की तो किती हंसून हांक मारतो, 'सुमाबाई. सुमाबाई म्हणतो तो. कारटी मस्तवाल पोरटी, आठ वर्षांची घोडी; असलें कांहीं वेडेवाकडें बोलत नाहीं कधीं कधीं ! त्याच्याकडेच जावें. तो देईल थोडी भाकरी खायला. ती खाऊन स्टेशनवर जावें आणि मग आगगाडींत बसून कुठें तरी लांब लांब—

आपण शाळेपाशीं केव्हां आलों तें सुमनला कळलेंही नाहीं. ती फाटकांतून हळूच आंत शिरली, आंत गेल्याबरोबर माळ्याच्या झोंपडीकडे धांवत

जायचें आणि ' माळीदादा, माळीदादा ' म्हणत मोठ्यानें हांका मारायच्या असें तिनें मनाशीं ठरविलें होतें. पण आतां तिचें पाऊल जागच्या जागीं थबकलें. तिच्यापुढें दोन मोठे प्रश्न उभे राहिले–माळ्याला काय सांगायचें? त्याच्याकडे भाकरी कशी मागायची?

काय करावें तें तिला कळेना. तिनें सहज आपल्या वर्गाकडे दृष्टि वळविली. तिथें खिडकीबाहेर माळ्याचा तो बोका मिशा साफसूफ करीत बसला होता. त्याचा असा राग आला सुमनला. तिनें एक लहानसा दगड उचलला आणि नेम धरून मारला. पण तो त्या बोक्यापर्यंत पोंचलाच नाहीं. मिशा साफ झाल्यावर मान वर करून तो खिडकींतून आंत काय बघत होता कुणाला ठाऊक!

सुमन चोरपावलांनीं त्या बोक्यापाशीं गेली. तिने ' छुत् ' करतांच तो किती दचकला–आणि कसा टुणकन् उडी मारून पळाला. त्याच्या त्या पळपुटेपणाचें तिला हंसूं आलें.

पण तें हंसूं ओठांवरून बाहेर पडण्याच्या आधीं तिथल्या तिथेंच मावळलें. तिचें लक्ष खोलींतल्या कोपऱ्याकडे गेलें. ती रुंदट फट–चिमणीच्या घरट्याची ती जागा–तिथें ती पिलांची आई एकसारखी फडफड करीत होती. ती चिमणी घरट्यांत आपल्या पिलांकडे कां जात नाहीं हें सुमनला कळेना.

तिची नजर जमिनीकडे वळली. तिथें––

तिथें किती किती वस्तु अस्ताव्यस्त पडल्या होत्या. त्या नाना तऱ्हांच्या काड्या छोट्या छोट्या काटक्या, वाळलेलें गवत, सुताचे इवले इवले तुकडे, नाजुक नाजुक कापूस, त्या पांढऱ्या कापसांत मिसळलेला विटांच्या रंगाचा काथ्या–

' ए पोरी ' कुणीतरी ओरडलें. सुमननें दचकून वळून पाहिलें. लगेच तिच्या कानांवर माळ्याचे शब्द आले ' आं? सुमनबाई? '

सुमन धांवत धांवतच त्याच्याकडे गेली आणि त्याला ओढीत खिडकीकडे आणीत म्हणाली, ' माळीदादा, ही चिमणी कां रे असं करते? '

"तिची पिलं गेली बया"

"गेली?"

"व्हय्"

"उडून गेली?"

"हं!" चिमणीच्या जीवाची चाललेली घालमेल पाहून माळी नकळत उद्गारला.

चिमण्या उडत उडत मुंबईला जातात काय? या गोष्टीविषयीं सुमनच्या मनांत कुतूहल निर्माण झालें.

माळी चुकचुकत म्हणाला, 'चिमणी गेली असेल पिलांच्या पोटासाठीं कांहींबाही पैदा करायला. आणि इकडे बोकोबानं––"

सुमनच्या डोळ्यांत भय आणि दुःख यांचें विलक्षण मिश्रण दिसूं लागलें. ती पिलें आपणहून खालीं पडलीं, वर्गातल्या पोरींनीं तीं बाहेर काढलीं कीं बोकाच युक्तीनें तिथें चढला हें सुमनला कांहीं केल्या कळेना. पण चिमणीची ती विचित्र फडफड पाहून तिचें कुतूहल कुठल्या कुठें नाहींसें झालें. ती चिमणी त्या फटीपर्यंत वर जाई, तोंडानं कसलां तरी आवाज करी, मग पुन्हा वावुळासारखी या भिंतीपासून त्या भिंतीपर्यंत फडफड करीत फिरे. मग पुन्हा कांहीं तरी आठवण झाल्यासारखी करून एकदम परत वर घरट्यापर्यंत जाई.

हें सारें पाहून सुमनच्या मनांत कालवाकालव सुरू झाली. दाटून आलेल्या स्वरानें ती म्हणाली, 'माळीदादा, आपलीं पिलं गेली हें या चिमणीला कळत नाहीं होय?"

"कळतंय् बया! पण––"

सुमन निश्चल नजरेनें माळ्याकडे पाहत होती. तो उद्गारला 'आइ हाय् ती. आईबापांची माया येडी असते बाई"





अनुक्रमणिका








माळी डोळ्यांत उभें राहिलेलें पाणी पुसूं लागला, तो एकदम दचकला आणि म्हणाला 'तुला सांगायला इसरलोंच कीं बाई ! आज कुठं व्हतीस तूं ? तुला शोधायला तुझा भाऊ येऊन गेला, तुझ्या वहिणी येऊन गेल्या. मगाशीं या घरट्यांत आणखी पिलू बिलू आहे कीं काय हें बगत होतो मी त्यो आईसाव बी येऊन गेल्या.'

" आई–माझी आई–आई इथं आली होती ? मला शोधायला ? "

माळ्यानें मान हालवली. सुमन स्फुंदुन स्फुंदून रडूं लागली.

माळ्याचें बोट धरून घराकडे येतां येतां तिनें दुरून पाहिलें. आई पायरीवर दाराला टेकून उभी होती. ती भिरि भिरी इकडे तिकडे पाहत होती. समोर–उजव्या बाजूला डाव्या बाजूला–सुमनला नुकत्याच पाहिलेल्या त्या चिमणीची आठवण झाली. माळ्याच्या हातांतून तिनें आपलें बोट झटकन् सोडवून घेतलें आणि घराकडे धूम ठोकली. ती दृष्टीला पडतांच आईनें हात पसरून केवढ्या मोठ्यानें 'सुम्या' म्हणून हांक मारली. किती गोड हांक होती ती ! जणुं कांहीं कुठें तरी दूर खूप खूप गाई आपल्या वासरांसाठीं हंबरत होत्या–हंबरतांना त्यांच्या गळ्यांतल्या घंटांचा किणकिणाट होत होता.

आईच्या लुगड्याला डोळे पुशीत सुमन आंत आली. तिनें माजघरांत पाहिलें. सकाळचा तो कॉफीचा पेला नी तीं बिस्किटें अजून तिथेंच पडलीं होतीं. पलिकडेच अक्काच्या फॅरमवोर्डवर ताईची साडी ठेवली होती. त्या साडीवर दादाचें फौंटनही दिसत होतें. या तीन वस्तु एके ठिकाणीं कशा आल्या, तें कांहीं केल्या सुमनला कळेना. ती त्यांच्याकडे पाहतच राहिली. आई तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली 'तिघेंही तुला शोधायला गेलीं आहेत. तुझ्यासाठीं हें सारं आणून ठेवलंय् त्यांनीं इथं !'

सुमननें स्वयंपाकघरांत डोकावून पाहिलें. तीनच उष्टीं ताटें दिसत होतीं. म्हणजे आई अजून—

तिनें सद्गदित स्वरानें विचारलें, 'आई, तूं जेवली नाहींस ?'

आई नुसती हंसली. लगेच ती म्हणाली. 'ते अजून उपाशीच असतील ग ! वेळगांवला गाडी दीड वाजतां जाते. पोट दुखत होतं म्हणून रात्रींही ते जेवले नाहींत. किती वेळ शेंकत बसले होतें त्यांचं पोट काल.'

सुमनची दृष्टि माजघरांतल्या तीन बिस्किटाकडे गेली. आपल्या हट्टामुळें बाबांना नुसता चहा घेऊनच जावें लागले. रात्रीं त्यांनीं कांहीं कोहीं खालें नव्हतें, त्यांची गाडी वेळगांवला दीड वाजतां पोंचणार, तोंपर्यंत ते उपाशी राहणार. या साऱ्या विचारांनीं तिचें मन गुदमरून गेलें. जणुं कांहीं ती एकामागून एक गटंगळ्या खाऊन खोल खोल पाण्यांत बुडत होती. 'तुला थोडी उनउनीत कॉफी देतें हं !'

आईचे शब्द तिला ऐकूं आले. पण त्यांचा अर्थबोध तिला झाला नाहीं. धांवतच ती वर गेली. बाबांच्या नि आईच्या फोटोपुढें उभे राहून तिनें हात जोडण्याचा प्रयत्न केला. पण तिचे हात थरथर कांपूं लागले. तिला तिथें उभें राहवेना. ती वेड्यासारखी माडीवर इकडे तिकडे फिरूं लागली. त्या किन्दी खोल्या जणुं कांहीं ती प्रथमच पाहत होती. प्रत्येक खोलींतल्या प्रत्येक वस्तूंत तिला आईबापाची आपल्या वरली माया दिसूं लागली. हा पाळणा–लहानपणीं एकदां खूप ताप आला होता आपल्याला तेव्हां रात्रभर बाबा आपला हालवीत बसले होते, ती कोंपऱ्यांतली सायकल–तिच्यावर बसवून बाबा आपल्याला बागेंत घेऊन जायचे, आपण रांगत होतो तेव्हांचा हा आपला फोटो–आईच्या मांडीवर किती ऐटीनं आपण बसलो आहों.

डोक्यांत आठवणींची गर्दी होऊं लागली. खाऊ, खेळणीं, खुर्च्या, गाद्या, पुस्तकें, कपडे, औषधें, साऱ्या वस्तु बोलक्या झाल्या. एकमेकांच्या हातांत हात घालून त्या सुमनच्या डोळ्यांपुढून नाचत गात जाऊं लागल्या. सिनेमांतल्या सारखीं भराभर त्यांची रूपें बदलूं लागलीं. खुर्च्यांच्या काटक्या झाल्या, खेळण्यांच्या काड्या बनल्या, गाद्यांतला कापूस वर येऊन उडूं लागला. आणि कपाटांतले सुंदर कपडे ? छे ! ते सुताचे तुकडे होते !

सुमनच्या भोंवतीं घर होतें कुठें ? ती एका चिमणीच्या घरट्यांत होती–त्या घरट्याभोंवती ती आई पुन्हां पुन्हां फिरत होती—तडफडत फडफडत होती !

सुमन धांवतच मघाच्या फोटोकडे गेली. तिचें सारें शरीर थरथर कांपत होतें. त्या फोटोपुढें हात जोडून ती उभी राहिली आणि म्हणाली 'नाहीं, बाबा, मी कध्धी कध्धी हा फोटो फोडणार नाहीं."

'ए वेडे, काय वडबडतेंय्स ?' आईचा आवाज तिनें ऐकला. ती कॉफीचा पेला घेऊन वर आली होती. तिनें पेला खिडकींतच ठेवला आणि आणि सुमनला जवळ ओढून घेऊन ती म्हणाली, 'वेडी कुठली ? हा फोटो कुठं फुटलाय् ?'

तिच्या कुशींत तोंड लपवीत सुमन म्हणाली 'मी वेडी नाहीं; वाईट आहे—अगदीं खूप खूप वाईट आहे.'

लगेच आवंढा गिळून ती आईपासून दूर झाली. आणि शांतपणानें, म्हणाली 'आई, मला मार—खूप खूप मार.'

पोरीला वेडबीड तर लागलें नाहीं ना असें वाटून किंचित् सभय दृष्टीनें आई तिच्याकडे पाहूं लागली. 'मार, तूं आई मला. अगदीं कालच्या सारखं, सकाळच्या सारखं मार. काल फळीवरनं मी आणेली चोरली होती.'

सुमननें पुन्हां आईच्या कुशींत तोंड खुपसलें. आईनें तिच्या पाठीवरून हात फिरविला, तिची मान वर केली आणि तिच्या अश्रुपूर्ण चेहऱ्याचा मोठ्या मायेनें मुका घेतला.

सुमनचें सारें दुःख कुठल्या कुठें पळालें. आतां तिचा गाल ठणकत नव्हता, अंग दुखत नव्हतें, तिला भूक लागली नव्हती ! ती काळी काळी चिचुंद्री नव्हती, पांढरा शुभ्र ससा झाली होती ती आतां ! !

आईनें पुन्हां तिच्या ओठांवर आपले ओठ ठेवले. पिलांच्या चोंचींत चोंच घालणारी ती चिमणी सुमनच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. ती एकदम आईला घट्ट मिठी मारून म्हणाली 'आतां मी तुझ्यावर कध्धीं कध्धीं रागावणार नाहीं. तूं कितीही मारलंस तरी घरांतून जाणार नाहीं.

—०००—



"आपल्याला पाहून काय पण पळताहेत या गाड्या !"

श्यामला हें एक स्वप्न आहे, सुखस्वप्न आहे. तें वस्तुस्थितींत कधीं अवतरत नाहीं; पण प्रत्यक्षावर स्वप्नाचा आरोप केला जातो, इतकेंच !




प्राचीन व मध्ययुगीन, संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत, विशेषतः काव्यांत श्यामा व श्यामला या संज्ञा वारंवार योजण्यांत येतात. श्याम व श्यामल हीं रंगांचीं नांवें आहेत. काळा किंवा काळसर; आणि श्यामा किंवा श्यामला म्हणजे त्या वर्णाची स्त्री. पण या संज्ञा सकृद्दर्शनीं दिसतात तेवढया सरळ नाहींत; कारण कोषकारांनीं व काव्यावरील टीकाकारांनीं संदर्भानुसार त्यांचे वेगवेगळे अर्थ दिलेले आहेत; आणि मला वाटतें, कवींनींही या संज्ञांचा उपयोग स्वप्नवृत्तीनें व थोडयाबहुत ढिलाईनेंच केलेला आहे.

अमरकोषांत श्याम व श्यामल या शब्दांचा अर्थ धीवर्गांत दिलेला आहे: 'कृष्णे नीलासित श्यामकालश्यामलमेचकाः ।' कृष्ण, नील, असित, श्याम, काल, श्यामल व मेचक हीं सात नांवें काळ्या रंगाचीं. मात्र कोषकारांनीं किंवा टीकाकारांनीं श्याम व श्यामल या शब्दांतील फरक सांगितलेला नाहीं. श्याम म्हणजे काळा, निळा काळा. उत्तररामचरितांत अरुन्धती लवाच्या कांतीचें वर्णन ( ४–१९ ) 'कुवलयदलस्निग्धश्याम'– 'नीलकमलाच्या पाकळीसारखी तकतकीत व श्यामवर्ण,' असें करतें. पण नीलकमलाचा वर्ण काळा भासण्याइतका गडद कधींच नसतो. मेघदूतांत कालिदासानें गोपवेषधारी विष्णूच्या व मेघाच्या वर्णाला अनुलक्षून श्याम ही संज्ञा वापरली आहे: " येनश्यामं वपुरतितरां कान्तिमापत्स्यते ते । बर्हेणेव स्फुरितरुचिना गोपवेषस्य विष्णोः ॥ " ( १–१५ ). " श्रीकृष्णाचें श्याम शरीर मयूरपिच्छांच्या मुकुटानें शोभतें त्याप्रमाणें तुझें काळें भोर शरीर इंद्रधनुष्यामुळें शोभायमान दिसेल. " कृष्ण काळा होता, पण सुंदर होता, म्हणूनच त्याला श्यामसुंदर म्हणतात. कृष्ण काळा होता, पण काळा कुळकुळीत नव्हता; त्याची कांति सांवळी होती. आभाळांत काळेभोर मेघ दाटले, असें आपण म्हणतों, पण ते काळेकुट्ट नसतात, काळे सांवळे असतात, कारण त्यांच्या मागें नील नभाची पार्श्वभूमि असते; तसाच कृष्णाचा वर्ण होता, म्हणूनच त्याला मेघश्याम घननीळ म्हणतात. श्यामकण्ठ म्हणजे नीलकण्ठ, शंकर. हलाहल प्राशनानें त्याचा कण्ठ काळवण्डला होता; अर्थात श्यामवर्ण म्हणजे नीलवर्ण. मेघदूतांत कालिदासानें श्याम हा शब्द आणखी एका ठिकाणीं दशार्ण देशाचें वर्णन करतांना वापरलेला आहे. " त्वय्यासन्ने परिणतफलश्यामजम्बूवनान्ताः । ( १–२३ ); फलांच्या पक्वतेनें श्यामवर्ण झालेलीं जांभूळवनें ज्याच्या ठायीं आहेत असा देश. येथें श्याम याचा अर्थ गडद जांभळा असा होतो. रघुवंशांत ( १३–५३ ) श्याम हें एका वटवृक्षाचें अभिधान असल्याचें नमूद केलेलें आहे: " त्वया पुरस्तादुपयाचितो यः सोऽयं वटः श्याम इति प्रतीतः । " पण वटवृक्षाची कांति काळी नसते, निळी काळी नसते, किंवा जांभळीही नसते. श्याम या शब्दाचे कोषकारांनीं दिलेले आणखी अर्थ पहा: काळा-सांवळा; गहिरा हिरवा; गोजिरा निळा; फिका तपकिरी. या वेगवेगळ्या अर्थांवरून श्याम वर्णाबद्दल स्पष्ट कल्पना येत नाहीं. अमरकोषांत काळ्या रंगाला जशीं सात नांवें दिलेलीं आहेत तसेंच पांढऱ्या रंगाला सोळा शब्द दिलेले आहेत. हे व इतर वर्णांना असेच दिलेले अनेक शब्द हे निवळ प्रतिशब्द नाहींत, त्यांमध्यें सूक्ष्म भेद आहेत. विशिष्ट वर्णांत असलेली दुसऱ्या वर्णाची छटा व्यक्त करण्यासाठीं जो तो शब्द निवडून वापरावयाचा, अशी योजना असली पाहिजे. हें लक्षांत न घेतां आपण शब्दांची योजना भोंगळपणें करतों. अमरकोषांत पांढऱ्या वर्णाला पांडुर व गौर हे शब्द दिलेले आहेत. त्यांमधील फरक उलगडून न सांगतांही समजण्यासारखा आहे. गौर हा शब्द पिंवळ्या रंगाचाही वाचक आहे असेंही अमरकोषांत सांगितलेलें आहे. यावरून दिसतें कीं श्वेत वर्णांत पीत वर्णाची छटा असली म्हणजे त्या कांतीला गौर म्हणावयाचें; आणि तसा प्रघात आहेही. त्याचप्रमाणें कृष्ण अगर नील वर्णांत गौर वर्णाची किंवा गौर वर्णांत कृष्ण अगर नील वर्णाची छटा असली म्हणजे त्या कांतीला श्याम किंवा श्यामल म्हणावयाचें, असा संकेत असला पाहिजे, असें वाटतें.

श्यामा व श्यामला हे शब्द श्याम व श्यामल या वर्णवाचक शब्दांवरून सिद्ध झालेले आहेत व ते समानार्थी आहेत, हें उघड आहे. तरीही त्यांचेही बाबतींत अशीच अनिश्चितता आहे. श्यामा या शब्दाचे आणखी अर्थ पहा: श्यामा म्हणजे रजनी–विशेषतः कृष्णपक्षांतली. श्यामा म्हणजे तुळस, दुर्वा, प्रियङ्गु, निशोत्तर, उपरसाळी. श्यामा म्हणजे दुर्गा, यमुना. श्यामा स्त्री म्हणजे यौवनमध्यस्था. एक व्याख्याकार सांगतो: " अप्रसूता भवेत् श्यामा श्यामा षोडशवार्षिकी । श्यामा च श्यामवर्णा च श्यामा मधुरभाषिणी ॥" पहिल्या ओळीला भिन्न पाठ आहे, तो असा: " अप्रसूता भवेत् श्यामा तन्वी च नवयौवना ।" आणखी एक टीकाकार सांगतो: " शीते सुखोष्णसर्वाङ्गी ग्रीष्मे या सुखशीतला । तप्तकांचनवर्णाभा सा स्त्री श्यामेति कथ्यते ॥ "अनङ्गरङ्गांत पद्मिनीच्या वर्णनांत सांगितलेलें आहे– "श्यामा कापि सुवर्णपंकज निभा:". या व्याख्या वा वर्णनें विषय सुगम करण्याऐवजीं वाचकाला अधिकच घोंटाळ्यांत टाकतात.

कालिदासानें अनेक नायिकांचीं शब्दचित्रें रंगविलेलीं आहेत. त्यांपैकीं मेघदूतांतील नायिका हीच काय ती त्यानें संपूर्णतया स्वतंत्रपणें निर्माण केलेली आहे. तिचें वर्णन पहा:

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी ।
मध्ये क्षामा चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः ॥
श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्याम् ।
या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः ॥

विदग्ध व विलासी प्राचीन भारतीय तरुणांच्या स्त्रीविषयक अपेक्षांचें सारसर्वस्व कालिदासानें या श्लोकांत ग्रथित केलेलें आहे. या श्लोकांत त्यानें श्यामा या संज्ञेचा जाणून उपयोग केलेला आहे. टीकाकारांनीं मात्र वैयक्तिक प्रवृत्तींच्या व उपलब्ध वचनांच्या अनुरोधानें या संज्ञेचे वेगवेगळे अर्थ

केलेले आहेत. श्री. वामनशास्त्री इस्लामपूरकर यांचें भाषांतर ( काव्यार्थ-दीपिका टीका. पृ. २०५ ) पहा. " अंगानें सडपातळ, तारुण्याच्या ऐन भरांत आलेली, जिचे दांत कुन्दाच्या कळ्यांप्रमाणें अणकुचीदार आहेत, जिचा अधरोष्ठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल आहे, जिची कटि बारीक आहे, भयभीत हरिणीप्रमाणे जिचे नेत्र चंचल आहेत, जिची नाभि खोल आहे, कटिपश्चात् भागाच्या भारांमुळें जी फार हळूहळू चालते, स्तनभारेंकरून किंचित् वांकलेली व तरुण स्त्रिया निर्माण करण्याच्या कामांत ब्रह्मदेवाची केवळ अधिसृष्टीच अशी त्या ठिकाणीं जी स्त्री असेल—तिला त्वां ओळखावें." या श्लोकावरील टीकेंत मल्लिनाथानें सांगितलें आहे. " श्यामा युवतिः श्यामा यौवनमध्यस्था इति उत्पलमालायाम् ।" हाच अर्थ शास्त्रीबुवांनीं स्वीकारलेला आहे. सर विल्यम जोन्स यांनीं या श्लोकाचें भाषांतर करतांना ' श्यामा ' हा शब्द ( Meghaduta: Calcutta, 1901; p. 23 ) अजिबात गाळला आहे. स्थिरदेव मात्र मूळ अर्थापासून ढळला नाहीं. तो सांगतोः " तन्वी कृशतनु इत्याकारचारुता । श्यामा श्यामला इति वर्णाभिरामता ।" ( डॉ. परांजपे संपादित आवृत्ति, १९३५, पृ. ९४ ) मेघदूतांत 'श्यामा' हा शब्द आणखी एका श्लोकांत आलेला आहे. " श्यामास्वङ्गं चकितहरिणी प्रेक्षिते दृष्टिपातम् ।" यावरील टीकेंत मल्लिनाथ सांगतोः " श्यामासु प्रियङ्गुलतासु । अङ्गं शरीरमुत्पश्यामि । सौकुमार्यादिसाम्यादङ्गमिति तर्कयामीत्यर्थः ।" आणि स्थिरदेव सांगतोः " श्यामासु प्रियङ्गुलतासु अङ्गं वपुः । श्यामत्वतनुत्वाभ्यां तत्सादृश्यम् । " या विवेचनावरून दिसून येईल कीं मेघदूतांतील श्यामा हा शब्द नायिकेच्या वयाचा द्योतक नसून तो तिच्या कांतीचा वाचक आहे.

गाथासप्तशती या आद्य महाराष्ट्री प्राकृत सुभाषितसंग्रहांत श्यामा व श्यामला या संज्ञा अनेक वेळां आलेल्या आहेत :

| छायेंतील संस्कृत रूप | मूळांतील प्राकृत स्वरूप | क्रमांक |
|---|---|---|
| श्यामा — — — | सामली — — | १२३ |
| ,, — — — | सामा — — | ९६३ |
| ,, — — — | सामाइ — — | १८०.४३९ |
| श्यामला — — | सामली — — | १८०.१८९ |
| | | २३८.७५८ |
| श्यामलाङ्गी— — | सामलङ्गी — | ५५५ |

अर्थनिश्चिति किंवा अर्थानिर्मिति यांसाठीं शब्दांची ओढाताण व विश्लेषण सुरू होण्यापूर्वीचा आणि कालिदासानें श्यामा ही संज्ञा रूढ व प्रिय करण्यापूर्वीचा हा सुभाषित संग्रह असल्यामुळें त्यांतील उल्लेखांवरून अर्थनिश्चितीस कांहीं आधार मिळतो किंवा कसें हें आपण पाहूं.

प्रथम वर नमूद केलेल्या गाथा अनुक्रमानें देतों :

**१२३ प्रसूति-वैराग्य.**

हासाविओ जणो सामलीअ पढमं पसूअमाणाए ।
वल्लहवाएण अलं मम त्ति बहुसो भणन्तीए ॥

" श्यामा प्रथम बाळंतीण झाली तेव्हां वल्लभाचें नांव घेण्याबद्दल तिच्या मैत्रिणी तिला आग्रह करूं लागल्या; तेव्हां ती पुन्हां पुन्हां म्हणाली, त्याला 'माझा वल्लभ म्हणूं नका ( ग सख्यांनो; यापुढें ) मी त्याचें नांव सुद्धां घेणार नाहीं; मग साऱ्या जणी हसूं लागल्या."

**१८० जांभळाची डिकशी**

सहिआइ सामलिज्जइ अद्धच्छिपलोइरीअ मुहसोहा ।
जम्बूदलकअकण्णावअंसभरिए हलिअपुत्ते ॥

" जांभळाचें पान अलंकार म्हणून कानावर धारण करून शेतकऱ्याचा मुलगा भटकूं लागला. श्यामलेनें हें दृश्य अर्धा मिटलेल्या डोळ्यांनीं पाहिलें, तेव्हां तिच्या डोळ्यावरील शोभा काळवंडून गेली."

**१८९ उच्छिष्टग्रहण**

तुज्झङ्गरागसेसेण सामली तह खरेण सोमारा ।
सा किर गोलाऊले ह्लाआ जम्बूकसाएण ॥

" श्यामला सुकुमार आहे, तरी तुझ्या अंगाचा ( अप्रत्यक्ष ) संग मिळावा म्हणून तुझ्या अंगाला लावून राहिलेलें जांभळाच्या रसाचें कडक उटणें आपल्या अंगाला लावून ती गोदातीरावर स्नान करीत आहे."

**२३८ बैल**

विक्किणइ माहमासम्मि पामरो पाइडिं वइल्लेण ।
णिद्धूमसुम्मुर व्विअ सामलीअ भणो पडिच्छन्तो ॥

" धूम्ररहित अग्निगोलांसारखे लकाकणारे श्यामलेचे स्तन पाहतांच गरीब शेतकऱ्यानें ऐन हिंवाळ्यांत आपली ऊबदार पांघरुणें देऊन शेतकामासाठीं बैल खरेदी केला."

**४३९ हेवा**

सामाइ गरुअजोव्वणविसेस भरिए कवोलमूलम्मि ।
पिज्जइ अहोमुहेण व कण्णवअंसेण लाअण्णम् ॥

" श्यामलेचें यौवन ओसंडून चाललें आहे. यौवनानें तिचे गाल गुबगुबीत झाले आहेत, तिच्या कानावरील अवतंसही अधोमुख होऊन जणूं तिच्या लावण्याचें पान करीत आहे."

—एकदांच नव्हे, अनेकदां; कारण श्यामलेच्या प्रत्येक पदन्यासाशीं अवतंसाच्या डोलण्यानें ताल धरलेला आहे.

**५५५ विनयभङ्ग**

पत्तणिअम्बप्फंसा ण्हाणुत्तिण्णाएँ सामलङ्गीए ।
जलबिंदुएहिं चिहुरा रुअन्ति बन्धस्स व भएण ॥

" श्यामला न्हात होती तेव्हां तिच्या केसांनीं तिच्या नितंबांना स्पर्श केला; या अपराधासाठीं स्नानानंतर ती आपणांस बांधून टाकील या भीतीनेंच जणूं ते अश्रु ढाळूं लागले."

**७५८ महायुद्ध**

तुह सामली ! धवलचलंततरलतिक्खग्गलोयणवलेण ।
मयणो पुणो वि इच्छइ हरेण सह विग्गहारंभ ॥

" श्यामलेचे डोळे स्वच्छ व तेजस्वी आहेत आणि तिची नजर चंचल व तीक्ष्ण आहे; तिची दृष्टि पाहून वाटतें कीं जणूं मदनाला शंकराबरोबरचें युद्ध पुन्हां आरंभावयाचें आहे."

**९६३ प्रजापति**

अण्णं लहुअत्तणअं अण्णं च्चिअ का इ वत्तणच्छाआ ।
सामा सामण्णपआवइणो रेह च्चिअ ण होइ ॥

" श्यामलेच्या शरीराची कोमलता अद्वितीय आहे आणि तिची अंगकांतीही विलक्षण आहे. सर्वसामान्य प्रजापतीनें हिला निर्माण केली असावी असें वाटत नाहीं."

'प्रसूतिवैराग्य' या गाथेवरील टीकेंत श्यामा म्हणजे युवती असें गंगाधर सांगतो. या गाथेची नायिका नुकतीच प्रसूत झालेली असल्यामुळें 'अप्रसूता भवेत् श्यामा,' हें लक्षण येथें लागू पडत नाहीं, आणि येथील श्यामा हा शब्द वर्णवाचक आहेच असें म्हणतां येत नाहीं. 'जांभळाची डिकशी' या गाथेचा नायक डिकशी कानावर ठेवून गांवभर भटकूं लागलेला पाहून

अनुक्रमणिका






श्यामल नायिकेच्या मुखावरील शोभा काळवंडली—हा उल्लेख निःसंशय वर्णवाचक आहे. श्यामलेनें शेतकऱ्याच्या पोराबरोबर जांभळीच्या झाडाजवळ संकेत ठरविला आणि स्पष्ट खुलासा करणें अशक्य असल्यामुळें त्याबद्दल सूचना म्हणून त्याला जांभळाचें पान दिलें; पण तो एवढा अडाणी कीं त्याला हा संकेत समजला नाहीं आणि लगोलग तिकडे जाण्याऐवजीं तें तिनें आपल्याला दिलें एवढ्यावरच खूष होऊन तें कानावर ठेवून मोठ्या तोऱ्यांत तो गांवच्या रस्त्यांतून भटकूं लागला. विचारीचा केवढा हिरमोड झाला असेल ? शिवाय त्याच्या बडबडीमुळें बोभाटा होण्याची धास्ती वाटल्यामुळें तिच्या मुखावरील शोभा काळवंडली. मूळांतील शब्द 'सामाइ सामलिज्जइ'—'श्यामायाः श्यामलायते' असे आहेत, आणि टीकेंत गंगाधरानें " श्यामाया मुखशोभा संकेतसमयलङ्घनवैलक्ष्येण खेदेन च श्यामलायते ।' असें सांगितलेलें आहे. 'उच्छिष्टग्रहण' या गाथेंतील 'सामली' हा शब्द वर्णवाचक नाहीं असें सकृद्दर्शनीं भासतें—पण कवीनें जम्बूकषायाचा उपयोग करून नायिकेचा वर्ण सूचित केलेला आहे असें वाटतें. "बैल" या गाथेची नायिका 'शीते सुखोष्ण सर्वाङ्गी' अशी असून तिची अंगकांति तप्त सुवर्णासारखी पिंवळी धमक व धगधगीत नसली तरी प्रज्वलित अङ्गुरासारखी लकलकीत, तप्त ताम्रासारखी आहे, हें निश्चित. 'हेवा' या गाथेच्या नायिकेबद्दल गंगाधर सांगतोः 'श्यामाया उत्तमनायिकायाः ।' ही नायिका केवळ 'षोडशवार्षिकी' नसावी, 'यौवनमध्यस्था' असावी असें वाटतें. या नायिकेचा वर्ण ध्वनीनेंही सूचित केलेला नाहीं. 'विनयभङ्ग' या गाथेची नायिका सामलङ्गी—श्यामलाङ्गी आहे. हा उल्लेख स्पष्टपणें वर्णवाचक आहे. शिवाय केशांच्या साहचर्यानेंही तिचा वर्ण ध्वनित केलेला आहे असें वाटतें. 'महायुद्ध' या गाथेंतील नायिकेचा वर्ण कवीनें वर्णिलेला नाहीं. 'प्रजापति' या गाथेच्या नायिकेची अंगकांति विलक्षण असामान्य असल्याचें विधान कवीनें केलेलें आहे; इतकी असामान्य कीं सर्वसाधारण जीवसृष्टि निर्माण करणाऱ्या विधात्याहूनही अधिक कुशल अशा कारागिरानें तिला निर्माण केलेलें असलें पाहिजे, असें प्रेक्षकाला वाटावें.

आणि हेंच खरें आहे. गाथासप्तशतीच्या संपूर्ण प्रतींतील श्यामलेचा हा उल्लेख अखेरचा आहे, एवढेंच नव्हे तर श्यामा या विषयावरील ही हा अखेरचा शब्द आहे !

भारतांत सुखकारक काय असतें ?

कूपोदकं, वटच्छाया, श्यामा स्त्री, इष्टिकागृहम् ।

आणि हीं सुखकारक कां असतात ? कारण—

शीतकाले भवेदुष्णं ग्रीष्मकालेच शीतलम् ॥

आडाचें ताजें पाणी खुशाल प्यावें, कारण तें उन्हाळ्यांतही रुचेल इतकेंच व प्रकृतिला मानवेल तेवढेंच गार असतें; माठांतलें किंवा कृत्रिमपणें गार केलेलें पाणी पिऊं नये, कारण तें फार गार असल्यामुळें धडधाकट प्रकृतीलाही बाधण्याचा संभव असतो. कूपोदक हिंवाळ्यांतही कोमट असतें, कारण भोंवतालच्या भूमींत मुरलेला उष्मा तें धारण करतें. सरोवरांचा विस्तार मोठा असल्यामुळें त्यांचें पाणी हिंवाळ्यांत फार थंड असतें. वडाची छाया दाट असते आणि त्याचीं पानें मोठीं असल्यामुळें त्यांमधून ताजी हवा खेळती राहते. त्यांच्या फांद्या व पारंब्या जवळजवळ व भुईसरपट असल्यामुळें हिंवाळ्या पावसाळ्यांतही वडाखालीं निवारा मिळतो. घर बांधवयाचें



[अनुक्रमणिका](#)






तें विटाचें बांधावें. विट उष्णतावाहक नसल्यामुळें उन्हानें भिंतींची बाहेरली बाजू तापली, तरी घराच्या अंतर्भागांतील गारवा नाहींसा होत नाहीं. स्त्री कशी असावी ? विशेषतः हिंदुस्थानांत ? अर्थात् आपली ! श्यामला ! कां ? कारण ती 'शीते सुखोष्ण सर्वाङ्गी ग्रीष्मे या सुखशीतला ।' अशी असल्या-मुळें सर्व ऋतूंत सुखकारक असते. गौरवर्ण स्त्रिया संसाराच्या धकाधकींत, विशेषतः हिंदुस्थानांत, टिकाव धरूं शकत नाहींत. हा सिद्धांत शास्त्रीय प्रमाणांनीं प्रस्थापित होण्याजोगा नसला तरी तो अनुभवाच्या कसोटीला उतरलेला आहे. 'काळी नार, सकत फार' हें एका लावणींतील वचन येथें उधृत करण्याचा मोह आवरत नाहीं. या वचनांतील उत्तान सूचना वगळली तरी व्यावहारिक सिद्धांत या दृष्टीनें त्याचें महत्व सहज पटण्याजोगें आहे. पण सध्याचें सुधारलेलें व सुसंस्कृत म्हणवून घेणारें जग वर उधृत केलेल्या सुभाषिताची प्रचीति घेण्याच्या मनःस्थितींत नाहीं. विलायतेंतही "Gentlemen Prefer Blondes"; बिचाऱ्या Brunettes!

गौरवर्ण हा पांढरपेशांचा आवडता आणि श्यामवर्ण बहुजनसमाजाचा. गोरा म्हणजे पांढरा शुभ्र नव्हे आणि श्याम वर्ण म्हणजे काळा कुट्ट नव्हे. श्यामला म्हणजे निमगोरी कीं निमकाळी ? कोण जाणे ! श्यामला म्हणजे सांवळी, हेंच खरें. प्रतिशब्द नाहीं. उपमाही नाहीं. कारण देश, काल व वैयक्तिक आवड यांच्या अनुरोधानें या वर्णाची छटा गडद किंवा फिकट होते, इतकेंच नव्हे, त्याच व्यक्तीच्या बाबतींत विशिष्ट परिस्थितीच्या अनुरोधानें ही वर्णाची चलविचल होते. लाल रंगाला जशी मोतिया, किंवा निळ्या रंगाला जसा अस्मानी—तसाच कृष्णवर्णाला श्यामल ! उन्हाची तिरीप लागली कीं जरा मलूल झाल्यामुळें काळसर झालासा भासतो—पण आणखी निरखून पाहिलें कीं त्यावर मोतियाची फिक्की छटा आलेली असावीसें वाटतें ! आणि सांवलीचा आश्रय मिळतांच तो पूर्वपदावर येतो; मनोवृत्ति उत्तेजित होतांच गौरतेकडे झुकतो आणि स्थिरस्थावर होतांच पूर्वपदावर येतो; असा हा वर्ण आहे ! गंगा व यमुना यांचा संगम होतो तेथें गंगेचा गौर व यमुनेचा श्यामल वर्ण यांचा प्रत्यय येतो, असें सांगतात. कल्पना करा: गंगा व यमुना या दोन्ही नद्यांना उन्हाळ्यांतला पूर आलेला आहे हिमालयांत उगम पावणाऱ्या या नद्यांना बर्फ वितळल्यामुळें उन्हाळ्यांतही पूर येतो आणि वितळणारें पाणी सुट्या मातीवरून लोटत नसल्यामुळें पूर आला तरीही या नद्यांचें पाणी गढूळ होत नाहीं; गंगा व यमुना यांच्या पुराच्या पाण्याबरोबर वाहणारें फेंसांचे पुंजके संगमावर एकमेकांत मिसळतील तेव्हां त्यांचा जो दिसेल तो श्यामवर्ण !

आणि श्यामला ? म्हणजे अशा वर्णाची स्त्री. निमगोरी, निमकाळी, श्यामला पण तकतकीत. श्यामला ही सौंदर्याची सीमा, समाधानाचें निधान; अप्रसूता—पण बाला नव्हे; यौवनमध्यस्था—यौवन व प्रौढत्व यांच्या चंचल सीमारेषेवर, एक पाऊल जरा इकडे कीं दुसरें जरा तिकडे, अशा तरल अवस्थेंत असलेली; आड भूतकाळाकडे अपाङ्ग दृष्टीनें अवलोकन करीत असलेली; आणि भविष्यांतील उपभोगांकडे आतुर व आसक्त दृष्टिक्षेप करणारी !

श्यामला हें एक स्वप्न आहे, सुखस्वप्न आहे. तें वस्तुस्थितींत कधीं अवतरत नाहीं; पण प्रत्यक्षावर स्वप्नाचा आरोप केला जातो, इतकेंच.

> मनुष्य हा विरोधांचा संचय आहे. म्हणूनच त्याचें तें वैशिष्ट्य आहे. देवदर्शनाचा नवस फेडून नास्तिकांच्या मनाला मीं धक्का दिला! नवसाला देव पावतात, हें पावत नाहींत इतकेंच खरें नाहीं का?




'तुम्ही हा नवस केव्हां केला? आणि केलेला नवस फेडणार? दोन्ही आश्चर्य वाटण्यासारख्या गोष्टी आहेत!' जो व्यक्ति हें बोलली ती सामान्य व्यक्ति नाहीं. आज मुंबई इलाख्यांतील राजकारणांत एक मानाचें स्थान असलेली ती व्यक्ति होती. इतर कोणी असता तर फटकळपणें मी उत्तर देऊन मोकळा झालों असतों. सामान्य माणसांना डाफरावयाचें व अधिकारपदावर असलेल्यांना गोंजारावयाचें हा सर्वसाधारण आचारधर्म आहे. तथापि लोकशाहींत सामान्य माणूस असामान्य महत्त्व पावला आहे. प्रत्येक पुढाऱ्याला त्याची काळजी वाटत आहे. प्रत्येक शिक्षणतज्ञ, यांच्यासाठीं झुरत आहे. लाल बावटेवाल्यांची सर्व खूनखराबी त्या विचाऱ्यासाठीं आहे. साम्यवादी सर्व तत्वज्ञान व सर्व आचारविसंगति त्याचे उद्धारार्थ आहे अशी श्रद्धा बाळगतात. सर्वोदयवादी तो एकदम श्रीमंत होऊन बावरून जाऊं नये म्हणून त्यास प्राप्त हेंच श्रेष्ठ व कल्याणकारक आहे असें सांगत आहेत. या सर्व गोष्टी व हें असलें वातावरण मजभोंवतीं असूनसुद्धां सामान्य माणसाला डिवचण्यास मी कमी केलें नसते. कारण पाय दिल्याशिवाय नाग फणा काढीत नाहीं, व फुंकर मारल्याशिवाय अग्नि प्रज्वलित होत नाहीं. सामान्यांच्या अपमानांतूनच क्रान्ति निर्माण होते असा माझा दृढ विश्वास आहे. जगांत सर्वांशीं नम्रतेनें वागून कार्य होत नाहीं व प्रसिद्धि तर त्याहून मिळत नाहीं. कोणीच टीकाकार नसले तर राजकारणी पुरुषाला कसेसेंच होतें. मात्र फार टीकाकार झाले तर भलतेंच होतें. तात्पर्य राम रावणामुळें प्रसिद्धि पावला व आजचे जगांतही हाच अनुभव आहे. महात्माजींना त्यांचे मारेकऱ्यानें अजरामर केलें व आजचीं मंत्रीमंडळं टीकामुळेंच तरांरून आहेत. या सर्व अनुभवांचा मी दृष्टा व भोक्ता आहें. म्हणूनच जमेल तेथें व पचेल त्यांची रेवडी अर्थात् सभ्य शब्दांत उडविण्याची माझी संवय मला एक सद्गुणस्वरुपि वाटते. प्रश्न विचारणारी व्यक्ति जरी सामान्य नव्हती तरी टिंगल उडविण्याची माझी प्रवृत्ति जवळजवळ कार्यान्वित झाली होती, पण—

ज्या विषयाबाबत नवस केला होता तो गंभीर होता, ज्या ऐतिहासिक पार्श्वभूमीवर तो केला होता ती उन्नत होती. ज्या वयांत केला होता तें उमेदवारीचें वय होतें. ज्या कालांत केला होता तो काल महान् घटनांनीं गजबजला होता. १९१८ च्या मार्च अखेरीची ती गोष्ट आहे. मुंबई विश्वविद्यालयाची बी. ए. ची परीक्षा संपली होती. पेपर्स बरे गेले होते व पास होण्याची खात्री होती. आम्हीं पुण्यांतील एका कॉलेजांतील एकच ऐच्छिक विषय असलेले तीन विद्यार्थि बरोबर अभ्यास करीत होतों व मुंबईसही बरोबर येऊन एकाच ठिकाणीं राहिलें होतों. परीक्षा संपल्यामुळें डोक्यावरील ओझें कमी झालें होतें. विद्यार्थिदशा संपली म्हणून आनंद झाला होता. पुढें काय याची चर्चा जरी अकाली होती तरी थोडीशी आम्हीं केलीही. पुण्यास परत



गेल्यानंतर व निकाल होईपर्यंत महाराष्ट्रांत कुठें हिंडावयाचें, याचाही मनसुबा केला. १९१८ साल म्हणजे होमरूल चळवळीच्या प्रकर्षाचें तें साल होतें. परीक्षेच्या सुमारास चिरोल केसचाही बोलबाला चालला होता. राजकीय वातावरण गरमागरम होतें. गव्हर्नरच्या सभेंतून टिळक उठून गेल्याची घटना ताजी होती. मराठी व इंग्रजी पत्रें जोरांत लिहीत होतीं. महायुद्ध संपलें नव्हतें, पण अखेरची कलाटणी त्यानें घेतलेली दिसत होती. आम्हां तरुणांना कुठल्यातरी नव्या युगाचे उंबऱ्यावर उभे आहोंत असें वाटत होतें. ब्रिटिशांचें राज्य असह्य वाटत होते. तथापि प्रचंड युद्ध इंग्लंड जिंकणार व मग या देशाचें काय होणार याची काळजी अनेकांना वाटत होती. मॉन्टेग्यु-साहेबाचा रिपोर्ट अद्याप बाहेर पडला नव्हता. त्यावर आशा देऊन अनेक व्यक्ति व पक्ष प्रचार करीत होते. आशानिराशा यांचें द्वंद्व चालू होतें. अनेक व्यक्ति कारागृहांत करम्त होत्या. अनेकांचे मागें पोलिसी भुंगे चालूच होते. आईबापांना जेवढी मुलांबद्दल माहिती नव्हती तेवढी जिल्ह्याचे पोलिस अधिकाऱ्याजवळ असे. आम्हीं तरुण एकत्र जमत असूं. कांहीं विचारही करीत असूं. देवपूजनापासून देहपातापर्यंत स्वप्नें आमच्या डोळ्यांपुढें येत, चहा सोडण्यापासून प्राणयज्ञापर्यंत आमचीं मनें हेलकावे खात होतीं. जे मार्गदर्शक दिसत ते बोलण्यांपलिकडे जात नव्हते. जे दहशतवादी भेटते ते प्रथम बिचकत, पुढें थापा मारत व शेवटीं निरुपयोगी ठरत. मनें कावरीबावरी होत होतीं, कारण आदर्श निश्चित झाले नव्हते. तथापि स्वातंत्र्यासाठीं वाटेल तें करण्याची तयारी असणारा असा लहान कां होईना तरुणांचा वर्ग होता. पर्वतीमागें जमावे, वनविहारांचे निमित्तानें बाहेर जाऊन मसलती कराव्यात. पण यांपलीकडे प्रयत्न सरकत नव्हते. साधनांचें शुचित्व त्यावेळीं तेजींत नव्हतें. 'भाईयुग' भविष्याचे उदरांत होतें व 'ताईयुग' कधींतरी येईल असें कोणालाही वाटत नव्हतें. तात्पर्य, तें सामान्य युग नव्हतें व ती पिढीही अगदीं मामुली माणसांची नव्हती. आमच्या मनःप्रवृत्ति कालानुरुप होत्या. प्रेरणेसाठीं इतिहासाकडे पाहत होतों. प्रयत्नासाठीं स्वतःचे कुवतीकडे. यश सर्वस्वीं प्रयत्नाधीन आहे असें वाटत असलें तरी भगवंताचें अधिष्ठान असावें असें वाटत होतें. या व अशा वैचारिक संदर्भात पुढें काय करावें याचा विचार करीत होतों, सहज कल्पना निघाली कीं, मुंबईहून पुण्यास पायीं जावें. तथापि माझे मनांत फार दिवस वसईचा किल्ला पाहावा असें होतें. त्रिवर्गांना हा विचार पटला हा किल्ला पाहून मुंबईस यावयाचें व तेथून पुण्यास पायीं जावयाचें.

दुसरे दिवशीं आम्हीं वसईस गेलों. किल्ल्यांतील धड व पडक्या इमारती पाहिल्या, गणपतीचे देऊळाबरोबर येशूचें पवित्र मंदीर पाहिलें. आमचा वाटाड्या प्रत्येक इमारतीबद्दल आस्थेनें सांगत होता. एका इमारतीजवळ येतांच त्यानें सांगितलें कीं, या वास्तूंत बसून बाजीरावानें १८०३ सालीं तह करून तामुखीला घरांत घेतलें. चिमाजी अप्पानें हा किल्ला जीवाची तमा न करतां फिरंग्याकडून घेतला व त्याच्या नष्ट

[अनुक्रमणिका](#)




वंशजानें केवळ जिवाच्या तुमेसाठीं हा व अनेक किल्ले व प्रदेश परक्यांना दिले. या शंभर वर्षांतला इतिहास डोळ्यांसमोर आला. भाग्याचे चढ-उतार हर्ष व खेद उत्पन्न करतें झाले. १८०२ नंतरचें शतक डोळ्यापुढें आलें. बुडलेला पुरुष जसा गोते खातो तसेंच या देशाचें चालू आहे म्हणून विषाद वाटला. वर सूर्य तळपत होता. ऊन हाय हाय करीत होतें. मन तळमळत विषण्ण झालें होतें. मधून मधून बाजीरावाबद्दल त्वेषाचा झटका येत होता. पानिपताहून पळालेल्यांना मनांत उद्धार करीत होतों. मुत्सद्यांच्या चुका शोधून नांवें ठेवत होतों. सेनापतींच्या योजनांत दोष काढीत होतों. तथापि हें सर्व करून आतां काय? आज १९१८ मध्यें जळींस्थळीं व नभीं परराज्य दरोबस्त ठाण मांडून आहे. तृणवत् जगावें अगर मरून जावें या शिवाय तिसरा विकल्प दिसत नव्हता. विचारांचा प्रवाह मनाचा बांध मोडून बाहेर पडण्याच्या मर्यादेपर्यंत आले. भावनांनीं हृदयाचा कबजा घेऊन त्याला स्फोटक परिस्थितीपर्यंत आणलें. माझें अस्तित्व मला असह्य झालें. कांहीं तरी झाल्याशिवायच कांहीं तरी वेडेंवांकडें होईल असेंही वाटूं लागलें. काय झालें कोणाला ठाऊक, माझें लक्ष डोक्यावरील छत्रीकडे गेलें व ताडकन् अंगांत यावें, त्याप्रमाणें मीं छत्री बंद केली व ओरडलों, "होय, याच ठिकाणीं मराठ्यांचें राज्यछत्र मोडण्यांत आलें. मी कांहींच करूं शकत नाहीं, हें खरें. निदान तोंपर्यंत ही विलायती छत्री तरी मीं डोक्यावर घेणार नाहीं," असें म्हणून ताडकन् तिला जमिनीवर आपटून समोरच्या तळ्यांत फेंकून दिली. मन मोकळें झालें. दांटलेला कंठ साफ झाला. सुतक संपल्यावर स्नान केल्यानंतर मनाला जी एक प्रसन्नता येते ती आली. माझे दोघे मित्र चकित झाले, पण माझा चक्रमपणा त्यांना अपरिचित नव्हता. ते बोलले नाहींत. आम्हीं तिघे मुंबईस परत आलों तरी माझ्या डोळ्यांपुढें वसईचा किल्ला अद्याप माझ्या भावनांशीं लढत असलेला दिसत होता.

दुसऱ्या दिवशीं अवजड सामान म्हणजे परीक्षेसाठीं आणलेलीं पुस्तकें व अन्य एका मित्राबरोबर आम्हीं पुण्यास गाडीनें धाडून दिलें. प्रत्येकीं एक लहान पिशवी, ज्यांत सतरंजी, धोतर, टॉवेल व सदरा याप्रमाणें पाथेय घेऊन आमच्या प्रवासास आम्हीं प्रारंभ केला. साधारणपणें कोणत्या गांवीं जावयाचें याचें टिपण केलें होतें. पुण्यापर्यंत पायीं जावयाचें हें ध्येय होतें. तथापि प्रसंग पडल्यास गाडीनेंही जाणें भाग पडेल हें आम्हीं जाणून होतों. तात्पर्य, योजना व डावपेंच यांचा समन्वय कार्यसिद्धीसाठीं व्हावा लागतो हें आम्हीं जाणून होतों. इतिहासाचे आम्हीं विद्यार्थि असून अर्थशास्त्र व राज्यशास्त्र हे आमचे ऐच्छिक विषय होते. अर्थशास्त्र व राजकारण यांतील सिद्धांत सापेक्ष असतात, व इतिहास केव्हांही पलटी खात असतो, हें आम्हीं जाणून होतों. 'मराठ्यांचें बळ पायांत आहे' ही महादजी शिंद्याची उक्ति आम्हांला माहित होती. जें करावयाचें तें केल्यानंतर तेंच अनिवार्य होतें, व तेंच योग्य होतें, हा मुत्सद्देगिरीचा पहिला सिद्धांत माहीत होता, पण प्रयोगांत आणला नव्हता. सांगण्याचा मुद्दा असा कीं, गिरगांवांतील मुक्कामापासून दादरपर्यंत गेल्यानंतर नुसतीं घरें व गर्दी पाहण्यांत काय अर्थ आहे, असा विचार मनांत आला. पायीं प्रवासाचें हें का ध्येय आहे? प्रवासांतील अनुभव म्हणजे कांहीं एक आमची विशिष्ट कल्पना होती. पाय थकले होते ही सत्यकथा होती, पण निर्णयासाठीं विचारांत घेण्यांत येण्यासारखी ती बाब महत्त्वाची नव्हती. महत्त्वाची गोष्ट क्षुद्र व क्षुल्लक लेखून, क्षुद्र गोष्टीला तत्त्वाचें स्वरूप देऊन प्रतिपक्षाला गोंधळावयाचा, व त्याची नैतिक अप्रतिष्ठा करावयाची, ही रामराज्यांतील नीति त्या वेळीं स्पष्ट नव्हती. पण तिचें जनकत्वच जर शोधावयाचें असलें तर आमच्यापैकींच कांहींना तो मान द्यावा लागेल. ज्या गोष्टीबद्दल जिद्द धरली तर पराभव नक्की होणार हें समजून कुठली तरी दुय्यम गोष्ट पणाला लावून ती मिळतांच प्रचंड जय झाला म्हणून गाजावाजा करावयाचा हें तत्व आम्हीं त्या वेळीं कॉलेजचे अधिकारी यांच्याशीं झगडतांना अमलांत आणीत असूं. तपशीलवार चर्चा करण्याचें हें स्थान नाहीं. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, स्वतःला फसविण्याची कला आम्हीं हस्तगत केली होती. व आमचें म्हणणें सत्य म्हणून सर्व मानतात असा आमचा ग्रह होता. पायीं प्रवासाच्या जाहिराती आधींच पुढें गेल्या होत्या. एका तपानंतर झालेल्या 'दांडीकूच' चें हें कदाचित् ट्रेलरही म्हणतां येईल! दादरचे स्टेशनवर आम्हीं तिघे विचारार्थ आलों. कुठें तरी बसावयाचें म्हणून स्टेशन योजलें. गाडीनें गेलो तर वेळ वाचेल, केवढी मौलिक कल्पना वाटली!! नाहीं तरी मुंबई ते ठाणें पाहण्यासारखें काय आहे? ज्ञानानें माहिती पुरविली. झालें. ठाण्यापर्यंत गाडीनें जाण्याचा निर्णय ठरला व कार्यक्षम सनदी नोकराप्रमाणें आम्हीं तो झटपट अमलांत आणला. कांहीं मिनिटांत ठाणें आलें. तेवढा तेथें फक्त आम्हांला किल्ला पाहावयाचा होता.

उतरल्यावर चौकशी करूं लागलों, पुष्कळ लोक रस्ता दाखवीत पण चमत्कारिक रीतीनें आमच्याकडे बघत. आम्हीही थोडे कावरेबावरे झालों. तथापि ध्येयच्युति हा आरोप सहन करणें शक्य नव्हतें. अंगांतून घामाच्या धारा वाहत होत्या. माध्यान्हींचा सूर्य, प्रकाशाची भलतीच किंमत वसूल करून घेत होता. अनेक क्रॉस रस्त्यावर पाहिलें. क्षणभर असें वाटलें कीं, ठाणें पूर्वी नुसतें स्मशानच होतें कीं काय? शेवटीं एकदांचे किल्ल्यासमोर आलों. त्र्यंबकजी डेंगळ्या ज्या किल्ल्यांतून पळाला, तो हा ऐतिहासिक किल्ला होता. दार मोडून, भिंत ओलांडून, खाडीपार करून, अंतरावर असलेल्या झाडाखालील घोड्यावर स्वार होऊन इंग्रजांच्या हातावर तुरी दिलेला हा गृहस्थ—एरवीं भेकड व नीच असला, तरी या कृत्यानें तो आमच्या मतें एक वीर होता व म्हणून तर या वास्तूच्या दर्शनार्थ आम्हीं आलों होतों. जें दृश्य आम्हांला दिसलें त्यानें आम्हीं अगदींच गोंधळलों. मोठा जाळीचा दरवाजा दोन बुरुजांत असून त्याच्यापुढें बंदुका घेतलेले शिपायी पहारा करीत होते. माझे दोघे मित्र या भानगडींत न पडतां शिस्तवार माघारीचा सल्ला देऊं लागले. अर्थात् माझा स्वभाव याविरुद्ध होता. संकट म्हणजे आव्हान मानणारा म्हणून मी एकटाच फाटकापर्यंत गेलों. कोणी गोळी झाडली नाहीं अगर बागनेट खुपसलें नाहीं. जातांना जोरांत जात होतों, पण पोटांत









भीति नव्हतीच असें मात्र नाहीं. दैहिक भीति व मानसिक अहंकार यांच्या झगड्यांत अहंकार श्रेष्ठ ठरला. दाराजवळ पोंहचतांच, कोणाला भेटावयाचें आहे ? अर्ज आणला कां ? प्रश्न विचारले गेले. मी म्हणालो, मला किल्ल्यांत जावयाचें आहे. एवढ्यांत एक गोरा गृहस्थ बाहेर आला. मला त्यानें न्याहाळलें, तसेंच संरक्षणाची दुसरी फळी अंतरावर उभी असलेलीही त्यानें पाहिली. मनांत त्याच्या संशय आला असावा असें वाटलें. कोण, काय म्हणून प्रश्न विचारले. मींही पुणेरी इंग्रजींत फर्डी उत्तरें दिलीं. व्याकरणामुळें झालेली त्याची करमणुक मजविषयीं त्याची दृष्टि स्नेहमय करती झाली. तो म्हणाला, आंत जावयास लायकी लागते 'you must deserve it', मीं म्हणालों. मी तें करावयास तयार आहे. तो हंसला व म्हणाला, 'गड्या, हा तुरुंग आहे व येथून कैद्यांना अंदमानला धाडतात.' तुम्ही बाहेरून पाहा, पलीकडे खाडीला लागून असलेल्या भिंतीवरून तुमचा हिरो पळाला !' अर्थात् मी परतलों. हें होईपर्यंत तोफखान्यानें काम केल्यानंतर पायदळ जसें पुढें सरकतें, तसे माझे दोन्ही मित्र माझ्या मागें येऊन उभे राहिले होते. आम्ही लांबूनच डोंगळ्याची पराक्रमभूमि पाहिली व पुढें पुलावरून भिवंडीचा रस्ता धरला. त्या वेळीं कल्पनाही नव्हती कीं, १२ वर्षांनीं या किल्ल्यांत अनेक परीनें राहण्याची पात्रता मजमध्यें येणार आहे ! !

प्रवासाला निघतांना आम्ही ठाणें जिल्ह्याचा नकाशा घेण्याचें ठरविलें होतें. पुण्यांतील व पुणें जिल्ह्यांतील मार्ग माहितीचे होते. बाजारांतून नकाशाही आणला होता. पण नेमका तोच ट्रंकमधून पुण्याला गेला व आम्ही मात्र या गोष्टीची जाणीव होतांच हात चोळीत बसलों. तथापि रस्त्यावरील फलक व अंतराचे आंकडे यांना मार्गदर्शक करून प्रवास सुरू केला. त्या ठाणें, भिवंडी रस्त्यावरून हे तीन यात्रेकरू निघाले होते. कुठें जावयाचें हे निश्चित होतें व नेत असलेला मार्ग अचूक होता असा आमचा विश्वास होता. आमच्या कार्यक्रमाप्रमाणें अनगांव–कवाड येथें रात्रीं मुक्काम करावयाचा, असें ठरलें होतें. तथापि सदहू गांव दूरवर होते. पाय गति घेईनात. भूक तर कांहीं सुचूं देईना. खिशांत पैसे होते, पण 'विश्रांतिगृह' नजरेंत येईना. दोन्ही बाजूंस जंगल. रस्त्यावरून एखाद-दुसरा मोळीविक्या दिसे. त्याला विचारावें तर त्याचें मराठी आम्हांस समजेना, व आमचें त्याला. ब्रह्मांड आठवलें. पण त्यानें काय होणार ? चालतां चालतां, रस्त्यालगत एका झोंपडींत 'चाय'चें दुकान आढळलें. रामाला भरत भेटल्यानंतर जितका आनंद झाला असेल, तितका झाला. दुकानदार आजच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे austirity standard प्रमाणें पोषाख घालून होता. थोडक्यांत म्हणजे एक लंगोटी त्याच्या त्या भव्य पण काळ्या शरीरावर होती. त्याचे केस कांहींसे विचित्र दिसत होते. तथापि या गोष्टी महत्त्वाच्या नव्हत्या. चहाचें सुभाषित या वालापासून आम्हांला घ्यावयाचें होतें. गाण्याचें माधुर्य नाकाच्या नकटेपणानें थोडेंच कमी होतें ! कमाल औत्सुक्यानें त्यानें पुढें केलेला इवलासा कप घेतला. चहा इतका काळा असूं शकतो ही गोष्ट तेव्हां लक्षांत आली. हॉटेलमधला चहा म्हणजे आधुनिक कविता–पुष्कळसे शब्द, थोडीशी कल्पना व किंचित् अर्थ. पुष्कळ पाणी, थोडा चहा व किंचित् दूध ! व तें किंचित् दूधही येथें दिसेना. न प्यावें तर पंचाईतच. क्षुधा भडकणार व शिवाय पैसे द्यावे लागणार. हुज्जत घालतां येईल असें तें स्थळ नव्हतें; व व्यक्तिही तसली नव्हती. प्यावें तर राम जाणें काय होईल. तथापि हिय्या करून थोडा घेतला व कप खालीं ठेवून पैसे दिले. दोन्ही मित्र तेंच करते झाले. प्रवासी पुन्हां रस्ता चालूं लागले. अनगांव आमचेपैकीं एकाचें गांव होतें व तेथें गेल्यावर स्वागत होईल, सर्व श्रमपरिहार होतील या आशेवर आम्हीं स्वतःला ढकलत होतों. रात्रीं नऊ चे सुमारास मुख्य रस्त्यावरून गांवच्या रस्त्यावर वळतांच एखाद्या पुढाऱ्यावर वर्तमानपत्रें तुटून पडतात तशी गांवची 'होमगार्ड चमू' म्हणजे कुत्रीं भुंकून आमचेसमोर समूहानें उभीं राहिलीं. भुंकणारे चावत नाहींत, हा राजकीय क्षेत्रांतील अनुभव अद्याप यावयाचा होता. तसेंच



भुंकणाऱ्यांचीं तोंडें बंद करण्याची युक्ति अद्याप माहिती नव्हती. प्रसंग बांका होता. परत फिरणें शक्य नव्हतें. पुढें जाणें सोपें नव्हतें. हातांत काठ्याही नव्हत्या. दगड घेऊन मारावे तर शत्रू अधिक चवताळावयाचा. दंड अशक्य, भेदनीतीसाठीं जरूर असणारा मलीदा नव्हता, तेव्हां तीही गोष्ट अशक्य. दाम तर उघडच अप्रस्तुत मार्ग होता. 'उपेक्षा पंचमी स्मृता' पण ही पांचवी नीति स्वीकारणें धोक्याचें होतें. सामाचा मार्ग होता पण कशी सुरुवात करावी हें कळेना. कोणत्या नांवानें सुरुवात करावी, वाघ्या, मोत्या, गबरू–इंग्रजी नांवें येथें उपयोगी नाहींत एवढें मी समजून होतो. वास्तविक त्यांचे गोंधळ्या नागरिक आमचेबरोबर होता. त्याला तरी त्यांनीं नीट वागवावयाचे होते तो तर कांहींच बोलेना शेवटी कांहीं वेळ स्वस्थ उभे राहण्याचे ठरविलें. आपण उभे राहिलें कीं, भीति पण उभी राहते तसेच झाले. त्यांचा आवाज किंचित् कमी झाला थोडे गोंजारून, थोडे आर्जवून नाना नांवें घेऊन मी त्यांचेकडे बघून पण एक एक पाय पुढें ढकलत होतो. जणूं कांहीं एखाद्या कसलेल्या निवडणुकीचे उमेदवारानें करावें तसें ! एवढ्या वेळांत गावची कांहीं माणसें आलीं. 'भाऊकाका'ची ओळख पटली व आम्हां तिघांना गावांत जाण्याचा मार्ग मोकळा झाला. 'होम गार्ड' ला टाळा फिरवून आमचे पुढें पुढें चालत होते. मित्राचे घरीं आम्हीं गेलों.–ठरलेल्या दिवसापूर्वी चार दिवस आम्हीं आधी आलों होतों. आजीनीं आम्हांस येवढी वहिवाट झालेली समजतांच तेल व ऊन पाणी दिलें. त्यानीं पाय धुतल्यावर खरोखरच श्रमपरिहार झाले. आयत्या वेळचे महाराष्ट्रीय जेवण म्हणजे झुणका भात. आम्हीं मनसोक्त जेवलों व अंथरुणावर पडतांच झोंपी गेलों.

दुसरे दिवशीं आम्हीं अगदीं सकाळीं उठून वज्रेश्वरीचीं उन्हाळीं पाहण्यासाठीं निघालों. ऊन पाण्याचे झरे म्हणजे काय हें जाणण्याची उत्सुकता होती. शिवाय भाऊकाकानें त्यांची फार स्तुति केली होती. शिवाय वज्रेश्वरी हें स्थान रम्य आहे असेंही त्यानें सांगितलें, म्हणून आमच्या कार्यक्रमांत हें स्थान पहावयाचे असें आम्हीं ठरविलें होतें. अनगांवापासून बारा मैल रस्त्यानें व जंगलांतून पायवाटेनें गेल्यास नऊ मैल होईल अशी माहिती मिळविली. अनुभवाचे मोतीं तळापर्यंत गेल्याशिवाय मिळत नाहींत म्हणतात. आम्ही तर त्याच्याच शोधार्थ निघालेले वीर होतो. पायवाटेनें जाण्याचें ठरलें. भाऊकाका साशंक होता. राम नक्की सांगेना. मी निश्चयानें पायवाटेनेंच जावें असें सांगितलें व प्रवास सुरू केला. दोघां मित्रांचे पाय व मन संशयानें मागें आलें. सकाळची सुंदर वेळ होती. गर्द जंगलांतून पायवाट होती. दोन्हीं बाजूंस झाडेंझुडपें व मधून कोठें सरळ, कोठें वक्र, कोठें सपाट, कोठें ओबडधोबड, कोठें किंचितशा टेकाडावरून पायवाट धांवत होती. कांहीं ठिकाणीं जणुं कांहीं

भूसुंदुरीच्या डोक्यावरील केसांचा भांग पाडावा, तसें चित्र दिसत होतें. आमचीं मनें प्रफुल्ल होतीं. साहजिकच काव्यकल्पना स्फुरत होत्या. मधेंच दोन वाटा दिसाव्यात, आम्हीं घोटाळ्यांत पडावें. साधारण दिशा लक्षांत घेऊन चालावें. याप्रमाणें तीन तास चालल्यानंतर मुख्य रस्त्याला कोणत्या कोणांत असणारा रस्ता आला. माणसें भेटलीं व कळलें कीं, आम्हीं वज्रेश्वरीचें शिवारांत आलों. जंगलांतून जातांना ऊन फारसें लागत नव्हतें. पण रस्ता लागल्यानंतर ऊन लागूं लागलें. थोड्या वेळांत आम्हीं उन्हाळ्या-जवळ आलों. समोर 'तान्सा नदीचें पात्र होतें. लहान मोठे चार पांच झरे बांधून काढलेले कोठालगत होते. खुद्द नदीचें प्रवाहांतही ऊन पाण्याची एक धार दिसत होती. पाण्यांतून वाफा निघत होत्या. आम्हीं कपडे काढून कुंडांत उतरलों. गंधकाचा वास येत होता. थोड्या वेळांत मीं बाहेर आलो. नंतर थोड्या वेळानें भाऊकाका आला. राम डुबत राहिला. मी लवकर बाहेर येण्यास सांगितलें. देवदर्शन घेऊन आम्हास संध्याकाळचे आंत अनगांवास पोहोंचावयाचे होते. 'फार मजा आली' 'फार मजा आली' म्हणून तो ओरडे व डुंबत राही. शेवटीं वर आला व धोतर बदलता बदलता बेहोश होऊन जमिनीवर पडला. आम्ही घाबरलो. त्यानें डोळे पांढरे केले. छाती धडधडत होती. पण नाडीचा पत्ता लागेना. थोड्या वेळानें कळलें कीं, भलत्याच बाजूला मी नाडी पाहत होतो. धावत जाऊन नदीचे गार पाणी आणलें. तोंडावर मारलें, हात पुढें मागें केलें. मनांत देवाला विनविलें. भलतेंच झालें तर काय करा? त्याचे आईबाप पहिल्यापासून माझ्या संगतीबद्दल त्याचेंवर रागवून होते. दैवानें खैर केली. थोडी हुशारी आली. नंतर तो पूर्णपणें सावध झाला. धोतर पिळून व डोक्यावर पसरून देवळाकडे निघालो. बाराचा सुमार होता. देवळाजवळ खाणावळ असेल म्हणून चौकशी केली. सदावर्त आहे व ब्राह्मणांना जेवण मिळतें म्हणून समजलें. आम्ही सदावर्ताकडे गेलो. तेथल्या व्यवस्थापकानें आम्हांस न्याहाळलें व तो म्हणाला 'येथें ब्राह्मणांना फक्त जेवण मिळतें' त्यावेळचें राज्य निधर्मी नव्हतें म्हणून 'आम्ही ब्राह्मण आहोत' असें म्हणालो. त्याच्या चेहऱ्यावरून त्याला पटलें असें वाटेना. भाऊकाकानें आपण अनगांव-कवाडचे अमक्याचे पुत्र, अमक्याचा नातू—ज्यांत उपाध्याय म्हणतात त्याप्रमाणें सांगून पाहिलें. व्यवस्थापकानें अमकी बाई तुमची कोण, अमकी तुमचा कोण लागतो वगैरे प्रश्न उलट तपासणीचे आवेशानें विचारलें. भाऊनें उत्तरें दिली. भाऊ उत्तीर्ण झाला. माझी पाळी आली. मी म्हणालों संध्या म्हणून दाखवितो. पुरुषसूक्त, रुद्राचा एखादा अनुवाक म्हणतो. गोत्र व प्रवर सांगितले. त्याचें मन ग्वाही देईना पण तो 'ठीक' येवढें म्हणाला. मी 'मार्जिनवर' पास झालो. भाऊकाकानें केस ठेवले नव्हते. माझे काय सुवर्ण मध्य. म्हटले तर ठेवले होते, म्हटले तर नाहीं. पण राम मात्र अगदीं चट्टोपाध्यायी केशरचनेचा भोक्ता होता. त्याचे ते लांब केस, ठेंगू मूर्ति पाहून व्यवस्थापकाला हा कुणी तरी नाटकांतला असामी असें वाटलें. आमच्या परीक्षा चालू असतां, कुठलेही गोत्र सांग असें हळूच त्याला इंग्रजींत सांगितलें व गोत्राचा उच्चार न करतां स्पेलींग सांगितलें. रामची परीक्षा न व्हावी म्हणून दुसरेंच विषय काढून व्यवस्थापकाशीं बोलण्याचा प्रयत्न केला. चालू युद्धाची बातमी येथें येते का व वर्तमानपत्रें येथें मिळतात का? बी. एचे परीक्षेला युद्धाचा प्रश्न आला होता. तात्पर्य ज्ञान, बहुश्रुतता, कुलिनता याबाबत त्याचेवर रुबाब मारण्याचा मी प्रयत्न करीत होतो. उद्देश त्यानें रामला कांहीं विचारूं नये? शेवटीं रामला त्यानें गोत्र विचारलें रामानें पढविलेल्या साक्षीदाराप्रमाणें गोत्र सांगितलें. लागलीच धूर्तपणें मी पिण्यास पाणी मागीतलें. आम्हांला तहान फार लागली आहे. काम झालें. त्यानें पाणी आणण्यास सांगितलें व लागलीच म्हणाला, 'तुम्ही एक तासानें जेवण्यास या. जो प्रसाद मिळेल तो खा?' आम्ही विजयी झालों. अन्नमय जग व अन्नमय जीवन आहे हेंच खरें! आम्ही नंतर देवळांत गेलो. तेथील बाजूच्या ओऱ्यांत सतरंजी हांथरून पडलो. जेवणानंतर दर्शन घ्यावयाचें ठरविलें. मनांत आलें कीं, जेवणाला बसतांना सोवळें नेसावें लागेल, कपडे काढावे लागतील व लागलीच मनानें धाय घेतली कीं, जानवें नाहीं. व जानवें नसेल तर तो महाभाग भरल्या पानावरून उठवील. राम जवळ तर जानवें कधींच नव्हतें. भाऊकाकाजवळ दोन होतीं, दोन जानवीं व तीन माणसें. एकदम जेवावयास बसणार, तेव्हां एका मागून एकानें घालावें हेंही शक्य नाहीं. पेचप्रसंग निर्माण झाला. डोळे मिटून देवाचें स्मरण केलें. तोड सुचली. दोन जानव्याचे सहा पदर होतात. दोन दोन पदरांची तीन करून प्रत्येकानें एक एक घालावें व गळ्यांत दुहेरी करून घातले तर पदर कमी आहेत हें लक्षांतही येणार नाहीं. ठरल्या-प्रमाणें केलें. जेवतांना आपोषणी व चित्राहुतीबद्दल व उठतांना आपोषणी-बद्दल रामला माहिती दिली. बेसावधपणाला जागा ठेविली नाहीं. सर्वांची जेवणें झाल्यावर आम्हांला बोलाविलें. फाटक्या धाबळ्या आम्हीं नेसलो. भात व आमटीचा महाप्रसाद आम्हीं घेतला. रामनें चुकून दोनदां आपोसणी घेतली व अधिक चित्रावती घातल्या पण कोणी पाहिलें नाहीं. नाहीतरी व्यवस्थापकानें ब्राह्मणांचे पंक्तीस आम्हांस बसविलेंच नव्हतें. भाग्य एवढेंच कीं, जेवण घातलें. जेवून कांहीं काळ विश्रांति घेऊन देवळांतील मुख्य गाभाऱ्यांत आलो. देऊळ कोणी बांधलें, केव्हां बांधलें याची विचारणा केली. तेथील उपाध्यानें सांगितलें 'चिमाजी अप्पा पेशवे वसईचा किल्ला लढवत होते. विजय होईना. निदान माझें शिर तोफेचे गोळ्यास बांधून तोफ उडवा म्हणजे ते तरी किल्ल्यांत पडेल अशी निर्वाणीची भाषा बोलूं लागले. त्याच सुमारास वज्रेश्वरीची यात्रा होती. अप्पा येथें आलें. दर्शन घेतलें. दृष्टांत झाला. या रानावनांत माझी व्यवस्था नाहीं. तर परम देवभक्ता दुष्टांचें शासन व सज्जनांचें संरक्षण करण्यास तुला उदंड सामर्थ्य मिळो! चिमाजींनीं नवस बोलला 'माते तुझे पांग फेडीन. सध्या कामगिरी पुरी झाली नाहीं. यशाचा विडा पुरा झाला नाहीं. वसई फत्ते करतांच तुझी सेवा पुरी करीन. उजव्या बाजूनें फूल पडलें. साक्षात्कार मानून आप्पांनीं ते घेतलें. विजयी झाले व लागलीच हें भव्य मंदीर, सदावर्त, कायम उत्पन्न कौल करून दिलें. असा हा इतिहास आहे.' ४८ तासापूर्वी वसईचे किल्ल्यांत छत्रत्याग करून मी आलों होतों. ते सर्व विचार पुढें आले. नास्तिक म्हणून गाभाऱ्यात आलों होतों. आस्तिक म्हणून मुर्तिपुढें उभा राहिलों. 'हे जगदंबे या देशाला स्वातंत्र्य प्राप्त झाल्याबरोबर तुझ्या दर्शनाला येईन. आज मी धनहीन, सत्ताहीन आहे. आज नमस्काराशिवाय तुझे चरणीं वाहण्यासारखे कांहीं नाहीं. अशी मनांत प्रार्थना करून साष्टांग नमस्कार करून परतलो. मित्रांना नवस सांगितला तेव्हां त्यांनीं थट्टा केली व मी ही हे सर्व थट्टेंत केले असें त्यांना वाटलें.

बरोबर ३० वर्षांनीं स्वातंत्र्य प्राप्तीनंतर विद्यमान वैभवानें मी ठाणें जिल्ह्यांत येणार होतो. व पालघरहून विरार, वसई करून कल्याणला जाव-वयाचे होते व जवळचा रस्ता वज्रेश्वरीहून आहे असें सुरुवातीस उल्लेखिलेली व्यक्ति म्हणाली तेव्हां मी म्हणालो ठीक. काय योगायोग आहे. आतां 'केलेला नवस फेडतो.' मी नवस करीन अगर कोणास फेडीन हें त्या व्यक्तीला असंभाव्य वाटते व म्हणूनच तिने सुरवातीस उल्लेखिलेले प्रश्न विचारले. आणि जेव्हां सर्व हकीगत सांगितली तेव्हां त्यांनाही पटलें. मनुष्य हा विरोधांचा संचय आहे. व म्हणूनच त्याचें वैशिष्ट्य आहे. सांगण्याचें तात्पर्य मी दर्शनाचा नवस फेडला. नास्तिकांचे मनाला धक्का दिला. सनातनी व आस्तिक यांना मी जवळचा वाटूं लागलों. खरें सांगावयाचें म्हणजे हजारों वर्षांच्या संस्कृतीच्या पाशांतून सर्वस्वी कोणी सुटत नाहीं. नवसाला देव पावतात. हे पावत नाहींत इतकेंच खरें नाहीं का? तरीपण पुन्हा मी नवस करणार नाहीं याची खात्री नाहीं.













# मी महाकवि?

—अनंत काणेकर

स्वतःला महाकवि ठरविणारा लेख मी स्वतःच लिहितों आहे हें पाहून मला वेड तरी लागलें आहे, किंवा कांहीं तरी अचाट विनोद मी करतों आहें असेंच कुणाही सुबुद्ध वाचकाला वाटेल. पण या दोहोंपैकीं एकही गोष्ट खरी नाहीं. खरोखरच मी महाकवि आहे. त्याला माझा स्वतःचा मुळींच इलाज नाहीं. जाणत्या साहित्यचिकित्सकांनीं ही गोष्ट सिद्ध केली आहे. त्यांच्यापुढें मी कांहीं करूं शकत नाहीं. रवींद्रनाथ टागोर किंवा खलील जिब्रान यांच्या काव्यांत जें जे गुण आढळतात ते ते सर्व मी लिहिलेल्या काव्यांत आहेत हें तज्ज्ञांनीं सांगितल्यानंतर मी महाकवि आहें ही गोष्ट इतर लोकांनींच काय पण मीही मान्य करायलाच पाहिजे. 'जीवनमूल्यांचें समन्वयी आकलन, साध्या प्रसंगांतून 'महान् तत्त्वदर्शन, सर्वस्पर्शी कल्पकता, जीवनदर्शनाची सूक्ष्मता, महान् सत्यांचें मर्मभेदक आणि सूचक प्रतिपादन, गगनाला वेधणारी कल्पनाशक्ति, चिंतनात्मक जीवनदृष्टि वगैरे वगैरे गोष्टी या टागोर किंवा जिब्रान यांच्यासारख्या महाकवींचीं लक्षणें आहेत. हीं लक्षणें तज्ज्ञांच्या शब्दांत मी सांगितलीं आहेत; आणि हीं सर्व लक्षणें माझ्या लिखाणांत आहेत, हें तज्ज्ञांनीं याच शब्दांत सांगितलें असल्याचें या लेखाच्या शेवटीं दिलेल्या अनेक उताऱ्यांवरून दिसून येईल.

मराठी साहित्यांत घडलेली ही घटना इतके दिवस कुणालाच कशी कळली नाहीं हें आतां मला स्पष्ट करावयाला हवें. मी जाहीर करीपर्यंत ही गोष्ट कुणालाच कळणें शक्य नव्हतें. आतां ही गोष्ट जाहीर करण्याची वेळ आली आहे, असें मला वाटतें. वस्तुस्थिति अशी आहे. गेलीं तीन चार वर्षें निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या आणि दीड दोन वर्षांपूर्वी 'रुपेरी वाळू' या नांवानें पुस्तकरूपानें बाहेर पडलेल्या, खलील जिब्रानच्या मी अनुवादित केलेल्या म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सर्व कणिका स्वतंत्रपणें मी लिहिलेल्या आहेत.—जिब्रानच्या कोणत्याही कणिकांचे ते अनुवाद नाहींत. स्वतःच्या स्वतंत्र प्रेरणेनें लिहिलेलें लिखाण जिब्रानच्या नांवानें मी प्रसिद्ध कां केलें तें सांगतो. मोठमोठे विचारवंत आणि रसिक टीकाकार जिब्रानच्या ज्या रूपकात्मक किंवा प्रतीकात्मक वाङ्मयाची वाहवा करतात तें मी वाचूं लागलों तेव्हां तसेंच कांहीं तरी

अनुक्रमणिका

मलाही लिहितां येईल असें मला वाटूं लागलें. दोन चार कणिका मी लिहूनही टाकल्या. पण टागोर किंवा जिब्रान यांच्यासारखे महाकवी जें वाङ्मय लिहितात तें लिहिणें इतकें सोपें कसे असेल, असें सुटे. आपण लिहितों त्यांत खरोखर कांहीं तथ्य आहे कीं नाहीं हें मला समजेना. तेव्हां जिब्रानच्या नांवानें या कणिका प्रसिद्ध कराव्या, आणि सामान्य वाचक आणि तज्ज्ञ टीकाकार काय म्हणतात तें पहावें, असा विचार केला.

त्या प्रसिद्ध होऊं लागल्या तेव्हां जिब्रानच्या कुठल्या इंग्रजी भाषांतरावरून त्या मी करतों म्हणून अनेकजण विचारूं लागले. या पेचांतून बाहेर पडण्याकरतां, 'या इंग्रजींत कुठेंच आलेल्या नाहींत; अरबी जाणणाऱ्या एका मुसलमान मित्रानें मला इंग्रजी करून दिल्या, त्यांचें मराठी भाषांतर मी प्रसिद्ध करतो आहें, असें मला सांगावें लागलें. 'रुपेरी वाळू'च्या प्रस्ताविकांतही हाच खुलासा दिली आहे. अनेक सज्जनापासून वस्तुस्थिति कांहीं काळ कां होईना पण लपवून ठेवल्याबद्दल मी त्यांची मनःपूर्वक क्षमा मागतों. उदार अंतःकरणानें ते मला क्षमा करतील, अशी मला आशा आहे. विशुद्ध वाङ्मयीन मूल्यें कळावीं, हाच माझा हेतू होता. वाङ्मयाचा त्यामुळें फायदाच होईल, असें मला वाटतें. टीकाकार किंवा तज्ज्ञ साहित्यिक झाला तरी तो माणूसच असतो. मोठें नांव असलेल्या लेखकाच्या लिखाणांतले थोर गुण त्याच्या जितक्या लवकर ध्यानांत येतात तितक्या नांव न झालेल्या लेखकांतले त्याच्या आले नाहींत तर त्याचा मुळींच दोष नाहीं. तें अगदीं स्वाभाविक आहे. मात्र हें लक्षांत घेऊन छोटयांच्या लिखाणांतले गुण काळजीपूर्वक पहाण्याची प्रवृत्ति वाटावमाला हवी.

वाङ्मयाच्या इतिहासांत अशा प्रकारच्या खोडया चांगल्या साहित्यिकांनीं केलेल्या असल्यामुळें मला धैर्य आलें हें कबूल केलें पाहिजे. स्वतःच्या कविता भानुसिंह-या नांवानें प्रसिद्ध करून, भानुसिंह हा एक प्राचीन कवि आहे, आणि त्याचे बाड आपणांला सांपडलें असें रवींद्रनाथ टागोरांनीं जाहीर केलें होतें. एका विद्वानाने भानुसिंहाच्या काव्यावर प्रबंध लिहून 'पी. एच. डी.' पदवीही मिळविली—! पुन्हां एकदां सर्वांची क्षमा प्रार्थून 'रुपेरी वाळू' वरील तज्ज्ञांच्या अभिप्रायांतले उतारे देतों:

"...जिब्रानच्या अशा छोटया कथापरिच्छेदांतून प्रामुख्यानें नजरेंत भरणारें सर्व विशेष-मार्मिकपणा, उपरोध, भेदक दृष्टि, जीवन मूल्यांचें, समन्वयी आकलन—यांतही आहेत. 'प्रश्नोत्तरें' खरोखर विस्मयकारक आहेत. "वैशिष्टय' 'माकड,' 'शत्रु' 'शिंपी' 'शक्ति' यांतील मार्मिक व्याजोक्ति, 'सौजन्य,' 'भिकारी' यामधील भेदक उपरोधिकपणा 'शहाणा,' 'स्वातंत्र्य,' 'सौंदर्य,' वगैरेतून दिसणारें जीवनदर्शन, यांवर खास जिब्रानचा ठसा स्पष्ट उमटला आहे—"

× × ×

"—प्रत्येक कणिकेमध्यें कांहीं तरी नावीन्यपूर्ण विचार ग्रथित केला आहे. कणिकांचें वैशिष्टय हें कीं, त्यांत विचारांचा किंवा भावनेचा विस्तारानें आविष्कार नसतो. एकच विचार अतिशय थोडक्या शब्दांमध्यें व सौंदर्यपूर्ण रीतीनें प्रकट केलेला असतो. त्यामुळें त्या तत्त्वगंभीर वाटतात. या कणिकांत अर्सेच तत्त्वदर्शन आहे. 'प्रश्नोत्तरें,' 'सत्याची सावली' 'भांडण,' 'कलावंत,' 'शहाणा,' 'स्वातंत्र्य,' 'शत्रु,' सौंदर्य.' उथळपट्टी' या कणिका विचारमनोहर वाटतात. आणि आपल्याला कांहीं तरी नवीन विचारसौंदर्याचें दर्शन झाल्याचा आनंद होतो. कल्पनावैचित्र्य आणि अर्थप्रतीति या बाबतींत या कणिका सरस वाटतात...."

"...या सुललित अनुवादांतील रूपककथा रेखीव, हृद्य आणि जिब्रानच्या उत्तुंग प्रतिभेचें अस्फुट दर्शन घडविणाऱ्या आहेत. 'रूपेरी वाळू' मधील 'शक्ति,' 'मजूर' या कथांत जिब्रानचा, सामाजिक समानता आणि संघटणा यावरील पुरोगामी दृष्टिकोण प्रतीत होतो. 'कलावंत,' 'वैशिष्टय 'सौंदर्य,' 'शिंपी,' या रूपककथांत मानवी जीवनांत विवेक आणि वासना यांचा सुरेख संगमच अंतिम मांगल्याकारक आहे, हें सूचित केलें आहे. 'तारका' आणि 'शत्रु' या कथा जिब्रानचें कल्पनावैभव कसें अपूर्व होतें याची प्रचीती देतात...."

× × ×

"...जीवनांतील विविध सूक्ष्म अनुभूति कथारूपानें मोठया कल्पकतापूर्ण रीतीनें मांडण्यांत जिब्रान सिद्धहस्त आहे...त्याच्या गोष्टी आकारानें अतिशय लहान असल्या तरी त्यांचा आशय फार मोठा असतो. जगांतील ढोंगें, सोंगें, मूर्खपणा, आंधळेपणा यांच्यावर असल्या कथांतून तो मोठया सफाईनें हत्यार चालवतो, कल्पकता व उपरोध याच्यामुळेंच त्याच्या चटकेवजा गोष्टीनासुद्धां कांहीं वेगळीच आकर्षकता येते.

'रुपेरी वाळू' मध्यें जिब्रानचे हे सर्व गुण प्रतिबिंबित झाले आहेत. या कणिका म्हणजे एखाद्या सनातन सत्याचें अथवा सुंदर सुभाषिताचें केवळ नाटयरूपांतर आहे असें वाटतें. कित्येकदां तो पूर्वपरिचित कल्पनाच त्यांचा घाट बदलून पुढें मांडतो. सत्याची सावली,' 'स्वातंत्र्य,' 'ताजवा' वगैरे या संग्रहांतलीं प्रकरणें अशांपैकींच आहेत. पण 'भिकारी,' 'शहाणा,' 'कलावंत,' 'सौंदर्य,' इत्यादि कथा हे जिब्रानची सर्वस्पर्शी कल्पकता आणि त्याचीं जीवनदर्शनाची सूक्ष्मता यांचा मेळ किती मनोहर होऊं शकतो याचे नमुनेच आहेत...."

× × ×

"...या अनुवादाचें महत्वमापन करावयाचें म्हणजे तें कणिकांत प्रतिपादिलेल्या विचारांच्या मौलिकतेवरून करावें लागेल. त्या दृष्टीनें...त्यांत व्यक्त झालेली स्वतंत्र आणि मर्मग्राही जीवनदृष्टि आपणास मननीय वाटूं लागते. प्रत्येक कणिकेतून घडविलेलें नवी जीवनाचें वस्तुनिष्ठ दर्शन चिंतनशील वाचकाच्या अंतःकरणावर तात्काळ प्रभाव पाडूं लागतें.... 'शत्रु' या कणिकेंत नेहेमीं दुर्लक्षिलें जाणारें जीवनांतलें एक महान् सत्य अत्यंत मर्मभेदक आणि सूचक रीतीने प्रतिपादिलेलें आहे....एकेका कणिकेवरील प्रतीकात्मकतेचें आवरण दूर सारून आपण त्यांचें वाचन करूं लागलों म्हणजे कधीं जुन्याच तर कधीं नव्या अनुभूतींच्या संप्राप्तीचा आपणांस लाभ होतो...."

× × ×

"...जिब्रानच्या या कथांमध्यें कथानक आणि पात्रें यांचें महत्त्व त्यांच्या निमित्तानें व्यक्त होणाऱ्या तत्त्वज्ञानामुळें आहे, आणि हें तत्त्वज्ञानही उत्तुंग कल्पनाशक्तीच्या या प्रतिभेतून काव्यमय स्वरूपांत बाहेर पडतें. पानांपानांवर याचीं उदाहरणें हवीं तेवढीं मिळतील. रूपकांचा अवलंब हें जिब्रानच्या कल्पनाशक्तीचें सर्वांत मोठें वैशिष्टय. त्या दृष्टीनें या सर्व कथा रूपककथाच आहेत. जिब्रानची खोल, गंभीर आणि चिंतनात्मक जीवनदृष्टि, गगनाला वेधणारी कल्पनाशक्ति आणि अंतःकरणाची उत्कटता याचा नमुनाच हवा असेल तर 'रुपेरी वाळू'मधील 'प्रश्नोत्तरें,' 'स्वातंत्र्य,' 'ताजवा,' 'उथळपट्टी' या कणिकांचा उल्लेख करावा लागेल. जिब्रानची जीवनदृष्टि आणि प्रतिभा यांचा अर्कच त्यामध्यें उतरला आहे...."



चमत्कार !
कवी—अज्ञातवासी

एक कवी हळुवार मनाचा
तर हा दुसरा लढणारा;
'शूर—वीर' जन एका म्हणती,
'केविलवाणा' दुजा खरा.
कविराया म्हणतसे मनाशीं,
माझ्यासाठीं गातों मी;
म्हणे गर्जुनी दुसरा तेव्हां
देशासाठीं जगतों मी.
चमत्कार ! परि वेटे दोघे
तुरुंग करिती घर अपुलें;
रांडापोरें रडती, यांच्या
शवावरीं सन्मान—फुलें !
थाट निराळा दोघांची परि,
माथ्यावरचें आभाळ
अन् पायतळींची माती म्हणते
दोघेही माझे बाळ !



वाचाळपणा हा लघुत्व आणणारा आहे आणि मौन उन्नति देणारे आहे; पहा कीं, निरंतर शब्द करणारीं जीं नुपुरें त्यांचें अधिष्ठान पायांवर आणि मुका जो मौक्तिकहार तो कंठाचे ठायीं धारण केला जातो.









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





# गेलेली आई

— मामा वरेरकर

[ मुंबईतील एका ] संपन्न वस्तींतील flat मधील दिवाणखाना. किंमतवान् फर्निचरनें सजविलेला. भिंतीच्या मागल्या बाजूनें येणाऱ्या व्यक्ति आंत येतांना दिसाव्या अशी खिडकी. आंत येण्याचा दरवाजा रंगभूमीच्या मागल्या बाजूला. दिवाणखान्याच्या दोन्हीही बाजूला घरांतल्या दोन भागांत जाण्याचे दोन दरवाजे. मागील खिडकीच्या कडेला टेबलावर असलेला रेडिओ.

पडदा वर जातो त्यावेळीं रंगभूमीवर कोणीच नसतें. रेडिओंतून एक पद ऐकूं येत असते. तें अर्धवट होत आहे तोंच कुंदा प्रवेश करते व रागारागानें धांवत जाऊन रेडिओ बंद करते. दरवाज्याबाहेर जाऊन डोकावून पहाते. तोंच सुधा येत असलेली खिडकींतून दिसते. ]

**कुन्दा**—आलीस ! कसं तुला वेळेचं भान रहात नाहीं !

**सुधा**—( तिचा हात धरून आंत येत ) झाला खरा उशीर. हें असं होतं ! किती वेळ संभाळायला जावं पण कांहीं तरी अडचणी येतात अन् शेवटीं हा असा उशीर होतो. मेली ही घड्याळंच वाईट ! आपली सारखी चालत असतात. एवढीसुद्धां विश्रान्ति घेत नाहींत.

**कुन्दा**—घेतात कीं ! किल्लीच देऊं नये.

**सुधा**—तें सुद्धां होत असतं रोज. घड्याळ बंद पडल्याशिवाय किल्ली द्यायची आठवणच होत नाहीं कधीं मला.

**कुन्दा**—पण हें जगाचं घड्याळ मात्र किल्ली दिल्याशिवाय सारखं चाललंय. तें कधीं विश्रान्ति घेत नाहीं कीं बंदही पडत नाहीं. आम्हीं थांबलों, विश्रान्ति घेतली, नाहीं पुढं जायचं म्हटलं तरी जग मात्र सारखं पुढं चाललंय. तें कांहीं आमच्यासाठीं थांबत नाहीं.

**सुधा**—बरं बरं कळलं. आतां असं सांग कीं एवढं घड्याळावर बोट ठेवून कशाला बोलावलं होतंस मला ?

**कुन्दा**—तेंच सांगतें आतां. बैस इथं. इंदूला मी बोलावलं आहे. ( हातांतल्या घड्याळाकडे पाहून ) तिला यायला अजून ७-८ मिनिटं आहेत. तूं वेळींच आली असतीस तर चांगलीं पंधरा मिनिटं मिळाली असती आपल्याला बोलायला—

**सुधा**—ती यायच्या पूर्वींच कांहीं तरी सांगायचं होतं वाटतं तुला ?

**कुन्दा**—हो–सांगायचं आहे म्हणजे असं– ( क्षणभर थांबते ) मोठा कठीण प्रसंग आहे. इंदूची हकीकत कळली ना तुला ?

**सुधा**—कुठली हकीकत ? गेल्या महिन्यांतच लग्न झालं ना तिचं ? आतां आणखी काय झालंय ?

अनुक्रमणिका

**कुन्दा**—लग्न झालं म्हणूनच आणखीन् कांहीं झालंय—(पुन्हां क्षणभर थांबते) ती निघाली आहे आपल्या घरांतून बाहेर.

**सुधा**—भांडून?

**कुन्दा**—भांडून असं कसं म्हणूं? तरी पण भांडण झालंय खरंच—

**सुधा**—अन् आतां कुठंय ती? माहेरी कां गेलीय?

**कुन्दा**—नाहीं—इथंच येणाराय ती! म्हणजे ती घरांतून निघणाराय आतांच— अन् इथं येणारायही आत्ताच! माहेरीं गेली होती काल. पण तिला तिथं थारा मिळाला नाहीं.

**सुधा**—माहेरीं थारा मिळाला नाहीं?

**कुन्दा**—हो, सासर काय अन् माहेर काय, तत्त्वाचा प्रश्न आला कीं दोन्हीही सारखींच. सासर सोडून निघावं लागलं अन् माहेरी थारा मिळाला नाहीं—अन् आत्ता येणाराय इथं— मला प्रश्न पडलाय तो हा कीं इथं तिला थारा द्यावा कीं नाहीं? आई म्हणते नको, बाबा म्हणतात नको, दादाचा कांहीं तेवढासा विरोध नाहीं–तुला माहीतच आहे आहे आमचा दादा–

**सुधा**—चांगला माहित आहे! खूप सतावलं होतं त्यानं मला. तो म्हणायचाच तसं. Chivalry आहे ना!—छे! तशी कांहीं भानगड असेल तर ती इथं न आलेलीच बरी.

**कुन्दा**—किती झालं तरी आम्हीं मुलं. आईबापांनीं नको म्हटलं तर हो कसं म्हणायचं? पण तुला माहीतच आहे, इंदू म्हणजे माझी जिवाभावाची मैत्रीण–कुठंच थारा नाहीं तिला, असा प्रसंग आलेला, अन् याच वेळीं जर मी नाहीं म्हटलं–(तिचें अर्धें वाक्य चालू असतां-नाच इंदू खिडकीशी आलेली दिसते. एक क्षणभरच थांबून ती ऐकून घेते. नंतर हंसत हंसत तडक आंत येऊन त्या दोघींच्या मध्यें बसते. आणि दोघींच्या खांद्यावर हात टाकते.)

**इंदू**—हें पहा कुन्दा, कुणालाच संकट नाहीं.—नवऱ्यानं टाकलं–आईबापांनीं टाकलं, तर परक्यांनीं थारा द्यावा अशी अपेक्षा कां करावी मी?—थांब—बोलूं नकोस—मला माहीत आहे तुझी तूं मुखत्यार नाहींस. मला माहीत आहे तुझ्या घरीं एक तुझा दादा आहे. त्यांची कीर्ति सर्वांना माहीत आहे, तशीच तुझ्या आईबापांनाही माहीत आहे. हें सारं माहीत असतांना तुझे आईबाप कसा मला थारा देतील? माझं जें जें प्रकरण झालंय—

**सुधा**—काय प्रकरण झालंय तुझं?

**इंदू**—हं! काय प्रकरण झालंय माझं! मोठंच प्रकरण झालंय माझं! तसं पाहिलं तर त्यांत कांहीं विशेष झालंय असं नाहीं. सध्यां जग बदललंय—स्वातंत्र्य आलंय ना! त्या स्वातंत्र्याबरोबर सर्वांच्याच भावना बदलूं लागल्या आहेत. कनिष्ठाला वाटतं मी स्वतंत्र आहें, अन् वरिष्ठालाही वाटतं मी तितकाच स्वतंत्र आहें. स्वातंत्र्याची जाणीव झालेल्या दोन व्यक्तींचा झगडा सुरूं झालाय–अन् तो झगडा सुरूं झालाय–स्वातंत्र्य आलं म्हणूनच.

**सुधा**—आतां हें तुझं व्याख्यान राहूं दे. काय झालंय तें आधीं सांग मला.

**इंदू**—या कुंदेनं तुला सांगितलं नाहीं वाटतं?—बरोबर मीच सांगतें तुला. माहीत आहे ना, लग्नापूर्वी मी नोकरी करीत होतें— मी नोकरी करीत होतें हें सुरेशला माहीत होतं. लग्न झालं तरी नोकरी सोडायची नाहीं असं आम्ही ठरवलं होतं. त्यावेळीं सुरेशला तें पटलं होतं. चांगले १४० रु. यायचे घरीं–या महागाईच्या दिवसांत. कुणाला ते नकोसे होतील? (क्षणभर थांबून) मला तसं वाटलं होतं. (थांबते)

**सुधा**—थांबलीस कां? बोल ना पुढं! तुला तसं वाटलं होतं तें खोटं कां ठरलं पुढं!

**इंदू**—तेंच आतां सांगतें—ऐक. तुटपुंज्या उत्पन्नाच्या घरांत १४० रु. ची भर सर्वांनाच मोलाची वाटेल असा माझा समज होता. माझे सासरे नोकर आहेत, नवऱ्यालाही नोकरी आहे, एक नणंद आहे ती कॉलेजांत जात असते, एक दीर हायस्कुलांत आहे—दोन माणसं मिळवणारीं, ५-६ माणसं खर्च करणारीं— शिवाय स्वयंपाकीण आणि गडी—तीही माणसं आहेत पगारी. म्हणूनच मला वाटलं कीं मी आल्यानं ही १४० रु. ची भर पडेल. आणि संसारालाही तेवढीच जास्त मदत होईल. सुरेशला देखील तसंच वाटलं होतं—लग्नाच्या पूर्वी वाटलं होतं. खूप बोलणं झालं होतं आमचं दोघांचं या गोष्टीवर. प्रेमाच्या गोष्टी बोलण्यापेक्षां आम्हीं संसाराच्याच गोष्टी जास्त बोलत होतों—(बाहेर घंटा वाजते.)

**कुन्दा**—कुणी तरी परकी माणूस आलेलं दिसतंय. थांब हं. पाहून येतें. (जाते.)

**सुधा**—हं—मग काय झालं?

**इंदू**—थांब जरा. कोण आलंय तें आधीं पाहूं. परक्यांसमोर बोलायच्या गोष्टी नव्हत या. कुणाजवळ तरी बोललंच पाहिजे म्हणून बोलतेंय मी—पण आजची परिस्थिति अशी आहे, कीं भलत्या माणसाकडे यांतल्या गोष्टी बोलणं धोक्याचं आहे फारच!

(कुंदा आणि तिच्या मागोमाग सुनंदी येत असलेली खिडकींतून दिसते.)

**कुन्दा**—(येत येत दाराशीं) अग परकी कोणी नाहीं दुसरं! ही सुनंदाच आहे आपली.

**इंदू**—सुनंदा कां! ये—बस—कुणी पाठवलं तुला? माझ्या सासूनं कीं नणंदेनं?

**सुधा**—नणंद म्हणजे काय ग!

**कुन्दा**—अग नणंद म्हणजे नवऱ्याची बहीण. हिच्याच कॉलेजांत असते ती.

**सुनंदा**—हें पहा इंदू, प्रेमा माझी मैत्रीण आहे हा कांहीं माझा दोष नाहीं, मीं तुझ्या घरीं—म्हणजे तुझ्या सासरीं जातें— रोज जातें—एक दिवस सुद्धां कधीं माझी खेप चुकत नाहीं. तुला कदाचित् माहित नसेल, पण तुझ्या सासूला तें आवडत नाहीं, प्रेमा सुद्धां माझ्या घरीं येते, आठवड्यांतून एक दोनदां तरी येते—आईला नकळत येते—

**इंदू**—तें मला माहित आहे, ती भानगडही मला माहित आहे. सासूबाईंचा तुझ्यावर राग कां आहे, तेंही मला माहित आहे. पण मला माहित नाहीं तें एवढेंच कीं प्रेमा आपल्या आईवर नाराज असली तरी माझ्याकडे कोणत्या दृष्टीनें पाहते?

**सुनंदा**—तुला काय वाटतं?

**कुंदा**—हें पाहा, अशा वर्दळीवर येऊं नका. आपण साऱ्याच मत्रिणी आहोंत. एकमेकींचं सुखदुःख एकमेकींना जाणवतं म्हणून आपण एकाजागीं जमतों—

**इंदू**—पण आज मी इथं आलेंय ती अगदीं वेगळ्या हेतूनं. तूं मला बोलवलंस, आपल्या घरीं येऊन रहावं म्हणून आग्रह केलास— तुझ्या वडील माणसांना तें खपलं नाहीं म्हणून मी इथं येऊन राहिलें नाहीं. आतां तुझ्या घरीं कुणी नाहीं अशी संधि साधून तूं मला बोलावलंस—म्हणून आलें. पण ही सुनंदा आतां आली! (सुस्कारा टाकून) मोठी भित्री झालेंय मी! स्वतःच्या सावलीची सुद्धां भीति वाटते मला—

**सुनंदा**—तसं भ्यायला नको कांहीं. अगदीं सहज आलें मी. मी आलें होतें कुंदेला आमंत्रण द्यायला—माझ्या धाकट्या भावाचं बारसं आहे म्हणून—

**कुंदा**—असं होय? आतां तूंच पाही इंदू उगीच संशय कशाला घेत होतीस?





**इंदू**—भारी संशयी झालेय मी. आतांच सांगितलं ना तुला—मी भित्री झालेंय. भित्रेपणाचं मूळ असतं संशयांत. सर्वांचा संशय वाटतो मला. म्हणूनच भित्री झालेंये. नऊ महिने ज्या आईनं मला पोटांत वाढवलं, लहानाचं मोठं केलं, शिक्षण दिलं अन् शेवटीं माझ्या मर्जीप्रमाणं लग्न करून दिलं, त्या आईनं सुद्धां मला आपल्या घरांत थारा दिला नाहीं—म्हणूनच प्रत्येकाचा संशय येतो मला.

**सुनंदा**—आईनं थारा दिला नाहीं ?

**कुंदा**—तुला कळली आहे ना तिची हकीकत ?

**सुनंदा**—तशी नीटशी नाहीं कळलेली. तरी पण ही नवऱ्याला टाकून निघून गेली—

**इंदू**—जरा थांब. थोडं चुकतंय् इथं. मी नवऱ्याला टाकून निघून गेलें खरी—मला त्यांनीं घरांतून घालवून दिलं असं खोटंच सांगायचं नाहीं मला—पण मी जी घर सोडून निघालें, ती तशी का निघालें हें मात्र कुणाला नीटसं कळलेलं नाहीं.

**कुंदा**—अगदीं खरं आहे तें. जो तो आपल्या परीनं सांगतो. ज्याचं ऐकावं त्याचंच खरं मानायचं, तर खऱ्याखोट्यांतील अंतराचा मेळ घालणं कठीण जातं. प्रत्येक जण खोटंच सांगतो, असं कसं म्हणायचं ?

**इंदू**—बरोबर आहे तें. प्रत्येक जण आपल्या परीनं खरंच सांगतो. पण तें संपूर्ण खरं नसतं. त्यांत कांहीं खोटं असतं असं नाहीं. पण त्यांतलं अर्ध चोरून ठेवलेलं असतं. मी घर सोडून बाहेर निघालें एवढंच सांगतात सारीं जणं; पण त्या घरांत राहणं मला असह्य कसं झालं हें मात्र कुणी सांगत नाहीं.

**सुनंदा**—हें मात्र अगदीं खरं. प्रेमा मला म्हणाली तें असंच.

**सुधा**—काय म्हणाली प्रेमा तुला ?

**सुनंदा**—हा मोठा पेंच आलाय्. कसं सांगूं ? सांगितलं तर चहाडी होईल.

**कुंदा**—चहाडी कसली त्यांत ? तिनं तुला सांगितलं तें कांहीं गुपित म्हणून सांगितलं नाहीं, कुणाला सांगूं नको असं बजावलं होतं का तिनं ? तसं असलं तर नको सांगूं.

**सुनंदा**—नाहीं—तिनं तसं बजावलं नव्हतं. आपली सहज म्हणून सांगितली हकीकत तिनं.

**सुधा**—मग सांग ना काय तें.

**इंदू**—मी सांगतें तिनं काय सांगितलं असेल तें—

**कुन्दा**—थांब, तिनं काय सांगितलं तें या आपल्या मैत्रिणीला सांगितलं. आपल्या घरचें व्यंग आपल्या मैत्रिणीला तिनं कसं सांगितलं तें ऐकायचंय् आम्हांला. सांग ग सुनंदे.

**सुनंदा**—मोठा गहजब झाला ! [illegible] गोष्ट ती काय अन् त्याचा कांड्याचा नायटा होतोय् काय !—बरं सांगतें. प्रेमा असं म्हणाली—( क्षणभर थांबते ) मोठं संकट आलंय् हें ! फार वाईट शब्द वापरले होते तिनं.

**सुधा**—कशासाठीं ? इंदूला नांवं ठेवण्यासाठीं ?

**सुनंदा**—हो ! मोठी उठवळ बया आहे ही असें म्हणाली. ( थांबते. इंदूकडे पाहते. इंदू गंभीर असून तिच्या तोंडावर रागाचें चिन्ह नाहीं असं पाहून पुढें बोलते. ) कांहीं तरी भांडण उकरून काढायचं आणि घर सोडून निघून जायचं, असा डाव् होता हिचा, असं प्रेमाचं म्हणणं ! नोकरी सोडून दे म्हणून नवऱ्यानं म्हटलं—

**इंदू**—( संथपणें ) नवऱ्यानं नाहीं म्हटलं.

**सुनंदा**—तिनं सांगितलं तें मी सांगतें.—नवऱ्यानं म्हटलं नोकरी सोडून दे. ती म्हणाली, कांहीं जीव गेला असता नोकरी सोडली तर ? मुळचीच उठवळ—कांहीं तरी कारण शोधीत होती घरांतून बाहेर पडायला !

**इंदू**—ऐकलंस कुंदा ?—म्हणूनच मी आलें नाहीं तुझ्या घरीं राहायला. अगदीं योग्य होतं तुझ्या आईबापांना सांगितलं तें. कुणीं असंच कांहीं तरी म्हणतील, म्हणूनच तुझ्या आईबापांनीं मला राहूं दिलं नाहीं इथं. ( सुस्कारा टाकून ) असं आहे हें ! सासर नाहीं कीं माहेर नाहीं—शेजाऱ्याचं घर सुद्धां वर्ज्य.—कुठं जाऊं मी ? कोण आसरा देईल मला ?—( क्षणभर थांबून ) कां कुणी आसरा द्यावा मला ? सांग ना कुणी मला आसरा कां द्यावा ? ( कुणी उत्तर देत नाहीं असें पाहून ) कळलं आतां ? तुम्हांला सुद्धां या प्रश्नाचं उत्तर देतां येत नाहीं ! जगाच्या दृष्टीनं घोर अपराधी आहे मी. जग ऐकतं माझ्या नवऱ्याचं—जग ऐकतं माझ्या सासूसासऱ्याचं—माझ्या दीरानणदांचं—अन् माझ्या आईबापांचं सुद्धां—माझं ऐकून घ्यायची मात्र कुणाचीच तयारी नाहीं. कां अशी निराधार झालें मी ? लग्न झाल्यावर नोकरी सोडायची नाहीं असं ठरलं होतं—असं जर ठरलं होतं, तर यांनीं कां माघार घ्यावी ?

सुनंदा—म्हणजे असं का तुझं म्हणणं, कीं तूं नोकरी सोडीत नाहींस म्हणून तुझी कड घेऊन तुझ्या नवऱ्यानं आईबापांना टाकून, तुला घेऊन घराबाहेर पडावं?

इंदू—तूंच सांग. माझ्या नवऱ्याच्या जागीं तूं असलीस तर काय केलं असतंस?

सुनंदा—खरंच काय केलं असतं?

इंदू—पाहा हुडा पटकन् उत्तर देतां येत नाहीं. तसा प्रश्नच नाहीं हा. पण पहा,—विचार करून तर उत्तर देशील?

सुनंदा—विचार करून तरी उत्तर काय द्यायचं? नवऱ्यांना आपल्या बायकांबद्दल काय वाटतं हें मला तरी कुठं कळतंय्? कोणाला तरी, लग्न झालेल्या मैत्रिणीला विचारलं पाहिजे.

सुधा—म्हणजे तुला नुसता अंदाज सुद्धां करतां येत नाहीं का? मी सांगतें. मी हिचा नवरा असतें तर मी अगदीं सरळ सांगितलं असतं, आपण दोघं समर्थ आहोंत, दोघांचा विश्वास आहे एकमेकांवर, चल, आपण दुसरं बिऱ्हाड करून राहूं कुठं तरी—

इंदू—भावनेच्या भरांत बोलते आहेस; असं व्हायचं नाहीं. नवऱ्यांची जात तुझ्या ओळखीची नाहीं.

कुंदा—नवऱ्यांची जात कधीं ओळखीची आमच्या? पण नवऱ्याच्या जातीची ओळख आपण करून घेतली पाहिजे, एवढं मात्र खरं! ती ओळख झाल्याशिवाय आपण संसारांत पडलों तर—

सुधा—तर ह्या इंदूसारखं होईल असं कां तुझं म्हणणं!

इंदू—हेंही चुकतंय्. माझं तरी असं झालं तें कां म्हणून? पहिल्यानं ठरलं होतं—वरं पहिल्यानं ठरलं होतं म्हणून कुणी तें ऐकलं पाहिजे असं थोडंच आहे? तो कांहीं कायदेशीर करार नव्हता. तो करार मोडावा असं त्यांना वाटलं—मला नाहीं वाटलं. ही माझी चूक—(कुंदा बोलणार, तिला थांबवून) हं! थांब. तूं काय म्हणणार तें माहित आहे मला. पण जगाच्या दृष्टीनं तें बरोबर नाहीं. जग म्हणणार कशाला—हिला एवढी मिजास! राहिली असती घरीं सुखानं तर काय बिघडलं असतं?

सुनंदा—हो, मी सुद्धां तेंच म्हणतें. काय बिघडलं असतं त्यांत?

इंदू—बरोबरंच आहे.—खरोखर कांहीं बिघडलं नसतं. खेडेगांवची एकादी पोरगी आणून सुरेशाच्या आईबापांनीं तिच्याशीं लग्न लावून दिलं असतं तर कशाला ती तक्रार करणार होती? सुरेशाचं चुकलं तें इथंच—त्यानं माझ्याशीं लग्नच करायला नको होतं.

कुन्दा—खरोखरच त्यानं तुझ्याशीं लग्न करायला नको होतं—

सुनंदा—मग कुणाशीं लग्न करायला हवं होतं? एकाद्या गांवढळ मुलीशीं? हा शहरांत वावरणारा माणूस, शिकला संवरलेला. पटलं असतं का त्याचं असल्या मुलीशीं?

कुन्दा—कां पटूं नये? त्याला हवी होती नुसती स्वयंपाकीण आणि एक शेजेची सोबतीण!—गांवढळ मुलीला हीं कामं शोभली असती, रुचली असती—

सुनंदा—छे बाई! अगदीं कसंसंच वाटतं हें! कल्पना सुद्धां करवत नाहीं.

सुधा—सुशिक्षित नवऱ्यांच्या सुशिक्षित बायका तरी दुसरं काय करताहेत? काय करावं त्यांनीं दुसरं! आतां ही इन्दू—ही नोकरी करायला जाईन म्हणते—हिला जाऊं देत नाहींत—तशी तक्रार तरी नसती केली त्या गांवढळ मुलीनं, संसार सुखाचा झाला असता.

सुनंदा—गांवढळ मुलीबरोबर सुशिक्षित माणसाचा संसार सुखाचा झाला असता का ग सुधे?

सुधा—कोण जाणे! मी कांहीं सुशिक्षित पुरुष नाहीं. मी कसं सांगूं तें?

कुन्दा—कुणी तरी सुशिक्षित पुरुष यावेळीं इथं यायला पाहिजे होता—

इंदू—कुणी तरी आणि कुठला तरी सुशिक्षित पुरुष या वेळीं इथं असता, तर बरोबर उत्तर मिळालं असतं, असंच कांहीं म्हणतां यायचं नाहीं. पण एकंदरींत पुरुषाच्या तोंडचं उत्तर मिळालं असतं एवढं मात्र खरं. एका पुरुषाच्या तोंडच्या उत्तरानं साऱ्या सुशिक्षित मुलींचं समाधान मुळींच झालं नसतं. अन् ह्या उत्तरावर कसा भरंवसा ठेवायचा? सुरेशनं नव्हतं का कबूल केलं पहिल्यानं? तोच नाहीं का आतां बदलला? कसा विश्वास ठेवायचा ह्याच्यावर! कुणी तरी पोक्त बाई इथं असती तर—

कुंदा—म्हणजे माझी आई का?

इंदू—तसं तरी कसं म्हणूं? मी इथं येऊन राहूं नये असं तुझ्या आईनंच सांगितलं ना तुला?

कुंदा—हो! आईनंच सांगितलं पण मला नाहीं वाटत—(इंदिराबाई येतात. त्यांना पाहतांच इंदू आणि सुनंदा दचकून बाजूला उभ्या राहतात.)

इंदिरा—(सर्वांकडे पाहून) इंदू इथ आली आहे होय! बरं, बरं राहूं दे. सहज भेटायला आली आहेस का ग?—बैस किं ग, मी आलें म्हणून उठायला कशाला ग हवं? बैस इथं. सहज आली होतीस होय—

इंदू—हो, अगदीं सहज आलें होतें. आतांच आम्हीं म्हणत होतों कुणीतरी वडील माणूस हवं होतं! बरं झालं! तुम्हीं आलांत.

इंदिरा—थांब हं! एवढं हें सामान आंत ठेवून येतें. मेला जीव अगदीं टेकीला आलाय् ह्या रेशनिंगच्या पायीं. गडीमाणसं सुद्धां ऐकत नाहींत. पूर्वी म्हणत, स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं—आतां म्हणायला हवं, स्वतः गेल्याशिवाय रेशन मिळत नाहीं, अन्न मिळत नाहीं. आलें हं! अग, बैस ना (बोलत बोलत आंत जाते. इंदू कुंदाच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या शेजारीं बसते.)

सुनंदा—आतां खरोखरीच कांहीं विचारणार आहेस इंदू?

इंदू—कुणाला तरी विचारायला हवंच ना! माझ्या भाग्यानं ह्या आल्या आहेत, पाहतें एकदां विचारून.

कुंदा—खरं सांगूं तुला एक गोष्ट! तूं इथं येऊन राहूं नयेस असं जें म्हणणं होतं तें—(आंतून इंदिराबाई—जरा इकडे ये ग कुंदे, हा डबा कुठं ठेवलाय् तांदुळाचा? एक जिन्नस जागेवर सापडेल तर शपथ!)

कुन्दा—आलें हं (आंत जाते.)

सुनंदा—(हळूच) बरं का ग सुधे, इंदूचा संशय कांहीं खोटा नाहीं. तिच्या सासूनंच धाडलं होतं मला. तिला कुणी तरी सांगितलं कीं हीं इथं येऊन राहिलीय्.

सुधा—म्हणजे हेरगिरी करायला आली आहेस वाटतं?

इंदू—कसली ग हेरगिरी?

सुनंदा—नाहीं ग. तिचं आपलं कांहीं तरीच! मी तिला म्हणत होतें—(इंदिराबाई व कुंदा आंतून बाहेर येतात. इंदिराबाई खुर्चीवर बसतात. कुंदा खुर्चीवर हात टेकून उभी राहते.)

इंदिरा—असं आहे ह्या संसाराचं. कसा जीव अगदीं मेटाकुटीला येतो! गडी आहेत, माणसं आहेत, आचारी आहेत. पण सारं कांहीं स्वतः केल्याशिवाय संसार ठाकठीक होत





नाहीं. तुझी सासू म्हणाली तें खोटं नव्हे. इंदूमति, घरची व्यवस्था पाहायला घरचं माणूस घरांतच हवं.

**कुन्दा**—मग आहे कीं हिची सासूबाई.

**इंदिरा**—तूं गप्प बैस ग कुंदे. असं मध्येंच तोंड घालूं नकोस. बरं कां इंदूमति, मला मोठा प्रश्न पडलाय—तूं काय विचारणार तें माहित आहे मला. सारं कांहीं कळलंय् मला. पण मीं असं म्हणतें एवढा हट्ट धरून कशाला बसली आहेस? सोडूनीस का नोकरी! वडील माणसं सांगताहेत—इंदूमति, अगदीं खरं खरं सांगतें. तुझं म्हणणं मला पटतं—माझी सून अशी तुझ्यासारखी असती—

**कुन्दा**—तर तूं तिला नोकरी सोड म्हटलं नसतंस, होय ना?

**इंदिरा**—थांब ग जरा—माझी सून तुझ्यासारखी असती तर इंदूमति, मी तिला म्हटलं असतं, बाई ग, तुझ्या नवऱ्यानं कबुली दिली आहे ना, आम्हांला कांहीं विचारलं नव्हतं त्यानं—खरं म्हटलं तर त्यानं विचारायला पाहिजे होतं—आतां नाहीं विचारलं—नाहीं तर नाहीं—कोण विचारतंय् हल्लीं आई-बापांना? तूं हट्ट धरलास त्यानं कबूल केलं—आतां त्याचा शब्द कसा खालीं पाडायचा आम्हीं. मीं म्हटलं असतं होईल तितके दिवस कर नोकरी—

**कुन्दा**—ऐक सुधा.

**सुधा**—बरं, बरं कळलं. (तोंड वेंगाडून दाखविते.)

**इंदिरा**—ऐक ग!—होईल तितके दिवस ... री अन् नकोशी झाली कीं सोडून दे.

**इं**...—अन् नकोशी नाहीं झाली तर—

**इंदि**...—अग नकोशी व्हायचीच. किती झालं तरी बायकांची जात. अशी कारकुनी करीत राबत राहिल्या होत्या का कधीं बायका?

**कुंदा**—ह्यापूर्वी बायका नोकरी करीतच होत्या कुठं? ही लढाई आली, रेशनिंग सुरू झालं, मुली नोकऱ्या करूं लागल्या अन् त्या Competent ठरल्या म्हणून साऱ्याच ऑफिसांतून मागणी येऊं लागली त्यांना—

**इंदिरा**—कळलं, कळलं. आतां गप्प बैस. मुली म्हणे पुरुषांपेक्षां हुशार! अग, पुरुष ते पुरुष! त्यांची सर येणार का बायकांना? चार दिवसांचे चोचले आहेत हे—

**कुंदा**—नाहीं बरं आई, आतां स्वतंत्र झालों आहोंत आम्हीं—

**इंदिरा**—(खुर्चीवरून उठून कुंदेकडे वळून उभी राहून) कोण ग स्वतंत्र झालां आहांत तुम्हीं, तुम्हीं कारट्यां काय, अन् हें मला सांगते!—

**इंदू**—खरं सांगते आहे ती. आम्हीं स्वतंत्र झालों आहोंत. तुमच्या कारट्यांच नव्हे—पुरुष, बायका, मुलं. भारतांतलीं सारींच माणसं स्वतंत्र झालों आहोंत आम्हीं. साऱ्यांनाच आतां हा राज्यकारभार चालवायचा आहे.—

**इंदिरा**—कुणाला चालवायचा आहे राज्यकारभार? तुम्हां पोरींना! तोंड तर बघा!

**इंदू**—देवी सरोजिनी आहेत गव्हर्नर, विजयालक्ष्मींनीं अमेरिकेला आणि रशियाला सुद्धां दिपवून टाकलं, कमलादेवी आहेत, हंसा मेहता आहेत, अम्मू स्वामिनाथन् आहेत, अनसूयाबाई काळे आहेत, अरुणा असफअली आहेत, प्रत्येक प्रांतांतली एकेक तरी बाई गाजवतेय सारा भारत—

**इंदिरा**—आतां ऐका! अग, खंडीमध्यें पावरती आहेत ह्या. कोटी कोटी बायकांतील दहापांच—

**कुंदा**—पूर्वी संधिच नव्हती. आतां झालाय दरवाजा खुला. आणखीन् दहा वर्षं थांब आई. आतां नवा कायदा झालाय्. परवां महिनाभर परीक्षा थांबवली सरकारनं, अन् बायकांना सुद्धां आय. सी. एस.ला नव्हे—आ. ए. एस.ला बसण्याची परवानगी दिली आहे. आतां आम्ही बायका जज्ज होऊं, मॅजिस्ट्रेट होऊं, कलेक्टर तर आज झाल्याच आहेत बायका—

**इंदिरा**—पुरे पुरे! काय दिवे लावणार आहांत ते दिसेलच आतां!

**कुन्दा**—कसं दिसेल? सुनालेकींना तुम्ही अशा घरांतून घालवूं देऊं लागलां—

**इंदिरा**—आतां थांबशील जरा. मला बोलूं दे या इंदुमतीशीं. हं, तेव्हां काय म्हणत होतें मी—

**कुन्दा**—तूं हिला घरांतून घालवलं नसतंस?

**इंदिरा**—असं म्हटलं कां मी? म्हटलंहि असेल कदाचित्! ते आपलं झालं माझं म्हणणं. पण माझं म्हणणं कोण ऐकतंय्?

**कुन्दा**—बाबा आहेत ना?

**इंदिरा**—आतां गप्प बसायला काय घेशील? कसं अगदीं सुचूं देत नाहींस मुला. भारीच अवखळ आहे ही कारटी बरं, कां इंदुमती. अगदीं तडातड उत्तरं देते त्यांना समोरासमोर, एवढी सुद्धां मर्यादा ठेवीत नाहीं वडील माणसांची. तोच आमचा काळ पहा, कधीं सुद्धां उलटून उत्तर यायचं नाहीं.

**कुन्दा**—अगदीं तुकोबांनं उपद्व्याप करीत हिंडतो गांवभर! बाबा म्हणतात, सिगारेट ओढूं नको—त्यांच्यासमोर होय म्हणतो अन् बाहेर खुशाल सिगारेटी फुंकत हिंडतो. कॉलेजांतल्या पोरी त्याच्याबद्दल काय म्हणतात ते ऐकायचं असलं तरि ... इथं आहे—

**सुधा**—इथं माझं नांव नको काढूं—अन् दुसऱ्याही कोणाचं नको.

**सुनंदा**—मूळ विषय राहिला एका बाजूला अन् आपसांतच तुमची भांडणं सुरू झालीं. तुझे बाबा तरी यावेळीं इथं असते कुंदा—

**इंदिरा**—नको ग बाई नको, इथं नसायचं तेंच बरं आहे. तोंड सुद्धां उघडूं दिलं नसतं कुणाला त्यांनीं! तेव्हां काय म्हणत होते मी—बरं कां इंदू, खरोखरच मला तुझी कींव येते. खरोखरच मला वाटतं, जशी माझी कुंदा तशीच तूं, निराधार झालेली एक मुलगी माहेरीं आली आहे असं समजले असतें मी, पण ते असं झालंय्—(... थांबते) कसं सांगू तुला!

**इंदू**—ते कळलंय् मला. भारी उपकार आहेत तुमचे माझ्यावर. स्पष्ट बोलते म्हणून रागावूं नका, क्षमा करा—जशी मी तशाच तुम्ही-कांहीं फरक नाहीं दोघींत. मला बाहेर पडावं लागलंय्, तुम्ही घरालाच धरून बसला आहांत, एवढाच काय तो फरक. आमच्या आयुष्यांतल्या वीस पंचवीस वर्षांच्या फरकामुळं तुम्ही घरीं राहिलां. १९४८ साल आलंय् म्हणून मला घराबाहेर पडावं लागलं. कुंदा म्हणते तें कांहीं खोटं नाहीं—स्वातंत्र्याचा उगम होतांच हें असं व्हायचंच. गुलामगिरींत रुळले वाढले जीव, दुसऱ्यांना गुलाम करण्यांतच मोठा आनंद वाटत असतो गुलामाच्या जातीला. तसंच झालंय् हें. पण आतां मला सांगा, मी काय करूं? माझ्याबद्दल तुम्हांला जिव्हाळा वाटतो—पण कितीही जिव्हाळा वाटत असला तरी तुम्हांला आपल्या घरीं ठेवून घेतां येत नाहीं मला—

**सुधा**—एक करतां सवरतां मुलगा आहे ना घरांत?

**कुंदा**—हां! बाहेर कीर्ति गाजवलेलं गुणी बाळ आहे बाबांचं!





इंदू—थांबा ग—गुणी असो कीं दुर्गुणी असो, कुणावर कसला तरी आरोप करणाऱ्या जगाचं तोंड कांहीं धरतां येत नाहीं, कोंडमारा होतो आहे तो त्यापाईंच ! मला दासर नाहीं, माहेर नाहीं, शेजारघर सुद्धां नाहीं माझ —आतां आई, कुठं जाऊं मी? काय करूं? कुठं राहूं? कुणाच्या आसरा घेऊं?— ( क्षणभर सर्व स्तब्ध राहतात ) कुणीतरी याचं उत्तर ( पुन्हां सर्व ... )

सुनंदा—( उठून उभी राहते ) मी जातें आतां घरीं. आई वाट पहात असेल. तिला सांगून आले नव्हते.

सुधा—तुझी आई वाट पाहतेय् कीं कुठली तरी बातमी ऐकण्यासाठीं कोणाची तरी आई वाट पाहतेय् ?

कुन्दा—अस्सं ! हे असं आहे होय ! तूं इकडे आली आहेस ती कामगिरीवर होय सुनंदा ?

इंदिरा—उगी रहा ग साऱ्याजणी ! आतां असं पहा इंदू, असं करूं का मी? तुझ्या सासूला विचारूं का ?

इंदू—( निराशेचा सुस्कारा टाकून ) विचारा हवं तर—कांहीं व्हायचं नाहीं, कांहीं–म्हटल्या कांहीं व्हायचं नाहीं, सारं कांहीं होऊन गेलंय्. मूळं मांग दाम खोटा, तो कसा चालणार बाजारांत ? ते खोटं नाणंच फेकून द्यायचंय् मला. कुणाची सुद्धां दया करायची नाहीं ! एकदां असं वाटतं, सरळ जावं, पाया पडावं, क्षमा मागावी नि नोकरी सोडून घरीं बसावं—वादाचं मूळच काढून टाकावं—

इंदिरा—करच तर तसं ! कशाला हा हट्ट धरतेस ! काय निष्पन्न होणार आहे या हट्टांतून ? कुणालाच सुख लाभणार नाहीं या तुझ्या हट्टा-मुळं. निदान तूं तरी सुखी होशील !

इंदू—नाहीं ! मी तर सुखी होणार नाहींच असं कांहीं केलं तर ! सुखी होतील माझे सासूसासरे ! सुखी होतील माझे आई-बाप. कुणी सांगावं, माझा नवराही सुखी होईल कदाचित् ! सुखी होणार नाहीं ती मी. कदाचित् सुखी होणार नाहींत काय त्या माझ्यासारख्या शेंकडों मुली ! गुलामगिरींत वाढलेल्या या वडील माणसांना कोणत्या भाषेंत कसं सांगायचं कीं परिस्थिति बदलली आहे म्हणून ? क्षमा करा मला, काळीज तुटतंय् म्हणूनच असली ही कठोर भाषा तोंडीं येतेय् माझ्या. वडील माणसांचा उपमर्द करावा असं स्वप्नांत सुद्धां वाटत नसतं मला. वडील माण-संच जर अशीं कठोर होऊं लागलीं, निर्दय होऊं लागलीं, भूतदया विसरूं लागलीं,—

( इंदुमतीची सासू शारदाबाई येऊन खिडकींत उभी असल्याचें दिसल्यामुळें कुंदा तिला दाखवते. तितक्यांत शारदाबाई बोलत बोलत आंत येते. )

शारदा—निर्दय झालों का ग आम्ही ? दैत्य झालों ? कसाब झालों ? आतां तुम्हीच पहा इंदिराबाई—

इंदिरा—बसा ना शारदाबाई—( आपण उठून तिचा हात धरून आपल्या खुर्चीवर बसवते. इंदूमति उठून दूर उभी रहाते. )

शारदा—जीव कातावून गेलाय अगदीं ! तोंड दाखवायला जागा उरली नाहीं जगांत ! अहो काय सांगू तुम्हांला इंदिराबाई, वर्तमान-पत्रांत कीं हो आलीय ही हकीगत ! कसं करायचं आतां ?

इंदिरा—असं झालयं खरं. आतां काय आहे त्याला उपाय !

शारदा—उपाय एकच, हिनं नोकरी सोडावी अन् मुकाट्यानं घरीं यावं.

इंदू—( येऊन शारदेच्या पायाला हात लावून तिच्या पायाशीं बसते. ) सासूबाई नव्हे, तुम्ही आई आहांत माझ्या. तुम्हीच सांगा हा प्रसंग तुमच्या मुलीवर आलाय—

शारदा—( आवंढा गिळून ) तसं नाहीं ग बाई व्हायचं ! माझी प्रेमाताई तशी नाहीं !

इंदू—( उठून दूर उभी राहून ) खात्रीनं सांगाल कां हें ? ( क्षणभर सर्वत्र स्तब्ध ) आजच्या काळांत कुणीसुद्धां खात्री देऊं नये कुणाची–प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याची सुद्धां–प्रेमाच्या जीवाची सुद्धां ! मला वचन दिलं होतं, त्या वचनावर विश्वासून मी तुमची सून झाले—

इंदिरा—सज्जन मुलगा आहे ना तो ! चांगला कर्तासवरता आहे. प्रत्यक्ष घरचा नसला तरी अगदींच कांहीं शाळा कॉलेजांतला विद्यार्थी नाहीं. विचारावं असं वाटलं नसेल त्याला !

कुंदा—त्यानं कशाला विचारायला हवं होतं कुणाला ?

इंदिरा—हे काय बोलणं झालं ! वडील माणसं आहेत ना ! त्याचं घरीं राहयचं आहे ना त्याला ?

सुनंदा—मला क्षमा करा. एकच प्रश्न मी विचारते, मला कांहीं कळत नाहीं यांत, पण समोर नजरेला दिसतं तेवढंच पाहून मी विचा-रतें. त्यानं विचारलं नाहीं यांत काय बिघडलं ?

शारदा—आतां तूं सुद्धां विचारूं लागलीस सुनंदा ?

सुनंदा—हो ! मला लग्न करायचं आहे. नोकरीही करायची आहे. घर चालवणं मोठं-कठीण झालंय आजच्या काळांत—म्हणून नोकरी करायची आहे मला—म्हणूनच मी विचारते, काय बिघडलं आम्ही नोकरी केली म्हणून ?

शारदा—हें काय बोलणं झालं ! किती झालं तरी तें ऑफिस—लहान आहेत, मोठे आहेत, म्हातारे आहेत तसे तरुणही आहेत—अशा माणसांत तरण्याताठ्या मुलींनीं वावरा-यचं ! छे ! नाहींच पटत तें मनाला.

कुन्दा—मी विचारूं कां एक प्रश्न ?

इंदिरा—आतां पुरे झाली तुझी अक्कल.

शारदा—नाहीं, नाहीं, विचारूं दे. काय म्हणणं आहे तुझं कुंदे.

कुन्दा—आतां हा इंदूचा नवरा, ऑफि-सांत जातो,—तोही तरणाताठा मुलगा आहे त्याच्याही ऑफिसांत मुली आहेत—एका हातानं कांहीं टाळी वाजत नाहीं—भीती वाटते ती ही मुलगी आहे म्हणून, बिघडेल म्हणून–पण मुलगा असल्याशिवाय कांहीं मुलगी बिघ-डत नाहीं अन् मुलगी असल्याशिवाय मुलगा बिघडत नाहीं. ऑफिसांत गेलं म्हणून जर मुलगी बिघडेल तर ऑफिसांत जातो म्हणून मुलगा कां बिघडायचा नाहीं ?

शारदा—अग तो मुलगा आहे ना ! ऑफिसांत आजवर सारे पुरुषच होते—

कुंदा—पण आतां मुलीही जाऊं लागल्या आहेत तिथं—

शारदा—हो आतां मुली जाऊं लागल्या आहेत ऑफिसांत—( क्षणभर चाचरत थांबते ) मुलगाच तो, विश्वास टाकायला हवा त्याच्यावर. तुमची ही मुलींची जात—

कुंदा—कां मुलगाच तेवढा विश्वासू आणि मुलगीच कां अविश्वासू ?

इंदिरा—एवढं मात्र खरं बोललीस कुंदे. हें माझ्यासुद्धां आलं नव्हतं ध्यानांत. असं पहा शारदाबाई, ही ऑफिसांत गेली तर बिघडेल, असं खरोखरच कां तुम्हाला वाटतं ?

सुधा—अन् घरीं राहिली तर नाहीं का बिघडायची ? घरीं राहाणाऱ्या सुना-मुलींनींसुद्धां थोडे कां गुण उधळलेत ?

अनुक्रमणिका






इंदू—हात जोडते तुम्हांला—क्षणभर उगी रहा. ( पुन्हां येऊन सासूच्या पायाशीं बसते ) माझा जिण्यामरणाचा प्रश्न आहे सासूबाई. तुम्ही सांगा मला, घरीं बसून मी काय करूं? स्वैंपाक करायला स्वैंपाकीण आहे. धुणी-भांडी-बाजार करायला गडी आहे. तुमची प्रेमा कांहीं करते काम?—ती कॉलेजांत तरी जाते—तरीच रिकामी बसून ठेवणार आहांत कां मला? मग मी बी. ए. झाले आहे ती कशाला? समजा, ऑफिसांत नाहीं गेले—तुम्हीं ऑफिसांत जाऊं नको म्हणतां. म्हणून म्हटलं, शाळेंतली मास्तरीण होऊं का मी, तरीसुद्धां परवानगी मिळेना मला! घरीं बसून मी काय करूं? गांवांतल्या उखाळ्यापाखाळ्या काढीत बसूं? सांगा ना काय करूं मी? कसं जगायचं मी? कसं मी हे जीवन कंठायचं? सांगा ना इंदिराबाई.

**इंदिरा**—कसं देऊं मी, याचं उत्तर!

**इंदू**—माझ्या जागीं तुम्ही असतां तर तुम्ही काय केलं असतं?

**इंदिरा**—काय केलं असतं ते कसं सांगतां येईल मला? त्यावेळीं असं कांहीं नव्हतंच मुळीं.

**इंदू**—थोडीशी कल्पना तर करून पहा, काय केलं असतं तुम्ही? गडी घालवून दिला असतां? स्वैंपाकीण घालवून दिली असती? धुणी-भांडीं, स्वैंपाक स्वतः हातीं केला असता?—( उत्तरासाठीं क्षणभर वाट पाहून ) तुम्ही तसंही केलं असतं कदाचित्. तुम्ही बी. ए. नव्हता, तुम्हांला नुसतं लिहितां-वाचतां येत होतं, नुसतं पुस्तकांनाच लिहितां-वाचतां येत होतं तेव्हां. मी बी. ए. झाले आहें, चारचौघींपेक्षां मी विशेष कांहींतरी आहे अशी जाणीव झाली आहे मला. ती जाणीव विसरतां येत नाहीं मला. तें माझं शिक्षण कामीं लागलं पाहिजे कुठंतरी. ते माझ्या शिक्षणापायीं जे पैसे खर्ची पडले आहेत त्याचं निदान व्याज तरी मिळालं पाहिजे मला. घरीं स्वस्थ बसून मिळेल का तें? सांगा ना मला—सुशिक्षित झालेली मुलगी, सुविद्य झालेली मुलगी, मी घरीं स्वस्थ बसून राहूं? कां राहूं? कांहींतरी करायची अंगीं धमक असतांना मी कां स्वस्थ बसून राहूं? अन्याय नाहीं का व्हायचा तो! सांगाना—( उत्तरासाठीं पुन्हा थांबते. )

**कुंदा**—या प्रश्नाचं उत्तर मला सुद्धां पाहिजे. ( इंदिरेला ) हिला उत्तर द्यायचं नसेल आई, तर तूं मला सांग, अशा सुशिक्षित मुलीनं घरीं स्वस्थ बसून कां राहावं? असाच प्रसंग उद्यां माझ्यावर आला तर आई म्हणून तूं हेंच का सांगणार आहेस मला?

**इंदिरा**—खरंच सांगा शारदाबाई—अगदीं जीव तोडून विचारतेय् मी तुम्हांला-खरंच सांगा, काय चुकतंय् हिच्या मागणींत ( शारदा स्तब्ध राहते. )

**कुन्दा**—तिला सांगायचं नसलं तर मला सांगा. काय चुकतंय् हिचं?

**शारदा**—एकच चुकतंय्.

**कुन्दा**—काय चुकतंय्?

**शारदा**—बायकांच्या जन्माला आलीं—अन् तीही ह्या गुलामाच्या देशांत—नसानसांतून गुलामगिरी खेळत होती अशा काळांत! ही माझी सून नेहमी म्हणत होती तसं तें! या गुलामाच्या देशांत, गुलामीच्या हवेंत जन्मापासून वावरत राहिलों होतों आम्हीं—( गहिंवरून ) म्हणून तुझे असे हाल होताहेत पोरी! ( इंदूमतीचा हात धरून तिला ओढून जवळ घेते ) अगदीं अक्षरशः खरं आहे तुझं म्हणणं! शब्दन्-शब्द पटतो आहे मला तुझा. ते म्हणत होते त्यावेळीं नव्हतं वाटलं असं—हेच प्रश्न विचारले होतेस तूं त्यावेळीं—तुला उत्तरं मिळत होती तीं त्यांच्याकडून—त्या घरधन्याकडून—त्यावेळीं त्या घरधनी पुरुषाचा साउट पडली होती माझ्यावर म्हणून त्यावेळीं तसं वाटलं. आतां आम्हीं साऱ्या बायकाच जमलों आहोंत इथं—गोरी काय थोरी काय, पण साऱ्या बायकाच!—बायकांच्या दृष्टीनं पाहतां असं वाटतं नवऱ्याशीं भांडावं, मुलाशीं भांडावं, शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं भांडावं अन् म्हणावं घरची प्रधानीण मी आहें, खुशाल जा. माझा अगदीं विश्वास आहे तुझ्यावर. संसाराला हातभार लावतेस तूं, उपकार आहेत तुझे आमच्यावर. ( क्षणभर स्तब्ध राहून इंदूमतीला हातीं धरून उभी राहते. ) हें मी इथं बोलतेंय् ग पोरी, तिथं बोलायचा धीर व्हायचा नाहीं मला. मुर्दाड होऊन गेलंय् आमचं मन. अगदीं नाईलाज झालाय् माझा. कांहीं चालायचं नाहीं माझं तिथं. फुकट, फुकट हें आमचं जिणं!

**इंदिरा**—मग आतां काय करणार हिचं तुम्ही?

**शारदा**—कांहीं सुद्धां करणार नाहीं मी! सांगितलं ना, कुणीसुद्धां ऐकायचं नाहीं माझं! बरं झालं इथं आलेंय् ती—कांहीं निष्पन्न झालं नाहीं तरी डोळे उघडले माझे पोरी! सून नव्हेस तूं, मुलगी आहेस तूं माझी. घरांतून घालवून देतेय् मी तुला. अगदीं निर्भयपणानं घालवून देतेय्. तिळतिळ काळीज तुटतंय् माझं. पुन्हा कांहीं सुद्धां करतां यायचं नाहीं मला—एवढी सुद्धां दया दाखवतां यायची नाहीं मला—खरं बोलतां यायचं नाहीं—मनाला पटतंय् तें एवढं सुद्धां बोलून दाखवितां यायचं नाहीं. जा मुली, प्राक्तन नेईल तिकडे जा. इज्जतीनं वाग. कलंक लावूं नकोस आपल्या नांवाला. पुढला मार्ग तुला ईश्वरच दाखवील. क्षमा करा इंदिराबाई. आतां बोलवत नाहीं माझ्याच्यानं. तुम्हीं तरी आसरा द्या तिला—( मुसमुसून येऊन इंदूमतीला कवटाळते. )

**इंदू**—( सद्गदित होऊन ) आई!—

**शारदा**—हो—आईच!—निर्दय, कठोर, अन् वर गुलामाची बायको—गुलामाची गुलाम! उघड्या डोळ्यांनीं होत असलेला अन्याय पाहून जिला दिक्कत वाटत नाहीं. असली ही मी—ही असली कसली तुमची आई! आई म्हटलंस मला, धन्य झालेसं वाटलं—तुझ्या स्वतःच्या आईनं सुद्धां पदरांत घेतलं नाहीं तुला? तीच मी! अशाच झाल्याहेत ह्या सगळ्या 'आई' आतां इंदिराबाई आतां हिच्या आई तुम्ही—तुमच्या हातीं सोंपवते मी तिला—( इंदूमतीची मिठी सोडवून तिला झटकून एकदम निघून जाते. क्षणभर सर्वत्र स्तब्धता )

**इंदिरा**—( गहिंवरून ) आतां काय करणार आहेस इंदू?

**इंदू**—आतां कांहींही झालें तरी वाईट वाटायचं नाहीं मला—दुःख वाटायचं नाहीं—यातना व्हायच्या नाहींत, पिळवटून निघायचं नाहीं हें माझं काळीज! कुठच आसरा मिळाला नाहीं तरी एवढंच समाधान मिळालंय मला कीं आतां 'आई' जाग्या होणार. आज नाहीं उद्यां या मुक्त झालेल्या देशांतल्या 'आई'—लहान मोठ्या साऱ्या 'आई' आतां जाग्या होणार. माझी निराधार स्थिति पाहून आज ना उद्यां 'आई'ची जात बंड करून उठणार—अगदीं खात्री वाटतेय मला!

**कुन्दा**—किती आशाळभूत आहेस तूं!

**इंदिरा**—खरंच! किती आशाळभूत आहेस तूं!

**इंदू**—नाहीं आई. मी आशाळभूत नाहा. देश आतां स्वतंत्र झालाय. गुलामगिरी नाहींशी झाली. गुलामगिरीची जुनी सावली अजून






जाणवत असली तरी प्रकाश येईल. ही साउली मावळेल.उजेड फांकेल जिकडे तिकडे! (इंदिराबाईच्या जवळ जाऊन) स्वत:च्या आईनं टाकलं, नवऱ्याच्या आईनं टाकलं, मैत्रीणीच्या आईनं टाकलं—आतां माझा आधार एकच—माझं मायबाप सरकार! माझं सरकार—हजारो वर्षांची गुलामगिरी उधळून लावून स्वतंत्र झालेलं माझं सरकार! मला आशीर्वाद द्या. 'आई' (इंदिरेच्या पायावर मस्तक ठेवते. इंदिरा तिला वर उचलते) एवढाच आशीर्वाद द्या. मला स्वतंत्र भारतांतल्या आम्हां मुलींना स्वत:च्या पायावर उभं राहून मानानं जगायचं सामर्थ्य जगानं द्यावं. स्वतंत्र भारताचं सौभाग्य म्हणजे आम्ही मुलीं—आमच्या सौभाग्यानं भारताचं सौभाग्य मोठं होईल—(पुन्हां इंदिराबाईच्या पायावर मस्तक ठेवतो.)

**इंदिरा**—(तिला वर उचलीत) तथास्तु!

**इंदू**—येते मी. मला क्षमा करा. तुम्ही माझ्या आईबहिणी—बायकांच्या जातीला होणारा अन्याय पाहून, चीड येऊन घराबाहेर निघालेल्या या दुर्दैवी मुलीला नांव ठेवूं नका उगीच! जुन्या गुलामगिरीच्या पायीं स्वातंत्र्य आलं असतां सुद्धां, खर्ची पडली आहे ही!—स्वातंत्र्य आलंय् हें अजूनसुद्धां जाणवत नाहीं आम्हांला; म्हणून खर्ची पडलेंय् न् मी—मला क्षमा करा—मी येतें आतां! (एकदम जाते.)

**इंदिरा**—(डोळे पुसून) अरेरे! गरीब बिचारी! (एक मोठा हुंदका देऊन मटकन् खालीं बसते. बाकीच्या तिघीजणीं दाराकडे जाऊन बाहेर पाहात राहतात.)

(पडदा.)

---








आजची हवा कांहीं निराळीच होती. तिला निराळेपणा आला होता तो कशामुळें तें कोण जाणें ? वांबावरून नदीकडे जातांना बैलांच्या खुराखालीं नो महिपतीच्या पायतणांच्या तीन बोटें जाड टाचेखालीं चिरडलेल्या नागरमोथ्याचा तीक्ष्ण गंध हवेंत दरवळल्यामुळें असेल; किंवा हरभऱ्याच्या रोपावर मोत्याच्या चुराप्रमाणें चमकणाऱ्या दंवाच्या दाट तुषारामुळें असेल; गेल्या पंधरवड्यांत सरसरून वाढलेल्या जोंधळ्यांच्या रुंद पातींच्या सळसळीमुळें असेल अथवा चोंहीकडे तरवडावर फुललेल्या पिवळ्या धमक फुलावर असेल. कोणास ठाऊक कशामुळें तें. पण आजची हवा निराळी होती खास. ऋतुमान बदलल्याची स्पष्ट चाहूल तिच्यांत उमटलेली होती. तरवडाच्या फुलाफुलांतून मध गोळा करीत हिंडणाऱ्या माशा अधिक मस्तींत आल्या होत्या आणि शेतांवर किरकिरणाऱ्या पांखरांचे पंख अधिकच हलके नि मोकळे झाल्यागत वाटत होते. दोन कोसांवरच्या केंजळ गांवांतल्या बहिरोबाच्या देवळाचा कळस देखील आज अधिकच झळकतो आहे असें महिपतीला वाटलें.

दी. ५

दरडीवर पोंचल्यावर महिपतीनें बैलांना तसेंच पाणवठ्यावर जाऊं दिलें आणि तो स्वतः दरडीवरच उभा राहून खालीं पसरलेल्या कृष्णेच्या डोहाकडे पाहूं लागला. डोहाचें पाणी काचेसारखें नितळ नि स्वच्छ दिसत होतें. त्या अथांग डोहांत किती शतकांचीं काय काय गुपितें कृष्णामाईनें सांठवून ठेवलेलीं होतीं ! ऐल तीरावर लहानी सोनारी आणि पैल तीरावर थोरली सोनारी बसलेली होती. त्या दोन गांवांतल्या शेतकऱ्यांच्या किती तरी पिढ्या तिचें स्तनपान करून वाढलेल्या होत्या. मळईमधल्या मक्यांतली किती चोरटीं प्रेमें चांदण्यानें धुंद बनलेल्या रात्रींच्या स्वप्नाळू उजेडांत तिनें पाहिलेलीं होतीं. कितीतरी विधवांचीं कढत आसवें तिच्या वक्षःस्थळावर सांडलेलीं होतीं. कितीतरी लाजऱ्या नवऱ्या तिला नमस्कार करून या तीरावरून त्या तीरावर गेलेल्या होत्या. दोन्ही सोनारांतल्या तरण्या बांड पोरांनीं रंगेलपणानें तिचें पाणी घुसळून काढून आपल्या यौवनाचा उन्माद तिला कितीतरी वेळां चाखवला होता. आणि संध्याकाळच्या गहिऱ्या सांवल्या डोहावर दाटू









लागल्या कीं मारकेऱ्यांच्या फरशांवरचे साकळलेल्या रक्ताचे डाग तिनें अनेकवार धुऊन काढले होते.

महिपति त्या अथांग डोहाकडे कितीतरी वेळ पाहत उभा राहिला. पूर्वीच्या इतक्या गोष्टी तूं पाहिल्या आहेस. पण पुढची तुलाँ कांहीं सांगतां येईल का?' असा प्रश्न त्या जळदेवाला विचारावा असा विचार महिपतीच्या मनांत येऊन गेला. महिपति उभा होता तिथून थोड्याच अंतरावर कृष्णेचें पात्र वळण मारून डाव्या अंगाला वळलें होतें. त्या बाजूला थोरल्या सोनारांचा पाणवठा होता. धुणीं धुण्याचें, माणसांच्या बोलण्याचे अस्पष्ट आवाज तिकडून येत होते पण महिपतीचें त्यांच्याकडे लक्ष नव्हतें. सकाळच्या कोवळ्यां उन्हांतून, हलक्या निळ्या आकाशांतून, पाखरांच्या स्वच्छंद भराऱ्यांतून डोहाच्या सस्मित गंभीरतेंतून जें नवजीवन आज लहरतांना भासत होतें तें महीपति जणूं पिऊन घेत होता, दाव्याचें विरडें काढतांच गाईचे ताठलेलें सड त्या अधीर ओठांनें वासरूं लुचूं लागतें त्याच अधीरतेनें, त्याच आवेशानें.

तो अथांग डोह निःस्तब्ध झोंपला होता. कांठावरून पाण्यांत ओणवलेल्या बाभळीच्या वाकड्या फांदीवर टपून बसलेला खंड्या एकाद वेळीं बाणासारखा सणकन पाण्यांत घुसे नि परत बाभळीच्या झाडावर जाई. त्या वेळीं त्याच्या पंचरंगी पंखांचे कवडसे डोहाच्या आरशांत चमकत. उंच उंच आकाशांतून एकादा बगळा आपली परीट घडी शिडें फडकावीत संथपणें उडे तेव्हां त्याचें प्रतिबिंब क्षण दोन क्षण डोहामध्यें रमे. डोहाच्या पलीकडे उमाळ्यापर्यंत रानांतलें पीक उभें होतें. क्षितिजावर गर्द निळ्या डोंगराचा दांड आडवा पसरलेला होता आणि छोटे छोटे पांढरे शुभ्र ढग त्याच्या अंगावरून डुलकत डुलकत हलक्या मेंढरांच्या कळपासारखे पुढें सरकत होते. महिपतीनें हरखून जाऊन एक जोराचा श्वास घेतला. सृष्टींत भरलेलें अमृतमय चैतन्य तो जणूं आपल्या पंचेंद्रियांनी पोटांत साठवूं पाहत होता. धोतर सोडून त्यानें आपला लंगोट ठाकठीक कसला, झपकन् पैरण काढली आणि मुंडासें त्यावर ठेवून, गळ्यांतली मारुतीची पेटी बोटांनीं छातीवर मस्तकाशीं आणून त्यानें दंड थोपटले. तो मनांत म्हणाला, 'आज डोहाचा तळ काढल्यबिगर राह्याचं न्हाई...'

'एऽऽ महिपा, एऽऽ भैय्या ऐकाया येतय कां नाय?'

महिपतीनें जरा त्रासिक मुद्रेनेंच डाव्या अंगाला जिकडून ही हाळी आली तिकडे पाहिलें. सदू भोई तो उथा टेंबावर उभा होता त्या रोखानेंच मोठ्या दक्षतेनें काहिल घेऊन येत होता. काहिलींत चार उतारू होते. पण उताराची नेहमींची जागा सोडून सदू भोई आज इकडे कुठें आणतो आहे या मंडळींना, असा प्रश्न महिपतीच्या मनांत येऊन महिपतीनें जरा सलगीच्याच आवाजानें विचारलें,

'पाव्हणं मासं माराया निघाल्यांत जणूं डोहावर?'

त्याला सदू भोयाकडून कांहीं उत्तर मिळालें नाहीं. त्यानें डोळे वटारून महिपतीकडे पाहत जरा दटावणीच्या आवाजांत म्हटलें,

'गुमान खालीं उतर आन् पावण्यास्नी उतराया हात दे. पगत राहूं नको येड्यावाणी. कोण पावणं कश, जरा दसल ठेवून बोलशील का न्हाई?'

सदू भोई छातीएवढ्या पाण्यांत खालीं उतरला होता आणि त्यानें दोन्हीं हातांनीं काहिल तोलून धरली होती. तोल सावरल्या-वर कडेच्या मऊ गाळांतर्ह एक एक पाऊल उचलून तें पुढें रोवीत आणि एका हातानें काहिल ओढून घेत तो कांठाकडे येत होता. महिपतीच्या बैलांनीं पोटभर पाणी पिऊन घेतल्यामुळें त्यांच्या कुशी फुगलेल्या होत्या आणि त्यांच्या जबड्याखालच्या केसांतून पाण्याचे थेंब खालीं डोहाच्या पाण्यांत टपकत होते. सदूची काहिल आपल्याच बाजूला येत आहे असें पाहिल्याबरोबर त्यांनीं शिंगें हालवलीं, काहिलींतल्या उतारूंकडे त्या डोहांतल्या पाण्याइतक्याच आपल्या काळ्याभोर व विशाल डोळ्यांनीं पाहिलें आणि जरा विचकल्यासारखे करून गळ्यांतले घुंगूर खळखळवी. ते दरड चढून पांदीमध्यें दिसेनासे झाले.

महिपति तसाच लगबगीनें खालीं आला आणि गुडघाभर पाण्यांत जाऊन जरा हात पसरून उभा राहिला. काहिलींतला एक पाव्हणा त्यानें ओळखला होता. केंजळपासून दोन्ही सोनापुरापर्यंतच्या बारा गांवांत त्यांची इनामदारी होती. जाड पाकळ्यांच्या झडपांमुळें सदैव अर्धवट झोंपल्यासारखे दिसणारे त्यांचे ते कासवासारखे डोळे उभ्या तालुक्याला चांगले परिचित होते. घुबडाचें दर्शन झालें कीं माणसें जशीं दचकतात तसेंच बाळासाहेब इनामदारांचें दर्शन झालें कीं पंचक्रोशींतलीं माणसें दचकत असत. त्यांतल्या त्यांत धाकट्या सोनारीच्या लोकांचें व बाळासाहेबांचें तर विळ्याभोपळ्यासारखें सख्य होतें. पण बाळासाहेबांबरोबरचे आणखी तीन उतारू कोण? त्यांतला जो खाकी हाफ पँट, लोकरीचे मोजे व बूट अशा पोशाखांत होता तो इंजिनियर असावा असा महिपतीनें कयास बांधला. त्याला कऱ्हाड इस्लामपुरकडे केव्हां तरी आपण पाहिल्यासारखेंहि महिपतीला वाटलें. पण बाळासाहेब इनामदार व इंजिनियर यांना सोडून जीं दोन माणसें होतीं तीं पाहून महिपति अगदीं अवाक् होऊन गेला. त्यांपैकीं एक पुरुष होता आणि एक बाई होती. पुरुष पन्नास पंचावनच्या सुमाराचा दिसत होता. उंच देह, धवरीत नाक, दाढी मिशा सोफ केलेला तेजस्वी चेहरा आणि जाड भिवयांच्या खालीं जंबियाच्या धारेप्रमाणें लकाकणारे घारे डोळे...आणि ती बाई? बाई नव्हती ती अन् पोरगीहि नव्हती. मोटेच्या पाण्यावर वाढलेल्या निळ्याच्या रसरशीत धाटासारखी उंच होती नि सरळ होती. तिच्या नाकपुड्या नि तिचे ओंठ नि तिचे डोळे...ते डोळे...जवसाच्या फुलासारखे निर्मळ निळे डोळे...खंड्याच्या पांखासारखे तळपते डोळे! हिरव्या गोल साडींत आंतल्या पांढऱ्या कपड्यांचा रंग मिसळून ती अशी दिसत होती कीं जसें खचून दाणे भरलेलें मक्याचें कणिसच!

महिपति आपले हात किंचित् पसरून गुडघाभर पाण्यांत दगडी पुतळ्यासारखा उभा राहिला होता. गोंधळून गेल्यामुळें त्याला किंचित् घाम फुटला होता. आखाड्यांतल्या मुलतानी मातीनें किंचित् तांबूस झाक चढलेलें त्याचें शरीर घामाची तकाकी चढल्यामुळें नुकत्याच रंगवून वाळत ठेवलेल्या चित्रासारखें दिसत होतें. आपल्याकडे काहिलींतल्या उतारूंचें लक्ष आहे याची जाणीव महिपतीला होती. इंजिनियरप्रमाणें दिसणारा तो साहेबी पोशाखांतला माणूस आपल्या हातांतलें कागदाचें नळकांडें काखेंत मारून उभा राहिला आणि सदूनें व महिपतीनें काहिल नीट सावरून धरली आहे हें पाहतांच चटकन् उडी मारून कांठावर गेला. बाळासाहेब इनामदारांनीं आपल्या धोतराचे सोगे उजव्या हातानें आवरून घेतले, डाव्या हातांत पायतणें घेतलीं आणि आपल्या रुंद जबड्यांतून डोहामध्यें एक पिंक टाकून ते धबक्कन् पाण्यांत उतरले. गाळांतून कांठाकडे जातां जातां तोंड फिरवून ते काहिलींतल्या त्या गृहस्थाकडे वळून म्हणाले—





'आप्पासाहेब, येतानं वरं का. तुम्ही खोल पाण्यांत उतरूंच नका. हे सद्या नि महिप्या कांठावर आणतील देखील तुम्हाला अलगत... पण कांठावर पोचल्यावर पाखतणांत पाय मरकवतां मरकुवतां ते म्हणाले? 'सद्या, महिप्या संभाळून उतरवा रे त्यांना.'

महिपतीनें बाळासाहेबांच्या बोलण्याकडे लक्ष सुद्धां दिलें नाहीं. काहिलीच्या कडेवरची बोटांची पकड तेवढी त्यानें जरा घट्ट केली. सदू मात्र मान झुकवून लाचारीच्या स्वरांत म्हणाला.

'व्हय जी.'

सदूनें आपला एक हात जरा वर केला आणि त्या जरा वयस्कर इसमाला तो म्हणाला, 'माझ्या खांद्यावर किंचित भार टाका साहेब मंजी अलगत उचलून नेतो तुमास्नी.'

त्या गृहस्थानीं आपला डावा हात सदूच्या उजव्या हातांत देऊन ते हलूच त्याच्या खांद्यावर टेकले आणि बरोबरच्या बाईला उद्देशून म्हणाले, 'सुलू, गडबड करूं नको बरं का. जपून उतर. नाहींतर धांदलींत जर का पाय घसरला विसरला...'

'ओ्ना मला पोहता येतंय् म्हटलं,' सुलू आपल्या जरा पुढें आलेल्या बटा मागें सारीत आणि सनीवेंगचा पट्टा खांद्यावर नीट बसवीत बेदरकारपणें म्हणाली.

'तें आहे मला ठाऊक. पण हा कृष्णेचा डोह आहे. सी. सी. आय. मधली पुष्करणी नव्हे,' अप्पासाहेबांनी किंचित हसून तिला खोडून काढलें आणि पाण्यांत अवघडून उभ्या असलेल्या सदूला ते म्हणाले. सदोबा, टेकवा आमचा हा बोजा कांठावर. जरा भारीच आहे हो पण. संभाळा.'

सदू या विनोदीनें ओशाळा होऊन म्हणाला—

'असूं द्या कीं. चार पावलं जाई पातर काय मान मोडनार न्हाई माजी. चांगली घट हाय.'

अप्पासाहेबांचें बोलणें खोटें नव्हतें. त्यांचें वजन काहिलींतून कमी झाल्याबरोबर काहिल दोन अंगळें एकदम वर उठली नि सुलूच्या बाजूला थोडीशी कलली. त्याबरोबर सुलूचें अवसान सुटून तिनें एकाएकीं महिपतीच्या अंगावर आधारासाठीं झेप टाकली.

आपण आपले काहिलीवरचे हात सोडून सुलूला केव्हां कवटाळून घेतली, कांठावर कसे आलों नि दोन पुरुष उंचीची ती दरड चढून तिला खालीं केव्हां उतरवली याची शुद्ध महिपतीला राहिली नाहीं. त्याचें सारें अंग आंतून बाहेरून धगधगत होतें, थरथरत होतें. नागरमोथ्याच्या सूक्ष्म सुगंधानें, तरवडीवरच्या घमघमीत फुलांनीं, हरभऱ्यावरच्या कणीदार दहिंवरानें, डोहाच्या निगूढतेनें आणि आकाशाच्या झळझळीत निळ्या घुसटीनें त्याच्या नसानसांत ओतलेलें जीवन त्या क्षणाला जणूं उतास जाऊं पाहत होतें. पण सुलूचे डोळे अगदीं थंड होते, चेहरा निर्विकार होता.

सुलूला तो खालीं उतरवतो तोंच अप्पासाहेब, बाळासाहेब दरड चढून वर आले. अप्पासाहेबांना थोडी धाप लागली होती पण ती तशीच दाबीत ते म्हणाले, 'सुले कमाल आहे तुझ्या धांदरटपणाची. पोटभर पोहायला मिळणार होतं आज वरं का...'

'न्हाई, आमचा महिपा असल्यावर भ्या न्हाइ या डोहाचं. जान्हं प्वार पडलं तर बुडूं न्हाई देणार महिपा,' खाद्यपदार्थांची भली लठ्ठ टोकरी खालीं उतरवीत असतां सदू अभिमानानें बोलला.

'म्हादू सकपाळाचाच मुलगा ना रे हा?' बाळासाहेबांनीं आपलें ज्ञान प्रकट करण्याच्या बुद्धीनें म्हटलें.

'व्हय जी. येवढाच ल्योक हाय म्हादबाम्नी,' सदूनें स्पष्टीकरण केलें.

डोक्यावरची काळ्याभोर बनातीची टोपी काढून अप्पासाहेब आपलें टक्कल पडलेलें घवघवीत मस्तक पांढऱ्या शुभ्र रुमालानें टिपून घेत होते. ते मधेंच थांबून म्हणाले—

'मला तर वाटलं कीं हा टारझन आतां आमच्या सुलूला घेऊन जंगलांत पळून जातो कीं काय?'

सुलू किंचित चेकाळलेल्या आणि किंचित लटक्या रागीट आवाजांत म्हणाली, 'अय्या, अण्णांचं आपलं कांहीं तरीच,' आणि खुदकन् हसली.

आणि मक्याच्या कणसांतला दुधाला आलेला दाणा नख लागून टचकन् फुटावा तसें कांहीतरी झाल्यासारखें महिपतीला वाटलें. बाळासाहेबांनीं पानपट्टीचा नवा तोबरा डाव्या गालफडांत भरला होता. त्याचा रस तोंडांत खेळवीत अण्णासाहेबांच्या विनोदाचें मर्म आपणाला बरोबर समजलें आहे असें दाखवून ते बोबड्या शब्दांत बोलले.

'ह्या रानगटांचा कांहीं नेम नाहीं सांगतां यायचा वरं अप्पासाहेब.'

इतक्यांत दरडीच्या नाकाडावर चढून आजूबाजूला दूरवर पाहून राहिलेले इंजिनियरसाहेबहि त्यांना येऊन मिळले. आल्याबरोबर अगदीं व्यवहारी सुरांत त्यांनीं सुरवात केली—

'अप्पासाहेब, या शेतापासूनच आपल्या हद्दीला सुरवात होते म्हणाना. इथपासून तों पश्चिमेला चार मैलांवरच्या दुधणी स्टेशनाजवळून जाणाऱ्या पुणें–बंगलोर रस्त्यापर्यंत उलग आपल्या कारखान्याचें क्षेत्र. तो तीन चार फर्लांगावर वड दिसतो आहे ना तिथं फॅक्टरी येईल आणि आपण उभे आहोंत हीच पंपाची जागा. आपण अगदी नेमके याच जागेवर कसे उतरलों, हें आश्चर्य. हा पाहिलात नकाशा...'

सदूनें पसरलेल्या सरपोसावर सुलू बसली होती आणि टोकरींतून हा जिन्नस काढ, तो जिन्नस काढ असें सदूला फर्मावीत त्यानें काढलेला एक एक जिन्नस सरपोसावर मांडीत होती. नाजुक पानें फुलें काढलेल्या कपबश्या, चांदीचे कांटे, चमचे, चमकदार कांचेचे पेले, उकडलेलीं अंडीं, पावरोटी, लोणी, मोसंबीं, सफरचंद कायकाय पदार्थ येत होते बाहेर त्या टोकरींतून, पण महिपतीचें तिकडे लक्ष नव्हतें. 'या शेतापासून आपल्या हद्दीला सुरवात,' 'त्या वडापाशीं फॅक्टरी' 'आपण उभे

आहोंत इथं पंप.' यांच्या ह्या बोलण्याचा अर्थ तरी काय? सोनारीला साखर कारखाना होणार, मुंबईचे कोणी बडे शेट त्या पंचक्रोशींतली सारी जमीन विकत घेणार, चावडीवर कसल्याशा नोटिसा लागल्या आहेत असें काहीं तरी आपण बापाच्या तोंडून ऐकत असतों तेंच हें कीं काय? पण ही तर सारी आपली जमीन. अगदीं त्या वडापासून डोहापर्यंतची. त्याच्या पलीकडची आपल्या चुलत्याची. त्याच्या पलीकडे सोन्यांची, नकदुमांची, साळुंक्यांची. मग ही 'आपली जमीन' असें हा साहेब म्हणतो म्हणजे काय? 'इथं फॅक्टरी उभारणार' म्हणतो, 'इथं पंप बसवणार' म्हणतो तो. पण आपण पंप बसवणार आहोंत ही सुगी पदरांत पडल्यावर, त्याचें काय? पण हीं माणसें तर सगळीं चांगलीं दिसतात, सभ्य दिसतात. रातचीं चोरून मारून आलेलीं नाहींत. दिवसाढवळ्या आलीं आहेत. मग असं कसं बोलतात हीं...? महिपतीला कांहीं उमजेना. त्याच्या डोक्यांत गरगरल्यासारखें होऊं लागलें. आणि एकदम तडकल्यागत तो म्हणाला—

'आमच्या जित्रापांत बसून इथं पंप बसवण्याच्या भाषा तुम्ही खुशाल करतां याचा अर्थ काय? ही माझ्या बापाची जमीन आहे. संक्रांतीला आम्ही पंप बसवणार आहों इथं' हें बोलतांना आपण तोतऱ्यासारखें अडखळत बोललों हें लक्षांत येऊन महिपति अधिकच गोंधळून गेला.

सरपोसावर बसलेल्या मंडळींचें आतां चहापान सुरू होतें. अप्पासाहेब एकीकडे चहा घेत होते आणि दुसरीकडे इंजिनियरांनीं खालीं पसरलेल्या नकाशाकडे डोळे आकसून पाहत होते. नकाशावर बोटें ठेऊन इंजिनियर त्यांना निरनिराळ्या जागा दाखवीत होता. बाळसाहेबांनीं पहिला कप खलास करून दुसरा तोंडाला लावला होता. आणि अप्पासाहेबांचें चहाकडे मुळींच लक्ष नाहीं म्हणून सुलू त्यांना दटावीत होती, 'अप्पा, आधीं चहा पिऊन टाका नी मग बोला. गार होतोय् चहा...'

इतक्यांत महिपतीनें तिरमिरीनें उच्चारलेल्या त्या शब्दांनीं सुलूची लाडिक दटावणी मध्येंच तुटली. इनामदारांनी आपल्या जड पापण्या वर उचलून ओठाला लावलेल्या कपाच्या कडेवरून महिपतीकडे रोखून पाहिलें. इंजिनियरांनीं हा मध्येंच तोंड घालणारा तोतरा उपटसुंभ कोण अशा अर्थाचा त्रासिक चेहरा केला. पण अप्पासाहेबांनीं मात्र आपली बैठक जरासुद्धां बदलली नाहीं. सरपोसावरची कपबशी त्यांनीं उचलून हातांत घेतली आणि कप तोंडाकडे नेतां नेतां अगदीं सहजगत्या म्हणाले—

'हें पहा महिपति जर संक्रांतीपर्यंत जमीन तुमच्याकडे राहिली तर जरूर बसवा बरं तुम्ही पंप. एक सोडून दोन बसवा, काय इनामदार?'

'होय खरंच आपण बोललां तें.' सँडविचचा एक भला मोठा तुकडा तोंडांत इनामदार म्हणाले. 'अहो आपल्याला काय. यांचे पंप चालू झाले तर आपण त्यांचा मळा पाहण्यासाठीं पुन्हा एक खेप करूं. काय, ताईसाहेब?'

सुलू सरपोसावर आपल्या रंगवलेल्या मधल्या बोटाच्या नखानें कसल्यातरी रेघोट्या मारीत होती. तिनें अर्धवट वर पाहून हसल्यासारखें केलें. अप्पासाहेबहि हसले आणि म्हणाले, 'छान आहे कल्पना. वारंवार यावसं वाटण्यासारखं हें ठिकाण आहे खरं. इथलीं माणसं मात्र जरा तिखट वाटतात, नाहीं!' असें म्हणून त्यांनीं महिपतीकडे साभिप्राय कटाक्ष टाकला.

हीं बोलणीं ऐकून सदू गारठून गेला होता. अप्पासाहेबांच्या बोलण्यावर महिपति तिरसटासारखें कांहींतरी बोलणार आणि प्रकरण अधिकच चिघळणार तें टाळावें म्हणून तो अगदीं आर्जवाच्या सुरांत महिपतीला म्हणाला

'महिपा ऽऽ अर लोट्यांतून उलिसं पाणीतरी भरून आण. जा जा बिगी बिगी!' असें म्हणून त्यानें फिरकीच्या तांब्यांतलें थोडेंसें उरलेलें पाणी लांब फेकून तो महिपतीकडे केला.

'मला काय गांवचा वेसकर समजलास काय तूं सदा? मला वेळ नाहीं.' असें उत्तर देऊन महिपति चालूं लागला. सकाळपासून त्याच्या अंगांत उफाळलेलें सारें चैतन्य थिजून गेलें. सोडून ठेवलेलें धोतर घेण्यासाठीं तो टेंबावर गेला आणि त्यानें डोहाकडे आपली गढूळलेली नजर टाकली तेव्हां एक टीचभर लांबीचा मासा आपल्या तपकिरी चोचींत पकडून पाण्याबाहेर पडत असलेला खंड्या त्यानें पाहिला. खंड्याच्या धारदार चोचीच्या कैचींत अडकतांना माशानें मारलेल्या शेवटच्या फटकाऱ्याचीं वर्तुळें विशाल डोहावर पसरत मोठीं होत गेलीं आणि अमळशानें दिसेनाशीं झालीं.

बैल कोठें गुंगारले तें पाहण्यासाठीं महिपति जित्रापांत शिरला तेव्हां त्याच्या कानावर त्या कासव-डोळ्या इनामदाराच्या तोबऱ्यांतून उमटलेले शब्द आले, 'भारी मस्तवाल दिसतंय् कारटं.'

आणि सदू अजीजीनें म्हणत होता, 'तरुण रंगत हाय, व्हईल थंड.'

× × ×

थोरल्या सोनारीच्या चावडीवर आज पंचक्रोशींतले शेतकरी जमले होते. पाटलांनीं गुलाबी फेटा झोकदार बांधला होता आणि अंगांत खाकी कोट घालून ते चावडीच्या आंत बाहेर लगबग करीत होते. चावडीच्या ओसरीवर एक टेबल मांडलेलें असून पांच दहा खुर्च्या रांगेनें मांडून ठेवलेल्या होत्या. टेबलावरची रंगीत चादर पाटील मधून मधून साफ करीत होते आणि वर ठेवलेले दस्ताभर कागद उगीचच इकडून तिकडे, तिकडून इकडे हालवीत होते. उन्हें फिरूं लागलीं तसतशी पाटलांची धांदलहि वाढली. शेतकऱ्यांच्या पिवळ्या, पांढऱ्या, गुलाबी फेट्यांमुळें चावडीचें आवार गुलबाक्षीच्या ताटव्यासारखें फुलून गेलें. शेतकरी गटागटानें बसले होते. तंबाखू चोळीत होते, पिचकाऱ्या टाकीत होते, विशेष कांहीं झालेलें नाहीं असें भासविण्याचा प्रयत्न करीत होते. पण त्यांच्या दबून चाललेल्या बोलण्याचालण्यावरून प्रत्येकजण आंतून हवालदील झालेला होता हें सहज कळण्यासारखें होतें.

चावडीशेजारच्या पिंपळाची सावली आतां चावडीसमोरचा मोकळा चौक ओलांडून घरावर चढली आणि शाळेची घंटा घणघणून खुराड्याचें दार उघडतांच कबुतरें फडफड करीत बाहेर पडावीं तसा गोंगाट करीत शेंदोनशें पोरांचा लोंढा बाहेर पडला. कलेक्टर येणार तेव्हां गोंगाट नको



"आपल्या आवडत्या स्त्रीशीं संगम किंवा विरह यांतून तुला कोणतें हवें" असें जर कोणीं मला विचारलें, तर मी "विरह बरा, संगम नको" असें सांगेन! कां कीं, समागम झाला असतां ती एकटीच मला मिळणार. पण विरह जर घडला, तर अवघ्या त्रिभवनांत जिथें तिथें ती मला दिसेल!

म्हणून सांगळे मास्तरांनीं घंटाभर आधींच सोडली होती. चावडीच्या कट्ट्यावर उभे राहून त्या गोंगाटाच्याहि वरताण आवाजांत आबा पाटील गरजले, 'जेतां धरला मुकाट्या, का हाणूं एकेकाच्या टकोऱ्यांत.'

आबा पाटलांची गर्जना हवेंत विरते न विरते तों उंदरांच्या चपळाईनें मुलें चारी वाटा पांगतात न पांगतात तोंच मोटारींची स्वस्र स्वस्र कानावर आली. आबा पाटील तरातर पायऱ्या उतरून फेटा दोन्हीं हातांनीं सावरीत, दडपीत चौकांत येऊन उभे राहिले, आणि शेतकरीहि चूपचाप होऊन गटागटानें जागच्या जागीं खडे झाले. पहिली मोटर, दुसरी मोटर, तिसरी मोटर. एकाहून एक चकचकित आणि लांबरुंद मोटरी. ऐटबाज, सफेद टायरच्या, वसक्या आणि रेललेल्या! पहिली मोटर सरळ येऊन आबा पाटील होते तेथपासून दहा हात अंतरावर थांबली. त्यावरोवर ड्रायव्हरच्या शेजारीं बसलेले पोलिस इन्स्पेक्टर खालीं उतरले आणि त्यांनीं अदबीनें मागचा दरवाजा उघडला. कलेक्टर साहेबांची स्वारी बाहेर पडतांच इन्स्पेक्टर साहेबांनीं खाडकन् डाव्या बुटाची टाच उजव्या बुटाच्या टाचेवर हाणून सलाम केल्यावर पाठोपाठ आबा पाटील सामोरे जाऊन पाठींत खुरप्यासारखें वांकून सलाम करते झाले. इतक्यांत मागच्या दोन गाड्यांतून बाळासाहेब इनामदार, अप्पासाहेब, इंजिनियर साहेब आणखी पांच–सहा गांवकऱ्यांनीं कधीं न पाहिलेलीं माणसें खालीं उतरलीं. कांहीं लठ्ठ होते, तर कांहीं बारीक, कांहीं उंच होते तर कांहीं खुजे. कांहींच्या डोक्यावर भरजरी रुमाल होते तर कांहींच्या डोक्यावर साहेबी टोप्या. पण सगळे मोठे सभ्य दिसत होते यांत शंका नाहीं! कलेक्टरांनीं आबा पाटलांच्या वंदनाचा मानेनें स्वीकार केला न केल्यासारखें केलें, थव्याथव्यांनीं जागोजाग उभ्या राहिलेल्या शेतकऱ्यांकडे उडती नजर फेकली व ते चावडीच्या रोखानें निघाले. त्या बरोबर साराच जमाव तिकडे निघाला. टेबलाजवळच्या मधल्या खुर्चीवर कलेक्टरसाहेब विराजमान झाल्यावर बाकीची त्यांच्या समवेत आलेली शिष्ट मंडळी दोन्ही बाजूंच्या खुर्च्यांवर बसली. कलेक्टरांनीं अप्पासाहेबांना मुद्दाम बोलावून घेऊन आपल्या शेजारीं बसवलें.' कलेक्टरांच्या मागें पोलिस इन्स्पेक्टर आणि टेबलापाशींच अंग चोरून आबा पाटील उभे होते. कलेक्टरांनीं 'बराय् पाटील, आतां कामाला लागूं या,' असें म्हणतांच बरोबर आलेल्या मंडळीपैकीं एका बुटकेल्या गृहस्थानें तांबडी फीत गुंडाळलेलें एक बाड त्यांच्यासमोर आणून ठेवलें आणि फितीची सुरगांठ मोकळी केली, कलेक्टरांनीं विचारलें,

'संगळ्या गांवच्या मंडळींना कळवलं होतं आज इथं हजर राहण्या-बद्दल?'

'जी, कळवलं होतं.'

'आलीत सारी मंडळी.

'जी, प्रमुख प्रमुख सर्वे आलेत.

कलेक्टरसाहेबांनीं 'ठीक आहे' म्हटलें आणि ते टेबलावर जरा पुढें झुकून सर्व मंडळींना उद्देशून म्हणाले,

'हें पाहा...' त्या बरोबर सारे शेतकरी सावरून बसले. बहिरटवाडी, पिंपळगांव, तराळें, खरोशी, दोन्ही सोनोऱ्या या गांवची मंडळी तर आलीच होती पण आसपासच्या गांवांतले कांहीं खातेदारहि हजर होते. लहानल्या सोनोरीचा गट जरा वेगळा बसलेला होता. महादबा पाटील, आणि महिपति पुढें आणि बाकीची मंडळी मागें असा गोट बांधून ते बसलेले होते. कलेक्टरांनीं 'हें पाहा' म्हटल्याबरोबर महिपतीच्या तोंडून 'पहातोय सगळं कांहीं' असे कांहींतरी शब्द अर्धवट बाहेर पडले. त्या बरोबर महादबांनी त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला दाबलें. कलेक्टरांनीं जरा तिकडे मान केल्यासारखें केलें, इन्स्पेक्टरसाहेबांनीं शिकारी कुत्र्या-सारखे कान टवकारले आणि अप्पासाहेबांच्या भव्य चेहऱ्यावर एक अस्पष्ट स्मिताची रेषा उमटून लगेच नाहींशी झाली. कलेक्टर पुन्हा म्हणाले,

'हें पाहा, माझ्या शेजारीं बसलेले हे श्रीमंत अप्पासाहेब तुमच्या या भागांत एक प्रचंड साखर कारखाना काढणार आहेत. कारखान्यासाठीं हजारों एकर ऊंस करावा लागेल. त्याकरतां उत्तम जमीन हवी, भरपूर पाणी हवें, जवळपास रेल्वेचा व गाडीचा रस्ता हवा...'

'नि मुर्दाड शेतकरी हवेत' तालमेळ न साधल्यासारखा महिपति बोलून गेला. अप्पासाहेबांच्या तोंडावरचे स्मित अधिक स्पष्ट उमटलें, कलेक्टरसाहेबांची नजर एकदम करडी झाली आणि इन्स्पेक्टरांनीं तर एक पाऊल तिकडच्या दिशेनें उचललेंसुद्धां. हे शब्द ऐकून बाकीचे शेतकरी मनांत थोडे तरी हरखले असावेत. पण ते म्हणाले मात्र 'अरे जरा मुकाट बस कीं,' 'महादबाचं प्वार लई तालेवार पगा,' 'ल्हान तोंडीं मोटा घास घेऊं नाई' इत्यादि इत्यादि.

कलेक्टरांनीं या सगळ्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून आपलें बोलणें चालू केलें

'म्हणून हा भाग अप्पासाहेबांनीं निवडून काढलेला आहे. सरकारनें त्यांची योजना मंजूर केलेली असून तुमच्या पांच गांवांच्या जमिनी ॲक्वायर करावयाच्या—ताब्यांत घ्यावयाच्या—असें ठरवलेलें आहे. त्या बद्दल तुम्हाला योग्य तो मोबदला देण्यांत येईलच. जानेवारीच्या पहिल्या आठवड्यांत कंपनी तुमच्या जमिनी ताब्यांत घेण्यास सुरवात, करील. जो कोणी या कामांत अडथळा आणील त्याला कायद्याप्रमाणें शिक्षा होईल. ऐकलंत नीट मी काय म्हणतों तें?'

शेतकऱ्यांनीं इतका वेळ जणूं कांहीं श्वास रोखून धरला होता. तो कलेक्टरांचें भाषण आटोपल्यावर त्यांनीं सोडला. कोणी कांहीं बोलेना. कांहीं जण तर एवढा सगळा विचार मनांत न मावल्यामुळें गुदमरा होऊन बाहेरची हवा घेण्यासाठीं चावडीचा कट्टा उतरून पटांगणांत गेले. कांहीं जागच्या जागीं मंत्र घातलेल्या जिवाणूंसारखे खिळून राहिले. इतक्यांत एक दोनदां घसा खाकरून महादबा उभे राहिले. त्या सरशीं सगळेजण पुन्हा सावरून बसले आणि पटांगणांत गेलेली मंडळी परत चावडीच्या कट्ट्याशीं येऊन उभी राहिली. आपल्या घोगऱ्या आवाजांत महादबा बोलत होते,

''ही जमीन कंपनीला द्येस वाटली. सरकारनं कंपनीला द्या म्हटलं, ह्ये भिकचंद मतिलाल, ह्ये तोटाप्पा सुळी, ह्ये अप्पासाहेब समदीं भलीं मानसं हायती. पण आमी म्हणतो आमच्या पोटावर तुमी पाय ठिऊं नका. आमच्या धाइस पिढ्या तरी या काळींत गाडल्यात. सरकारची



अनुक्रमणिका







एक पै आमी कदी चुकवली न्हाई. मंग आमच्यावर ही वला कशापायीं ? आमाला जमीन पाग्राची नाय...' इतकें बोलेपर्यंत महादबाच्या गळ्याच्या शिरा ताठ झाल्या होत्या. हें आपण आपलें उगीचंच बोलत आहतों याची त्याला अगोदरच जणूं कांहीं कल्पना आली होती. कलेक्टरसाहेब, इनामदार, भिकचंद, नि तोटाप्पा नि अप्पासाहेब याच्या तोंडावरचें हंसू पाहून तर तो अगदीं शरमिंदा होऊन गेला. त्याला पुढें बोलवेनाच. तो एकदम खालीं बसला. मग थोडें मोठ्यानें हंसून कलेक्टर म्हणाले,

'हें पाहो पाटील. सगळ्यांचा निर्णय होऊन गेलेला आहे. आतां उगीच हमरातुमरीवर येऊन काय फायदा ? तुम्हांला जमिनीचा मोबदला मिळेल. पिकाचाहि मोबदला मिळेल. समजलं ?'

पुन्हा सगळीकडे शांतता पसरली. अगदीं स्मशान शांतता. कलेक्टरांच्या मागें उभ्या असलेल्या इन्स्पेक्टरांनीं पाय ताटकळल्यामुळें उभ्या उभ्याच पायांची जरा चाळवाचाळव केली, तेव्हां त्यांच्या बुटांची करकर स्पष्ट ऐकूं आली. इतक्यांत अप्पासाहेब कलेक्टरांकडे वळून म्हणाले

'आपली परवानगी असेल तर दोन मिनिटं बोलेन मी.'

कलेक्टर म्हणाले, 'आ ! अवश्य, अवश्य.'

अप्पासाहेब ताठ उभे राहिले, त्यांनीं आपले गुबगुबीत आणि लालसर हात जोडून सर्व मंडळींना नमस्कार केला आणि मग ते पाठीमागें नेऊन हंसतमुखानें त्यांनीं बोलण्यास सुरुवात केली.

'तुम्हां मंडळींच्या जमिनी जाणार म्हणून तुम्हांला वाईट वाटणं स्वाभाविकच आहे. पण जमिनी जाणार म्हणजे आम्ही त्या उचलून का नेणार आहोंत ? त्या इथंच राहतील. फक्त मधल्या मालकीच्या निशाण्या दूर होतील इतकेंच. आणि कारखान्यांत कामावर तुम्हीच असाल. कृष्णाबाईचंच पाणी आपण आपल्या शेतांना पाजूं. फरक फक्त इतकाच कीं जोंधळा, शाळू, तंबाखू, तूर, हरभरा, करडी यांच्याऐवजीं आपण यापुढें तीन चार हजार एकर जमिनीवर ऊंस पिकवणार आहों. आज आपल्या देशाला साखरेची जरूर आहे. मग साखरकारखान्यांतून साखर कशी तयार होईल ? हा साखरकारखाना काढून आपण देशाची सेवाच बजावणार आहों. कारखाना उभारला कीं कृष्णेवर थोरल्या व लहान्या सोनारीला जोडणारा पूल होणार, पक्के रस्ते होणार, शेतमजुरासाठीं चाळी होणार, शाळा, इस्पितळ होणार. एक नवी दुनियाच आपण वसवणार आहों आणि तीसुद्धां आपल्या स्वतःच्या हिकमतीवर. श्रीछत्रपतींची आणि या पंचक्रोशींतील समस्त शेतकरी बंधूंची कुलदेवता जी भवानी तिचंच नांव आपण या कारखान्याला देऊन तिचा आपण आशीर्वाद मागून घेतलेला आहे. तेव्हां आपण सर्वांच्या देशाच्या संपत्तींत व लौकिकांत भर घालणाऱ्या या श्रीभवानी साखर कारखाना लिमिटेडला तुम्ही सर्व बंधूंनीं मनःपूर्वक सहाय्य करावं अशी मी तुम्हांला अंतःकरणपूर्वक विनंति करतों.'

भाषण संपवितांना जेव्हां पुन्हा एकवार आपले गोरे गोरे, लालसर आणि गुबगुबीत हात अप्पासाहेबांनीं जोडले आणि सर्वांना नमस्कार केला तेव्हां त्यांच्या डाव्या हाताच्या करंगळींतल्या अंगठीचा खड्यावडा खडा व्याधाच्या चांदणीसारखा झळाळतांना सर्वांनीं पाहिला. अप्पासाहेबांच्या भाषणाचें कौतुक खुद्द कलेक्टरांनीं टाळ्या वाजवून केल्यावर सगळ्या मंडळींनी टाळ्या वाजवल्या.

महिपति अप्पासाहेबांचें भाषण चालू असतांना आंगठ्यानें जमीन उकरीत राहिला होता. आपले वडील महादबासुद्धां टाळ्या वाजवताहेत हें पाहून तो मनांत खजील होऊन गेला. अनवधानानें टाळ्या वाजवण्यांत आपण सामील झाल्याचें महिपतीनें पाहिलें, हें उमगतांच महादबांचे हात एकदम थांबले. उपरणं खांद्यावर नीट सावरून घेत उठतां उठतां ते महिपतीला म्हणाले का आणखी कोणाला कोण जाणें.

'चला आतां घरला. वाहूळ वक्त झालाय्. सरकार पुढं शेतकऱ्यांचं काय चालतंय.'

× × ×

अप्पासाहेबांचें भाषण झाल्यानंतर पंधरा दिवसांपासून पुणें-बंगलोर रस्त्याच्या बाजूनें सैन्य यावें तसा माती-वडारांचा मोर्चा सोनारीवर आला. शेंकडों गाढवें, पावडीं, कुदळीं, घमेलीं, कोंवडीं, कुर्‍हीं, बिनचोळीच्या बाया नि घुशीसारखे जमीन पोखरीत जाणारे पुरुष यांचा प्रचंड तळ लहान्या सोनाराच्या शिवेवर येऊन उतरला. शेजारच्या स्टेशनावरून शिमिटाचीं हजारों पोतीं, लोखंडी तुळवटें, पत्रे, माणूस उभा राहील एवढ्या वेढाचे नळ, अजस्र लोखंडी चाकें, पट्टे, असें सामान दिवस म्हणूं नका रात्र म्हणूं नका मोठमोठ्या लॉऱ्यामधून येऊं लागलें. त्या लॉऱ्या शेतांतून रॅंव रॅंव करीत जात तेव्हां दर खेपेला वीत वीत जमीन खालीं जाई. सकाळीं आठला घंटा झाली कीं भुतासारखीं माणसें कामाला लागत, दुपारीं चारची घंटा झाली कीं माणसें जात नि दुसरीं येत; त्या पाळीचें काम रात्रीं बारा वाजेपर्यंत चाले. मग सारें शांत होई. दोन दोन पुरुष जमीन खणली जात होती, टेकड्यासारखे उंच खडीचे ढीग रचले जात होते, जोंधळ्याच्या दाण्यासारखी खडी पिसली जात होती, कॉंक्रिटमध्यें











हत्तीच्या पायासारखीं जाड लोखंडी तुळवटें गाडलीं जात होतीं. वहिरटवाडी, पिंपळगांव, खरोशी वगैरे गांवांत यांत्रिक नांगर चालू होऊन उसाचें वेणें लावण्यासाठीं सरी, चर पाडून सुद्धां झाले. उद्यां यांत्रिक नांगरांची फौज लहान्या सोनारीकडे वळणार होती. संध्याकाळचीं जेवणंखाणं आटोपून महादबा ओसरीवर बसले होते आणि अंगणांत खाटल्यावर उताणा पडून महिपती आकाशांतल्या खाटल्याबाजल्याच्या ताऱ्याकडे शून्य दृष्टीनें पाहत होता. इतक्यांत सरमाड्या अंगाचे गांवपाटील लहानबा सकपाळ बैठकीवर येऊन बसले नि इकडच्या तिकडच्या गप्पांच्या ओघांत उद्यां तुमच्या शेतांत कंपनी ट्रॅक्टर घालणार आहे ही बातमीहि त्यांनीं सांगून टाकली.

महादबा कांहींच बोलले नाहींत त्यावर.

महिपतीहि कांहीं बोलला नाहीं. मुकाट्यानें तो घराबाहेर पडला आणि किती तरी वेळ कृष्णेच्या डोहावरच्या टेंबावर जाऊन बसला. तो परत आला तेव्हां गांवांत सगळीकडे सामसूम झाली होती. फक्त कंपनीची मुख्य इमारत जेथें उभी व्हायची होती तेथें गॅसच्या बत्त्या लावून चाललेल्या कामाचा आवाज ऐकूं येत होता. आंगणाचें कवाड लोटतांच झालेल्या करर्र आवाजानें महिपतीच्या वडलांना जाग आली असावी. चिंतेच्या स्वरांत म्हाताऱ्यानें विचारलें, 'महिपा कुठं गेलतास बाबुळ. अरं आकाश फाटल्यावर ठिगुळ कुठं कुठं म्हणून लावनार.'

महिपतीनें एका शब्दानेंहि उत्तर दिलें नाहीं. खसदिशी दांडीवरचं कांबळं ओढून त्यानें तें खाटल्यावर पसरलें आणि त्यावर आपला तापलेला देह लोटून दिला.

त्याला झोंप लागणें शक्य नव्हतें. त्याचे डोळे सताड उघडे होते. मात्र जळजळत होते. त्याला चीड आली होती. प्रतिकार करावयाचा होता त्याला. पण कशाचा प्रतिकार करावयाचा? खडीचा, तुळवटांचा, रॅंव रॅंव करीत सामानांचे पर्वत घेऊन येणाऱ्या लॉऱ्यांचा कीं जमिनीचीं आंतडीं बाहेर ओढून काढणाऱ्या यांत्रिक नांगरांचा? या अजस्र घडामोडींचा सूत्रधार कोण? कलेक्टर कीं अप्पासाहेब? कासवडोळ्या इनामदार कीं ढेरपोट्या भिकचंद! पांढऱ्या रेघोट्या मारलेला निळा कागद हातांत घेऊन हिंडणारा तो इंजिनियर कीं पुरुषाच्या अंगाला अंग भिडलें तरी न लाजणारी ती सुलू? सारीं शेतं भातं, सारीं गुरं बैल, ज्यासाठीं या गांवांत वाचा बाच्या झाल्या, रक्त सांडलें, तें प्रत्येकाची मालकी दाखवणारे जमिनींचे बांध नव्हे, हा सगळा गांवगाडाच नष्ट करणारीं हीं लोखंडी अवजारं चांगलीं कीं वाईट? साखर हवी मग कारखाने नको कसे? आणि कारखाने हवेत तर जमिनी घेतल्यावांचून ते उभे कसे राहणार? महिपतीला यापैकीं एकाहि प्रश्नाचें उत्तर सुचेना! भवानीच्या देवळाच्या आवारांत दसऱ्याच्या दिवशीं जशी गांवकऱ्यांची खेंचाखेंच व्हावयाची तशी या प्रश्नांची खेंचाखेंच त्याच्या डोक्यांत झाली होती. त्या विचारांचा वेग भयंकर होता. ते एकमेकांवर घासले कीं पिठाच्या गिरणींत जसा जळलेल्या पिठाचा वास येतो तसा कांहीं तरी वास आपल्या झिजत चाललेल्या मेंदूतून येतो आहे असा त्याला भास झाला. यांत्रिक नांगराचे चकचकीत फाळ, मातीचीं भली मोठीं काळी भंगार ढेंकळें, आडवीं उभीं तुळवटें, शेंतांत पडलेल्या खोल खोल चाकोऱ्या, अप्पासाहेबच्या, बोटांतली चमकदार आंगठी, इनामदारांचे जड डोळे, सुलूचा शेवरीच्या कापसासारखा स्पर्श या सगळ्यांची गल्लत त्याच्या तारवटलेल्या डोळ्यापुढें एकसारखी होत होती.

सुलूचं अंग आरस्पानी कसं, इतकं मऊ कसं? असा एक प्रश्न मध्येच



## अस्थाई अंतरा

कवि : सोपानदेव चौधरी

गरगर फिरतो खगोलांतुनी पृथ्विगोल भोंवरा
गुंगवी स्वर अखिल चराचरा
षड्ज सूर हा अखंड धरुनी
वसुंधरा सखि धून लावुनी
स्थिरा चरांना सवें घेउनी

अखंड घाली प्रदक्षिणा त्या तेजोमय भास्करा
ऐकवित स्थायी षड्ज स्वरा
ताल धरिति या दिवस यामिनी
संध्या पेंगत 'काल' सोडुनी
ताल या पुढें विरती स्वप्नीं

उदय समेवरि झांज वाजवी उषादेवि सुंदरा
समेवर सामिल होई धरा
अनंत ग्रहमालांच्या स्पर्शें
सूर निघति नित नव्या श्रुतींचे
पडदे छेडित नाना परिचे

पवन विहरतो हुडकित अवघ्या संगीताच्या तऱ्हा
नादवित अनंत क्षितिजांतरा
कर्णा पलिकडल्या त्या श्रवणा
वर्णा पलिकडल्याहि भावना
कोण करी निःशब्द योजना

स्थायी भाव न अंत जयाचा अस्थाई-अंतरा
गहराग विश्वराग शंकरा
अनंत गोलांतील असे रचन
वादी-संवादींचे मीलन
बनले ब्रह्मांडाचे गायन

जीव नाचतो जीव हसतो हंसवित परमेश्वरा
गुंगवी अनंत क्षितिजांतरा

अनुक्रमणिका

त्याच्या डोक्यांत आला आणि त्याचें जणूं उत्तर म्हणून त्याला असें दृश्य दिसलें की चिखल, सिमीट, खडी, खंगलेलीं माणसें यांच्याहा समुद्रासारखा सगळीकडे पसरला आहे आणि त्यांतून कमळाच्या देठासारखें कारखान्याचें धुराडें वर आलें आहे त्याच्यावर आपल्या ओसरीवर लावलेल्या चित्रांतल्या लक्ष्मीप्रमाणें सुळ उभी आहे ! आणि काय आश्चर्य तिनें डोळ्यांचा इशार करतांच गिरणीचें तें दोन मजली इमारतीइतकें उंच लोखंडीचाक गरागरा फिरू लागलें नि आपल्याकडे वेगानें येऊं लागलें. कोण थांबवणार त्याचा वेग ? आलेंच कीं तें अंगावर. किंकाळी फोडण्याची सुद्धा सवड न देतां तें आपला चेंदामेंदा करून सुसाट गेलें देखील पुढें...

महिपति दचकून जागा झाला. त्याचें सारें अंग घामानें निथळत होतें. त्यानें पडल्या पडल्या चाचपून पाहिलें तो पिंढ्या, मांड्या छाती सगळं जागच्या जागीं, शाबूत होतें. बाजल्यावर तो उठून बसला. आतां हा विचार बंद करावयाचा असें त्यानें ठरवलें. पण सकाळी आठ वाजतां ट्रॅक्टर आपल्या शेतांत घुसणार तेव्हां त्यांना अडवणार कोण ? हा प्रश्न भुंगा लाकूड कोरतो त्याप्रमाणें त्याचें डोकें कोरीत राहिला. डोक्यांतून तो प्रश्न हालेनाच. पुन्हां विचारांचे ताणेबाणे एकमेकांत गुंतू लागले. आणि त्याच्या मनांत एकदम विचार आला कीं 'महात्मा गांधी की जय' म्हणून जर आपण ट्रॅक्टरपुढें उभे राहिलों तर...तर...? कऱ्हाडांत, इस्लामपुरांत बंदुका घेतलेल्या पोलिसांपुढें शाळकरी पोरेंसुद्धां 'महात्मा गांधी की जय' म्हणून छातीठोक उभीं राहतांना आपण पाहिलेलीं आहेत. मुंबईला तोच जयघोष करून साध्या मजुरांनीं मालाच्या मोटरी अडवल्याचें आणि गिरण्या बंद पाडल्याचें आपण ऐकलें आहे. हा विचार सुचल्यावर त्याच्या डोक्यांत भ्रमणारें चक्र एकाएकी थांबलें. शरीराची धगधग शांत होऊं लागली. पण त्याला एकदम थकून गेल्यासारखें वाटूं लागलें. आणि धोतर अंगावर ओढून घेऊन तो तसाच पुन्हा शरिराचें मुटकळें करून खाटेवर पडून राहिला.

× × ×

सकाळीं खूपच धुकें पडलें होतें. हातभर सूर्य वर आला तेव्हां कोठें धुक्याचें थर विरळ विरळ होऊं लागले. महिपतीच्या घरांत आज कोणी बोलत नव्हतें. स्वतंत्र शेतकरी म्हणून हा आपल्या आयुष्यांतला शेवटचाच दिवस हें समजूनच सगळ्यांचा कारभार चालला होता जणूं कांहीं. पहाटें घरांतल्या जात्याची घरघर महिपतीला तरळत्या स्वप्नासारखी ऐकूं आली होती. पण दररोज त्यांत अधमुऱ्या दह्याप्रमाणें मिसळणारा सई आत्याचा स्निग्ध नि गोड आवाज त्याला ऐकूं आल्याचें स्मरेना; गुरांना गवत घालतांना महादबांनीं आपल्या घोगऱ्या आवाजांत 'कां रे नाठविसी। कृपाळू देवासी' हा अभंग म्हटला नव्हता आणि लटक्या रागानें 'महिपा अरं उट की, निजाव तरी किती मानसानं' असें म्हणून त्याला नेहमींसारखें हालवलेंहि नव्हतें. सगळे व्यवहार खालच्या मानेनें चालले होते. आजचा दिवस काय दाखवणार आहे या आशंकेने सर्वांचें जीव चेपून गेल्यासारखें दिसत होते.

थाळींतील न्याहारी महिपानें कशीबशी संपवली नि हात धुतल्याबरोबर लगेच पैरण घालून व फेटा डोक्याला गुंडाळून तो लगेच बाहेर निघाला. ओसरीवर महादबा डाव्या हातावर ठेवलेली तंबाखूची चिमूट मळीत होते. त्यांनीं महिपति चूपचाप बाहेर जातोसें पाहून मान वर करून विचारलें, 'कुठं निघालास !'

'मी जातों जरा कारखान्यावर !'

'तकड कशाला ?'

'मी आज ट्रॅक्टर अडवणार आहे. आपल्या शेतांत त्यांना मी पाऊल घालूं देणार नाहीं!' असें म्हणून महिपति सणक्यानें निघालाच.

मळलेली तंबाखू तशीच जमखान्यावर टाकून 'अरं येडा का काय ?' असें म्हणत महादबा उठले. फेट्याची चुंबळ त्यांनी कशीतरी डोक्यावर दावली नि ते त्याच्या पाठोपाठ निघाले.

महिपति कारखान्यावर पोचतो न पोचतो तो आठाची घंटा झाली. महिपति शेतामध्यें उभा असलेला पाहतांच तिकडे कांहीं तरी चुळबुळ झालेली दिसली. ट्रॅक्टरच्या धमेल्यासारख्या बैठकीवर बसलेला ड्रायव्हर झटकन खालीं उतरला आणि कचेरीच्या बाजूला धांवत धांवत गेला. आज कामामध्यें कांहीं तरी विघ्न येणार याची अटकळ कंपनीवाल्यांना असावी. कारण तो ड्रायव्हर परत आला तेव्हां त्यांच्या मागोमाग खुद्द अप्पासाहेब, इंजिनियर, आणि इतर पांच पन्नास मंडळी होतीं. अप्पासाहेब नेहमीं सारखेंच धुवट, शांत नि प्रसन्न दिसत होते. त्यांची पावलें अगदीं धीमेपणानें पडत होतीं. इतर मंडळींची मात्र धांदल उडालेली दिसत होती. म्हणतां म्हणतां शे दोनशें माणसें अप्पासाहेबांच्या भोंवती कडें करून जमलीं. ड्रायव्हर पुन्हां आपल्या बैठकीवर बसला. आणि त्यानें ट्रॅक्टरचें इंजिन सुरू केलें.

इतक्यांत अप्पासाहेबांनीं उच्चारलेले शब्द महिपतीच्या कानीं पडले.

'हें पाहा महिपती, आमच्या कामांत उगीच अडथळा आणूं नको. आम्हीं करतों आहोंत तें सगळं काम याप्रमाणं चाललेलं आहे. कालच महादबांना जमिनीचा नि पिकाचा मोबदला आम्हीं चुकता केलेला आहे. आतां तूं माथेफिरूपणा करायचंच ठरवलं असशील तर त्याची जबाबदारी सर्वस्वीं तुझ्यावर आहे.'

महिपति हालला नाहीं, बोलला नाहीं. आंत त्याचा जीव तळमळत होता. त्यानें आपल्या खालचा ओठ वरच्या दातांना घट्ट दाबून धरला होता. आपल्या मांड्यांचें नि पोटऱ्यांचें स्नायु त्याला कापसावल्यागत वाटत होतें. पण त्यानें जागा सोडली नाहीं. तो अप्पासाहेबांच्या दिशेनें डोळे लावून पाहत राहिला.

अप्पासाहेबांनीं 'चालूं कर ट्रॅक्टर' अशा अर्थाची खूण ड्रायव्हरला केली त्या वेळीं त्यांच्या त्या जाड भिवयांच्या सावलींत दडलेल्या डोळ्यांमधील धार क्षणभर लकाकल्याचें आपण पाहिलें असें महिपतीला वाटलें.

ट्रॅक्टर जरा मागे पुढे हालला आणि एका उसळीसरसा मार्ग काढूं लागला. आतां महिपतीचे डोळे ट्रॅक्टरकडे लागले होते. त्याला तो एकाद्या दव घरीत पुढें येणाऱ्या श्वापदासारखा भासत होता. श्वापदासारखा पण किती विलक्षण ? त्याच्यावर घाव घालायचा तर तो कुठं घालायचा ? महिपतीला वाटलें की याच्या ड्रायव्हरला लोळवला तरी हा कांहीं वेद पडणार नाहीं. त्याचें सरपटणें चालूंच राहील. त्याचे ती खावड खुबड चाकें फिरतच राहतील. त्याचे ते भयंकर फाळ जमीन चिरीतच राहतील. ट्रॅक्टर पुढें येत होता. त्याचा आवाज आतां जोरानें आपल्या कानांत घुसत आहे असें महिपतीला वाटूं लागलें. फाळांनीं उकरलेलीं व उलथून टाकलेलीं प्रचंड ढेपळें त्याला स्पष्ट दिसूं लागलीं. ट्रॅक्टर पुढें येत होता. आतां महिपतीला आपल्या डोक्यांत काय चाललें आहे तें समजेनासें झालें. ड्रायव्हर कांहीं तरी दटावीत आहे, मागून महादबाची की आणखी कोणाची तरी आरोळी ऐकूं येत आहे, अप्पासाहेबांच्या सभोंवारचीं माणसें कांहीं तरी आरडा ओरड करीत

आहेत याचें अस्पष्ट ज्ञान त्याला होत होतें. इतकी वेळ तो ट्रॅक्टरकडे रोखून पाहात होता पण एतक्यांत तो एवढा मोठा कसा झाला? कसा झाला...? कसा...

आपल्याला कोठें तरी मार बसला आणि आपण फेकले गेलों एवढी कल्पना महिपतीला आली. पडतां पडतां आकाशाचा निळा पट्टा, पिकावर तरंगणाऱ्या भोरड्या आणि वाऱ्यांत झोकदारपणें कललेलें पीक आपण पाहिलें आणि मग तांबड्या, काळ्या नि पिवळ्या रंगाचे भले मोठे पट्टे आपल्या डोळ्यांसमोर चकाकून एकजात गडद अंधार पसरला असें कांहींतरी महिपतीला वाटलें... कीं कृष्णामाईच्या अथांग डोहांत बुडत होतों आपण... ?

श्री भवानी साखर कारखाना गेलीं तीन वर्षें अगदीं जोरांत चालू होता. थोरल्या सोनारीच्या पाणवठ्याशेजारीं कृष्णेवर छोटासा पूल बांधण्यांत आला होता, त्यावरून पलिकडच्या रानांतल्या उसानें भरलेल्या ट्रॉल्या रात्रंदिवस येत असत. वीज आली होती. रस्ते झाले होते. हिरवळीच्या मधोमध हस्तीदंती रंग दिलेली अप्पासाहेबांच्या बंगल्याची भव्य नि देखणी इमारत हिरव्या किनखापी रुजाम्यावर रेलून बसलेल्या सरदारणी सारखी चमकत होती. आजूबाजूला मॅनेजर, केमिस्ट, असिस्टंट मॅनेजर इत्यादि लहान थोर अधिकाऱ्यांचे छोटे मोठे बंगले होते. त्याच्या मागे बरेंच अंतर टाकून फोरमन, मेकॅनिक वगैरे कायम नोकरांचीं पत्र्याच्या छपरांचीं घरें होतीं आणि मग कुठें डब्याच्या पत्र्यांचीं ठिगळें जोडून तर कोठें सरपाड नि उसाचा पाचोळा एकत्र करून हारीने उभारलेल्या, दिवसा माशांना व रात्रीं मच्छरानें भरलेल्या मजूर, पाणभरू भंगी वगैरेंच्या खोपट्या होत्या.

अप्पासाहेबांच्या 'श्री निवासांत' डावा हात तुटलेला आणि पाठींत किंचित् वाकलेला एक नोकर खांद्यावर झटकणें टाकून दिवसभर काम करीत असे. तोच महिपती आल्या गेल्याची साहेबांना आंत वर्दी देणें, सर्व बंगल्यावर चिठ्या चपाट्या व निरोप पोचवणें, बैठकखाना नीटनेटका ठेवणें अशीं कामें तो करी. या हपीसर लोकांचें एक स्वतंत्र जग आहे आणि तें खोपटांत राहाणाऱ्या सर्व लोकांच्यापेक्षा अजिबात निराळें आहे एवढें ज्ञान त्याला गेल्या तीन चार वर्षांत झालें होतें. हे लोक दातांना मशेरी लावीत नाहींत, चहा बशीत न ओततां सरळ कपांतूनच नाजुक घुटके घेत घेत पितात, न्हाणीघरांत गेल्यावर सर्व कपडे उतरून ठेवून हीं माणसें स्नान करतात, जेवतांना यांना सगळें कांही चालतें, यांच्यांतलीं वयांत आलेली तरूण मंडळी मुलगे व मुली लग्नापूर्वी एकमेकांपाशीं फार हळू नी फार गोड असें कांहीं तरी बोलतात. रात्रीं जेवणापूर्वी बाप्या लोक लोखंडी कपाटांतील बाटल्या फोडून एकदोन ग्लास झोकून जेवावयास बसतात अशा किति तरी तपशिलाच्या गोष्टी त्यानें पाहून ठेवल्या होत्या. न्हाव्याच्या, धोब्याच्या नि तेल्या-तांबोळ्यासारख्या सामान्य माणसांच्या घरांत जे गांधी नेहरु वगैरेंचे फोटो दिसतात ते मोठ्या व छोट्या हपीसरांच्या घरांत दिसत नाहींत, कांहीं इतर लोकांचेच फोटो या पांढरपेशाच्या घरांत आढळतात ही गोष्टहि त्याच्या लक्षांत आली होती.

एकदा गांधीजयंती निमित्त कामगारांनी रात्रीं भजनें, पोवाडे वगैरे कार्यक्रम ठेवला. उसाचीं बुचाडें उभीं करून नी झेंडूच्या फुलांच्या गेंदेदार माळांचीं तोरणें लावून कारखान्यावरच्या सगळ्या कामगारांनीं टेनिस कोर्ट मुसतें शृंगारून सोडलें होतें. सगळ्या वाड्यांवरचे स्त्रीपुरुष कामगार जयंतीच्या उत्सवासाठीं एकत्र जमले होते. पांढऱ्या शुभ्र टोप्या घालून कोणी लेझीम खेळत आलें तर कोणी दिंड्या घेऊन आलें. टेनिस कोर्टावर रात्रीं बरोबर दोन वाजेपर्यंत उत्सव सुरू होता पण मोठ्या अधिकाऱ्यांपैकीं कोणीच तिकडे फिरकलें नाहीं. नाहीं म्हणायला अप्पासाहेब दोन मिनटें उभ्या उभ्या येऊन गेले.

त्यांना पानसुपारी झाली, हार-तुरे झालें. ते जावयास निघालें तेव्हां गणू फिटरनें पुढें होऊन म्हटलें.

'हा महात्माजींचा फोटो फॅक्टरीच्या आंत शिरतांच समोर दिसेल असा लावावा असं कामगार म्हणतात;

तेव्हां तोंडावर हसूं आणून अप्पासाहेब म्हणाले होते.

'अरे गांधींचा फोटो नि कारखान्यांत! तुमच्या गांधींला तर कारखानें दृष्टीसमोर नकोत. नाहीं रे बाबा. एकाद्याला जें आवडत नाहीं तें आपण मुळींच करतां कामा नये.' एवढें म्हणून ते एकटेच मोठ्यानें हंसलें नि कामगारांनीं हिरमुसलेपणानें आपलीं तोंडें फिरवलीं.

त्या दिवशीं साऱ्या कामगारांना खादीच्या टोप्या देण्यांत आल्या. महिपतीचें फाटकें मुंडासें गणूनें हिसकून घेतलें आणि त्याच्याहि डोक्यावर एक पांढरी टोपी चढवली.

सकाळीं चहाच्या वेळीं घरचीं सर्व मंडळी चहासाठीं टेबलासभोंवर बसलीं. चहाचा ट्रे घेऊन येणाऱ्या गणूच्या डोक्यावर पांढरी टोपी पाहतांच सगळ्यांना अचंबा वाटला. अप्पासाहेबांच्याहि ध्यानांत ती गोष्ट आली पण ते कांहीं बोलले नाहींत. त्यांचा चौदा वर्षांचा नातू प्रताप मात्र पटकन् म्हणाला,

'महिपतचा थाट पाहिला कां आज? गांधी बाबा बनलाय आज स्वारी.'

मग त्याची थोरली वहिण कालिंदी आपल्या वेणीचा शेपटा पुढें आणीत म्हणाली.

'आतां धोतर सोडून पंचा नेसायला लाग महिपत, कीं मग खरा गांधीबाबा शोभशील...'

असे कोपरखळ्यांचे प्रकार पुष्कळ चालत. पंचावाचून दुसरें कांहीं अंगावर नसणाऱ्या नि नेहमीं आजोबाप्रमाणें प्रेमळ दिसणाऱ्या या गांधीबाबाचा ही सारी मंडळी एवढा मनापासून द्वेष कां करतात हें महिपतीला कधीं उमगलें नाहीं. स्नानासाठीं डोहावर गेला कीं किती तरी वेळ तो विचार करीत बसे पण त्याला या प्रश्नाचें उत्तर सांपडत नसे. सुळूचें अंग इतकें घोटीव नि इतकें मऊ कसें याचें उत्तर जसें त्याला कधीं देतां आलें नाहीं, अप्पासाहेबांच्या घरच्या शे-दोनशें निरनिराळ्या पायतणांच्या जोड्या, कपाटेंच्या कपाटें भरून कपडे, डोळे दिपून जातील असे दागिनें, नाना तऱ्हेचें कांच सामान, अशा खुर्च्या नि तशा खुर्च्या, दर सहा महिन्याला बदलणाऱ्या मोटरी यासाठीं लागणारा पैसा येतो कुठून याचा थांग पत्ता त्याला जसा कधीं लागला नाहीं तसाच गांधीबाबाचा ही मंडळी एवढा तिटकारा कां म्हणून करतात या सवालाचा जबाबहि त्याला कधीं देतां आला नाहीं.

डोहापासल्या पंपावर कधींकधीं कामाला येणाऱ्या गणू फिटरशीं तो बोले तेव्हां गणू तुसडेपणानें त्याला म्हणे. 'महिपा तुजं शरीर दगडासारखं हाय नि तुज्या डोक्यांत दिखिल दगडच भरलेलं हाय ती पण. अरं ही सारी ऐट तुज्या माज्या जिवावर चालतिया, कामगाराचं रगात भट्टींत जाळ्यात तवा त्याचं सोनं बनत. अन् त्या सोन्याचा जिवावर चालत्यात यांच्या गमजा. गांधी बाबा यांना सांगतो कामगारावाणी बना म्हून गांधीबाबाशीं यांची दुस्मनी. दुसरं काय ?'

गणू फिटरचें हें बोलणें त्याला पटे नि मग त्याच्या पोटांत गुदगुल्यांच्या खालीं कांही विचित्र ढवळाढवळ होई. आपल्या अंगावर ट्रॅक्टर येतो आहे आणि जमीनीवर पडतां पडतां आपणाला आकाशाचा निळा पट्टा हवेंत भिरभिरणाऱ्या, आणि वाऱ्याच्या झुळकेनें ऐटींत झुकलेलीं पिकें पुन्हा दिसत आहेत असा त्याला भास होऊन त्याच्या उजव्या हाताची मूठ वळली जाई.

❖ आणि एक दिवस संध्याकाळीं ती बातमी आली, कृष्णेच्या पुरासारखी सोसाव्त, सारी गांवें नि नगरें, शेतें नि मळे, गिरण्या नि कारखानें आपल्या प्रवाहांत सामावून घेत. साऱ्यांना मूढ बनवून टाकीत, विव्हळ करीत. पंचा नेसणारा नि नेहमीं आजोबा सारखा प्रेमळ हिसणारा तो गांधीबाबा, त्याच्या उघड्या छातीवर गोळ्या झाडून एका घातक्यानें त्याचा खून केला होता....

ती बातमी येतांच कारखान्यांतलें तें दोन मजले उंचीचें लोखंडी चाक पांच पन्नास वेळां गरगर, गरगर फिरून स्तब्ध उभें राहिलें. उसाच्या मोळ्यांचा सपासप फडशा पाडणाऱ्या सुऱ्या खालीं माना घालून मुकाट बसल्या. भट्टींतली धगधगणारी आग शरमून गेली. पॅनमधल्या रसावर साय धरूं लागली आणि साखर ओतणाऱ्या यंत्राचें तोंड भकासपणें उघडें पडून राहिलें. गळून पडलेलीं पानें इकडे उडावीं तिकडे उडावी तसे सगळे कामगार गटागटानें भिरभिरत राहिले होते.

अप्पासाहेबांच्या बंगल्यांत रेडीयोभोंवतीं बरीच मंडळी जमली होती. त्यांच्या चेहऱ्यावर खेद नव्हता. मुळींच नव्हता. नुसती उत्सुकता होती. रेडिओ एकसारखा विव्हळत होता. मग कोणीतरी खुन्याचें नांव सांगितलें; 'नथुराम गोडसे' त्यावरोबर कोचाच्या कडेला रेलून बसलेले केमिस्ट आपल्या तोंडांतील सिगरेट टीपॉयवरच्या रक्षापात्रांत विझवीत म्हणाले,

'आपला पुण्याचा नथुराम गोडसे ? वाऽरे गड्या. सिंहाची छाती खरी गड्याची. म्हणजे मी त्याला चांगला...'

त्यांचें हें बोलणें अनुचित होत आहे हें अप्पासाहेबांच्या ताबडतोब लक्षांत आलें. त्यांनी गंभीरपणानें म्हटलें.

'आजची ही घटना फार गंभीर आहे. तेव्हां सर्वांनी आतां आपापल्या घरीं जावं हें बरं !'

अप्पासाहेब इतकें खोटें बोलल्याचें आपण प्रथमच ऐकत आहोंत असें महिपतिला वाटलें.

❖ सकाळीं भोंगा वाजला तेव्हां सारे कामगार गिरणीच्या आवारांत जमा झाले पण आंत कोणीच जाईना. इतक्यांत केंजळचा गणू फिटर म्हणाला.

'आज कुणीबी कामावर जायांचं न्हाई. आज हरताळ पाडायचा. डोहा-वर जायाचं आणि तिलांजलि द्यायाची महात्माजींना. चला. टोप्या काढा डोस्क्यावच्या, अन् निघा मिरवणुकींनं. कुणी बोलायचं न्हाई, आरडायचं न्हाई.'

साऱ्यांनीं टोप्या काढून घेतल्या, आणि मिरवणुकीचें तें चालूं लागलें. जयघोष नाहीं, गाणीं नाहींत, ध्वज नाहींत, शब्द नाहीं. रस्त्याच्या वाळूवर त्यांच्या आठदहा हजार पायतणांचे सरक फरक असे आवाज होत होते तेच काय ते. मिरवणूक मजूर वस्तीवरून गेली तेव्हां झाडून सारीं बायकापोरें सुद्धां तिच्यांत सामील झालीं. कोणी गंहिवरून आलीं होतीं तर कोणी रडत होतीं. गांधीबाबाचा खून झाला हें कोणाच्या तरी कारस्थानाचें फळ आहे, कोणीतरी पसरवलेल्या दीर्घ द्वेषाचा परिणाम आहे, त्याबद्दलची अद्दल अपराध्यांना घडवलीच पाहिजे असे कांहीं तरी विचार त्यांच्या हृदयांत घोळत होते. एवढा मोठा समुदाय नी त्याला लक्ष्य नाहीं, भक्ष्य नाहीं, घोष नाहीं, हुंकार नाहीं, असें होईल तरी कसें? पण कोणतें लक्ष्य, कोणतें भक्ष्य? कसली घोषणा, कोणता हुंकार? अपराधी कोण, घाव कोणावर करायचा? शेपटीवर पाय देणाऱ्याचा माग काढीत, पोटांत सारा राग धुमसत ठेवून नी दाढा दंशासाठीं तयार ठेवून फुंफाटत निघालेल्या काळ्या भुजंगाप्रमाणें तो समुदाय अंदाज घेत घेत सरपटत चालला होता.

अधिकाऱ्यांच्या वस्तीवरून मिरवणूक चालली. एक बंगला गेला, दुसरा मागें पडला नी तिसऱ्यावरून मिरवणुकीची आघाडी पुढें सरकली. बंगल्यांतून कोणीं मिरवणुकींत आलें नाहीं. फाटकापाशीं देखील कोणीं उभें नव्हतें. अप्पासाहेबांच्या बंगल्यापाशीं मिरवणूक येतांच गणू फिटरनें हात उंच केला. तशी मिरवणूक थांबली. त्यावेळीं सगळ्यांना सगळ्यांचीं मनें जणूं न बोलतांच कळत होतीं. मिरवणुकींतले सगळे लोक जणू एकाच साखळीचे दुवे बनले होते. गणू आणि तीनचार आघाडीवरचे लोक तडक बंगल्याच्या आवारांत गेले. सारें आवार सुमसाम दिसत होतें. इतक्यांत महिपति पुढें आला. त्याला गणू म्हणाला,

'शेटना बोलाव.'

'कशासाठीं?'

'सर्वांनीं नदीवर जायाचय् आज'

'पण शेट नि त्यांची सारी मंडळी काल रातचीच गेल्याती गाडीला–मुंबईला.' गणू परत फिरला.

पुन्हां मिरवणूक चालू झाली. महिपति त्यांत सामील झाला होता. टेनिस कोर्टावर पांढरे स्वच्छ कपडे नि पांढरे स्वच्छ रबरी बूट घातलेले पुरुष नि बायका टेनिस खेळत होतीं. मिरवणुकीचा तो भुजंग क्षणभर तेथें थांबला. टेनिस कोर्टावर त्याचा वैरी असल्याचा वास त्याला आला काय? कोणास ठाऊक? त्याचें सारें अंग जणूं कांहीं सळसळलें आणि फडेच्या दुशी अंगाच्या पाकळ्या उमलेल्या न उमलल्यासारख्या होऊन तो पुढें सरला. टेनिस कोर्टावर स्वच्छंदपणें वागडणाऱ्या त्या मऊ दुलदुलीत अंगाच्या सशांनाहि कुसला तरी वास आला असावा. कारण खेळ एकदम बंद पडला. आनंदाचीं आणि हास्याचीं थुईथुई उडणारीं कारंजीं एकदम गडप झालीं आणि ढिल्या पायांनीं मंडळी आपापल्या बंगल्यावर परतलीं.

मिरवणूक कृष्णेवर पोंचली. कृष्णामाईचा डोह नेहमींसारखाच काळाभिंग दिसत होता. सगळ्यांनीं स्नानें केलीं आणि माणसं पंपापासच्या उघड्या जागेंत जमा झालीं. पंप-शेडच्या कट्टयावर गणू फिटर जाऊन उभा राहतांच दाबून ठेवलेल्या भावना उफाळून वर आल्यागत सर्वांच्या-तोंडांतून एकच जयघोष बाहेर पडला "महात्मा गांधी की जय" आणि मग तोच जयघोष दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा, पांचव्यांदा, दहाव्यांदा. लोक जसे बेहोष झाले होते.

तेवढ्यांत गणू ओरडला.

'थांबा. शांत व्हा.'

सगळीकडे शांतता पसरली. गणू काय सांगतो तें ऐकण्यासाठीं माणसें चौड्यावर बसलीं. बायकांनीं मुलांना पदराआड घेतलें आणि गप्प केलें. गणूच्या मनाच्या तारेशीं त्यांनीं आपल्या मनाच्या तारा जुळवून घेतल्या. गणूनें ओरडून विचारलें.

'महात्माजींचा खून कोणीं केला माहीत आहे तुम्हांला? तुमच्या, माझ्या, सर्वांच्या बापाला कोणीं गोळी घातली!'

श्रोते एकमेकाकडे पाहूं लागले. तेवढ्यांत महिपति बोलला,

'नथूराम गोडशे म्हून नांव सांगितलं खरं रेडियोवर.'

श्रोतें कमालीचे अधीर झाले. गणूनें डोळे किंचित् किलकिले करून पुन्हा प्रश्न केला.

'हा गोडसे कोण होता?' आणि श्रोत्यांकडून त्या प्रश्नाचें उत्तर मिळण्याची वाट न पाहतां त्यानें स्वतःच उत्तर दिलें, 'बामणाचा पोर होता

तो. ही बामणं गांधीजीचा द्वेष करत्यात. ञ्जून करत्यात. आपल्या शेटची वागणूक आठवती तुम्हास्नी. गांधीजयंतीच्या दिवशींची ? कालपासूनची ? सारं जग आज रडतंय पण त्यांच्या डोळ्याला टिपूस न्हाइ. सारं जग आज रडंतय पन यांचं खेळ बंद न्हाईत. मुलका वेगळी जात हाय ही.

'मी इच्यारतो गांधींबाबाशी यांचा येवढा वाकुडपणा कां ? तो सांगत व्हता की मजुरांना पिळूं नका. शेतकऱ्यांना लुबाडूं नका. गरिबांच्या देशाला शोभल असं ऱ्हा. पन आम्हांला मातींत तुडवल्याबिगर त्यांचं बंगलं कसं सजत्याल ? मोटारी कशा पळत्याल ? पोरीबाळी कशा नटत्याल, मुरडत्याल ?...'

महिपतीच्या डोळ्यासमोर क्षणार्धात सुलूचें चित्र उभें राहिलें. मक्याच्या टपोर कणसासारखी टंच, शुभ्र, नितळ. मग त्याला समोरचें आकाशाच्या पोटांत भाल्याप्रमाणें घुसलेलें गिरणीचें धुराडें दिसलें आणि आपला ट्रॅक्टर खालीं सांपडून तुटलेला डावा हात आठवला. त्याच्या डोक्यांतल्या साऱ्या प्रश्नांची गुंतागुंत गणू फिटर उकलींत होता. गुंता सुटत चालला होता. आपला उजवा हात एकदम वर करून महिपति उभा राहिला आणि किंचाळला.

'महात्मा गांधी की जय.'

हजार, दोन हजार, पांच हजार, आवाजांनीं त्याला साथ दिली.

'महात्मा गांधी की जय.'

पुन्हा गणूनें गरजून सांगितलें, 'अशी ही मुलखावेगळी जात हाय. गांधीबाबावर हात टाकाया जे कचरत न्हाईत ते तुमच्या आमच्यावाणी गरिबास्नी रगडाया भ्येतिल व्हय. यांच्या दाढा लई वाढल्या न्हइ तवरच त्या उपटून काढाया होव्या. यांच्या म्होरं मुडद्यावानी वसून न्हायाचं न्हाई. चला. उठा अन् आपल्या जमिनींत घुसलेल्या या डुकरांना वाडीच्या बाहेर हुसकून लावा.'

पुन्हा प्रचंड जयघोष झाला.

'महात्मा गांधी की जय.'

आणखी एकदा. आणखी एकदा. आणखी एकदा. त्या जयघोषांत त्यातां एक भयानक धग निर्माण झाली. त्याला आतां एक विलक्षण धार आली. उघड्या माथ्यांचा तो जमाव पुन्हा मिरवणुकीच्या शिस्तींत उभा राहिला. आतां त्याला जणूं आपलें लक्ष्य मिळालें होतें, अपराधी गवसला होता. मिरवणुकीचा तो काळभुजंग आतां फुंफाटत सरळ आपल्या भक्ष्यावर झडप घालणार होता.

तो काळीज कांपवणारा उन्मत्त फुंफाट पुन्हा एकवार वातावरणांत निनादतांच कृष्णेच्या डोहाचें अंग जरा थरकलें, जरा शहारल्यासारखें झालें. पण मानवसमाजांतील या उलट सुलट भोवऱ्यांत डावें उजवें करण्याची, न्याय्य अन्याय्य ठरवण्याची यातायात करण्यांत काय अर्थ आहे अशा विचारानें तो आपल्या चिरस्वप्नांत पुन्हां गुंगून पडला!

---



जो मेघ पृथ्वीची सारी तृषा शमवितो तो गर्जतो हें ठीकच आहे, तो खुशाल मोठ्यानें गर्जना करो; पण जो कोणाचीहि तहान भागवीत नाहीं तो समुद्र निर्लज्जाप्रमाणें व्यर्थ गर्जना करतो हें काय ?




आम्ही संस्कृतिसंवर्धनाचें काम करणार, असं आतां जो तो म्हणत आहे ! द्वेषमत्सर माजवणाऱ्यांना संस्कृतीचा अर्थ तरी कळतो का ? जगांत तुम्ही सदयता, सहृदयता, मानवता, समता किती आणतां, यांवरच तुमच्या संस्कृतीची किंमत अवलंबून आहे.

दीपावलीसाठीं मागील वर्षी महाकवि तिरुवल्लुवर यांच्यासंबंधीं परिचयात्मक लेख मला वाटतें मी पाठविला होता. यां वर्षी काय देऊं? मला निबंधात्मक किंवा कथात्मक फारसें लिहितां येत नाहीं. आणि तें सारें कलात्मक रीतीनें मांडणें हें तर नाहींच जमत. आकाशांतून पाऊस पडतो तो का कलात्मक रीतीनें पडत असतो ? भरून आलेलें आकाश रिकामें होतें. त्याप्रमाणें माझ्या मनांत जमलेलें मी कोठें तरी ओतून टाकीत असतों. मग तें व्याख्यान असो वा लेखन असो. तेच विचार, त्याच भावना, त्याच कल्पना, तेच शब्द. मी नवीन आणूं तरी कोठून ? मला एकच ध्यास आहे. या जीवनांत मेळ येवो, प्रेम येवो, संगीत येवो. आज सकल जीवन विकल झालें आहे. सकल शब्दांचाही अर्थ बघा किती सुंदर आहे. कलासहित तें सकल. जेथें सर्व कलांचा विकास आहे तें सकल. अपूर्णांत, अर्धवटांत, खंडांत, अंशांत प्राण नाहीं. सकलतेंत, समग्रांत आनंद आहे.

## छिन्नभिन्न जीवन

जगांतील आजचें जीवन छिन्नभिन्न आहे. विज्ञानानें जीवन समृद्ध केलें. परंतु संकुचित स्वार्थी माणसांनीं तें भिकार केलें आहे. फोनोग्राफ सर्वत्र संगीत नेतो. परंतु आम्ही सर्वत्र द्वेषमत्सर नेतों. मानवांना मानवता कोण शिकवील ? आपापले प्रान्त, आपापल्या जाती, आपापलीं राष्ट्रें, आपापले धर्म, आपापल्या संस्कृति, आपापले मानववंश, यांच्या अहंकारांतच मानव अजून गुरफटलेला आहे. आणि त्यामुळेंच जगांत आनंद नाहीं, शान्ति नाहीं, सुसंवाद नाहीं, मेळ नाहीं. सारें जीवन शतखंड आहे. या जीवनाला अखंड कोण बनवणार ? शतभग्न मानव समाजाला एकत्र कोण सांधणार ?

हें काम कलेचें आहे. कला ही जोडणारी आहे, तोडणारी नाहीं. कुरूपतेंतूनहि ती सुंदरता प्रकट करते. चित्रकलाच बघा ना. चित्रकलेंतील नाना संप्रदायांबद्दल मला येथें सांगायचें नाहीं. परंतु अनेक रंगांचा उपयोग करून चित्रकार एक रमणीय चित्र चितारतो. त्याच्याजवळ सर्व रंगांचा सन्मान, सर्व रंगांना स्थान. साध्या काळ्या रंगांतही तो किती सुंदर चित्रें रंगवितो. तो प्रमाण साधतो. कोठला रंग कोठें संपला जणूं कळत नाहीं. एक एकजीवि असें तें सुसंवादी मिश्रण असतें. चित्रकार जणूं जगाला सांगतो. "अनेक रंगांचा उपयोग करून, सर्वांना जवळ घेऊन मी सुंदर चित्र तयार करतों. तुम्हीं तें बघतां. दिवाणखान्यांत टांगतां. परंतु नाना रंगांचे मानववंश एकत्र आणून मानवतेचें व्यापक चित्र तुम्हांला कां निर्माण करतां येऊं नये ? गोरे, काळे, पिंवळे भेद कशाला ? अनेक रंगांतून आपण एक चित्र तयार करतों, त्याप्रमाणें अनेक मानववंशांतून एक मानवता निर्माण करा."

चित्रकाराची चित्रकला एवढेंच सांगते असें नाहीं. ती आणखी सांगते कीं कोणाही थोर चित्रकाराचीं चित्रें कोणालाही आवडतात. मानव येथून तेथून एकच आहे. अजिंठ्याचीं अमर चित्रें बघायला, त्यांच्या प्रतिकृति करायला सगळ्या जगांतून चित्रकार येतात, सहासहा महिने तेथें राहतात. त्या चित्रांतील तो सजीव भाव कोणाला उचंबळवणार नाहीं ? अजिंठा लेण्यांतील चित्रांना जणूं पंख आहेत असें वाटतें. तीं चित्रें गतिमान् आहेत, जिवंत आहेत. जगांतील सर्व मानवांना तीं चित्रें हांका मारीत आहेत. भिंतीवरील दीड-दोन हजार वर्षांपूर्वीचीं तीं चित्रें, परंतु मानवाला तीं एकत्र आणूं शकतात. रंग, जात, राष्ट्र विसरायला लावतात.

शेक्सपिअर हा का केवळ इंग्लंडचा आहे ? तो सर्व जगाचा आहे. साऱ्या मानवांचें हृदय त्यानें एकत्र आणलें आहे. परवां जर्मन महाकवि गटे याचा २०० वा जन्मदिवस जगभर साजरा झाला. जर्मनीची राज्यसत्ता जगावर लादूं पाहणारा हिट्लर रसातळाला गेला. परंतु गटेची मानवी हृदयावरची, मानवी बुद्धीवरची सत्ता चिरंजीव आहे. जर्मनीच्या नाझी लोकांनीं युरोपला त्राहि भगवान् केलें, त्यांच्या गटेची काय म्हणून स्तुति करायची, कशाला त्याचा उत्सव, असें युरोपांतील जनता म्हणाली नाहीं. जणूं अशा ऐक्यदिनासाठीं ते भुकेलेले होते. द्वेषमत्सरांच्या अंधारांत असे आन्तरराष्ट्रीय दिवस म्हणजे प्रकाश होत.

कलेचें हें महान् ध्येय आहे. कलेच्या प्रांतांत तरी क्षुद्रता नको. आपल्याकडचा संगीतशास्त्राचा इतिहास किती गोड आहे ! संगीताला वेदाची थोरवी देण्यांत आलेली आहे. गांधर्ववेद असें आपण म्हणतों. गीतेच्या दहाव्या अध्यायांत "वेदानां सामवेदोऽस्मि" असें म्हटलें आहे. मी लहानपणीं म्हणायचा "ऋग्वेद मोठा असून सामवेदाला कां महत्त्व ?" पुढें एक दिवस मनांत प्रकाश आला. सामवेदांत संगीत आहे. संगीत जीवनांत समता आणते. आपण उत्तम गाणें ऐकत असतांना सारे एका भावनेंत डुंबत असतों. जणूं एका भूमिकेवर, एका पातळीवर सारे असतों. सारे मान डोलवतात, सारे बोटें नाचवतात. जीवनांत संगीत आणणाऱ्या सामवेदालाच महत्त्व. ते सात अलग अलग सूर. चित्रकार नाना रंगांच्या मिश्रणांतून अनेक चित्र निर्माण करतो, त्याप्रमाणें संगीतज्ञ नाना सुरांतून सुसंवादी संगीत निर्माण करतो. एकाच सुराला महत्त्व नाहीं. सर्वांना मान नि स्थान. सारे सूर संयमांत ठेवल्यानें संगीत निर्माण होतें. संस्कृतीचा आत्मा संयमांत आहे. मानवी जीवनांत ज्याला सुसंवाद निर्मायचा आहे, संगीत निर्मायचें आहे, त्यानें सर्वांचा मेळ घातला पाहिजे. ऋषि म्हणतो :

सर्वेषामविरोधेन ब्रह्मकर्म समारभे। सर्वांमध्यें अविरोध निर्मून मी ब्रह्मकर्माला आरंभ करतों. ब्रह्मकर्म म्हणजे महान् कर्म. कोणतेंही थोर ध्येय, उदात्त ध्येय सर्वांचा विचार करूनच पुढें ठेवतां येईल. संगीताचा विचार मनांत येतांच माझी

जणुं समाधि लागते. जीवनाची किल्ली संगीतांत आहे. आपल्याकडे हिंदु-मुसलमान गवयी एक-मेकांचे शिष्य होते. मी-हिंदु, मी मुसलमान हा भेद तेथें विरून गेला. मानवतेच्या भूमिकेवरून ते शिकत शिकवीत. तानसेन मरण पावला, तेव्हां हिंदु म्हणाले, हा आमचा, मुसलमान म्हणाले, हा आमचा. तो तर सर्वांचा होता. आणि तुळशी व सब्जा, अबीर आणि गुलाल दोन्ही त्याच्या शवाजवळ दिसून आलीं. जणूं ऐक्याची तो मूर्ति होता.

## परंतु आज काय आहे ?

परंतु ज्ञानविज्ञानकला यांच्या क्षेत्रांतहि आज भेदभाव शिरत आहे. या पवित्र मंदिरांतहि द्वेष-मत्सराचीं भूतें हैदोस घालायला येऊं पाहत आहेत. ज्ञानविज्ञान साऱ्या जगाचें असतें. आर्यभट्ट, भास्कराचार्य, पाणिनी, जगदीशचंद्र, रामन् यांना जग आदरील; न्यूटन, कोपर्निकस, डेव्ही, आइन्स्टीन यांना जग आदरील. गीता, शाकुन्तल, अरेबियन नाइट्स्, प्लेटो, शेक्सपिअर, गटे, ह्यूगो, इमर्सन, शॉ साऱ्या जगाचे आहेत. मानवी मन एकच आहे. सीतेच्या वनवासानें जगांतील सारीं माणसें रडतील. उत्तररामचरित्रांतील रामाच्या शोकानें दगड पाझरतील. गटेचें 'तरुण वर्थरचीं दुःखें' वाचून कोण उचंबळणार नाहीं? ॲलेक्झांडरच्या खिशांत ॲरिस्टॉलचें पुस्तक असे. नेपोलियनच्या खिशांत गटेचें "तरुण वर्थरचीं दुखें" पुस्तक असे. तर क्रान्तिकारकांचा मुकुटमणि लेनिन खिशांत शेक्सपिअर ठेवी व दुःखानें म्हणे "क्रांति केल्यावरच शेक्सपीअर वाचायला पुन्हा वेळ." न्यायमूर्ति रानडे गोल्ड स्मिथचें व्हिकार ऑफ् वेकफिल्ड दरवर्षी पुन्हा वाचीत. आपण मानव जगभर पसरलेले असलों, तरी आपलें हृदय एक आहे. ज्ञानविज्ञानकला यांच्या द्वारा हा दिव्य अनुभव येतो.

परंतु आज काय चाललें आहे? एक जर्मन गणितज्ञ म्हणायचा, "गणितांतील या प्रमेयाचा नाझी दृष्टीनें विचार करतां!" म्हणजे गणितांतही नाझी दृष्टि म्हणून कांहीं आहे वाटतें? नाझी गणितांत दोन नि दोन का पांच होतात? रशियांतील शास्त्रज्ञही 'स्टॅलिनी दृष्टीनें विचार करतां" असे शब्द वापरूं लागले आहेत. स्टॅलिनी दृष्टीनें सूर्यावरच्या डागांकडे पाहिल्यावर ते का लाल दिसणार आहेत? सर्व शास्त्रांचा शोध प्रथम रशियांत लागला असे आतां पुरावे रशियांत तयार केले जात आहेत. हिंदुस्थानांत प्रथम रशियन मनुष्य आला. तारायंत्राचा शोध प्रथम रशियन माणसानें लावला. हा कोण अहंकार? ही कोणती दृष्टि? परवां एक रशियन शास्त्रज्ञ म्हणाला, "वाडवडिलांचे गुणधर्म पुढील पिढींत येतांत कीं नाहींत याचे प्रयोग करणारा तो मेंडेल बुर्ज्वा (भांडवलशाही) वृत्तीचा होता. आम्ही आतां स्टॅलिनी पद्धतीनें शोध करूं" बिचाऱ्या मेंडेलनें वाटाण्यांवर प्रयोग करून त्याला जें कळलें तें त्यानें लिहून ठेवलें. ही प्रयोगाची वस्तु आहे. जें ज्ञान मिळेल तें जगासमोर ठेवा. ज्ञानाच्या प्रांतांत आपण एकमेकांचे ऋणी असतों. साऱ्या जगांत आपले गुरु, साऱ्या जगांत आपले शिष्य. परंतु ज्ञान, विज्ञान, कला यांच्या क्षेत्रांतहि माणुसघाणपणा येत आहे. येथेंहि कृतज्ञता, मानवता, भेदातीतता, यांना राहूं द्यायचें नाहीं अशी दुष्ट वृत्ति जन्माला येत आहे.

भारतांतहि हिटलरी, स्टॅलिनी हुकुमशाही वृत्ति आलेली आहे. आमचें सारें श्रेष्ठ, इतरांचें येथें कांहीं नको असली घातकी पातकी वृत्ति येथें रूढ केली जात आहे. परवां गणेशोत्सवांत पुण्याला कराचीचे बडे गुलाम अलीखां आले होते. त्यांचें गाणें झालें कीं नाहीं कळलें नाहीं. परंतु पाकिस्तानी गवयी येथें पुण्यांत कशाला, असा प्रचार संस्कृतीच्या प्रचारकांनीं तेथें केला ही गोष्ट खरी. त्यांचें मुंबईस गाणें होऊन ते पाकिस्तानांत गेले. अब्दुल करीमखां, रहिमतखां किती थोर नांवें! त्यांना का हिंदु संगीतज्ञ कमी मानीत? बाळकृष्णबुवा वगैरेंचा मुस्लिम गवयी गौरव करीत, त्यांचा हे करीत. अब्दुल करीमखां सारीं कृष्णाचीं गाणीं गायचा. "जमुना के तीर" ही त्यांची भैरवी कोण विसरेल? आणि बडोद्याचे राजगवयी फय्याजखां—ज्यांना आफ्ताबे मोसिकी म्हणजे संगीत भास्कर म्हणत, ते का बहिष्कृत मानणार? कोठें ते अलादियां, बाळकृष्णबुवा वगैरे भेदातीत दृष्टीचे गायनाचार्य आणि कोठें तेथेंहि जातिधर्मभेदांचा चिखल उडवूं पाहणारे क्षुद्र वृत्तीचे बेडूक! संगीतकला, हा सामवेद का भेदांच्या बुजबुजाटांत बुडवणार? लंडनला रवीन्द्रनाथ सोसायटी स्थापन झाली आहे. त्याचा तुम्हांला अभिमान नाहीं वाटत? रवीन्द्रनाथांचें कौतुक लंडनमध्यें कशाला असें म्हणाल का? अरे, ज्ञान-विज्ञान-कला यांच्या प्रान्तांत तरी गुणगौरव ठेवूं या. दुसऱ्यांच्या गुणांचा गौरव करणें यांत स्वतःच्या विकासाचें बीज असतें. परंतु आम्ही आज केवळ आंधळे झालों आहोंत.

हिट्लरच्या लोकांनीं गॅसचेंबरमध्यें लाखोंना जाळलें. तरीही त्याच्या जर्मनींतील गटेचें साऱ्या युरोपनें पुण्यस्मरण केलें. पाकिस्तान, हिंदुस्थान अलग झालीं असतील. परंतु भौगोलिक मर्यादा ओलांडून आमची कला, आमचें साहित्य, आमचें ज्ञान-विज्ञान हें बाह्य अंतर तोडील व अंतःकरणें जोडील असें मानवानें घोळविलें पाहिजे.

## ही का तुमची संस्कृति ?

आम्ही संस्कृतिसंवर्धनाचें काम करणार असं आतां जो तो म्हणत आहे? द्वेषमत्सर माजवणाऱ्यांना संस्कृतीचा अर्थ तरी कळतो का? जगांत तुम्ही सदयता, सहृदयता, मानवता, समता किती आणतां, यांवर तुमच्या संस्कृतीची किंमत अवलंबून आहे. कोणी कोणी संस्कृतीचे उपासक "ज्यां आम्ही ताजमहालही खणून काढूं" असें आपसांत म्हणत असतात. ताजमहालहि खणून काढणें ही का भारतीय संस्कृति? ही का ऋषिमुनींची संस्कृति? ही का शिवछत्रपतींची, विवेकानंदांची संस्कृति? मराठ्यांनीं अजमीरच्या मुस्लिम संताचा दर्गा मोडकळीस आलेला दुरुस्त केला. त्या वेळेस लढाया चालू होत्या. पानपतें होत होतीं. तरीहि ही दृष्टि ठेवण्यांत आली होती. ती दृष्टि कोठें, आणि ताजमहालहि खणून काढूं म्हणणाऱ्याची दृष्टि कोठें? काळ्या यमुनेच्या तीरावरची ती विश्वमनोहर इमारत. शहाजहान बादशहाच्या स्वप्नांत आलेली ती कल्पना. मुम्ताज महालवर त्यांचें प्रेम. त्या प्रेमांतून स्फुरलेली ती भव्य भावना! ताजमहाल म्हणजे प्रेममंदीर आहे. जगांतील सारे सुंदर पाषाण आणून तें आरसपानी काव्य निर्मिण्यांत आलें आहे. ज्या यमुनेच्या तीरावर गोपाळकृष्णानें प्रेमाचा पाऊस पाडला, विश्वमधुर मुरली वाजविली, त्याच यमुनेच्या तीरीं ही इमारत आहे. चांदण्यांत ती बघत असतां समाधि लागते. ती भव्य कलाकृति सकल मानवांचें ऐक्य निर्मिते. साऱ्या जगांतील मुशाफीर तेथें येतात, तन्मय होतात. असें जगाचें भूषण बनलेली समाधि नष्ट करूं इच्छिणारे का संस्कृतीचे उपासक?

## नांवेंगांवेंही बदलूं

मुस्लिमांच्या खाणाखुणा नष्ट करूं, गांवांचीं शहरांचीं नांवें बदलूं असेंहि संस्कृतीचे कांहीं उपासक म्हणत असतात. शहाजीचें नांव बदलून कोणतें ठेवणार? मुस्लिम साधुसंतांचीं नांवें आम्ही उचललीं होती. कांहीं शहरांचीं नांवें इस्लामपूर, अहमदनगर अशीं आहेत. हिंदुस्थानांतील अशीं सारीं नांवें जमवून तीं बदलण्याचा ठराव करणार वाटतें? मग द्राविडी बंधूंनीं तुमची आर्य नांवेंही बदलण्याचा हट्ट धरला तर मात्र रागावूं नका. आज तामीळनाड प्रांतांत "आर्यांनीं आमची संस्कृति मारली, भाषेंतील संस्कृत शब्द काढा" अशी चळवळ सुरू झालेली आहे. जें पेराल तें खाल. कांटे पेराल कांटे खाल. ब्रह्मदेश, जावा, सुमात्रा, सर्वत्र संस्कृतोद्भव शेंकडों नांवें आहेत. तींही का त्यांनीं बदलावीं? अरे, आपण त्या खुणा मानू. मानवी यात्रेंतील पाउलें. नानावंश एकत्र आले, लढले, भांडले, परन्तु आज गुण्यागोविंदानें नांदत आहेत, याचा महान् इतिहास ते शब्द, तीं नांवें सांगतील. परवां सेनापति भेटले. सहज म्हणाले, अमेरिकन स्पेलिंग पद्धति सोपी असेल, उच्चाराप्रमाणें अक्षरें लिहिणें बरें असेल, परन्तु त्यामुळें शब्दांचा इतिहास नाहींसा होईल. रात्रीला शब्द Night नाइट असा आहे. आतां अमेरिकन स्पेलिंगप्रमाणें Nite असें लिहितील. परन्तु मधलीं तीं gh जी एच्. हीं अक्षरें संस्कृतमधील "नक्तम्" शब्दामधल्या 'क्त'चे अपभ्रष्ट अवशेष आहेत. नक्तम् शब्दांतून नाइट शब्दांतील gh जी एच् अक्षरें आलीं. पुढें उच्चार त्यांचा गेला तरी तीं अक्षरें राहिलीं. अक्षरें राहिल्यामुळें संस्कृत शब्दांतून त्याची व्युपत्ति कळली. शब्दांच्या अशा मौजा आहेत. मानव जातीचा त्यांतून इतिहास असतो. इंग्रजींतील Knee नी म्हणजे गुडघा हा शब्द घ्या. संस्कृतांतील 'जानु' या शब्दापासून तो आहे. अनुच्चारित इंग्रजी के K ही संस्कृतांतील जानूमधील जपासून आलेली आहे. मानव जातीचा महान् इतिहास ज्याला शोधायचा आहे, अभ्यासायचा आहे, त्यानें प्रत्येक शब्द पवित्र मानावा. शब्दब्रह्माची ती उपासना तुम्हांला मुक्त करील, मानवतेचें महान् दर्शन घडवील.

## गोंधळांतून संगीताकडे

या महान् इतिहासांत लढे, झगडे, कत्तली, द्वेषमत्सर सारें आहे. परंतु मृतमय देहांत राहून अमरता अनुभवायची, त्याप्रमाणें या सगळ्या गोंधळांतून आपण सुसंवादाकडे, संगीताकडे जात आहोंत. लहानपणचीं भांडणें, मारामाऱ्या, संकटें पुढें गोड आठवणी होतात. त्याप्रमाणें आपण म्हणूं. आम्ही या देशांत आज सारे एकत्र नीट नांदत आहोंत. या देशांत जगांतील सारे धर्म, संस्कृति, वंश आले. या पाहा त्यांच्या खुणा, या पहा समीक्षा. आम्हीं लढलों, मारामारी केली, परंतु त्यांतूनच आतां संगीत निर्माण केलें आहे. कचऱ्यांतून प्रेमाचें पीक घेत आहोंत असें आपण पुढें म्हणूं. यासाठीं संस्कृतीच्या उपासकांनीं सर्वांना जवळ घ्यावें. एकमेकांचे सुंदर शब्द घ्यावे. एकमेकांचें ज्ञान घ्यावें. एकमेकांच्या कला घ्याव्या, उपासाव्या. एक मानवता निर्माण करावी.

## वेदांतील ऋषींची वाणी

वेदांतील ऋषि वाग्देवतेच्या सूक्तांत म्हणत

अहं राष्ट्री संगमनी जनानाम्।

वाग्देवता म्हणते "मी सर्व राष्ट्रांची आहे, सर्व मानवांना एकत्र आणणारी आहे." केवढी भव्य कल्पना! परंतु आमच्यांतील कांहीं संस्कृतीचे उपासक भाषाहि अशी योजूं इच्छितात कीं जनांना समजणार नाहीं. संतांनीं सर्वांना समजावें म्हणून संस्कृत सोडून देशी भाषांचा आधार घेतला, अमर वाङ्मय लिहिलें. सकल जनांच्या जीवनविकासासाठीं त्यांची साहित्यकला होती. त्यांच्याजवळ अहंकार नव्हता.

## सिद्धींचा मार्ग

योगवासिष्ठांत पुढील सुंदर चरण आहे.

अनहंवेदनंसिद्धिः अहंवेदनमापदः।।

अहंकाराची जाणीव नसणें म्हणजे सिद्धि, अहंकाराची जाणीव म्हणजे आपत्ति. आज या भारतांत मी हिंदु, मी मुसलमान, मी महाराष्ट्री, मी गुजराथी हें विसरून आम्ही भारतीय, आम्ही

सारे हिंदी असें म्हणूं तर त्यांत राष्ट्राच्या यशाची सिद्धि आहे. फूट पाडाल, तर राष्ट्रलाहि पाडाल.

### देशभक्ति शिवी होईल

टॉलस्टायनें एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं "एक काळ असा येईल कीं ज्या वेळेस देशभक्ति ही शिवी होईल !" असे कसे आपले पूर्वज ? हा त्या राष्ट्राचा द्वेष करीत आहे, तो या राष्ट्राचा ! असें पुढील पिढया म्हणतील. गुरुदेव रवीन्द्रनाथ असेंच म्हणत. महात्माजींनीं जीवनानें नि मरणानें सर्वांबद्दल सद्भाव राखा असें शिकविलें. एका जर्मन शास्त्रज्ञाच्या आयुष्याला ६० वर्षें नुकतींच पुरीं झालीं. मुंबईच्या विज्ञानाच्या कांहीं विद्यार्थ्यांनीं त्याला अभिनंदनपर पत्र पाठविलें. हिटलरनें या शास्त्रज्ञाला हद्दपार केलें होतें. तो आज आयर्लंडमध्यें राहतो. त्यानें मुंबईच्या विद्यार्थ्यांना उत्तरांत लिहिलें: "तुम्ही माझें अभिनंदन कां केलें ? कारण तुमच्या उपनिषदांत तो भव्य विचार प्रथम उद्घोषिला गेला. मानव कोठेंहि जन्माला येवो, त्याला सन्मान. त्याचा विचार घे.' हा शास्त्रज्ञ पुढें म्हणतो:

"I hope to see a time when nationalism and socalled patrtioism will no longer be considered virtuous (as it is now) but criminal, because it endangers war."

[अर्थ: असा काळ मी बघूं इच्छितों, जेव्हां युद्धें पेटवणारे राष्ट्रधर्म व देशभक्ति ह्यांना आजच्याप्रमाणें सद्गुण न मानतां गुन्हा म्हणून मानतील, पाप म्हणून मानतील.]

आपलाच वंश श्रेष्ठ असें मानण्यापासून कोणत्या आपत्ति मानवजातीवर येतात तें ह्या शास्त्रज्ञानें पाहिलें आहे, अनुभवलें आहे. आपणहि या आगींतून गेलों आहों. तरी का पुन्हां येथें भेदभावांचे वणवे पेटवणार ? हा लाहोरी संगीतज्ञ येथें कशाला असें का म्हणणार ? हा ताजमहाल खणून काढूं अशीं दुष्ट स्वप्नें मनांत खेळवून तो विषारी प्रचार का नवपिढींत करणार ? प्रभु करो, नि असली घातकी विचारसरणी येथें न रुजो.

### सामरस्यांत पावित्र्य

आपण पूर्णाला महत्त्व दिलें आहे. ज्याप्रमाणें संगीत, साहित्य, चित्रकला यांचा संदेश मानवजातीला असतो, विविधतेंतून कला ज्याप्रमाणें सुंदरता निर्मितात, त्याप्रमाणें आपणांस जीवनांत करायचें आहे. निर्जीव भोपळ्यांतून, त्या तारांतून, त्या मृदंगांतून जर सुरेल संगीत काढूं शकतां, तर जीवनांतून कां नाहीं काढीत ? सर्वांत श्रेष्ठ जीवनकला होय. गांधीजी इतर कलांचे उपासक होते. परंतु त्या सर्व कला जीवनाच्या महान् कलेसाठीं त्यांना हव्या होत्या. त्यांनीं सारी मानवजात आपली मानली. आपल्या जीवनतंत्रीला सहस्रतारा लावून त्यांनीं महान् संगीत निर्माण केलें. त्यांच्या जीवनांतून मूर्त झालेला तो सामवेद आज जगाला संगीत ऐकवीत राहील. Wholeness is holiness, सर्वांचा विचार करण्यांत पावित्र्य आहे. आपल्याच जातीचा, आपल्याच धर्माचा, आपल्याच राष्ट्राचा फक्त विचार कराल, तर तुमच्या विचारांत नि वर्तनांत दोष येईल, संकुचितता येईल, द्वेषमत्सर येईल, म्हणजेच अपवित्रता येईल. ज्या मानानें जास्तींत जास्त मानवांच्या कल्याणाचा विचार कराल, त्या मानानें जीवनांत जास्तींत जास्त शुचिता येईल, पावित्र्य येईल. ही खात्री आहे. म्हणून महात्माजींचें जीवन महान् झालें, सागराप्रमाणें उचंबळत राहिलें. त्यांचें जीवन विश्वजनांच्या मीलनाचें तीर्थक्षेत्र झालें. परमकृतार्थ जीवन मानवजातीचें तें हृदय झालें होतें. ते दूर असले तरी मानवाला त्यांच्यामुळें आधार वाटे. ते गेले तेव्हां मुंबईतील कामगार वस्तींतील एक मुसलमान माता म्हणाली, "या अल्ला, अभी हमको कौन है ?" महात्माजींचें जीवन म्हणजे भारतीय संस्कृतीचा परमोच्च बिंदु असें नामदार गोखल्यांनीं १९१२ मध्येंच म्हटलें होतें, तें उगीच नाहीं. इटली देशांतील स्त्री-पुरुष "Gandhi good, Gandhi good" असें त्यांच्या खुनाची वार्ता ऐकून हळहळून म्हणाले. याचें रहस्य काय ? गांधीजी मानवजातीचें हृदय बनले होतें. जीवनकलेचा परमोच्च आदर्श त्यांनीं भारतीयांसमोर मानवजातीसमोर ठेवला.

### परमात्मा सर्वांहून मोठा कलावान्

आणि परमेश्वर तर सर्वांहून मोठा कलावान्. वामन पंडितांनीं म्हटलें आहे,

'जो कलाप्रद कला सकलांचा' सर्व कलांना कलात्व देणारा तो प्रभु. वेदांनीं त्याला कवींचा कवि असें म्हटलें. कारण सर्वांविषयीं त्याला सहानुभूति. लहानशा फुलपांखराचे रंग तो माणिकमोत्यांच्या रंगानीं रंगवील. लहानशा फुलांत अपार गंध नि रंग ओतील, त्याला तृणपर्णांचीही काळजी. इराणी भाषेंत एक म्हण आहे, "बेडुक चिखलाचा पाऊस पाड म्हणतो. हंस मोत्यांचा पाड म्हणतो. प्रभु निर्मल पाण्याचा पाऊस पाडतो जो सर्वांसाठीं असतो." ईश्वराचा पाऊस सर्वांसाठीं तसें तुमचें सर्वांसाठीं असो. परमात्मा ही विश्वव्यापक कला दाखवीत आहे. मानवानें त्यावरून आपुली जीवनकला फुलवावी. सर्व कलांचें ध्येय एकच, "प्रमाण राखा. उतू नका, मातूं नका. संयम राखा. तरच आनंद अनुभवतां येईल !" असें आपण करूं तरच जीवनांत दिवाळी राहील. नरकासुर, घाणीचे असुर जाऊन प्रेमाचा प्रकाश तेवत राहील !



## तुकारामबुवा आणि साबण-

'नाही निर्मळ जीवन। काय करील-साबण!' असा श्री संत तुकारामबुवांनी प्रश्न केला आहे. याचा अर्थ साबणावर त्यांचा राग नव्हता. उलट साबणानं बाह्यस्वच्छता निश्चित होते असं त्यांना म्हणायचं होतं. म्हणून जास्ती-जास्त काटकसरीसाठीं—

आजपासून








## मलीन कपडे सांचून रहातात!

कपडे धुण्यास ज़ादा त्रास पडूं लागला कीं माहजिकच कपडे धुण्याचा कंटाळा येतो. मग काय, मळक्या कपड्यांचे ढीगच्याढीग तसेंच पडून रहातात. म्हणून श्रम आणि पैसा बांचविणारे चांगल्या प्रतीचे साबण वापरा.

'२५१' सोप चिप्स • २५१ बार सोप आणि




पायोनिअर सोप्स लि., कोल्हापूर

TOM & BAY (R) PSL/M4






पायोनिअर सोप्स लि. कोल्हापूर (S.M.C.)




PSL/M TOM & BAY (R).

स्वच्छतेच्या

## शुभ्र-पताका

चौफेर फडकविणारे

## ३

## श्वेत-शिलेदार

"२५१"

बार, स्पेशल वडी, सोपचिप्स
** गाय छाप बारसोप
*** 'जॉकी' छापबार सोप
दीपावली शुभचिंतनाप्रीत्यर्थ आपल्या सेवेस तत्पर असल्याची घोषणा करीत आहेत!

## अल्पमोली संपूर्ण स्वच्छता

पायोनिअर सोप चिप्स

सर्वच साबण कपडे स्वच्छ करतात परंतु थोड्या साबणानें अधिक कपडे स्वच्छ होणें ही साबणाची कसोटी होय.

'251' SOAP CHIPS PIONEER SOAPS LTD.

रेशमी अथवा रेयॉनचे नाजूक कपडे धुण्यास '२५१' सोप चिप्स वापरा.

पायोनिअर सोप्स लि., कोल्हापूर

TOM & BAY (R) PSL/M3



## कपडे धुण्याचा छळवाद कमी झाला..

घरांत गडी नसल्यामुळें कपडे धुण्याचं काम माझ्यावर पडलं आहे. पण अलीकडं 'जॉकी बार सोप' वापरण्यास सुरवात केल्यापासून मला या कामाचा मुळीच त्रास वाटत नाहीं.

पायोनिअर जॉकी बार

पायोनिअर सोप्स लि., कोल्हापूर S.M.C.

PSL/M1 TOM & BAY (R)

अनुक्रमणिका



## काय ह्यांत खरें पण ?

कवि : **यशवन्त**

येथें रंगलें कीर्तन.
    ‘ काय कथेंत नवीन ?’
    ऐसें मनांत म्हणून
        गेलों पुढतीं निघून.

तेथें चाललें नर्तन
    परि संयमानें मन
    परतवून तेथून
        गेलों पुढतीं निघून.

सभा गर्जते विराट
    नाहीं रिघावया वाट.
    ‘ प्रचारकी हा बोभाट ’
        ऐसें चाललों तुच्छून.

कोणी लाखांत देखणी !
    पाहूं कैंवि निरखोनी ?
    सभ्यतेची तेणें हानी ! !
        गेलों खालतीं पाहून.

आली सुसंधि चालुनी—
    ‘ छे, ही कांचन-हरिणी ?’—
    ऐसा विवेक करुनी
        नच सोडिलें स्वस्थान.

मुलें खेळांत बेभान
    माझें आड प्रौढपण !
    मिरविलें तेंहि पण
        तयांनाच दटावून.

आला कोणी भांडायास
    तडजोड केली खास
    व्यवहारी समंजस
        व्हावें काय न आपण ?

काय माझें हें वर्तन
    काय माझें हें धोरण
    वानितात सारेजण—
        ‘ किती सुज्ञ, सावधान

काय परि लाभ मला ?
    सारा अनर्थ जाहला !
    अदुखाचा फक्त-मळा-
        राहे मोंवतीं पिकून.

माझा संयम, विवेक,
    सुज्ञपणाचा दिमाख
    सभ्यपणाचा पोषाख—
        -काय ह्यांत खरें पण ?

हीं तों नांवेंच सोज्ज्वळ.
    ह्यांत बावरें केवळ
    साऱ्या अदुखाचें मूळ
        आणि अनर्थ-कारण

फोडा माझे मुखवटे
    ओढा पारीं चिरगुटें
    दिसां येईल करंटें
        लपलेलें ‘भ्याडपण.’

व्याया जाणून अज्ञान
    व्याया जाणून प्रमाद
    व्हाया रंगून बेभान
        हवें शूराचेंच मन.

आणि येतां हें कळून
    स्वतालाच धिक्कारून
    वाट धरील नवीन
        काय कोणी शूरावीण ?

परि नाहीं शौर्य पोटीं
    म्हणूनीच खोटीनाटीं
    निमित्तें नि लटपटी
        हुडकणें रात्रंदिन

निवतांना कार्यासाठीं
    कां रे हवी शुभ घटी ?
    निष्ठा, सचोटी, चिकाटी
        नाहीं पुरेशी म्हणून !

चष्मा लवितो रंगीत
    डोळे दिपती म्हणून ?
    कां न तयांच्या आडून
        वावरतें भ्याडपण ?

ऐसें येथून-तेथून
    माझ्या जीविता व्यापून
    राहिलें हें भ्याडपण
        पुळें करंट-लक्षण.

अनुक्रमणिका



# पुरुष तेवढे सारे-?

— ना. सी. फडके

स्टेशन यायला दहा बारा मिनिटांचाच अवकाश उरला असं पाहतांच श्रीधरनं सूटकेस उघडून मासिकं आंत कोंबलीं, छोटा कंगवा काढून वाऱ्याच्या झोतानं विस्कटलेलीं आपलीं काळीं भोर दाट झुलपं विंचरलीं, सिगरेट शिलगावली, आणि ही सगळी तयारी ठाकठीक झाल्यावर कोटाच्या खिशांतला तारेचा कागद काढून उलगडून त्यानं तो डोळ्यांपुढं धरला. " मी मोठ्या संकटांत आहें. तावडतोब ये; उषा. " हे त्या तारेंतले सात शब्द पाहतां पाहतां प्रवासांतल्या तीन तासांत अगणित वेळां जे विचार त्यानं केले होते, तेच तो पुन्हां करूं लागला. सौभद्र नाटकांतला बलराम ज्याप्रमाणं सुभद्रा नाहींशी कशी झाली याबद्दल " एकवार वाटे कीं कोधें हिनें प्राण दिधले, एकवार वाटे कीं तिजला पार्थानें नेलें, एकवार वाटे तूं तिजला कपटें लपविलें, ऐसे माझ्या मनांत नाना तरंग ते आले " म्हणून कृष्णाला सांगतो, तद्वत् श्रीधरच्या मनांत अक्षरशः नाना तरंग हजारदां आले होते, तेच आतां पुन्हां आले. त्याला एकदां वाटलं कॉलेजच्या वसतिगृहांत राहणारी त्याची प्रेयसी उषा एखाद्या साथीच्या रोगानं तर आजारी झाली नसेल? प्लेग, कॉलरा, मेनिंजायटिस, देवी, इत्यादि भयंकर नांवं त्याच्या मनांत येऊन गेलीं. एकदां त्याला वाटलं, या दंगेखोर पोरीनं कांहीं भलती दांडगाई केली, आणि प्रिन्सिपलसाहेब तिला कॉलेजमधून हांकून काढताहेत असं तर नसेल? एकदां त्याला वाटे, हिनं कोणाचं भलतं कर्ज करून ठेवलं आणि आणि आतां तें सारं भागवलं नाहीं तर फिर्याद करतों—किंवा त्याहूनही वाईट म्हणजे तुझ्या वडिलांना कळवितों—अशी दहशत सावकारानं तिला घातली, असा तर कांहीं बनाव झालेला नसेल?...तारेंतल्या त्या " मोठ्या संकटांत " या दोनच शब्दांचा अन्वयार्थ लावतां लावतां त्याचं मन प्रत्येक वेळीं थकलं होतं, तसंच तें आतांही थकलं. जरा खुलासेवार तार केली असती तर काय बिघडलं असतं, अशा विचाराच्या चिडीनं त्यानं मनांतल्या मनांत 'गाढव' 'बेअक्कल' 'खुळी' 'स्टुपिड' इत्यादि ज्या शिव्या उषाला आतांपर्यंत शंभरदां दिल्या होत्या, त्या सर्वी पुन्हां एकदां दिल्या...आणि तारेच्या कागदाची अखेर घडी करून खिशांत ठेवतांना त्याच्या मनांत एकशेंएकाव्यांदा आलं, संकट बिंकट कांही नसेल, केवळ तिनं बोलावल्याबरोबर मी धांवत येतों कीं नाहीं याची चांचणी घेण्यासाठीं उषानं ही तार केली असेल...त्याचं आपल्यावर कितो प्रेम आहे आणि आपलीं त्याच्यावर किती सत्ता आहे हे पाहायची लहर उषाला पुष्कळदां येत असे. अशी लहर आली कीं इतर मुलींना बोरजन्मीं—कीं मायजन्मीं म्हणायला हवं?—सुचणार नाहींत अशा युक्त्या तिला सुचत असत, आणि मागचा पुढचा विचार

न करतां ती त्या धुंमलांत आणीत असे. संकट नसेल आणि कांहीं नसेल...ही तार म्हणजे उषाची 'ब्रेन वेव्ह ' आहे...या अखेरच्या विचारानं श्रीधर स्वतःशीच हंसला. आणि त्याच वेळीं गाडी स्टेशनांत शिरली...

खिडकींतून बाहेर पाहतांना त्याच्या नजरेपुढून सरकणाऱ्या आकृतींत डाव्या हातानं कपाळावरच्या झिपऱ्या मागं सारणारी व तो इचीच पदराबरोबर उजव्या हातांतला रुमाल उंचावणारी आणि हंसून धांव घेणारी, वाऱ्यानं उडणाऱ्या पदराची फिकिर न करणारी उषा त्याला दिसली. "उषा !" असा हर्षोद्‌गार त्याच्या तोंडून बाहेर पडला आणि त्याचा हात वर झाला. प्लेग, देवी, कॉलरा इत्यादि कल्पनांचं ओझं त्याच्या मनावरून दूर झालं. उषा खुशाल होती एवढं तर खास. तिनं केवळ आपली परीक्षा पाहण्यासाठीं तार ठोकली हेंच खरं दिसतंय्. तसं असेल तर दाराकडे जातां जातां त्यानं मनाशीं ठरवलं-तसं असेल तर असल्या मूर्खपणाबद्दल तिला एकदां चांगली शिक्षा दिली पाहिजे... तिच्यावर रागावलं पाहिजे...तो डब्याखालीं उतरला तो शक्य तितकी रुष्ट चर्या करूनच...ती जवळ आली व हंसली तरी तो हंसला नाहीं...

"म्हटलं, येतोस कीं नाहीं ?—" त्याच्याबरोबर पावलं टाकीत आणि तिरप्या हसऱ्या नजरेनं त्याच्याकडे पाहत ती उद्‌गारली.

"आलों ना ? झालं तुझं समाधान ?"

"अर्थात्—"

"माझं प्रेम तुझ्यावर आहे अशी खात्री पटली ना ?-आतां मी पहिल्या गाडीनं परत जाणार आहें."

"श्री र्रे !" तिनं झटकन् त्याचा दंड धरला. जणूं तो तिला सोडून निघालाच होता. "तुला नाहीं जाऊं देणार अं !"

"तुझ्या तारेनं म्यालों अन् आलों. वाटलं, तूं फार आजारी विजारी झाली आहेस कीं काय ? पण तूं छान खणखणीत मजेंत आहेस. आतां कशाला राहूं ? पहिल्या गाडीनं—"

"अरे, पण मी मोठ्या संकटांत आहें !"

"प्रिन्सिपल तुला कॉलेजांतून हांकून देणार आहेत ?"

"ते काय देतात हांकून !"

"सावकारानं तगादा लावला आहे ?"

"हा कुठला सावकार काढलास ?" तिनं भंवयांना आठी घालून विचारलें.

"नाहीं—माझी आपली कल्पना. मोठ्या संकटांत आहें असं तूं लिहिलंस तेव्हां मीं निरनिराळे तर्क करून पाहिले."

"ज्या संकटांत मी आहें त्याचा तुला तर्क करतां येणं शक्यच नाहीं."

श्रीधरचा राग एकदम नाहींसा झाला. चिंतेच्या स्वरांत त्यानं विचारलं,

"म्हणजे तूं खरंच संकटांत आहेस ?"

"अरे भलत्याच !"

"सांग, सांग लवकर कसलं संकट आलं आहे—"

"अरे, इथें का सांगूं ?—"

"मग ? घरीं गेल्यावर ? मी नेहमींप्रमाणं आमच्या मामांच्या घरीं जाणार. तूं येणार आहेस ना माझ्याबरोबर ?—"

"मी येणार नाहीं, अन् तुलाहि जाऊं देणार नाहीं. तुझी उतरण्याची व्यवस्था स्टेशनसमोरच्या नॅशनल हॉटेलमध्यें मीं करून ठेवलेली आहे फर्स्ट क्लास खोली राखून ठेवली आहे—"

आतां तीं दोघं स्टेशनच्या इमारतींतून बाहेर पडून मोकळ्या आवारांत आलीं होतीं. एकदम थबकून श्रीधर म्हणाला,

"तुझ्या बोलण्याचा अर्थच मला कळत नाहीं. तूं मोठ्या संकटांत आहेस म्हणून सांगते आहेस. आणि माझ्यासाठीं हॉटेलमधली एक फर्स्ट क्लास खोली राखून ठेवली आहेस ? तुझं डोकं ठिकाणावर आहे का ?"

"गेले दोन दिवस नव्हतं. पण आतां तूं आलास, आतां आहे. आतां संकटांतून पार पडण्याची खात्री वाटते मला."

"म्हणजे काय, म्हणतेस तरी काय ? मला कांहींच बोध होत नाहीं—"

"होईल. तूं मुकाट्यानं हॉटेलांत चल. तोंड धू. चहा घे. मग सगळी हकीगत सांगतें तुला." असं म्हणून तिनं त्याला ओढल्यासारखं केलं.

हॉटेलांत गेल्यावर उषानं विचारलं, "कशी काय आवडली तुला ही खोली ?"

"एकदम झकास." तो म्हणाला, "पण ही माझी बरदास्त कशासाठीं ?"

"माझ्या हांकेला धावून आलास म्हणून."

"पण हांक कां मारलीस ?"

"माझं संकट तूंच एकटा दूर करूं शकशील असं वाटलं म्हणून."

"उषा ! आतां हें संदिग्ध बोलणं बंद कर !" त्यानं तिला जवळ ओढलं.

"कसल्या संकटांत सांपडली आहेस ?"

"आमच्या कॉलेजचं संमेलन आहे."

"बरं, मग ?"

"संमेलनांत दोन नाटकं व्हायचीं आहेत."

"हं !" त्याला तिच्या संकटाची कल्पना येईना.

"विद्यार्थ्यांचं "झुंझारराव" शनिवारीं रात्रीं होणार आणि आमचं विद्यार्थिनींचं "संशयकल्लोळ" रविवारीं रात्रीं होणार."

"बरं, पण यांत तुझ्यावर संकट कुठं आलं ?"

"सांगतें रे घाई करूं नकोस. सगळी हकीगत नीट लक्ष देऊन ऐकून घे...अन् तूं मला सोडून दूर बैस पाहूं."

"नाहीं बसणार. हें कांहीं मामांचं घर नाहीं." त्यानं तिला आणखीच जवळ घेतलं.

पण तितक्यांत हॉटेलचा नोकर चहा घेऊन येतांना त्याला दिसला. चटकन दूर बसून तो सभ्यपणानं म्हणाला, "हं, सांग हकीगत—"

कशी झाली एका माणसाची फजिती, अशा अर्थानं उषानं त्याच्याकडे डोळे मिचकावून हास्य केलं. चहा घेतां घेतां ती सांगूं लागली.

"तिच्या कॉलेजांत संमेलनांतल्या नाटकाच्या प्रश्नावर मोठंच वादळ निर्माण झालं होतं. विद्यार्थिनींनीं आपल्या नाटकांत स्त्रीभूमिका कराव्या अशी विद्यार्थ्यांची इच्छा होती. मुलींनीं ती मान्यहि केली असती. पण थोड्याच दिवसांपूर्वी क्रिकेटमॅचच्या वेळीं कांहीं विद्यार्थ्यांनीं दोन विद्यार्थिनींशीं असभ्य वर्तन केलं होतं त्याबद्दलच्या तक्रारी विकोपाला गेल्या होत्या, आणि प्रिन्सिपलनीं जरी त्या मिटविल्या होत्या, तरी विद्यार्थिनींचं समाधान झालं नव्हतं. त्यांच्या मनांत तो प्रकार डाचत होता. नाटकांत काम करण्याबद्दल जेव्हां मुलांनीं विचारलं, तेव्हां मुलींनीं सांगितलं, कीं मॅचच्या वेळच्या अपमानाबद्दल लेखी माफी हातांत पडली तरच तुमचं आमचं सहकार्य होईल. विद्यार्थी म्हणाले, तोंडी दिलगिरी प्रदर्शित करूं. मुलींनीं हट्ट धरला, तें कांहीं नाहीं, माफीचा लेखी कागद हवा. शेवटीं विद्यार्थ्यांनीं सांगितलं, उडत गेलांत, तुमच्या सहकार्यावांचून आम्ही आपलं नाटक करूं. सुदैवानं पुरुषांनीं स्त्रीपार्ट करण्याइतकी मराठी रंगभूमि अजून मागासलेली आहे. विद्यार्थिनी म्हणाल्या,









ठीक आहे, आम्ही आमचं स्वतंत्र नाटक करूं, पुरुष स्त्रीपार्ट करतात, तर आम्ही पुरुषपार्ट करून दाखवूं. दोन नाटकांना दोन रात्री खर्च होणार हें प्रिन्सिपलना वरं वाटेना. स्वतंत्र नाटक करण्याचा विचार मुलींनीं सोडून द्यावा म्हणून त्यांची समजूत घालण्याची पुष्कळ खटपट त्यांनीं करून पाहिली. पण मुलींनीं अखेर सांगितलं कीं आमच्या स्वतंत्र नाट्य-प्रयोगाला मंजुरी मिळत असेल, तरच आम्ही संमेलनांत भाग घेऊं; नाहीं तर अडीचशें तीनशें मुलींचा संमेलनावर कडकडीत बहिष्कार पडेल. प्रिन्सिपलच्या डोळ्यांपुढं काळीं निशाणं दाखविणाऱ्या शूरमर्द झांशीच्या राण्यांचीं चित्रं दिसूं लागलीं. त्यांनीं मुलींच्या स्वतंत्र नाटकाला संमति दिली. झुंझार-राव व संशयकल्लोळ अशा दोन नाटकांच्या तालमी कॉलेजच्या दोन वेग-वेगळ्या हॉलमध्यें जोरानं झडूं लागल्या. विद्यार्थ्यांनीं आपल्या नाटकाच्या दिग्दर्शनासाठीं एक पासष्ट वर्षांचे म्हातारे जुने नट आणले, तर मुलींनीं एका बाहत्तर वर्षांच्या पेन्शनर नटाला सुपारी दिली. दोघांच्या भांडणांत दोन 'तिसऱ्यां' ना फायदा झाला. झुंझारराव नाटक पडणार असा मुलींनीं वभ्रा सुरू केला. उलट संशयकल्लोळ साफ आडवं होणार असा प्रचार विद्यार्थ्यांनीं चालविला. मात्र मनांतल्या मनांत ते ओळखून होते कीं मुलींचं नाटक चांगलं वसतं आहे, आणि त्याचा प्रयोग अधिक सुंदर वठून झुंझाररावचं नाक खालीं होणार आहे. रेवती व आश्विनशेट यांचीं कामं करणाऱ्या दोघी मुली तर नाटकांत बेफाम रंग भरणार असं संशयकल्लोळच्या तालमी दारा-खिडक्यांच्या फटींतून चोरून पाहणारे पंचमस्तंभी विद्यार्थी सांगूं लागले. मुलींच्या नाटकाची रंगीत तालीम झाल्यावर तर त्याचा प्रयोग विलक्षण गाजणार याबद्दल शत्रुपक्षाची देखील खात्री पटली. विद्यार्थिनींच्या छावणींत आनंदीआनंद झाला. त्या नाटकाची चिटणीस म्हणून उषानं अविश्रांत खटपट केली होती. "शाब्बास उषा!" म्हणून जी ती मुलगी तिच्या वेणीचा शेपटा ओढूं लागली, अगर लाडिकपणानं गालगुच्चे घेऊं लागली. त्या हर्षभरांत उषाला अस्मान ठेंगणं झालं...

आणि अशा मस्त आनंदांत उषा व तिच्या मैत्रिणी असतांना त्यांच्या छावणीवर एकाएकीं ॲटम बॉंब पडला. आश्विनशेटचं काम करणारी ललिता मोघे नाहींशी झाली!...

"अं? ?" श्रीधरनं आश्चर्यानं विचारलं. "नाहींशी झाली? म्हणजे पळून गेली कीं काय?"

"पळून गेली असं लोक म्हणतात, पण मी नाहीं म्हणणार."

"मग काय म्हणशील तूं?" त्याच्या आश्चर्याची धग वाढली.

"ती पळवली गेली आहे. हा सरळ फंदफितुर आहे. 'साबोटाज' आहे. आमचं नाटक हाणून पाडायचा भेकड डाव आहे हा, मला विचार." उषा आवेशानं म्हणाली, "रामू घाटेवर ललिताचं प्रेम आहे. त्याच्याशीं ती लग्न करणार आहे. त्यानं तिला धाक घातला कीं नाटकांत काम केलंस तर खबरदार, मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. ती म्हणाली, पण आतां नाहीं म्हणून कोणत्या तोंडानं सांगूं? तो म्हणाला, तुला मी इथून घेऊनच जातों म्हणजे झालं. तोहि नाहींसा झाला आहे. कुठ गेलीं आहेत दोघं तोंड काळीं करून—"

"किंवा खरं म्हणजे तुझ्या तोंडाला काळं फांसून—" श्रीधरनं दुरुस्ती केली.

"अगदीं बरोबर बोललास," ती म्हणाली. "लोकांत तोंड दाखवायची सोय राहिली नाहीं मुला. आतां आलं ना तुझ्या ध्यानांत मी कोणत्या संकटांत सांपडलें आहें तें?"

"पण या संकटांतून मी तुझी कशी सुटका करूं शकेन तें नाहीं अजून माझ्या ध्यानांत येत?"

"आहा रे! दोन अन् दोन चार नाहीं करतां येत तुला?"

"माझे दोन ओठ, तुझे दोन, मिळून—"

"असले वेडेचार करूं नकोस." तिनं जवळ आणलेलं तोंड चुकवून ती म्हणाली, "मी किती सीरिअस आहें या वेळीं तुला कसं कळत नाहीं?"

"मग सीरिअसली मुका घेतां येत नाहीं कीं काय?"

"नंतर हवे तेवढे घे. आधीं माझं संकट दूर करायचं वचन दे."

"म्हणजे तुझ्या त्या पळून गेलेल्या ललिताला शोधून आणूं म्हणतेस कीं काय? माफ कर, डिटेक्टिव्हचा धंदा आमच्याला बापजन्मीं साधायचा नाहीं."

"ललिताला शोधून आणायला कशाला मागेन मी तुला? आतां ती आपण होऊन परत आली तरी ती मला नको आहे.

"मग मी काय करूं?" श्रीधरच्या आश्चर्याचा पारा आणखीन चढला.

"आमच्या नाटकांत आश्विनशेटचं काम तूं कर.

"मी?" श्रीधरनं भयंकर चपापून विचारलं.

"होय, तूं! पंधराच दिवसांपूर्वीं तुमच्या कॉलेजच्या नाटकांत हें काम तूं फार उत्तम वठविलं आहेस. तुझी नक्कल अजून पाठ असेल. नसली तर नाटकाचं हें पुस्तक घे—" तिनं आपल्या पर्समधून पुस्तक काढून त्याच्यापुढं धरलं. "इथें निवांत पाठ करीत बैस—"

"अग पण, हें जमायचं कसं? मी कांहीं तुमच्या कॉलेजांत नाहीं. अन् त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे मी कांहीं स्त्री नाहीं."

"या सर्व अडचणींचा मीं विचार करून ठेवला आहे. मीं कसा प्लॉट रचला आहे तो नीट ऐक तरी!".

"मला वाटतं दाराला बोलट लावून घ्यावा—"

"नको!—"

"नाहीं, तूं आपला फार गुप्त बेत सांगणार आहेस, तेव्हां म्हटलं सावधगिरी घेतलेली बरी—"

"माझ्या दृष्टीनं सावधगिरी घेण्यासाठींच मी म्हणते, बोलट नको लावूंस."

दोघांनाहि एकदम हंसूं आलं. त्या हंसण्याच्या संधीचा फायदा श्रीधरनं घेतला. त्याच्या गालावर गोड चापट मारून उषा म्हणाली, "झालं एकदा समाधान?"

"समाधान नाहीं झालं, पण आतां तुझा प्लॉट ऐकून घेऊन ऐकायची आपली तयारी आहे. बोल हं."

ललिता मोघे नाहींशी झाली हें भयंकर वृत्त कळल्यावरोबर संशयकल्लोळमधल्या साऱ्या स्त्रिया डोक्याला हात लावून बसल्या होत्या. प्रयोग आठदहा दिवसांनी होणार असता तर आश्विनशेटचं काम करायसाठीं दुसरी एखादी मुलगी उभी करतां आली असती. पण आतां तोहि उपाय राहिला नव्हता. अपरिहार्य अडचणीमुळं प्रयोग रद्द करण्यांत येत आहे—असं जाहीर करण्यावांचून गत्यंतर नव्हतं. यांत विद्यार्थ्यांचा प्रचंड विजय होणार होता. विद्यार्थिनींची नाचक्की होणार होती. पण पेंच-प्रसंगच असा चमत्कारिक उद्भवला होता कीं नाक मुठींत धरून शरण जाण्यावांचून दुसरा मार्ग दिसत नव्हता. संशयकल्लोळच्या सगळ्या नटी हुंदके देत होत्या, आणि कोंडाळ्याच्या मधोमध बसलेल्या उषाला पुन्हां पुन्हां विचारीत होत्या, आतां कसं ग करायचं? उषाही चिंतित मुद्रेनं बसली होती, व वरचेवर फक्त आपलं नाक रुमालांत शिंकरीत होती...पण मग

अनुक्रमणिका







एकदम तिची चर्या बदलली. तिनं कांहीं वेळ समोर अंतराळांत नजर लावली, व मनाशीं कोणता तरी विचार पक्का झाल्याप्रमाणें तिनं चुटकी वाजवून म्हटलं,

"एक युक्ति सुचली आहे मला."

रेवती, ध्रुत्तिका, फाल्गुनराव, भोंदव्या, या सगळ्यांनीं आपले डोळ्यांना लावलेले पदर दूर करून म्हटलं, "होय? सांग, सांग. काय युक्ति काढतेस?"

"सांगतें. पण यांतलं एक अक्षर या कानाचं त्या कानाला कळतां कामा नये. शपथा घ्या सगळ्याजणी."

सर्वांनीं चटाचट वेलभंडार उचलला, व मग उषानं आपली युक्ति सांगितली.

"माझी एक बहीण आहे दादरला—"

"अय्या! सख्खी?—कधीं बोलली नाहींस ती?—"

"सख्खी नाहीं ग. चुलत-मावस अशी कांहीं तरी आहे. नक्की नात्याशीं तुम्हांला काय करायचं आहे? बहीण आहे एवढं खरं. तिचं नांव सुमति. देखणी, धिप्पाड अशी आहे. दादरच्या वनितामंडळाच्या संशय-कल्लोळ नाटकांत तिनं आश्विनशेटची भूमिका नुकतीच केली. अगदीं बेफाम. ललिता कांहींच नव्हे तिच्यापुढं. मुंबईच्या साऱ्या वर्तमानपत्रांत त्रिया स्तुतीचे कॉलम आणि फोटो तुम्ही पाहिले असतीलच कीं."

एकीनंहि पाहिले नव्हते, पण सगळ्याजणी म्हणाल्या, "हो, हो. पाहिले तर. पण तिचं काय सांगतेस उषा, तूं?"

"तिला तारेनं बोलावून घेतें मी. आपल्या नाटकांत ती करील काम."

"पण ती येणार केव्हां, तिच्यासकट तालमी होणार केव्हां, आणखी—?"

"तालमी नकोत अन् कांहीं नको. ती या भूमिकेंत मुरलेली आहे. अन् त्यांतून एखाद दुसरी चूक झाली तर झाली. आपलं नाटक होतंय्, अब्रू राहते, आणखी आपलं नाटक बंद पाडूं पाहणाऱ्या माकडांचे दांत पाडतां येताहेत ही मुख्य गोष्ट."

"पण प्रिन्सिपल म्हणतील बाहेरची मुलगी आणून नाटक केलं—" नाटकांतल्या रेवतीनं शंका काढली.

"अहो, ग वेंधळाबाई!" उषा हात ओवाळून म्हणाली, "एवढंहि समजत नाहीं. प्रिन्सिपलना कांहीं सांगायचंच नाहीं. गुप्ततेच्या आणाभाका आपण घेतल्या त्याचा अर्थ काय मग? आपण फक्त एवढंच सगळ्यांना सांगायचं, आमचा प्रयोग ठरल्याप्रमाणं होणार; ललितेचं काम आमच्या-पैकीच एकीला दिलं आहे आम्हीं. प्रिन्सिपलना काय पत्ता लागणार आहे आश्विनशेट झालेली नवी मुलगी कॉलेजांतली आहे कीं नाहीं? त्यांना काय साऱ्या मुलींचे चेहरे तोंडपाठ आहेत?"

"छे छे! तसांतले नाहींत हो आपले प्रिन्सिपल."

"झालं तर!" उषा म्हणाली, "आपलं ठेत व्यवस्थित पार पडतो बघा. तालमी नकोत. कांहीं नको. तुम्ही आपापल्या नकला अगदीं चक्क तयार ठेवा म्हणजे झालं. कुसुम, तूं रंगपटांतली व्यवस्था ठेव. शांते, माले, कपडेपट, सेटिंग, पडदे या साऱ्या गोष्टी तुम्ही बघायच्या आहेत, ध्यानांत ठेवा. मी जागेवर नसले तर गडबडून जाऊं नका. कांहीं अडूं देऊं नका. साडेनवाला पडदा वर गेला पाहिजे. मी बरोबर नऊ वाजतां आमच्या सुमतीला घेऊन हजर होतें. ठरलं ना सारं?"

"अग, पण तुझी बहीण आली पाहिजे ना?" एकीनं शंका काढली.

"येईल. आत्तां पोस्टांत जाऊन तार करतें तिला." उषा म्हणाली.

"मी येऊं का तुझ्याबरोबर?"

"चली तर नव्हेस तूं? पोस्टांत जायला सोबत लागते होय मला?"

उषा श्रीधरला म्हणाली, "आमच्या बैठकींतनं सटकलें, पोस्टांत गेले, आणि तार केली!"

"कोणाला?"

"माझ्या बहिणीला."

"मग आली का ती?"

"आली तर! माझी लाडकी बहीण!" उषानं त्याचीं झुलपं कुरकरलीं.

"उषा!" श्रीधर तिचा हात पकडून म्हणाला, "ही तुझी लाडीगोडी कांहीं उपयोगाची नाहीं. सुमतीचं सोंग घ्यायला मी कधीं तयार होणार नाहीं. स्त्रीपार्ट करूं होय तुझ्या नाटकाच्या सोयीसाठीं? मोठी शहाणी आहेस!"

"अरे, पण स्त्रीपार्ट करायला मी सांगतें आहें काय तुला? आश्विनशेटचं काम कर म्हणतें आहें. फक्त इथून हॉटेलांतून थिएटरच्या रंगपटांत पोंचे-पर्यंत आणखी नाटक आटपल्यावर परत येतांना मुलीचं सोंग घ्यायचं."

"शाबास! म्हणजे मला खरं नाटक करावं लागणार तें रंगभूमीवर नव्हे, तर जातांयेतांनाच! हें नाहीं जमायचं आपल्याला. कोणीं माझं खोटं सोंग ओळखलं म्हणजे?"

"अरे, त्या घाईत कोण ओळखतंय्? अन् शिवाय मी असेन ना सारखी तुझ्याबरोबर एखाद्या शरीररक्षकासारखी!"

"पण हें जमायचं नाहीं आपल्याला. साफ सांगतों."

"प्लीज, प्लीज, श्रीधर, असं करूं नकोस."

"असं नको तर कसं करूं? नाटकाच्या प्रयोगाच्या सोयीसाठीं अवश्य ते फेरफार करण्याचा हक्क आजपर्यंत नाटकवाले गाजवीत आले. पण तुम्हां विद्यार्थिनींच्या सोयीसाठीं मला साडीचोळी नेसवायचा तुझा हा मनसुबा अजबच म्हटला पाहिजे. बस कर! हें व्हायचं नाहीं माझ्या हातून. मी रात्रीच्या गाडीनं परत जाणार."

"ठीक आहे, जा; पण एक मेहेरबानी कर. जाण्यापूर्वी मला विष दे खायला अन् मग जा. कारण रविवारचं आमचं नाटक जर झालं नाहीं, तर माझी जी छीथू होईल ती मला सहन व्हायची नाहीं. त्या विटंबनेपेक्षां मरण परवडलं. माझा जीव घे, अन् जा. मला वाटलं होतं तुझं माझ्यावर प्रेम आहे—" उषा एकदम हसढसां रडूं लागली, आणि तिनं आपलं तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलं.

"उषा!" तिचे हात ओढून आपल्या हातांत घेत श्रीधर म्हणाला, "उषा! तूं वेडी का?"

आपले हात सोडवीत मान खालीं घालून रडत रडत उषा म्हणाली, "होय रे बाबा, मी वेडी आहें. अगदीं मूर्ख आहें. गाढव आहें. मला विष देऊन मारून टाक—"

"चल!" तिचे हात एका हातांत घट्ट पकडून ठेवून दुसऱ्या हातानं तिची हनुवटी वर करीत तो म्हणाला, "असं अभद्र बोलूं देणार नाहीं मी तुला."

"ती हुंदके देत म्हणाली, "अभद्र बोललें नाहीं तरी घडायचं थोडंच राहणार आहे? तूं माझं म्हणणं मान्य केलं नाहींस तर जीवच देईन मी!"

"अन् मान्य केलं तर?"

"पुन्हां म्हण—" ती अर्धवट हसली.

"मान्य केलं तर?"

तिचं हसणं एकदम फुटलं. त्याला झटकन् मिठी मारून ती म्हणाली, "माझा जीव ओवाळून टाकीन तुझ्यावरून! शप्पथ!"

अनुक्रमणिका






त्यानं तिचा मुका घेतला.

ती हलकेच म्हणाली, "आतां तुला हवे तेवढे घे!"

"माझी लाडकी—"

"पण आमचं नाटक अगदीं झक्क रंगलं पाहिजे हं."

"त्याची फिकीर नको करूंस ग."

"आमच्या कॉलेजचीं पोरं महा टारगट आहेत."

"असूं देत. पहिल्याच पदाला वन्समोअरची टाळी घेतों कीं नाहीं बघ—"

** श्रीधरच्या हा आत्मविश्वास कांहीं खोटा ठरला नाहीं.

मुलींचं संशयकल्लोळ रद्द झालं नाहीं हें पाहून निदान त्या नाटकाचा बोऱ्या झालेला तरी पाहावा आणि आपोआप होत नसेल तर आपल्या प्रयत्नांनीं करावा म्हणून विद्यार्थ्यांचीं चारसहा लहान टोळकीं ठिकठिकाणीं मोर्चे बांधून थिएटरांत बसलीं होतीं. त्यांनीं हशहुश, टाळ्या, शिट्या, स्टँपिंग इत्यादींचे प्रयोग सुरवातीपासून करून पाहिले. शिंकरून पाहिलं, खोकून पाहिलं. फाल्गुनरावनं प्रवेश करून "अरे हांग्या" असं साभूवर खेकसून "शिणवूं नको कंठ असा" हें पद सुरू केल्यावरोबर "वा चंपूताई?" असं त्या मुलींच्या नांवानं ओरडून हंशा पिकविला. भद्र्याच्या स्टेजवर आल्यावरोबर "पुंडलीकवरदा हारिविठ्ठल" केलं. पण एक तर मुलींनीं धीर न सोडतां काम चालू ठेवलं, आणि प्रिन्सिपल, प्रोफेसर, प्रतिष्ठित पाहुणे यांच्या उपस्थितीच्या दबदब्यामुळं एकंदर समाज उच्छृंखल झाला नाहीं. दंग्याची, हंशाची लाट उठली तरी अर्ध्यापाऊण मिनिटांत विरून जात होती. आश्विनशेट प्रवेश केल्यावरोबरचं स्वगत भाषण लांबट असूनही अगदीं ठसक्यांत झालं तेव्हां एक विद्यार्थिनी इतकं सुंदर काम करीत असलेली पाहून दंगा करावयासाठीं आलेले टारगट विद्यार्थी आश्चर्यानं, आणि बाकीचे प्रेक्षक कौतुकानं ऐकत राहिले. स्वगतानंतरच्या पदाचा पहिला चरण "सुकांत चंद्रानना पातली" असा कांहीं झोकांत सुरू झाला, कीं सारं थिएटर एकदम शांत झालं. आणि अखेर अशी कांहीं स्वच्छ दाणेदार तान लखलखून पद थांबलं, कीं साऱ्या प्रेक्षकांतून कडकड कडकड अशी एकच टाळी उठली.

मग नाटकाला जो रंग भरला तो सारखा वाढतच गेला. पांचवा अंक सुरू होण्याच्या अगोदर प्रिन्सिपलनीं स्टेजवर जाऊन भाषण केलं. अभिनयकौशल्यावद्दल आणि गायनकौशल्यावद्दलचीं बक्षिसं जाहीर केलीं व दिलीं. आश्विनशेटच्या छातीवर सोन्याचं पदक लावल्यावर ते म्हणाले, "या मुलीवर बक्षिसांचा पाऊस पडला हें अगदीं योग्य झालं. आजच्या नाटकाचा हा प्रयोग आपल्या सर्वांच्या स्मरणांत दीर्घकाळ राहील या गोष्टीचं सर्वांत मोठं श्रेय हिच्याकडे आहे. मराठी रंगभूमीला पुन्हां वैभव प्राप्त करून देण्याचं सामर्थ्य ज्यांच्या अंगीं आहे असे नट अन् अशा नटी कुठं आहेत म्हणून प्रश्न विचारणाऱ्यांना मी सांगतों अशी एक तरी आहे, ही पाहा! अन् मला फार अभिमान वाटतो कीं ही मुलगी माझ्या कॉलेजांतली आहे!" या वाक्यावर टाळ्यांचा मोठा कडकडाट झाला, व तो विरेपर्यंत प्रिन्सिपल हंसत उभे राहिले. मग ते पुढें म्हणाले, "या मुलीचे आई वडील इथं हजर असतील असं वाटतं. त्यांना माझं सांगणं आहे, कीं त्यांनीं आपल्या मुलीच्या अंगांतील असामान्य गुणांचं कौतुक केलं पाहिजे, त्यांची वाढ होईल यासाठीं झटलं पाहिजे. या मुलीवर केवळ त्यांचा हक्क नाहीं. मराठी रंगभूमीचा आहे. ही मुलगी म्हणजे लाखों मराठी रसिकांचं आशास्थान आहे..." त्यांनीं आश्विनशेटच्या गालावर प्रेमानं थोपटल्यासारखं केलं आणि टाळ्यांच्या प्रचंड गजरांत आपलं भाषण संपविलं.

** दुसऱ्या दिवशीं मुंबईस परत जाणाऱ्या श्रीधरच्या गाडींत बसून खिडकीबाहेर पाहतां पाहतां प्रिन्सिपलचं हें भाषण दूर मधून मधून आठवत होतंच अन् हंसूं येत होतंच, परंतु त्याचं मन मुद्दाम सतत त्या आठवणींशीं खेळत होतं, त्या निराळ्याच होत्या... मोटरींतून उतरून रंगपटापर्यंत धाइनं तो रंगपटांत शिरतांच "उषाची बहीण आली!" अशी अनेक गोड आवाजांची किलबिल त्याला ऐकूं आली होती. आणि दुसऱ्याच क्षणीं मेकअप करतां करतां धांवत आलेल्या पात्रांचा त्याच्याभोंवतीं गराडा पडला होता. "ही आमची सुमति" म्हणून उषानं ओळख करून देतांच साऱ्या मुलींनीं त्याचे हात हातांत घेतले होते. इतके मऊ कोमल कुशीत हात एकदम धरण्याचं भाग्य पुरुषाच्या वांट्याला क्वचितच येत असेल असं त्याच्या मनांत आलं होतं "अग, तारा कुठं आहे? बोलाव तिला!" उषा एका मुलीला म्हणाली होती. ती मुलगी धांवली होती, व केवळाच्या वेषांतल्या ताराला घेऊन आली होती. उषा म्हणाली होती, "तारे! हे तुझे आश्विनशेट! संभाळ!" साऱ्या मुली हंसल्या होत्या. "ही तुझी रेवती!" असं त्याच्याकडे वळून उषा म्हणाली तेव्हां नाटकी अभिनय करून तो ताराला म्हणाला होता, "रुमझुम रुमझुम! ओहो, यावं यावं तृषितचातक मेघमाले! यावं!" त्यानं नाटकांतलंच वाक्य म्हटलेलं ऐकून आणखी मोठा हंशा पिकला होता. ताराचा हात त्यानं खूपच वेळ धरून ठेवला होता. मेकअपमुळं ती भलतीच सुंदर दिसत होती. "सुमति, चल. मेकअपला उशीर होतो. तुझ्यासाठीं स्पेशल धाकटी खोली ठेवली आहे." असं म्हणून, उषानं त्याला ओढलं तेव्हां ताराचा हात सोडणं त्याच्या जिवावर आलं होतं... पण त्या क्षणीं अपुरी राहिलेली त्याची इच्छा नंतर तारानं आपण होऊन पूर्ण केली होती. "धन्य आनंददिन पूर्ण" हें पद म्हणून तो विंगमध्यें आला तेव्हां त्याची वाट पाहतच जणुं तारा उभी होती. त्याचे दोन्ही हात नुसते धरूनच नव्हे तर अगदीं प्रेमभरानं कुस्करून ती त्याला म्हणाली होती, "तुमचं किती अभिनंदन करूं? आणखी मी तुमचे स्पेशल आभार मानायला हवेत, कशावद्दल सांगूं? तुमच्यामुळं मला विलक्षण उत्साह चढतो आहे." तो म्हणाला होता "थँक यू!" नंतर दुसऱ्या अंकाच्या अखेरचा प्रवेश अधिकच रंगला होता, आणि तिसऱ्या अंकाच्या शेवटीं भांडणाच्या प्रवेशाच्या वेळीं तर त्याच्या व तिच्या खटकेबाज संवादाला टाळी पडली होती; आणि पडदा पडल्यावरोबर तिनं धांवत येऊन त्याला जवळ जवळ मिठीच मारून म्हटलं होतं, "सुमति, कमाल केलीस तूं! तुला कुठं ठेवूं आणि कुठं नको असं झालंय् मला!" यानंतर प्रवेशापूर्वी विंगमध्यें त्याच्याजवळ उभं राहण्याची एकही संधि तिनं वाया दवडली नव्हती, आणि प्रत्येक वेळीं ती त्याच्याशीं गुलगुल गोष्टी केल्या होत्या.

"उषा म्हणते तूं उद्यां सकाळच्या गाडीनं जाणार. खरं?"

"हं, जायलाच पाहिजे." तो म्हणाला होता.

"असं काय? दोन दिवस राहा कीं. बोलूं, बसूं. रहा ना?"

"राहतां येणार नाहीं. माफ कर."

"तुझी फार ओळख करून घ्यावीसं वाटतं—"

"मुंबईला ये कीं."

"येणारच आहे मी पुढच्या महिन्यांत." तिनं सांगितलं होतं.

"होय?"

"पण तंवर माझी आठवण राहील ना तुला?"








अनुक्रमणिका

" माझी राहील का तुला ?—बोलून चालून नायिकिणीची मुलगी तूं !"

तें ऐकून ती इतक्या मोठ्यांदा हंसली होती कीं तिच्या तोंडावर हात ठेवून त्याला म्हणावं लागलं होतं " अग अग ! बाहेर ऐकूं जाईल ना ? "

नंतर पुन्हां एकदां विंगमध्यें ती त्याला खेटून उभी राहिली व म्हणाली " मी मुंबईला येणार हं ! "

" ये ना. "

" तूं कुठं राहतेस ? दादरला कुठेसं ?

त्यानं आपला पत्ता सांगितला होता.

" होय ? म्हणजे मी जिथं उतरणार त्याच्याजवळच कीं ? "

नाटकाचा प्रयोग आटपल्यावर तो उषाबरोबर जायला निघाला तेव्हां साऱ्या मुलींनीं त्याच्याभोंवतीं गर्दी केली होती व बावचाय गुडबायचा मंजुळ चिवचिवाट करीत त्याच्या हातांत हात दिले होते. आणि तारानं तर पटकन त्याचा मुका घेऊन म्हटलं होतं, " मुंबईस येणार हं मी. "

तें पाहून उषा चांगलीच रुसली होती. वाटेनं मोटरींत ती अगदीं गप्प राहिली होती, आणि हॉटेलवर पोचल्यावर तिनं त्याला म्हटलं होतं.

" ताराचं अन् तुझं फारच जमलेलं दिसतंय्. मी पाहत होतें सारं वरं का ? पाघळला आहेस वाटतं तूं ? गुलुगुलु सारखं बोलत होतास तिला जवळ घेऊन ? "

" जवळ घेऊन ? मी तिला जवळ घेत होतों होय ? तीच येत होती—"

" पण तूं कां तिला येऊं देत होतास ? " उषानं विचारलं होतं.

स्त्रियांच्या मत्सराग्नीचा चटका त्याला प्रथमच बसत होता. त्यानं चिडलेल्या स्वरांत उत्तर दिलं होतं, " मग मीं काय तिला सांगूं होय, बाई, मी सुमति नाहीं, श्रीधर आहें ! — "

या प्रश्नानं निरुत्तर झालेली उषा मग अर्धवट स्वतःशीं पुटपुटली होती, " शेवटीं तिनं तुझा मुका घेतला—सरळ माझ्यादेखत घेतला. तेव्हां असं वाटलं होतं कीं तिच्या एक थोंडांत भडकवावी. अन् एक तुझ्याही ! "

" माझ्याही ? तीं कशाबद्दल ? "

" तूं तिला मुका घेऊं दिलास म्हणून. अरे, मी तुझ्याशेजारीं बसलें होतें त्याची तरी कांहीं लाज ठेवायचीस ! "

" अग, पण त्या वेळीं मी तुझी वहीण सुमति होतों ! " असं म्हणून तो मोठ्यांदा हंसला होता.

पण उषा हसली नव्हती. ती म्हणाली होती, " ताराच्या मेकअपमुळं तूं भाळला असशील, पण खरोखर ती अशी देखणी नाहीं, बरं का ? काळी मिट्ट, नकटी, मिचक्या डोळ्यांची, लुकडी आहे. ध्यानांत ठेव. "

तें वर्णन ऐकून श्रीधरला भयंकर हंसूं लोटलं होतं. ओकारी दिल्याप्रमाणं तो म्हणाला होता, " या ऽऽ ! "

" मला फसवण्यासाठीं खोटी ओकारी देऊं नकोस. तूं मनांतून पागल झाला आहेस हें मीं ओळखलं आहे. अन् मीं कितीही वर्णन केलं तरी तारा तुला भेटली कीं तूं पाघळशील हेंहि मी ओळखून आहे. पुरुष तेवढे सारे शेणखाऊ ! "

" केव्हां अनुभव घेतलास ? "

" घेतला नाहीं. पण तूं देशील कीं काय अशी भीति वाटते. "

" चल ! "

तिनं एकदम त्याचे हात धरले होते आणि रडव्या स्वरांत विचारलं होतं, " श्रीधर, माझं तुझ्यावर फार प्रेम आहे तुला माहित आहे ना ? "

त्यानं तिचं मस्तक कुरवाळलं होतं.

ती म्हणाली होती, " माझा गळा कापूं नकोस कधीं ! "

त्यानं तिचे पटापट मुके घेतले तेव्हां तिच्या आसवांच्या धारा थांबल्या होत्या.

या आठवणी श्रीधरच्या मनांत उलटसुलट दिशांनीं सुटलेल्या वाऱ्यांप्रमाणं घोटाळत होत्या, एकमेकींशीं झटापट करीत होत्या, त्याचं अंतःकरण द्विधा करीत होत्या. रेवतीच्या वेषांतली तारा पुनःपुन्हां त्याच्या कल्पनाचक्षूंपुढं उभी रहात होती, त्याचा मुका घेऊन त्याला सांगत होती, " मी मुंबईला येणार हं ! " तिसऱ्या अंकाच्या तिसऱ्या प्रवेशांत रेवती त्याला म्हणत होती,

" दृष्टि विचारी माझ्याकडे धांव घेते, तिला बलात्कारानं दुसरीकडे वळविण्यांत काय अर्थ आहे ? "

अश्विनशेट पुटपुटत होता, " हो, दृष्टि धांव घेते तर ! फोडून टाकीन अशी सैरावैरा धांवूं लागली तर ! "

" मला ऐकूं येण्यासारखं मुद्दाम पुटपुटण्याचं त्यापेक्षां उघड बोललेलं काय वाईट ?—हें मीं झाडावरच्या पोपटाला बोलतें हो ! नाहीं तर इथं कुणी आपल्याकडेच ओढून घेईल. "

" लागली मायाजाळ पसरायला. पण हा पोपट असला तसला नव्हे. असलीं दहावीस जाळीं घेऊन उडून जाणारा हा पोपट आहे !! "

" मग कां घोटाळतो इथं ? " असं विचारतांना तारानं फार लाडकं हास्य केलं होतं, पण टाळीच्या कडकडाटांत तें विरून गेलं होतं.

तितक्यांत उषाची मूर्ति त्याच्या डोळ्यांना स्पष्ट दिसूं लागे व तिचे शब्द त्याला ऐकूं येत, " काळी, मिट्ट, नकटी, पिचक्या डोळ्यांची, लुकडी... " आणि त्याला मनस्वी हंसूं लोटे.

तारा खरोखरीच अशी कुरूप असेल ? छे !

मेकअपनं केलेली खुलावट वजा केली तरी तारा देखणी असलीच पाहिजे. ती कृश होती. पण अंगानं सडपातळ स्त्री त्याला मनापासून आवडत असे. तिचं नाक किंचित् अपरं होतं. पण नाकाची अशी ठेवण बुद्धिमत्तेची निदर्शक असते असं त्यानं एका पुस्तकांत वाचलं होतं. तिचे डोळे तर गहिरे होते. आणि केस ? ओः ! ते मनसोक्त कुरकरावेत अशी तिच्याकडे बघतांना दर वेळीं त्याला भयंकर इच्छा झाली होती. किंबहुना त्यानं मनाशीं ठरविलं होतं कीं तारा मुंबईला येऊन भेटली, आणि थोड्याशा एकांतांत सांपडली कीं तिचे ते काळे भोर केस...

त्याला मनस्वी इच्छा झाली कीं हें सौख्य एकदां मनसोक्त ध्यावं...पण तितक्यांत उषाचा उद्गार त्याला आठवला,

" पुरुष तेवढे सारे शेणखाऊ ! "

" माझा गळा कापूं नकोस कधीं ! " त्याच्या डोळ्यांपुढं उभी राहिलेली उषा म्हणाली.

त्यानं भान झटकली, खिशांतून एक रेशमी छोटा बायकी रुमाल आणि घडी केलेला कागद काढला, आणि दोन्ही चुरगळून खिडकीवाटे फेंकून दिले...काल रात्रीं पांचवा अंक सुरू होण्याच्या आधीं तो विंगमध्यें उभा असतांना एकदम त्याच्याजवळ येऊन आधीं रुमाल व मग कागदाची घडी त्याच्या हातीं देत तारा हंसत कुजबुजली होती, " माझी आठवण राहावी म्हणून माझा रुमाल ! अन् माझा मुंबईचा पत्ता लक्षांत रहावा म्हणून हा कागद ! "...त्यानं खिडकींतून वांकून पाहिलं. वाऱ्याच्या झपाट्यामुळं कागद व रुमाल दोन्ही खिडकीवाटे पलीकडच्या डब्यांत शिरले...

कोणाच्या मांडीवर ते जाऊन पडले असतील कोण जाणे या विचारानं तो खूप मोठ्यांदा हंसला ! आपण आगगाडींत आहोंत याचं भान त्याला राहिलं नाहीं !







अनुक्रमणिका

दी. ८ अ






अनुक्रमणिका




**ब्रिटीश-पूर्व हिंदु व मुसलमान राज्यें 'निधर्मी' राज्यें होतीं, हें तुम्हांस ठाऊक आहे ?**

**—आणि आज 'सेक्युलर स्टेट' करावयाचें ठरवून आपण नव्या स्वरूपाचें 'धर्मप्रधान' राज्य बनवीत आहों याकडे तरी कोणांचें तरी लक्ष्य आहे ?**

**—आपणांस कदाचित् विस्मयकारक वाटणारे हे सिद्धान्त श्री. बेडेकर यांनीं पुढें मांडले आहेत.**

सुवर्णभूमि या नांवानें विख्यात असलेली भरतभूमि ब्रिटिश सत्तेच्या आघातानें व शोषणानें दारिद्र्य व दुष्काळ यांची भूमि बनली, एवढी एक ढोबळ गोष्ट आज सर्वांना माहित आहे. पण या राजवटीमुळें हिंदुस्थानच्या परंपरागत शेतकी-व्यवस्थेंत किती मूलभूत फरक झाले आहेत याची नीट कल्पना लोकांना अजून झालेली नाहीं. उदाहरणार्थ बंगाल, बिहार इत्यादि प्रांतांतल्या जमीनदारी पद्धतीचा प्रश्न घ्या. ही जमीनदारी पद्धति ब्रिटिशपूर्व काळापासून चालत आलेली आहे असा लोकांचा समज आहे. खरी गोष्ट मात्र अशी आहे कीं हा जमीनदार वर्ग ब्रिटिश सत्तेनें अगदीं नव्यानें निर्माण केलेला आहे. "वाघिणीचें दूध" पिऊन वाढलेला डॉकटर-वकिलांचा सुशिक्षित वर्ग जसा ब्रिटिश सत्तेच्या पोटींच जन्मला, तसाच हा जमीनदार वर्गहि नवीनच आहे. तो या भूमींतील मूळचा वर्ग नव्हे.

याच्या उलट, प्राचीन व मध्ययुगीन काळांतील हिंदी शेतकी-व्यवस्थेतल्या दोन मुख्य संस्था ब्रिटिश राजवटींत साफ बुडाल्या,—पद्धतशीर तऱ्हेनें त्या बुडविल्या गेल्या. या दोन संस्था म्हणजे **ग्रामसंस्था** व **वतनसंस्था**. या दोन आधारांवरच गांवांचा कारभार शतकानुशतकें निर्वेधपणें चालत राहिला होता. ग्रामीण जीवनाचें हें अखंड सूत्र म्हणजेच ब्रिटिशपूर्व भारताच्या साऱ्या इतिहासाचें स्थिर सूत्र किंवा अखंड व अविच्छिन्न पार्श्वभूमि आहे. या पार्श्वभूमीवरच पूर्वीच्या काळांत "देशकारभार" असें म्हणून व त्याच्यापासून वेगळा असा "राज्यकारभार" चाले. हा राज्यकारभार चालविणारे शहाजीराजांसारखे जहागिरदार असत किंवा शिवाजीराजांसारखे छत्रपति असत; पण ते कोणीहि असले, तरी त्यांच्या राज्यकारभारापासून देशकारभार हा वेगळा व स्वतंत्र चाले. या देशकारभाराचा गाडा चालू राहण्याचें कारण राजा नसून देशमुख पाटील इत्यादिकांची वतन-संस्था व ग्रामसंस्था या दोन लोकसंस्थाच होत्या.

## शेतजमिनीचें आजचे मालक

ग्रामसंस्था नष्ट करून जमिनीचा नवा मालक —जमीनदार वर्ग—ब्रिटिशांनीं निर्माण केला. पण ह्या उपटसुंभ वर्गाची निर्मिति त्यांनीं सर्वच प्रदेशांत केली नाहीं. महाराष्ट्रादि कांहीं प्रदेशांत त्यांनीं जुन्या लोकसंस्था मारल्या व शेतकऱ्यालाच नुसता असहाय बनविलें. याचाच परिणाम म्हणून नवा सावकारवर्ग निर्माण झाला. पूर्वी सावकारी होती, पण तिचा प्रवेश ग्रामसंस्थेच्या कक्षेंत होत नव्हता. मोठमोठे सावकार राजधान्यांच्या आधारानें असत व जहागिरदार, राजे वगैरे लोकांशींच आपले बहुतेक सर्व व्यवहार करीत. खेडेगांवांत सावकारीचा सार्वत्रिक प्रवेश झाला तो ब्रिटिश अमदानींतच. आजच्या सावकारी वर्गालाहि जमीनदारांप्रमाणेंच नवीन वर्ग म्हटलें पाहिजे तें यासाठींच. महाराष्ट्रादि रयतवारी प्रदेशांतून आज सावकारवर्गाच्या मालकीची जमीन एकंदर शेतजमिनीच्या जवळजवळ निम्मी आहे. अर्धेअधिक शेतकरी शेतमजूर बनले आहेत व जे अजून शेतमालक आहेत, त्यांतील बहुतेकजण निर्वाहाला अपुऱ्या अशा जमिनीच्या तुकड्यावर धडपडत आहेत. ज्यांच्याजवळ जास्त जमीन आहे, ते स्वतःच गांवचे सावकार, व्यापारी, ग्रामसुधारणा-मंडळांचे पुढारी व राजकीय पुढारीहि आज बनले आहेत व या बहुरूपी सधनवर्गाची गांवांवरील पकड दृढच होत जाईल, असें आजचें राजकारण व अर्थकारण आहे.

## मुसलमानी राजवटींत

आजची स्थिति येथवर मी सांगितली ती एवढ्यासाठीं कीं आज शेतीचे मालक बनलेले जमीनदार, सावकार व सधन शेतकरी-हे वर्ग ब्रिटिशपूर्व काळांत नव्हते ही गोष्ट प्रथम ठळकपणें लक्षांत यावी व त्यामुळें एका इतिहास-विषयक प्रश्नाची चर्चा करणें आपल्याला सोपें व्हावें. तो प्रश्न असा कीं मुसलमानी काळांत जमिनींची मालकी कोणाकडे होती ? ह्या प्रश्नाचें **धर्मनिरपेक्ष** राज्याच्या व राष्ट्राच्या बाबतींत होणाऱ्या वादाच्या दृष्टीनें काय महत्त्व आहे तेंहि प्रस्तुत लेखाच्या शेवटीं येईलच.

वरील प्रश्नासंबंधींचें विस्तृत विवेचन करणारा एक लेख डॉ. कुरेशी यांनीं "**परस्पेक्टिव्ह**" या मासिकाच्या एप्रिल १९४४ च्या अंकांत लिहीला आहे व त्याला मार्गदर्शक समजून मी पुढील विवेचन करीत आहें.

मुसलमानी कायद्यामध्यें अगदीं प्रथमपासून जमिनीची मालकी शेतकऱ्याची असें सांगितलेलें आहे. कांहीं जुने आधार देऊन डॉ. कुरेशी म्हणतात कीं मुसलमानी धर्माचा अनुयायी असो किंवा नसो, जो कसणारा शेतकरी असेल, तो आपल्या जमिनीचा मालक आहे ही गोष्ट इस्लामी कायद्याच्या प्रत्येक ग्रंथांत सांगितलेली आहे. "हें तत्त्व इतकें मूलभूत व रूढ आहे कीं यावर कोठेंहि संदेह प्रगट केला गेला नसून कायद्याच्या सर्व ग्रंथांत हें गृहीतच मानलें जातें."

हिंदुस्थानांत मुस्लिम राजे झाल्यावर त्यांनीं वरील तत्त्व अंगिकारलें काय ? याचें उत्तर अस्तिपक्षींच द्यावें लागतें. मुस्लिम कायद्यामध्यें राजाच्या जमिनीला अर्द-इ-मुमलिकात असें नांव आहे. पण हिंदुस्थानांतील कोठल्याहि जिंकलेल्या भागांतील जमिनीला हा दर्जा देण्यांत आला नाहीं. "अर्द-इ-मुमलिकात"चा दर्जा देण्याची वहिवाट इतर देशांतील मुसल्मानी राजसत्तेच्या विस्ताराच्या काळांतहि फारच तुरळकपणें आढळते, व **हिंदुस्थानांत तर या प्रकाराचें उदाहरण तर नाहींच पण उल्लेखसुद्धां आढळत नाहीं,** असें डॉ. कुरेशी यांनीं दाखविलें आहे.

## अकबराची "राजभागाची" कल्पना

अकबराच्या वेळच्या पद्धतींचें समग्र वर्णन देणाऱ्या "ऐने अकबरी" या ग्रंथांत शेतीच्या मालकीसंबंधानें स्पष्ट उल्लेख मिळतो. त्यांत स्पष्टच म्हटलेलें आढळतें कीं शेतकऱ्यानें राजाला जो कर द्यावयाचा तो राजछत्रानें रक्षण त्याला मिळतें

अनुक्रमणिका

म्हणून मोबदल्यादाखल द्यावयाचा आहे. म्हणजेच राजा हा जमिनीचा मालक म्हणून त्याला खंड द्यावयाचा ही कल्पना अकबराच्या पद्धतींत नाहीं; उलट "रक्षणकार्याला मिळणारी मजुरी," किंवा रखवाली, म्हणजेच राजाचा कर असें ऐने अकबरींत म्हटलें आहे. शेतकऱ्यावर बसविलेला कर व व्यापाऱ्यावर त्याच्या मालाच्या किंमतीनुसार घेतलेला कर हे तत्त्वतः एकच आहेत असें ऐने अकबरींत म्हटलें आहे त्यावरूनहि हें ठळकपणें दिसतें कीं जशी व्यापारी मालाची मालकी व्यापाऱ्याकडेच असते, तशीच निर्वेध मालकी शेतकऱ्याची आपल्या शेतावर व धान्यपैदाशीवर असते हें तत्त्व अकबरानें मानलेलें होतें.

ही कराची कल्पना व प्राचीन हिंदु राजांची "राजभागाची" कल्पना यांत साम्य आहे. एवढेंच नव्हे तर या दोन कल्पना वेगळ्या समजणेंच चूक होईल. धर्मसूत्रांमध्यें व शांतिपर्वामध्यें "रक्षणाचा मोबदला" या आधारावरच राजभागाची कल्पना ठेवलेली आहे. शेतकऱ्याला केवळ निर्वाहापुरतें वेतन देऊन बाकी सारें उत्पादन राजाच्या मालकीचें आहे असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं व राजभाग म्हणजे कुळांकडून घ्यावयाचा खंड असेंहि म्हटलेलें आढळत नाहीं. तीच दृष्टि अकबरानें ठेवलेली आढळते व त्याच्या आधींच्या व नंतरच्या मुसलमान राजांनींहि याच पद्धतीचा अवलंब केलेला आहे.

### औरंगजेबाचें फर्मान!

याला एक ठळक पुरावा म्हणून औरंगजेबाचें एक प्रसिद्ध फर्मान दाखवितां येतें व या फर्मानाचें स्वतःचें भाषांतर देऊन डॉ. कुरेशी यांनीं त्याची विस्तृत चर्चा केली आहे. त्या फर्मानावरून एक महत्त्वाचा निष्कर्ष निघतो तो असा कीं औरंगजेबाच्या पद्धतीमध्येंहि जमीनीचा मालक शेतकरीच समजला जाई; इतकेंच नव्हे, तर त्याचा हा मालकी हक्क त्याच्याकडून करवसुली न झाल्यानेंहि नाहींसा होत नसे. ब्रिटिशांनीं मात्र महसूल थकल्यास शेत लिलावांत काढण्याची नवी प्रथा काढली. राजभाग देणें शेतकऱ्याला अशक्य झालें किंवा कांहीं आपत्तीमुळें शेतकरी जरी शेती सोडून कांहीं काळ परागंदा झाला, तरी त्याचा शेतीवरचा मालकी हक्क अबाधितच राहील असें या फर्मानांत स्पष्ट म्हटलेलें आहे. (डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांच्या "ॲडमिनिस्ट्रेटिव्ह सिस्टिम ऑफ दि मराठाज्" या ग्रंथांत, पानें ५९७ ते ६०० वर, ह्या फर्मानांतील फक्त कांहीं भाग आहे आणि त्यांत वरील मुद्दा आलेला नाहीं.)

या फर्मानांतच नवीन लागवडीला आणलेल्या जमिनीबद्दल म्हटलें आहे कीं जो अशी जमीन नव्यानेंच नांगराखालीं आणील, तो मुसलमान असो कीं इतर धर्माचा असो, ती जमीन त्याच्या मालकीची होईल.

### राजा व रयत यांचे "स्थिर-संबंध"

येथपर्यंत आपण पाहिलें कीं प्राचीन काळापासून जी "राजभागा"ची पद्धति हिंदु राजवटींत चालू होती तीच पुढें मुसलमानी राजवटींत चालू राहिली व हेंच अखंड सूत्र ब्रिटिश अमदानीपर्यंत येऊन पोंचलें.

शेतकरी हाच जमीन-मालक समजून चालणारी राजसत्ता येथें अखंडपणें चालत राहिली, या घटनेचा जास्त खोलांत शिरून विचार केला तर राजा व रयत यांच्या परस्पर-संबंधांच्या प्रश्नापर्यंत जावें लागेल व त्या शोधांत कांहीं महत्त्वाच्या बाबींचा सुगावा लागेल. प्राचीन काळापासून ब्रिटिश अमदानीपर्यंतच्या काळांत म्हणजे असंख्य हिंदु व मुसलमान सम्राटांच्या. राजवटींच्या प्रदीर्घ कालखंडांत, शेतकऱ्याची जमिनीवरील मालकी अबाधित राहिली. याचा मुख्य व महत्त्वाचा परिणाम असा झाला कीं एकंदर समाजव्यवस्था व राजा व रयत यांचा परस्पर-संबंध "स्थिर" राहिला. भारतीय राजसत्ता ही शेतकऱ्याच्या शोषणावरच तगून होती हें खरें, पण ह्या शोषणाचें एक विशिष्ट मर्यादित व स्थिर स्वरूप राहण्याचें कारण जमीन-मालकीच्या वैशिष्ट्यांत आहे. येथील शोषण मर्यादित राहिल्यामुळें वर्गावर्गामधील आणि राजा व रयत यांच्यामधील द्वंद्वाला स्फोटक व क्रांतिकारक रूप आलें नाहीं. तें द्वंद्व तर खरेंच पण तें एका अगतिक कुंठित स्वरूपाचें द्वंद्व राहिलें. एकंदर जन्मसिद्ध जातिसंस्था, समाजव्यवस्था व राजा व रयत यांचे संबंध या सर्वांना या अर्थानेंच "स्थिर" असें संबोधणें शक्य आहे.

### सुराज्याचा अर्थ

या दीर्घ कालखंडांतहि शोषणाची तीव्रता थोडी कमी जास्त मात्र झाली; परंतु त्यांतहि राजानें निरंकुशपणें रयतेची लूट करण्याची शक्यता फार थोडी होती. मध्यवर्ती सत्ताधारी व्यक्तीच्या दुर्बलपणाचा फायदा घेऊन जहागीरदार लोक राजभागाचा बराचसा भाग स्वतःच दडपून गिळंकृत करीत. कांहीं वेळां असा प्रकार वतनदारहि करीत. पण राजभागाचा अपहार करून राजाला भारी होणारे पुंड देशमुख किंवा जहागीरदार प्रजेला भारी होऊं शकत नव्हते. जेथें राजाचाहि हात ग्रामसंस्थेच्या वतनदारांच्या आंत शिरकत नसे तेथें वतनदारांची व जहागिरदारांचीहि मात्रा चालत नसे यांत नवल नाहीं. सारांश, सुराज्य नसलें म्हणजे राजाचा वांटा कमी होऊन जहागीरदार बळावत पण रयत ग्रामसंस्थेच्या कवचांत सुरक्षित राही.

ज्यावेळीं अकबरासारखा कर्तृत्ववान् बलाढ्य राजा गादीवर असे तेव्हां तो राजभागाची वसूली चोखपणें करून घेई व जहागीरदारांना फक्त त्यांचा ठरीव भाग मिळे. वतनदारहि वतनी उत्पन्नावर संतुष्ट राहत. अशा बलाढ्य राजाकडून जी नियमबद्ध करवसुली होई तिच्यामुळें रयतेलाहि जास्त स्थैर्य व सुख लाभत असे हें खरें. आणि तोडरमल, मलिकंबर, दादोजी कोंडदेव इत्यादि अधिकाऱ्यांनीं जी नियमबद्धता आणली ती या दृष्टीनें महत्त्वाची आहे. पण त्यामुळें शेतकऱ्यांच्या पद्धतींत कांहीं मूलभूत फरक या अधिकाऱ्यांनीं किंवा राजांनीं घडवून आणला होता असें मात्र नाहीं. तसा फरक घडवून आणण्याचा प्रश्नच कधीं निघाला नव्हता व म्हणून अकबरानें किंवा शिवाजीराजांनीं कांहीं नवीच प्रथा पाडली असें म्हणण्यास जागा नाहीं.

डॉ. कुरेशी यांनीं आपल्या लेखांत बरानी या मुसलमान ग्रंथकाराचें असें मत दिलें आहे कीं आपल्या रयतेचें हिंदू जहागीरदारांकडून होणारें शोषण थांबविण्यांत मुसलमान राजांना यश आलें व मुसलमानी राजसत्तेला रयतेच्या राजनिष्ठेचा मोठाच आधार या कारणानें लाभूं शकला. याबाबतींत प्रथमच एक दिसतें कीं वरील विधानांत हिंदूंचा उल्लेख करून या मुसलमान ग्रंथकारानें आपली हिंदूद्वेष्टी वृत्ति दाखविली आहे. पण हा द्वेषभावनेचा भाग सोडला तर बरानीच्या विधानाचा अर्थ एवढाच होतो कीं मुसलमान राजवटीमध्ये जहागीरदार व वतनदार यांना ठराविक व रूढ वसुलीपेक्षां जास्त वसुली करणें अशक्य होतें व जी वसुली होई त्यांतील राजभाग बरोबर बादशाही तिजोरींत पोंचत असे. नेमकी हीच गोष्ट शिवाजीराजांनीं साधली व जे वतनदार गब्बर बांधून पुंड झाले होते त्यांच्या गढ्या पाडून त्यांना वतनदारांच्या रूढ स्थानावर आणलें. पण शिवाजीराजांनींहि वतनदारी प्रथा चालू ठेवली व शेतकऱ्याची जमिनीवरील मालकी पूर्वापार चालत आलेली होती तीहि अबाधित राखली.





### …सत्तेचा अभाव

ब्रिटिशपूर्व इतिहास-कालांत शेतकऱ्याची शेतजमिनीवरील मालकी अखंडपणें अबाधित चालत आलेली दिसते, या गोष्टीचा दुसरा एक महत्त्वाचा प्रर्याय आतां पाहूं. युरोपच्या मध्ययुगीन इतिहासांत आपल्याला पोपचें आधिपत्य दिसतें व युरोपच्या राजसत्तांनाहि पोपची धर्मसत्ता भारी झालेली दिसते. या सत्तेचा पाया फार भक्कम होता. तो कोणचा ? तर, युरोपभर मठसंस्थेकडे असणारी जमिनीची मालकी. दुसऱ्या वतनाचे अधिकारी वतनदार व दुसऱ्या सरंजामाचे अधिकारी जहागीरदार हे युरोपांतील लॉर्डसूपेक्षां वेगळे होते. लॉर्डस् हे मोठमोठे जमीन-मालक होते तसे आपल्याकडचे वतनदारहि नव्हते व जहागीरदारहि नव्हते. या लॉर्डस्च्या पंक्तींतच व जोडीलाच युरोपांतील मठसंस्था होती. 'मठ' ही एक निर्भेळ धार्मिक संस्था नसून लॉर्डस्च्या तोलाची—किंबहुना त्यांना भारी असलेली—एक संस्था होती व तिचें खरें सामर्थ्य व ऐश्वर्य तिच्या हातीं असणाऱ्या जमिनींच्या मालकींत होतें. लॉर्डस् एकेका राज्यांतहि एकमेकांत भांडत निर्बळ राहत होते, उलट, मठसंस्थेचा कारभार-सार्‍या युरोपभर शिस्तवारपणें, हिशोबीपणें व सुसूत्रपणें चालत होता. या मठसंस्थांचें केंद्रीकरण पोपच्या सत्तेंत होत होतें हातीच पोपच्या सर्वंकष व युरोप-व्यापी सामर्थ्याचें मर्म होतें.

अशी मठसंस्था आपल्या समाजव्यवस्थेंत उत्पन्न होणेंच अशक्य होतें, कारण शेतकरीच जमिनीचा मालक होता. ब्राह्मणांना अग्रहार मिळत, देवळांना व मशीदींना इनामें मिळत, सरकारी तिजोरींतून मोठमोठीं दानें होत. पण या सर्वांचा अर्थ एकच होई तो असा कीं, राजभागापैकींच कांहीं भाग धर्मगुरूंना व धर्मसंस्थांना जाई. अग्रहार व इनामें म्हणजे जहागिरीप्रमाणेंच केवळ करवसुलीचीं दानपत्रें होतीं. त्यामुळें जमिनीचें दान होत नसे. जमिनीच्या मालकी-हक्काचें दानहि कांहींवेळीं केल्याचे उल्लेख आढळतात, पण अशावेळीं असेहि नमूद केलेलें आढळतें कीं राजानें आपल्या प्रजेच्या मालकीची एखादी जमीन दिलेली नसून त्याच्या वैयक्तिक मालकीच्या शेतजमिनीपैकीं एखादा तुकडा दिलेला असे.

### धर्मप्रधान राजसत्तेचा अभाव

सारांश, मठसंस्थेचा मूळ आधार म्हणजे मठांच्या मालकीच्या जमिनी हा होता व हा आधार फार विस्तृत व भक्कम होता. साहजिकच या मठसंस्थेनें राजसत्तेवर आपली छाप ठेवल्याचें दृश्य आपल्याला युरोपच्या इतिहासांत दिसतें. किंबहुना तशी मठसंस्था होती म्हणूनच तेथें "थिऑक्रॅटिक स्टेट", म्हणजे धर्मप्रधान राज्ययंत्र निर्माण झालेलें आढळतें. कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट पंथांच्या परस्पर-संघर्षांत युरोपचीं राज्यें व राष्ट्रेंहि गुरफटलेलीं दिसण्याचें मूळ कारण असें आहे. मठसंस्थेचा राज्ययंत्रावरील प्रभाव अलीकडच्या काळांत कमी होत होत जवळजवळ नामशेष झाला आहे, याचें कारण जमिनीच्या मालकीऐवजीं भांडवलाची (कारखानदारीची) मालकी ज्या वर्गाकडे आहे तो भांडवलदार वर्गच आतां युरोपच्या राष्ट्रीय राज्यांचा सूत्रधार बनला आहे. ज्याप्रमाणें जमीन-मालक लॉर्डस् हतबल झाले आहेत त्या प्रमाणें जमीन-मालक मठसंस्थाहि निष्प्रभ झाली असून युरोपीय राज्यें या क्रांतीमुळें धर्मनिरपेक्ष झालीं आहेत.

युरोपच्या इतिहासाचा हा सारा क्रम अर्थातच भारतीय मध्ययुगीन इतिहासांत दिसणें अशक्य आहे. याचें कारण वर सांगितल्याप्रमाणें इकडे सामर्थ्यवान् मठसंस्थाच उद्भवली नाहीं व त्यामुळें "थिऑक्रॅटिक स्टेटस्" जन्मणेंहि अशक्य होतें. राज्य हें हिंदू असो कीं मुस्लीम असो त्या राज्याची रयत, म्हणजेच शेतकरी वर्ग हा एकमेव शेतमालक राहिला, त्यामुळें बौद्ध-हिंदू, जैन-शैव-वैष्णव, हिंदू-मुसलमान अशा सर्व पंथांचे राजे झाले तरी धर्मप्रधान राज्ययंत्र यांपैकीं कोणालाच निर्माण करतां आलें नाहीं. शिवाजीराजांनीं "गोब्राह्मणप्रतिपालक" हें बिरुद लावलें होतें असा एक रूढ समज आहे, तो बरोबर असो वा नसो सनातनधर्मीय मठसंस्थेला जमीन-मालकीच्या स्थिर आधारावर शिवाजी राजांना उभी करतां आली नाहीं,—तशी त्यांना इच्छाहि झाली नाहीं. औरंगजेबानें हिंदूंचा छळ केला व आपल्या सत्तेला इस्लामी सत्तेचें स्वरूप आणलें. पण हें सर्व त्याच्या वैयक्तिक लहरीइतकेंच वरवरचें होतें. जैन, लिंगायत, वैष्णव, शैव इत्यादि सांप्रदायिक लढयांत हिंदु राजांनींहि धर्मच्छळाचा अवलंब केल्याचीं उदाहरणें दाक्षिणात्य इतिहासांत आढळतात, पण यांतहि राजाची वैयक्तिक लहर किंवा अभिनिवेशच तात्कालिक प्रभावी झालेला दिसतो. पण, राजाच्या दुष्ट किंवा दुष्ट धार्मिक अभिनिवेशापलीकडे जाऊन राजसत्तेला स्थिर असा थिऑक्रॅटिक स्टेटचें स्वरूप आलेलें मात्र आपल्याला एकंदर भारतीय इतिहासांत आढळत नाहीं. भारतीय राज्यसत्ता ही मूलतः धर्मनिरपेक्षच राहिली व औरंगजेबासारखे अपवाद सोडले तर बहुतेक सर्व राजेहि विभिन्न धर्मपंथांशीं राजव्यवहारांत समदर्शी असे राहिले. ह्याचें कारणहि, माझ्या मतें, प्रबळ मठसंस्थेच्या अभावांत आहे व ह्या अभावाचें कारणहि शेतकऱ्याच्या शेतजमिनीच्या मालकींत व मठांकडे जमीन-मालकी नसण्यांत आहे.

### पाकिस्तानचें आधुनिक थोतांड

हें विवेचन संपविण्यापूर्वीं येथपर्यंतच्याच चर्चेवरून निघणारा एक निष्कर्ष सांगण्यासारखा आहे. भारतीय मध्ययुगीन इतिहासांत धर्मप्रधान राज्यसत्ता जन्मली नव्हती असें म्हटलें तर मग असा प्रश्न येतो कीं पाकिस्तानची कल्पना केव्हां व कशी जन्मली? या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर असें द्यावें लागेल कीं "पाक" देशांत पुण्यभूत, राहण्याची कल्पना सर्वच धर्मांत आढळते तशी जुन्या इस्लाममध्येंहि आहे हें खरें; परंतु धर्मप्रधान राज्य बनविण्याची कल्पना मात्र मध्ययुगीन हिंदी मुसलमानांना अपरिचित आहे,—मध्ययुगीन इतिहासावरून असें उघड दिसतें. मग ही कल्पना अलीकडे कोठून आली? याचें उत्तर असें कीं आंग्लशिक्षित मूठभर मुसलमानांच्या मनांत ही कल्पना आली व या नव्या परभृत वर्गाच्या महत्त्वाकांक्षेंत ती रुजून तिचा ब्रिटिश भेदनीतीमुळें व हिंदी राजकारणांतील कांहीं गुणदोषांमुळें विषवृक्ष बनत गेला. वस्तुतः, "मुस्लीम" राज्याची किंवा कोणच्याहि धर्मप्रधान राज्यसत्तेची कल्पना येथील समाजसंस्कृतींत व इतिहासांत कधींच रुजलेली नव्हती. याचें श्रेयहि आपल्या ग्रामसंस्थेला व तिच्या अभेद्य कवचांत नांदणाऱ्या व जमिनीचा मालक असलेल्या भारतीय शेतकऱ्याला द्यावें लागेल.

### आजची नवी धर्मनिरपेक्षता

समारोपापूर्वी एक गोष्ट सांगणें जरूर आहे. प्राचीन भारतीय समाजव्यवस्था, संस्कृति व इतिहास यांमध्यें आढळणारी ही धर्मनिरपेक्षता, मठसंस्थेचा अभाव व राजांची धर्मसहिष्णुता ह्या बाबी आतां इतिहासजमा आहेत. ग्रामसंस्था, वतनदार व जहागीरदार यांच्याबरोबर त्यावेळचीं जुनीं मूल्येंहि नाहींशीं झालेलीं आहेत. त्यांच्या जागीं वकील, डॉक्टर, सावकार, कारखानदार इत्यादि आंग्लनिर्मित उपटसुंभ आधुनिकांचीं मूल्यें व अभिनिवेश, भारतीय शेतकरी, पांढरपेशा

अनुक्रमणिका






व कामगार यांना ग्रासीत आहेत. भारतीय इतिहासांत जें नव्हतेंच तें धर्मप्रधान राज्याचें व राष्ट्रीयत्वाचें नवें वेड समाजांत विषासारखें भिनत आहे,—आणि तेंहि पुण्यभूच्या व पुरातन संस्कृतीच्या व इतिहासाच्या खोट्या पाठबळावर !

यावर उपाय काय ? हाच कीं धर्मनिरपेक्षतेचें तत्त्व आज आपण नव्या लोकसत्तेच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या भूमिकेवरून सांगितलें पाहिजे. प्राचीन हिंदु इतिहासांतहि धर्मनिरपेक्ष राज्यें होतीं; पण त्या धर्मनिरपेक्षतेचा पाया व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि आधुनिक कल्पनांवर आधारलेला नव्हता, उलट राज्यसत्तेची तरंगती स्थिति, मठसंस्थांकडे जमीन-मालकीचा अभाव, इत्यादि मध्ययुगीन सामाजिक बाबींवर ती धर्मनिरपेक्षता अवलंबून होती, हें आपण उघड सांगितलें पाहिजे. प्राचीन व मध्ययुगीन भारतांत राज्यें धर्मप्रधान नव्हतीं व युरोपसारखी मठसंस्था नव्हती, पण व्यक्तीच्या जीवनाला व विकासाला पूर्णपणें ग्रासणारी धार्मिकता व रूढि होती. धर्माच्या नांवावर युरोपसारखीं रणें येथें माजलीं नाहींत व कत्तली झाल्या नाहींत, पण व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा व स्वतंत्र विचारांचा अंकुरदेखील उगवूं नये अशी जातिसंस्थेची व रूढीची करसबंदी येथें कायम राहिली. एकनाथासारख्या सुधारकांचे सारे नवविचार आम्ह्यावर काढी मारणाऱ्या मापसाच्या प्रकरणासारखे फोल ठरले. ही सारी भारतीय जीवनाच्या अगतिकतेची व कुंठितपणाची मध्ययुगीन स्थिति जनतेपुढें स्पष्ट मांडून त्या काळची राज्यविषयक धर्मनिरपेक्षता व धर्मसहिष्णुता या भारतीय वैशिष्ट्यांची मीमांसा लोकांपुढें केली पाहिजे.

आज मात्र याच्या उलट घडत आहे. भारतीय राष्ट्रवादाच्या राजकीय रथावर आतां भारतीय संस्कृतीच्या गौरवाचा व अभिनिवेशाचा ध्वज फडकत आहे. अगदीं हिंदुत्वनिष्ठेचें उघड स्वरूप धारण करून किंवा धर्मनिरपेक्ष अशा 'भारतीय संस्कृतीचा' पेहराव घेऊन हा नवा अभिनिवेश जास्त जास्त प्रखर होत आहे. या अभिनिवेशांतच जगाला असें सांगण्यांत येत आहे कीं आम्हीं भारतीय हे कोणी तरी स्वयंभू व स्वभावतःच आध्यात्मिक प्रकृतीचे, उदार व परमतसहिष्णु लोक आहोंत ! साऱ्या भोगवादी मानवजातीवर अध्यात्माचा अनुग्रह करण्याचें कार्य आम्हां देवकोटींतील भारतीय आर्यांकडे आपोआपच आलेलें आहे !!

या आत्मिक अहंकाराला वास्तविक पाया नाहीं, पण आजचा नवा राष्ट्रवाद व स्वातंत्र्य यावर गबर होऊं पाहणारे धनिक वर्ग यांचा मोठा आधार या 'आध्यात्मिक व सांस्कृतिक' अहंकाराला मिळत आहे. तोंडानें गोरक्षणाचा जप करीत प्रत्यक्षांत निजामांच्या रझाकारांना मोटारींचा पुरवठा करणारे रामकृष्ण डालमियाशेठ हे या नव्या राष्ट्रवादी सांस्कृतिक अहंकाराचें व स्वार्थाचें उत्तम प्रतीक आहेत.

या अहंकारालाच पोषक म्हणून भारतीय इतिहासांतील राज्यविषयक धर्मनिरपेक्षता व सहिष्णुता आज वापरली जात आहे. म्हणून आज सर्व विचारवंतांनीं वा इतरांनीं या धर्मनिरपेक्षतेचा निःस्पृह वृत्तीनें अभ्यास करणें जरूर आहे. प्रस्तुत लेखांत जमिनीच्या मालकीच्या प्रश्नाच्या अनुषंगानें मठसंस्थेचा व राज्याचा विचार मी वाचकांपुढें मांडला आहे. ह्या याच विषयाचा सर्व बाजूंनीं विचार होईल अशी अपेक्षा करून येथें थांबतों.



## कधीं कधीं वाटे मला

कवि—वि. म. कुलकर्णी

कधीं कधीं वाटे मला
तांबड्या या मातींतून
खूप खूप चालावें मी
पाय येईतों दमून—

कधीं कधीं वाटे मला
पाणी कृष्णेचें पाहतां
जावें असीम पोहत
लाटा लाटांशीं खेळतां

कधीं कधीं वाटे मला
जावें विठ्ठलाच्या गांवा
कष्टभार आणि त्याला
सारा सांगोनिया यावा

कधीं कधीं वाटे मला
लेकराचें गोड 'हंसें'
माझ्या उरांत शिरावें—
घेत रूप अनारिसें

कधीं कधीं वाटे मला
सारा सांडूनि पसारा
यावा पाहूनि एकदां
निळ्या नभाचा किनारा.

कधीं कधीं वाटे मला—
"'असें' वाटूं नये मला"
आग्नि पाणी लागूं नये
असें मिठाच्या खड्याला!"














— अरविंद गोखले

आडमार्गावरील अंधेऱ्या घरांत सजवलेलें प्रसूतिगृह. आडमार्गाला असलें तरी बरेंच भरभराटींत चाललें होतें! तेवढ्याशा जागेंत भेटायला येणाऱ्यांसाठीं बाहेरचा व्हरांडा, औषधांचा चिंचोळा बोळ, रोगी तपासण्याचें दालन, बाळंतिणींचा दिवाणखाना, अन् खास रोग्यांची छोटी खोली. तीन मोलकरणी, दोन सुईणी अन् एक हरकाम्या सुद्धां अपुरा पडे. पोक्त व प्रशस्त डॉक्टरबाई पहांटेपासून अपरात्रीपर्यंत सोडवणुकींत गुंतलेल्या असत.

आतां व्हरांड्यांत भेटायला आलेल्यांची वर्दळ होतीच. बरेचसे पुरुष बाहेरच अवघडून बसले होते. दोन म्हातारे सारखे खोकत होते व बडबडत होते. एका कारकुनाला जुळी होतील अशी भीति होती—नी त्याचे दोन्ही डोळे फिरत होते. एका वेश्येचा मामा सिगरेटचा धूर फेकीत सुखस्वप्नांत सुस्तावला होता. एक कोवळा नवरा केंविलवाणा चेहरा करून बसला होता.

तोही त्या गर्दींतच होता. अस्वस्थपणें, हात चोळीत, कोपऱ्यांत उभा. चेहरा काळवंडून गेला होता व हातापायाला पुन्हा पुन्हां घाम फुटत होता. आजूबाजूचे 'पिते' त्याला पाहवत नव्हते. ते त्याच्याकडे पाहत, ओळख करून घ्यायच्या बेतानें हास्य करीत, अन् त्याला अगदींच मेल्यासारखें होई. त्यांचे हास्य, त्यांची हुरहूर त्याला त्रासदायक वाटे. आंतून ?लांचा रडण्याचा आवाज ऐकला कीं त्याच्या पोटांत सुयां टोंचल्यागत होई. पुन्हां पुन्हां तो शरमेनें चौफेर पाही, अन् कोपऱ्यांत अंग चोरून उभा राही. औषधांचा वास सुईणींच्या फेऱ्या, दुधाच्या बाटल्या, दुपट्यांच्या घड्या, चिमटे, कापूस...कुठल्या कोंदट, भयाण वातावरणांत त्याला यावं लागलं होतं!

एक म्हातारी सुईण त्याच्या?ढून गेली, थबकली, व हंसून म्हणाली, "थांबा हं!—आतां भेटतीलच डॉक्टर!" त्याला जरा ल्वटवी आली. पण दुसऱ्या क्षणीं तो थिजून गेला. त?' सुईणीचें तें मुद्दाम दाखवलेलें अगत्य अन् हेतुपूर्वक केलेलें हास्य पाहून तो पांढरा फटक पडला. केवढी विटंबना!—काय समजली असेल ही थेरडी आपल्याला.

त्यानें स्वतःला सांवरून घेतले. सारं भोगलंच पाहिजे आतां. अन् आता थोडक्यांवर आलं होतं! गेल्या महिनाभर होणारा मनःस्ताप अखेर संपणार होता. सगळी व्यवस्था पूर्ण झाली होती. फक्त एक रात्र व एक दिवस उलटला कीं...मग...मग?....

पुनः तो काळानिळा पडला. संध्याकाळच्या उदास सांवल्या अधिकच झांकळून गेल्या. पावसाची पिरपिर पूर्ववत् सुरू झाली. रस्त्यावरून एक

प्रेतयात्रा हलकेच गेली. कुठून तरी दळण घालणारं गाणं ऐकूं येत होतंच. आयुष्याचा सारा गुंता त्याच्यापुढें घोटाळत होता. अन् तिची मूर्ति त्यांतून तरळ होती.

किती निष्पाप, निर्व्याज ! पोपटाचा पिंजरा धूत असतांना चहाचा पेला पुढें करतांना, खिडकींतून चिठी भिरकावितांना...तिचीं अनेक रूपें त्याला दिसूं लागलीं. किती विलक्षण प्रेम करीत होती ती ! अन् त्या-प्रीतिपायीं केवढी संकटें सोशीत होती ! बापानें फाडून काढलेली, नातलगांनीं वाळीत टाकलेली, चोरून भेट घेऊन रडणारी...तिच्या अनेक आकृति त्याला दिसूं लागल्या. केवढं भव्य, दिव्य प्रेम होतं तिचं...

" केव्हां लग्न झालं-?"-शेजारच्या कोवळ्या तरुणानें विचारलें, अन् तो भानावर येऊन भयंकर दचकला. लग्न ! लग्न ! धरणी दुभंगली तर बरं होईल असं त्याला वाटलें. तो तरुण संसाराच्या ओझ्यानें वांकला होता, तरी संसारी होता, ह्या गोष्टीचा त्याला हेवा वाटला. तेवढ्यांत पेन्शनचा कारकून उद्गारला, " पहिलीच खेप वाटतं ? आमची ही तिसरी पाळी ! अन् जुळं होईल म्हणतात त्यापेक्षां आधींच—" विलक्षण चेहरा करून त्यानें कारकुनाकडे पाहिलें. किती सहज, सरळ सांगत होता तो ! त्यानें आपली दृष्टि दूर केली, अन् मग वेश्येच्या वारसानें सोडलेल्या सिगरेटचीं वलयें दूर करीत तो उदासवाणा उभा राहिला !

त्याला वाटलं, एकदम इथून पळून जावं ! दूर, एकांतांत जगाच्याही बाहेर !

पण अपराधी मुद्रा करून तो कोपऱ्यांतल्या स्टुलांवर टेकला. कुठें नि कसा जाणार ? निर्व्याज नि निस्वार्थी प्रेमाच्या थापा अंगाशीं आल्यावर ? तिला फसवून, तिला अडकवून स्वतः सुटूं पाहणार ?—दारिद्र्याची, जातपातांची, भावी परिणामाची पर्वा न करतां केलेल्या प्रेमाचं पोतेरं झालं म्हणून ? किती भेकड, हलकट...

पुन्हां घाम, पुन्हां शरम, पुन्हां हृदयाचा चोळामोळा. तो स्टुलावरून उठला नि तेथल्या तेथें फेऱ्या घालूं लागला. हा ताण आतां सहन होत नव्हता. एकदां लवकर उरकलं कीं ह्यांतून सुटलों ! 'सुटलों' होत —ह्या भावनेचीही त्याला भीति वाटली. कशांतून सुटलों ?...तो वेडा होत होता अन् स्वतःला सावरीतही होता.

मध्येंच तो थबकला नि त्यानें खिसा चांचपून पाहिला. शंभराची नोट सुरक्षित होती. शेक्सपीअरचे ग्रंथ, बोटांतली अंगठी, एकुलती एक आरामखुर्ची, असेल नसेल ते सारं मौल्यवान विकून शंभर रुपयांची उभारणी केली होती. सारंच मौल्यवान विकलं होतं. प्रेम, शील, माणूसकी ! त्याला उभं राहणंही अशक्य झालें. अंगांत ताप चढलासं वाटलें. पुन्हां घाम, पुन्हां शरम...

तेवढ्यांत समोरून डॉक्टर आल्या. त्याचें काळीज खालीवर होऊं लागलं. डॉक्टरनीं त्याला अभिवादन केलं. त्याला खेटरं मारल्यागत् वाटलं !

डॉक्टर म्हणाल्या, " अजून आल्या नाहींत त्या ?—"

तो चांचरत म्हणाला, " येतील आतां !—मी मुद्दाम पुढें आलोंय—"

" असं-असं !—मी आल्यें. तुम्ही तिकडे बसा, त्या बांकावर—"

तो औषधांच्या कपाटामागें गेला, व कसाबसा बसला. व्हरांड्यांतले लोक डॉक्टरभोवतीं गोळा झाले, आपल्या कायदेशीर सुनांचं, बायकांचं कुशल विचारूं लागले.

त्याला ब्रह्मांड आठवलं. तो कोवळा पोरगा, किरकोळ कारकून, छटेल इसम, ढसकणारे म्हातारे, ह्या सर्वांहून तो किती वेगळा होता, वरचा होता !

पण काय दुर्दैव वांट्याला आलं होतं !—परोपरीचं प्रेम करून अखेर सारं चोरून...आणि ह्या लोकांचीं लग्नं, त्यांचे संसार, त्यांची संतति काय मोठी सोन्याची होती ? केवळ घुसलेल्या बुद्रुकांनीं माना डोलावल्या, अन् दारादारावरच्या कायद्यांनीं खुणा केल्या म्हणून, ह्यांचा वंश वाढायचा !... त्यानं तोंड झांकून घेतलं !—साऱ्या जगाची विलक्षण किळस आली. स्वतःच्या दारिद्र्याची, दुबळ्या मनाची चीड आली. हळूहळू तो हुंदके देऊं लागला !

अपयश अन् अधःपात ह्यांच्या गर्तेंत त्याच्या हृदयाचे अणूरेणूंएवढे तुकडे कितीवेळ तरी होत राहिले !—

मग तो भानावर आला......कुणीतरी हुंदके देत होतं. तो दचकून पाहूं लागला. कुणी मेलं होतं. बाळंतिणी ? बाळ ?—त्याला अगदीं अपराध्या सारखं वाटलं......रस्त्यावरून पोलीसची गाडी गेलेली दिसली; अन् भीतीनें त्याची वाचाच बसली......समोरून स्ट्रेचरवरून पांघरुणांत लपेटलेली एक बाई कुठून कुठें नेली. अन् तो आ वासून पाहूं लागला.......समोरची सुरी उचलून स्वतःची मान चिरून टाकावी असं त्याला वाटलं—

अंमळशानें तो परत सांवरूं लागला. आतां थोडा धीर धरायला हवा होता. एवढं सुरळीत जमलं हेंच नशीब होतं. नाहीं तर केवढं अरिष्ट कोसळलं असतं —उद्यां संध्याकाळीं जिकडचं तिकडे होईल. जसं कांहीं कांहींच घडलं नाहीं.

टॉवेलला हात पुशीत डॉक्टर त्याच्या पुढ्यांत आल्या. नरबळीसारखा खालीं मान घालून तो लटपटत उभा राहिला.

डॉक्टर समजावणीच्या स्वरांत म्हणाल्या, " काळजीचं कारण नाहीं. अगदीं सोपं असतं सारं-उद्यां संध्याकाळीं परत जाऊं शकतील त्या—"

त्यानें खिशांतून नोट बाहेर काढली व पुढें करीत म्हटलं, " एवढंच देऊं शकतों मी—"

" हरकत नाहीं. तुम्ही ओळख आणलीत त्यावरून ही फुकटही काम केलं असतं—"

त्यानें मान खालीं घातली.

" काय करतां तुम्हीं ?—अन् लग्न कां नाहीं केलंत ?—"

त्यानें भकास चेहेरा करून वर पाहिलं. कधींच लग्न करणं अशक्य आहे हें त्यांना जर कळलं तर कदाचित्—तो घाईनें म्हणाला,

" पुढल्या महिन्यांत— "

" छान. छान !—हें असं फार वाईट !—फारच वाढलं आहे हें जिकडे तिकडे—"

आपण-तसे नाहीं हें सांगतां आलं असतं तर फार बरं झालं असतं असं त्याला वाटलं ! किती समंजसपणें, सुसंस्कृतपणें तो वागला होता. पण ह्या गप्पांत काय अर्थ होता ? केवढ्या विश्वासानें ती त्याच्याकडे आली होती. अन् त्यानें तिला उलट वासनेचा अहेर केला होता—

" मुलीची स्थिति मोठी वाईट होते—" डॉक्टरनीं समारोप केला, अन् त्याचें काळीज रक्तानें भरून गेलं. कावराबावरा होऊन तो म्हणाला,

" जरा काळजी घ्या; नाजूक आहे ती—"

" तुम्ही अगदीं भिऊं नका. सारं उरकलं आहे असं समजा नी सिनेमाला जा ! इकडे येऊंही नका. एकदम मांडवांतच भेटा आपल्या मैत्रिणीला—"

त्याचे पाय लटपटूं लागले अन् डोकें गरगरूं लागलें. केवढं गलिच्छ स्वरूप आलं होतं साऱ्या गोष्टीला ! केवढे धिंडवडे उडाले होते ! अरेरे—








"तुम्हाला घेरी येते काय ?– स्वस्थ बसा थोडा वेळ, अन् मग जा ! –आणि हें मिक्श्चर घ्या !–जरा बरं वाटेल ह्यानें—"

डॉक्टरनी एक डोस त्याच्यापुढें केला,.मि त्या निघून गेल्या.

क्षणमात्र त्याला हायसं वाटलं. सगळं संपणार आतां ! संकटच जवळ-जवळ. त्याच्या मनावरचं दडपण उडून गेलं, अन् अगदीं हलकं वाटलं त्याला ! एका भयंकर संकटातून तो सुटला होता. महिना दीड महिनाभर जे विलक्षण क्लेश भोगले होते ते आटोपले आतां ! त्याचं वजन कमी झालं होतं, तिच्याकडील आकर्षक भाव वाहून गेला होता, मनांतली सारी आशा नाहींशी झाली होती. पश्चात्तापानें ती अंतर्बाह्य पोळून निघाला होता. त्याच्या आयुष्यांत कायमचा अंधार होणारसं वाटत होतं.

पण अखेर उजाडणार ! आजची काळरात्र आंवरली कीं पुन्हां पूर्ववत् प्रश्वास सुरू...हुषारी आणण्यासाठीं तो औषधाकडे पाहूं लागला. औषधानें त्याला तरतरी येईल; ऑपरेशननें तिची सुटका होईल. अन् मग...मग??—

सारं जग त्याच्या पुढून गर्कन् फिरलं. स्वतःला सांवरण्याच्या भरांत समोरचं औषध सांडून गेलं...मग ? -उद्यां ? –चूक सुधारली गेली, संकटांतून सुटका झाली, पण अखेर साधलं काय ? लग्नाची कधींच शक्यता नाहीं. संसाराची, सहप्रवासाची यत्किंचित्‌ही आशा नाहीं. कसलंही साहस केलं तरी तिचा जमदग्नि बाप ते पुरून उरेल ! सारा जन्म विरहांत, व्यथेनं घालवायचंच नशीबीं आहे.......

छे, कुठलीच शक्यता नाहीं ! फक्त प्रेमाच्या पांघरुणाखालीं हें पाप करणंच शक्य आहे !

तो असहायपणें बांकावर बसला. अंग तापानें फणफणलं होतं. अन् दृष्टीसमोर अंधार होत होता. ताण संपल्यानंतर मोकळं झालेलं मन मोहरून येत नव्हतं. उठायचं अवसानच उरलं नव्हतं आतां ! आशेचे, आनंदाचे, उल्हासाचे विचार घोळवायची शक्तीच नष्ट झाली होती...

तो विव्हळूं लागला: काय करायचं ? कशाला जगायचं ? प्रीतीच्या ज्या सुखद स्मृतीवर एकाकी आयुष्य घालवायचं त्याही आतां विटाळून गेल्या. तिची नुसती आठवण झाली तरी आतां शरमेनें तोंड काळवंडून जाईल. तिची एकांतांत भेट झाली तर तिची सावलीसुद्धां आपलं सुतक पाळील ! कसं जगायचं ? कशाच्या आधारावर राहायचं ? पोटांतलं पाप दूर करतां आलं. पण हें हृदयांतलं पाप कसं काढून टाकायचं ?—पाप ! अन् खूनही. पोटच्या पोराचा खून !

त्याचं हृदय चिरून निघालं. विद्ध होऊन तो चौफेर पाहूं लागला. उलट सुलट सांवल्या एकमेकींत मिसळत होत्या. औषधांचे कुबट वास घोंघावत होते. पाळणे वेगानं फिरत होते, अन् सुईणींच्या फेऱ्या संपत नव्हत्या. ती थेरडी सुईण तेवढ्यांत थांबून हंसत होती... सुवासिनी वीत होत्या, लग्न लागलीं जात होतीं. सारे सुखी होते, सदाचारी होते...

रक्तवाहिन्या फुटणार, मज्जातंतू तुटणार असं त्याला वाटूं लागलं ! खरं म्हणजे संकट संपल्यावरचा सुटकेचा श्वास त्याला सोडायचा होता. पण आतां तर धड श्वासोच्छ्वासही घेतां येईना. सारं आयुष्यच ओंगळ झालं. जीवनांतलं संगीतच घुसरत खालच्या सप्तकाशीं, खालच्या सुराशीं सं रू लागलं.

अखेरचं अवसान आणून उठायचा त्यानें यत्न केला. पण मुंग्यांनीं भरलेले हातपाय नी वेदनांनीं भरलेलं डोकं कसं हालवायचं ? समोरचं तरतरी आणणारं औषध तर वाहून गेलं होतं. अन् उठायचं म्हणजे व्यय करायचं ! कुठं पाहायचं, कुठं जायचं ? कशाशीं वाट पाहायची, कसल्या स्मृति सांभाळायच्या ?



फुटणाऱ्या हृदयानें, फाटणाऱ्या नजरेनें तो इकडे तिकडे पाहूं लागला. ती यायची वेळ झाली होती. ती यावयाच्या आंत नाहींसं होणं अवश्य होतं. ह्या मुर्दाडपणेच्या हेऱ्यानें तिचे पोळलेले डोळे कसे पाहायचे ?—तिची जळकी नजर, तिचं हताश हृदय स्मरतांच तो अगदीं हतबल झाला...

अन् अचानक, एकाएकी तो आकांत करीत उठला. प्रेम, पाप, पोर... औषधाचं कपाट त्यानें आवेगानें उघडलं. अनेक औषधें ओळीनें मांडली होतीं. तरतरी यायला, भूल यायला, वेदना कमी व्हायला, विष...विषाच्या बाटलीला त्यानें चटकन् कवटाळलें.

...क्षण दोन क्षण वेदनांनीं व्याकूळ झाला. त्याचं हृदय दुःखानें जळत होते, अन् घशांत बाटलींतले घोट उतरत होते....मग तो तेथून निघाला. ती यायच्या आंत हें काळें तोंड लपवायला हवं होतं. तो खालच्या मजल्याच्या मागच्या दारानें, दूर आला...

× × ×

ती आली ती मागील दारानें, दबकत दबकतच ! मंगळागौर मैत्रिणीकडे जायला म्हणून दीड दिवसाची परवानगी घेऊन, चांगली वेणी नि सोन्याचे दागिने घालून घरांतून निघाली, ती तडक प्रसूतिगृहांत आली. घामानें नी पावसानें तिचे केस, कपाळ, कोरी साडी भिजून गेली होती. भीतीनें नी काळजीनें तिचं हृदय खालीवर होत होतं.

प्रसूतिगृहांतलें वातावरण पाहून ती अधिकच उन्मळून गेली. दिवेलागणीची वेळ झाली होती. संध्याकाळचीं औषधें, संध्याकाळचीं दुधं, संध्याकाळचीं जेवणं ह्यांत सुईणी व मोलकरणी गुंतल्या होत्या. पलंगावरून पहिलटकरणी, पोक्त बाया, अष्टपुत्रा सौभाग्यवती स्त्रिया बसल्या होत्या, निजल्या होत्या...

म्हाताऱ्या सुईणीनें तिला पाहिलें, अन् हंसून ऑपरेशनच्या कपाटाआड तिला बसवलं. त्या म्हातारीचं तिला भारी भय वाटलं ! पण कपाटाआड एकांत होता, कुणी बघायचं भय नव्हतं. गळ्यांत नसलेलं मंगळसूत्र कुणी चांचपेल ही धास्ती नव्हती...

तिला एकदम ह्या चोरटेपणाची शिसारी आली. आज दोन महिने हें चाललं होतं. चोरून रडणं, चोरून औषधं खाणं, चोरून...पण आतां संपणार होतं सारं ! अखेरचं अग्निदिव्य उरकलं कीं सुटका होणार होती. केव्हां एकदां सारं संपतंय् असं तिला झालं. आतुरतेनें ती आजूबाजूला पाहूं लागली.

तेवढ्यांत डॉक्टरच तिच्या पुढ्यांत आल्या. त्या हंसून म्हणाल्या,

"आलांत का ?–सकाळीं आलां असतात तर बरं झालं असतं—"

तिचं हृदय धावत्यांत सांपडलं. कशीबशी ती म्हणाली;

"आतां नाहीं कां—"

"हरकत नाहीं. तो मागली खोली रिकामी केरल्यें तुमच्यासाठीं—"

डॉक्टर गेल्यावर तिला सुटल्यासारखें आलें. पण मग वाटलें, डॉक्टरांच्या मागें धांवत जावें नि लवकर सुटका करून घ्यावी. एकटेपणाची तिला फार भीति वाटूं लागली. ती परकी जागा, तो वाढत जाणारा अंधार, अन् चोहोंकडे दिसणारे ते आईवडिलांचे चेहरे... ती आवेगानें उठली...पण तिला डॉक्टरांच्या हातांचं, सुईणींच्या हंसण्याचं, आजूबाजूच्या अर्भकांच्या रडण्याचं भय वाटलं. काय धिंडवडे होणार कोण जाणे !–

कपाटावर विषाची बाटली रिकामी होती, नाहींतर उचलायचीशी वाटली असती तिला !

नाहीं तरी जगण्यांत काय अर्थ उरला होता : प्रियकराबरोबर पळून जायचे, लग्न करून संसार थाटायचे एकूणएक यत्न फोल ठरले होते.








अनुक्रमणिका

त्याचें दारिद्र्य, बेकारी, हलकी जात !–अन् आपल्या घराण्याची प्रतिष्ठा, संपत्ति !–अखेर कुणाशीं लग्न करून मल्यासारखं, कुळटेसारखंच जगणं नशीबीं येणार होतं...

तिचे डोळे डबडले. मागल्या जन्मीं काय पाप केलं होतं म्हणून हे भोग वांट्याला आले होते. वास्तविक किती मानानें, हक्कानें या ठिकाणीं यायचं ?...पण आज मातृत्वाचा हक्क हिरावून घेतला. जात होता, प्रेम पूर्णत्वास न्यायची चोरी झाली होती.

विलक्षण विषादानें तिचं अंतःकरण भरून गेलं. पण तिनें आपले डोळे कोरडे केले, पदर नीट केला, अन् ती उभी राहिली. असं रडून ओरडून चालणार नव्हतं. सर्व सोसायची तयारी करायला हवी होती. नाहीं तो धीर धरायला हवा होता. घरांतून तात्पुरती सुटका झाली होती. या संकटांतून कायमची सुटका होणार होती...

धीरपणें ती उभी होती. अन् मग डॉक्टर आल्या तेव्हां ती शांतपणें म्हणाली,

"झाली ना तयारी ?–उद्यां संध्याकाळपर्यंत परत..."

डॉक्टर हंसल्या व म्हणाल्या,

"माझ्यावर विश्वास ठेवा. माझा हातखंडा आहे. तुमच्यासारख्या..."

ती स्वतःशींच म्हणाली, बोला, बोला...वाटेल ती विशेषणं वापरा. वांत असंच वर्तन घडलंय् माझ्या हातून...पण तिचा निर्लज्ज-पणा तिलाच बोचला. स्वतःला सांवरीत, समजावीत ती मुकाटपणीं डॉक्टरांच्या मागोमाग निघाली.

दिवाणखान्यांत अनेक बाळंतिणी होत्या ते पलंग, तीं पोरं, ते पाळणे पाहवेना तिला ! साऱ्या सद्भाग्याच्या होत्या, पवित्र माता होत्या. फक्त ही... तिची दृष्टि खालीं गेली. चेहेरा काळवंडला. पाय लटपटूं लागले. कशीबशी ती मागल्या खोलींत पोंचली अन् दमून खुर्चीवर बसली.

खोलींतलं वातावरण नी वस्तू पाहून तर तिच्या पोटांत भीतीचा गोळा उठला.

— कशाला वेड्यासारखी त्याच्याकडे त्या दिवशीं गेलें ?–दोन वर्षं असमजसपणें, सीमेवरून वर्तन केलें. उच्च पातळीवरून वागलों. अन् अखेर पवित्र प्रेम पायदळीं तुडवलं, साऱ्या कोमल भावनांची, आठवणींची राख केली. जें भाग्याचं, स्वर्गसौख्याचं ठरायचं तें पापी, पातकी ठरवलं...

"अरेरे–तुम्हांलाही चक्कर येते काय ?–नर्स, डोस दे यांना !" डॉक्टर तिच्याजवळ येत म्हणाल्या. तिनें घाईनें स्वतःला सांवरलें. दुःखाचे, दैन्याचे विचार दूर केले. उसन्या आवेशानें उभें राहून म्हटलें, "आटपा आतां..."

तेवढ्यांत गेलेली नर्स धावऱ्या धावऱ्या परतली. "डॉक्टर, पॉयझनची बाटली रिकामी पडली आहे कपाटावर." मघाशीं मीच नीट पुसून कपाटांत ठेवली होती. बूच काढलंय् नि बाटली मोकळी—"

नर्स नी डॉक्टर कावकाव करीत बाहेर गेल्या. ती पलंगाशीं शून्यपणें उभी राहिली.

कितीतरी वेळ लोटला. जणूं तिचे दिवस पुरे भरले नी ती प्रसूत झाली. किती बाळसेदार मूल होतं तिचं ! थेट त्याच्यासारखं दिसत होतं. या दोघांच्या प्रेमाला साजेसंच नाजूक नी गोंडस !... छे छे, तिचे आई-प तिला कोंडून ठेवीत होते, तिचे पोटदुखणं थांबत नव्हतं. तिचा छळ थांबत नव्हता...

डॉक्टर धापा टाकीत आल्या व तिच्या कानाशीं लागून किंचाळल्या, मचे मिस्टर मघाशीं आले होते, तेच पॉयझन पिऊन गेले. मी चौक-ला माणूस धाडला होता. ते आपल्या खोलीवर जाऊन पडले आहेत...

तिला क्षणमात्र अर्थबोध झाला नाहीं. मग ती विलक्षण नजरेनें पाहूं लागली. त्यानें विष खाल्लें ? जीव दिला ! तिचे डोळे मिटले गेले, अन् ती बेशुद्ध होत धरणीवर कोसळली.

डॉक्टर, सुईणी मोलकरणी बराच वेळ अस्वस्थपण उपचार करूं लागल्या. तिला कसं व काय समजवावं, कुणालाच कळेना !—

—त्यानें जीव दिला. किती करुण अन् किती भीषण ! त्याचा चेहरा, त्याचीं असंख्य रूपं तिच्या मिटत्या नेत्रांपुढें ओवाळून गेलीं. किती प्रेमळ, किती उमदा ! आयुष्यभर परिस्थितीशीं झुंजणारा, पराकोटीचं प्रेम करणारा...

तिला हळूहळू जाग आली. अन् तरीही ती भानावर येईना. सारखा त्याचाच ध्यास तिला लागला. ह्या संकटानें पोळलेला, व्याकूळ झालेला त्याचा चेहेरा तिला दिसूं लागला...प्रेयसीला फसवलें, बेजबाबदार, नादान ठरलों हेंच वेड त्याला व्याकूळ करीत होतें. कितीही सांगितलं तरी समजूत पडत नव्हती त्याची. हें अपयश असह्य झालं त्याला. केवढं अपूर्व, अलौकीक प्रेम ? त्या अलौकीक प्रेमामुळंच त्यानं जीवनयात्रा संपवली...

डॉक्टर तिला हालवीत होत्या, अन् सुईणींना म्हणत होत्या,

"काय गोंधळ आहे नसता !–अगदींच लफंगा दिसतो आहे तो इसम—"

हळूहळूं आजूबाजूचं जग तिला जाणवूं लागलं. बाजूच्या दिवाणखान्यांत बाळंतिणी वांटणीला आलेल्या नवऱ्याचा वंश पोशीत होत्या. किती ठिकाणीं संपूर्ण मीलन होतं ? कितीजणींनी असं प्रेम पाहिलं होतं ?–प्रेम पाहिलं होतं फक्त तिनेंच ! तिच्याच प्रियकराला तिच्या अब्रूची चाड होती. तो कसा लफंगा ?

"लफंगा कसचा–मूर्खच होता तो"–म्हातारी सुईण म्हणाली, "घाबरला काय, घेरी काय आली. जसं कांहीं तोच भोगत होता. कित्येक लोक थंडपणे सारं करतात अन् संसार थाटून सुखी होतात. पण ह्यांचं प्रेम ना ? कसलं मेलं हें प्रेम..."

हेंच प्रेम–! तिच्या तडफडत्या हृदयांत सूर उठले म्हणूनच तीं सहवेदनेनें व्याकूळ झाला. पापाच्या जाणीवेनें पोळून निघाला. प्रेममंदीर विटाळल्यावर बलीदान करायला सिद्ध झाला...त्याच्याबद्दल अभिमानानें तिचें हृदय भरून आलें...नव्या तेजानें फुललेले तिचे डोळे म्हणूं लागले, केवढा दिव्य पुरुष ! आपला प्रियकर.... आपला पति.... हो पतिच !

ती जागी झालेली पाहतांच घाईनें डॉक्टर म्हणाल्या,

"उठा. तुम्ही जा आतां, नाहींतर इथें किटाळ येईल कांहींतरी. सर्व थंडावल्यावर मात्र या हं ! तुम्हाला आतां तर मोकळं व्हायलाच हवं. कदाचित् ह्या धसक्यानेंच—"

तें ऐकताच पुन्हां कोसळणारी काया तिनें विलक्षण निश्चयानें सांवरली. तो गतप्राण झाला हें तर खरंच, पण ती फक्त आतां बेशुद्धही पडणार नव्हती. त्याला असेल तसा आवरायला धांवणार होती. अवसान आणून ती उठली. त्याच्या मृत्यूच्या दुःखानें ती मूढ होत होती. त्याच्या दिव्य प्रेमाच्या साक्षात्कारानें तिला सुचेनासं झालं होतं. अन् तिचं स्वतःचं संकट ?—त्या संकटाच्या जाणीवेसरशीं तिच्या हृदयांत एकदम वेगळेच सूर फेर धरीत वेगानें वाढूं लागले. भव्य दिव्य प्रेमाचा अपूर्व प्रसाद तिच्या पोटांत होता. तो तीं प्राणापलीकडे जपणार होती. संकटाशीं झगडून वाढवणार होती. ह्या गलिच्छ जागीं, अशा कृत्यासाठीं आतां ती कदापिही येणार नव्हती ! जें बेकायदेशीर, अनीतिमान ठरत होतें, तेंच ती आतां अभिमानानें, उजळ माथ्यानें मिरवणार होती...

अनुक्रमणिका







## जळुं दे पंख पुरे

कवि-प्रफुल्ल-दत्त

ज्वाले, जळुं दे पंख पुरे

त्यापुनि उरली मम जीवन जी
रसरसली ही प्रीती माझी
विलीन व्हाया तुझिया तेजीं
हृदयीं राख उरे
जळलें, जळुं दे पंख पुरे

असें तुझे काचेचें घरकुल
तरिहि तुझ्या अंतरिंची जळजळ
श्वासासंगे ओकी काजळ
मन्मन म्हणुनि विरे
जळलें, जळुं दे पंख पुरे

उरिंचा तव स्नेहाचा संचय
आसमन्त करि तेजें निर्भय
मलयिं तयाच्या होतां तन्मय
देहभान विसरे
जंळलें, जळुं दे पंख पुरे

कवळाया तव कडा रुपेरी
निमिष उसळल्या मानस-लहरी
कळलें क्षण प्रणयाचें जहरी
स्वर्ग जयांत तरे
जळलें, जळुं दे पंख पुरे

तुजविषयीची परिसुनि गाणीं
वेडयाचा उन्माद म्हणो कुणि
गातां परि दुःखान्त कहाणी
•मनिं चैतन्य भरे
जळलें, जळुं दे पंख पुरे



आकृति २ री

वसाहतीचें रात्रंदिवस संरक्षण करणें हें सैनिकांचें काम. डोळ्यांत तेल घालून ते हें करीत असतात. चालढकल नाहीं कीं कामचुकारपणा नाहीं. संकटाचें थोडेंसें चिन्ह दिसतांक्षणींच सैनिक आपलें कठीण कवचानें आच्छादिलेलें डोकें वारुळाच्या भिंतींवर आपटून एक प्रकारचा आवाज करतात व सगळ्या वारुळाला धोक्याची सूचना देतात. ही सूचना मिळतांच वारुळांतील सगळ्या उधया संकटाला तोंड देण्याकरितां तयार रहातात. सैनिकांमध्यें दोन प्रकार आढळतात. पहिल्या प्रकारच्या सैनिकांचें डोकें बरेंच मोठें असून त्यावर कठीण जाड कवच असतें. त्यांचे जबडे मोठे व अत्यंत तीक्ष्ण असतात. दुसऱ्या प्रकारच्या सैनिकांचें डोकें फार मोठें नसतें व त्यांचे जबडे तीक्ष्ण असले तरी लहान असतात. परंतु या सैनिकांच्या डोक्यांवर एक नळी असते व तिच्यांतून ते शत्रूच्या अंगावर एक प्रकारचा चिकट विषारी रस अचूकपणें उडवून शत्रूंना नाश करतात. या सैनिकांच्या पथकाला "पिचकारी पथक" हें नांव देतां येईल. मागच्या महायुद्धांत जपानी सैन्यांत ज्याप्रमाणें "आत्महत्त्या पथकें" होतीं तशीं पथकें उधईच्या राज्यांत देखील असतात. उधईसारख्या क्षुद्र कीटकापासून तर जपानी लोकांनीं ही कल्पना उचलली नसेलना? पण रेसभरहि मागें हटणार नाहीं अगर शत्रूला एक पाऊलहि पुढें टाकूं देणार नाहीं अशा ह्रिरीनें उधईच्या राज्यांतले हे सैनिक नेहमीं लढत असतात. तांबड्या मुंग्या हा उधईचा अत्यंत प्रबळ शत्रू होय.

कामकरी उधयांच्याजवळ सैनिकांप्रमाणें बचावाचें कोणतेंच साधन नाहीं. सगळे कामकरी निःशस्त्र असतात. सैनिकांना अगदीं बारिक डोळे असतात पण कामकऱ्यांना तेहि नसतात. असलेच तर त्यांचा कांहीं उपयोग नसतो. कामकरीवर्गाला वसाहतींमधील बहुतेक सगळीं कामें करावीं लागतात. बांधकाम, बागकाम, अन्न मिळविणें, राणीनें घातलेलीं अंडीं सांठवून ठेवणें, त्यांच्यापासून तयार होणाऱ्या पिल्लांची निगा राखणें, सैनिकांना व इतरांना खायला घालणें, राजदंपतीची सेवा करणें वगैरे कामें कामकऱ्यांकडे सोंपविलेलीं असतात. या सर्व कामांकरितां कामकऱ्यांच्या निरनिराळ्या तुकड्या पाडलेल्या असतात, व प्रत्येक तुकडी आपलें ठराविक काम करीत असते. वारुळाचे सगळे भाग कामकऱ्यांतील गवंड्यांनींच तयार केलेले असताता. डागडुजी आणि दुरुस्तीचीं कामेंहि तेच करतात. वारुळाला एखाद्या ठिकाणीं भेग पडली तर गवंड्यांच्या चौफेर फिरणाऱ्या नजरेंतून ती सुटत नाहीं. गवंड्यांच्या तुकड्यापैकीं एक लगेच त्या ठिकाणीं दाखल होते व सैनिकांच्या संरक्षणाखालीं ती फट तावडतोब बुजवून टाकते.

उधया शाकाहारी आहेत. ज्या पदार्थांना आपण अन्नदृष्ट्या थोडीहि किंमत देणार नाहीं असे लांकूड, झाडाची साल, पानें, गवत, पाचोळा, कागद वगैरे पदार्थ त्यांचें अन्न होय. थोडक्यांत सांगायचें तर धातूंच्या वस्तूंखेरीज सगळे पदार्थ त्यांना चालतात. उधयांना उजेड सहन होत नाहीं म्हणून अन्न मिळविण्याकरितां कामकरी रात्रीं बाहेर पडतात. अन्नाची सोय वारुळांतहि केलेली असते. वारुळाच्या एका भागांत बागा तयार करून त्यांत कामकऱ्यांनीं आळंबीं (Mushrooms) लावलेलीं असतात. या बागांना "आळंब्यांच्या बागा" म्हणतात. पिल्लांना आळंब्याचा अन्न म्हणून विशेषतः उपयोग होतो. आळंब्यांच्या बागा नेहमीं सुस्थितींत ठेवण्याचें काम 'माळी पथक' करीत असतें. बागेच्या एका बाजूकडून एक चिंचोळें भुयार तयार केलेलें असतें. जमिनींत ज्या ठिकाणीं पाणी लागेल त्या ठिकाणापर्यंत तें खणीत नेलेलें असतें. साधारणपणें या चिंचोळ्या भुयाराची लांबी सत्तर ते शंभर फूट असते. ह्या जलाशयांतील पाणी माळीकाम करणाऱ्या उधया आपल्या तोंडांत थेंब थेंब घेऊन बागेला घालीत असतात. त्यांचा हा उद्योग रात्रंदिवस चालू असतो. सुमारें सत्तर फूट खोलीवर असलेल्या जलाशयांतील थेंबभर पाणी तोंडांत घेऊन बागेला आणून घालावयाचें हा केवढा प्रचंड उद्योग! पण अत्यंत निरलसपणें कामकरी तो करीत असतात. या कीटकांच्या उद्यमशीलतेचें जितकें कौतुक करावें तितकें थोडेंच होईल!




आकृति ३ री

वसाहतीमधील साफसफाईचें काम एका कामकरी पथकाकडे असतें. केव्हांहि पहा वसाहतीचा प्रत्येक भाग अगदीं स्वच्छ ठेवलेला असतो. कुठें कचरा नाहीं कीं अडगळ नाहीं! राणीचा महाल तर आरशाप्रमाणें स्वच्छ ठेवलेला असतो. राणीच्या शरीराचें आरोग्य सांभाळण्याचें काम देखील एका पथकाला करावें लागतें. पिल्लांचें संगोपन करायला वसाहतींत "बालगृहें" असतात. या ठिकाणीं 'दाया' त्यांची काळजीपूर्वक जोपासना करून त्यांनी लहानाचीं मोठीं करतात.

राणीचें काम फक्त अंडीं घालण्याचें असतें व अंड्यांपासूनच वसाहतींतील सर्व प्रजा—पंख असलेल्या उधया, सैनिक, कामकरी वगैरे—निर्माण झालेली असते. अंडीं फुटून जीं पिल्लें बाहेर पडतात तीं सुरुवातीला दिसायला अगदीं सारखीं असतात. मग प्रत्येक वर्गांतील व्यक्तींच्या शरीरांत दिसून येणारें रचनाभिन्नत्व या पिल्लांत केव्हां उत्पन्न होतें? कांहीं अंड्यांतून कामकरी, तर कांहींपासून सैनिक तर कित्येकांतून पंख असलेल्या उधयाच कां निर्माण व्हाव्या? सगळ्या अंड्यांतून एका वेळेला नुसते कामकरीच तर दुसऱ्या वेळेला केवळ सैनिक किंवा पंख असलेल्या उधयाच कां उत्पन्न होत नाहींत? असे अनेक प्रश्न या कीटकांच्या जीवनक्रमाचें निरीक्षण केल्यावर आपल्यापुढें उभे रहातात. पण या गोष्टी कशा घडून येतात याचा मनुष्याला अद्याप छडा लागलेला नाहीं. प्रजोत्पत्तीच्या बाबतींत आणखी एक आश्चर्यजनक प्रकार आढळून येतो. अंड्यांची निगा व शिशुसंगोपनाचें कार्य ज्यांच्याकडे असतें त्या कामकऱ्यांना, प्रत्येक वर्गांतील उधयांच्या किती संख्येची जरूरी आहे याची पूर्ण जाणीव असते आणि जरूरीप्रमाणें प्रत्येक वर्गाची तेवढीच संख्या हे कामकरी निर्माण करीत असतात. या सर्व गोष्टी उधईला अगदीं हुकमी कशा घडवून आणतां येतात हें गूढ मनुष्याला अद्याप उकललें नाहीं. कांहीं शास्त्रज्ञांचें मत असें आहे कीं, पिल्लांचें

अनुक्रमणिका

पोषण करतांना अन्नांत वारंवार फेरबदल करून, प्रत्येक वर्गाच्या शरीररचनेंत दिसणारा फरक 'दाया' घडवून आणीत असाव्यात. पण या मताला पुराव्याचें पाठबळ नाहीं. अद्याप तरी या सगळ्या गोष्टी रहस्यमयच आहेत.

उष्ण कटिबंधांत असणाऱ्या देशांत उधई आढळते. या देशांतील लोकांना तिच्या विध्वंसक उद्योगाची नव्यानें ओळख करून देण्याची फारशी गरज नाहीं. घराचें लांकूडकाम, कपाटें, खुर्च्या, पुस्तकें वगैरेंचा पाहतां पाहतां हे कीटक फडशा पाडतात. अव्याहतपणें चालू असलेलें या कीटकांचें हें विध्वंसनाचें काम पाहून पुष्कळदां वाटतें कीं हे कीटक नाहींसे कां होत नाहींत. यांची काय जरूरी आहे? कित्येक प्राणिजाति या पृथ्वीतलावर कांहीं काळ राहून नंतर कायमच्या नष्ट झाल्या आहेत. मग हे उपद्रवी कीटकच युगानुयुगें पृथ्वीच्या पाठीवर कां म्हणून टिकाव धरून राहिले आहेत? निसर्गाच्या गुंतागुंतीच्या पसाऱ्यांत हे कीटक कांहीं नियोजित उपयुक्त कार्य करीत आहेत कां? या किंवा अशा प्रश्नांना हमखास असें उत्तर मनुष्याजवळ आज तरी नाहीं. फार झालें तर एवढेंच म्हणतां येईल कीं, निसर्गानें त्यांच्या वाट्याला कांहीं तरी उपयुक्त कार्य दिलें असलेंच पाहिजे; आपल्या बुद्धीला तें आकलनीय नाहीं एवढेंच! निसर्गांत जर त्यांनें कांहीं काम नसतें तर [illegible] दया [illegible] न दाखवितां निसर्गानें त्यांना निष्ठुरपणें केव्हांच नाहींसें केलें असतें.



आकृति ४ थी

## टीपा

आकृति १—वारुळाचा आंतील भाग. चित्राच्या उजव्या बाजूला जलशयापर्यंत खोल गेलेलें चिंचोळें भुयार दाखविलें आहे. १ पंख असलेली उधई उडून दुसरीकडे जात आहे. २ "आळंब्यांचा बाग." ३ अंडीं सांठविण्याचें कोठार. ४ राणीचा महाल. ५ शिशुसंगोपनगृहें. ६ वारुळाला आवश्यक असणारी उष्णता उत्पन्न करण्याकरितां पाचोळा कुजत ठेवण्याची खोली. ७ जलाशयापर्यंत जाणारें चिंचोळें भुयार. कांहीं कामकरी पाणी घेऊन येत आहेत व कांहीं आणायला जात आहेत. ८ आळंब्यांचें बियाणें सांठवून ठेवण्याचीं कोठारें. ९ कामकरी डागडुजी करीत असतां भिंतीचें संरक्षण करणारे सैनिक.

आकृति २—उधईचीं वारुळें.

आकृति ३—उधईच्या राज्यांत आढळणाऱ्या कांहीं जाती. १ सैनिक. २ राणी मेल्यावर तिच्या जागीं स्थापन करण्याकरितां राखून ठेवलेल्या माद्यांपैकीं एक "भावी राणी" ३ कामकरी. ४ पंख असलेला नर.

आकृति ४—राणी आणि राजा.

[अनुक्रमणिका](#)




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# रेशम धागा

—रा. भि. जोशी

कारखान्यांतून घरीं येऊन दुपारचें जेवण केलें म्हणजे तास-अर्धा तास झोंप घ्यायची अशी वासुदेवची संवय होती. त्याप्रमाणें आजही जेवण उरकून झोंप घेण्यासाठीं म्हणून तो चारपाईवर पडला होता. पण डोकें जड झालें असून सुद्धां त्याला झोंप येत नव्हती. पलीकडे लाला सुलतानमलच्या आवारांत सूत-रंगारी काम करीत होते. त्यांची वडवड, चरकांवर सूत गुंडाळतांना त्याचा होणारा गुंईई—गुंईई आवाज, मधेंच वाऱ्याचा सोसाटा आला म्हणजे खिडकीबाहेरचें लिंबाचें झाड लवे त्याची सरसर, आणि तटाच्या बाहेरच्या वागेंत एखादा तांबट कुक्—कुक् करी त्याचा, तेलावर चालणाऱ्या पिठाच्या गिरणीसारखा आवाज, ह्यांमुळें त्याची झोंप चाळवली जात होती. पण खरें म्हणजे हेंही कारण नव्हतें. कारण रंगाऱ्यांची वडवड, चरकांचें गुंईई—गुंईई, वाऱ्याचा सोसाटा, आणि तांबटाचें कुक्—कुक् ह्या गोष्टी रोजच्याच होत्या.

आज त्याच्या मनाची चलबिचल झाली होती. जिथें रंगारी दिवसा काम करीत त्याच आवारांत आदल्या रात्रीं आसपासच्या कांहीं बायका होरी गाण्यासाठीं जमल्या होत्या. त्यांत जैतुननें—मेहतराणीच्या सुनेनें—'दुलहनिया छमाछम छमाछम चली' हें गाणें म्हटलें होतें; तें सारखें त्याच्या कानांत घुमत होतें. जैतुनच्या चालण्या बोलण्यांत एक ठसका होता तसा तिच्या गाण्यालाही एक ढंग होता. आणि 'दुलहनिया छमाछम' हें ती अशा खुबीनें म्हणत होती कीं जणूं कांहीं खरोखरच एखादी कोंवळी लाजाळू दुलइन पायांत पैंजण घालून छुमछुमत चालली आहे असें वाटावें. 'दुलहनिया छमाछम' च्या लकेरींमध्येंच जैतुनची गुलछडीसारखी लवचीक, सडपातळ अंगलटही मिसळून गेली होती. तिची ती शेलारी अंगकाठी, तिचा तो किंचित् उंच धारदार आवाज, आणि जरा अंगाला झोंका देऊन चालण्याची तिची ढब,—'दुलहनिया छमाछम' च्या स्वरांचा चढउतार, आणि तिच्या अंगाचा झोंका ह्यांवर हेलकावणांत त्याचें मन दंग झालें होतें. मग मध्येंच त्याच्या मनात आलें, मेहतरांच्या लेकी-सुना इतक्या गोऱ्या-भुऱ्या तिखट-तरतरीत कशा! आणि मग त्याला वाटलें, जैतुन किती झालें तरी मेहतराणीची बहू, आणि आपण दरंदाज मनुष्य. त्यांतून नुकतेंच आपलें लग्न झालेलें. आपण मनांतल्या मनांत कां होईना मेहतराणीच्या बहूकडे असें आशाळभूतपणें निरखून पाहणें बरें नव्हे—

तितक्यांत दाराची बाहेरची कडी वाजली. फुलवन्ती आली होती. दुपारीं येऊन भांडीं घांसायचीं आणि केरवारा करून जायचें असा तिचा क्रम होता. ती काम आटोपून गेली कीं त्याचीही परत कामावर जायची वेळ होत असे.

त्यानें उठून तिला दार उघडलें. आणि पुन्हां आपल्या खोलींत येऊन चारपाईवर पडून, मेहतराणीच्या सुनेकडे मनांतल्या कां होईना पण आशाळभूतपणें निरखून पाहणं बरें नाहीं असें मनाशीं म्हणत तो तिच्याकडे निरखून पाहत राहिला. ' दुलहनिया छमाछम ' चे चढउतार करणारे स्वर, आणि जैतुनची शेलारी अंगकाठी, यांच्यांत आतां फुलवन्तीचीही आकृति येऊन मिसळली. जैतुन मेहतराणीची सून तर फुलवन्ती गरीब विधवा मोलकरीण होती. जैतुन अठरा-वीस वर्षांची तर फुलवन्ती वर्ष दोन वर्षांनीं लहान असेल. जैतुन गुलछडीसारखी लवचिक सडपातळ तर फुलवन्ती फुलांच्या झेल्यासारखी गुबगुबीत. जैतुनची नजर कट्यारी सारखी कापीत जाणारी तर फुलवन्तीची पिसासारखी मऊ हळुवार. जैतुनचें हंसणें दुसऱ्यावर उपकार केल्यासारखें तर फुलवन्तीचें फुलांच्या उमलण्यासारखें स्वाभाविक. फुलवन्तीच्या वागण्या-बोलण्यांत एक बालिश कुतूहल असे. वासुदेव कधीं आरशासमोर उभा राहून केसांना तेल किंवा सदऱ्याला बटने लावीत असला तर ती हातांतलें काम टाकून त्याच्याकडे पाहत राही. त्यानें जर कधीं विचारलें,

" क्या देखनी हो फूलो, "

तर ती म्हणे,

" कुछ नहीं बाबूजी, योंही देखती हूं. "

अशा वेळीं ती कुठें जवळपास असली तर तिचा मऊ गुबगुबीत दण्ड किंवा आंत हातांत धेऊन दाबून धरावा असे त्याला वाटे.

' दुलहनिया छमाछम ' च्या लकेरी, जैतुनची शेलारी अंगकाठी, आणि त्यातच फुलवन्तीचे गुबगुबीत दण्ड, मनगटे, हात हीं सगळीं एकमेकांत मिसळून त्याच्या मनांत घोळत होतीं आणि तो त्यांतच रंगून या कुशीवरून त्या कुशीवर वळत होता.

भांडीं घरांत ठेवल्याचा आवाज झाला. आणि एकदोन मिनिटांतच त्याच्या खोलीचा केर काढण्यासाठीं फुलवन्ती आंत आली. तो डोळे मिटून पडून राहिला. तिच्या अंगाचा उग्र दर्प, आणि हातांतल्या कड्यांचा आवाज यावरून ती खोलीच्या कोणत्या भागांत आहे तें त्याला कळत होतें. थोड्याच वेळानं त्याच्या चारपाईखालून केर काढून घेण्यासाठीं ती चारपाईशी आली वाकली. तिनें आपला हात चारपाईच्या खुरावर ठेवल्याचें त्याला जाणवलें. त्यानें आपला हात तिच्या हातावर ठेवला आणि हळूंच बावरल्यासारखें केलें.

त्यानें तसें कां केले तिला कळलें नसेल. खुरावरून हात काढून घेऊन ती केर सारीत पलिकडे गेली. त्यानें डोळे किलकिले केले. ती पाठमोरी होती. हातांच्या हालचालीबरोबर तिचा गुबगुबीत दंड डुलडुलत होता. थोडा वेळ त्यानें तिच्याकडे पाहिलें. आणि मग जरा पुढें झुकून सहजच तिच्या दंडावर हात ठेवल्यासारखें केलें.

झटक्यासरिखा हात ओढून घेऊन ती उभी राहिली. आणि त्याच्याकडे वळून हलक्या पण तीव्र स्वरांत म्हणाली,

" छी ! बाबूजी यह क्या करते हो ? सरम नहीं आती ? मैं अभी—"

तो उठून बसला आणि जणूं कांहीं आपण झोपेंतच होतों असें भासवीत म्हणाला,

" अँ ? क्या हुआ फूलो ? "

" बाबूजी मैं नहीं जानती थी कि आप इतने वह होंगे. कितनी सरमकी बात है ! अभी चिल्लाई तो —"

फुलवन्ती बालिश भोळी असली तरी मूर्ख नव्हती हें त्याच्या तेव्हांच लक्षांत आलें. सुदैवानें दिल्लींतलीं भाड्याचीं घरें अशीं बांधलेलीं असतात कीं घरांत काय चाललें आहे तें बाहेरून किंवा दुसऱ्या घरांतून दिसत नाहीं. त्यामुळें त्याला जरा धीर होता. तो म्हणाला,

" माफ करो फूलो. न जाने मैंनें क्या किया. लेकिन किसीसे कुछ न कहना. यह लो. " असें म्हणून त्यानें तिला गादीखालून दोन रुपये काढून दिले. आणि पुढें म्हणाला, " बस देखो, किसीसे कुछ कहना मत. "

" बाबूजी. मैं कहूंगी तो नहीं किसीसे, लेकिन बडा बुरा काम किया. अब मैं आपके यहां कामपर न आऊंगी. अगर इसवक्त बीबीजी होती तो— ? "

" देखो, ऐसा न करो. कामपर आती रहो. आएन्दा कुछ न होगा. पर, मैंनें जो कहा तो ध्यानमें रखना."

खरोखरच वासुदेवची बायको जर त्यावेळीं तिथें असती, तर असा प्रकार झाला नसता. चारसहा महिन्यांपूर्वीच त्याचें लग्न झालें होतें. ती दिल्लींत त्याच्याजवळ दोन-तीन महिने राहिली असेल नसेल. तेवढ्यांत संक्रांतीच्या सुमाराला कांहींतरी निमित्तानें त्याच्या वडिलांनीं तिला घरीं बोलवून घेतलें होतें. तेव्हांपासून दिल्लीच्या लांबच्या ठिकाणीं, कोणी विशेष ओळखीपाळखीचें नाहीं असा तो एकटेपणानें दिवस काढीत होता. आरंभीं त्याला तें इतकें जाणवलें नाहीं पण सगळ्या गोष्टी सभेला लागल्यावर त्याच्या आयुष्याला रहाटगाडग्याचा एकमार्गीपणा आला आणि त्याला एकटेपणा फारच जाणवूं लागला.

त्यांतून वसंत ऋतूचे दिवस मोठे विचित्र असतात. हिंवाळ्यांत जरठ खराटे होऊन गेलेल्या पिंपळांतला जीवनरस सळसळूं लागून त्यांच्या फांद्याफांद्यांना डोळे फुटतात आणि त्यांतून तरुणींच्या गुलाबी गालांची आणि तांबुस ओंठांची अस्वस्थ आठवण करून देणारी रेशमासारखी लुसलुशीत आणि तांब्याच्या पत्र्यासारखी तकतकीत पालवी बाहेर पडते; आंब्याच्या मोहराच्या धुंद सुगंधानें वातावरण कोंदून जाऊन श्वासागणिक रक्त उसळूं लागतें; पिसाटलेले वारे चवताळलेल्या नागिणींसारखे फुसकारीत जमिनीसूरपट धांवूं लागतात; शेतांत मैलचे मैल सरसूंचीं पिवळीं धमक फुलें वाऱ्याच्या झोंक्यावर झुळझुळूं लागतात. मधूनच एखादी कोकिळा एकदां ह्या झाडावरून तर एकदां त्या झाडावरून कुहूऽऽ करून, विव्हल झाल्यासारखी ओरडते. आणि माणसाला अगदीं वेडावल्यासारखें होतें. कुणीतरी आपल्याजवळ असावें, त्यांच्याशीं आपण हितगुज करावें, अगदीं सामान्य गोष्टी अतिशय महत्त्वाच्या आणि गुप्त असल्यासारखें बोलावें, कुणाला तरी अगदीं जवळ घ्यावें, आणि कुणीतरी आपल्याला तसें घेऊं द्यावें असें वाटूं लागतें. अंगाला चावा घेणाऱ्या हिंवाळ्यांत किंवा अंग भाजून काढणाऱ्या उन्हाळ्यांत वाटत नाहीं. पण वसंतांत वाटतें.

तसें त्याला वाटत होतें. अस्वस्थ, हुरहुरल्यासारखें, जड-जड आणि हलकें-हलकें वाटत होतें. त्याला न कळत आणि न जुमानतां वाटत होतें. दिल्लीला वसंत ऋतु कसा असतो ह्याची जर त्याच्या वडिलांना कल्पना असती तर त्यांनीं त्यावेळीं सुनेला घरीं बोलावून घेतलें नसतें. आणि मग त्याचें मनही तसें उंडारलें नसतें. सावित्रीचा बांधा जैतुनसारखा सडपातळ आणि नीटनेटका नव्हता. तिचें नाक तितकें तरतरीत







अनुक्रमणिका

आणि जिवणी रेखीव, वळणदार नव्हती हें खरें. पण किती झालें तरी सावित्री त्याची बायको होती. मनांत आलें कीं, हात लांब करून तिच्या अंगाला स्पर्श करतां येत असे. मनांत आलें कीं, तिची इच्छा असो नसो, तिला जवळ घेतां येत असे, आणि मनांत आलें कीं, तिच्या कानाशीं कांहींतरी कुजबुजतां येत असे. शिवाय त्याला काय हवें नको तें आधींपासून ओळखून ती त्याच्या सुखाला जपत असे. असा हक्काचा, सुखाचा निधी जवळ असतांना त्याला जैतुन किंवा फुलवन्ती ह्यांच्याकडे, मनांतल्या मनांत का होईना, आशाळभूतपणें निरखून पाहण्याचें कधीं कारण पडलें नव्हतें.

पण आज सगळेंच कांहींतरी तिरपागडें झालें होतें.

त्यामुळें तो दुपारीं कारखान्यांत परत गेला तेव्हां तिथेंही त्याचें कामाकडे नीट लक्ष लागेना. कुणाजवळ तरी बोलून आपल्या मनावरचा भार हलका करावा तर त्याची फारशी कुणाशीं ओळख नव्हती. त्याच्याच कारखान्यांतल्या दीनानाथशीं काय तो कधींमधीं सुखदुःखाच्या गोष्टी बोले. पण त्या दिवशीं तेंही त्याला शक्य झालें नाहीं. एक तर त्या दिवशीं कारखान्यांत काम जास्त होतं. आणि त्याकडेही त्याचें नीटसें लक्ष लागत नव्हतें. त्यामुळें त्याला आपल्या वरच्या मुकादमाचें बोलणें वरचेवर ऐकून घ्यावें लागे. आणि त्याचा परिणाम म्हणजे त्याचा आणखी गोंधळ उडे. इथं ठाक-ठोक कर, तिकडचा स्पॅनर इकडे उचलून ठेव असें करीत त्यानं कसा तरी दिवस काढला.

संध्याकाळीं कामावरून बाहेर पडतांना दीनानाथ त्याला म्हणाला,

" क्यों वासुदेव, आज कुछ बेचैनसे दिखते थे. "

" कांहीं नाहीं. विशेष कांहीं नाहीं. "

" अरे यार, आम्हांला सांगत नाहीं ? पण मी जाणतों. माझीही तर तुमच्यासारखीच हालत आहे. "

" म्हणजे ? ".

" म्हणजे काय, आमचीही तर घरवाली मैवयाला गेली आहे. "

थोडेसे आढेवेढे घेतल्यानंतर वासुदेवनें त्याला दुपारची हकीकत थोडक्यांत सांगितली. त्यावर दीनानाथ म्हणाला,

" चला आज आपण कुठंतरी भटकायला जाऊं. "

" जाऊं या. आठाच्या अंदाजाला मी तुमच्याकडे येतों. आपण चांदणी चौकांत परोठा खाऊं अन् मग जाऊं कुठं तरी. "

परोठा गल्लींतल्या एका दुकानांत आलू परोठे खाऊन बाहेर पडत असतांना दीनानाथ म्हणाला,

" चला, आपण फूटा दरवाजाकडे जाऊं. तिथं ' शीरीं फरहाद ' लागलं आहे. "

" मीं पाहिलं आहे 'शीरीं फरहाद.' कंपनींत एकदोन मुली चांगल्या फक्कड आहेत. पण नाटक नको आज आपण सदर बाजाराकडे जाऊं या. "

" म्हणजे. हं ? " दीनानाथनें डाव्या नाकपुडीपर तर्जनी ठेवीत विचारलें.

" पाहूं तर खरं काय आहे तिथं तें. ऐकलंय् पुष्कळ. जरा तास-दोन तास भटकून येऊं."

" चला. आपल्याला काय कुठंतरी जायचं. "

" पण माझ्या मनांत एकच शंका येतेय् कीं, तिथं कुणी ओळखीचं भेटलं तर ? आणि आपण कांहीं त्या तशा ठिकाणीं अद्याप गेलों नाहीं कधीं. "

" तसं भ्यायचं कांहीं कारण नाहीं आपल्याला. " दीनानाथ म्हणाला.

" एकतर इथं दिल्लींत आपल्या विशेष ओळखीचं कुणी नाहीं. जे आहेत चार दोन लोक आहेत ते नवा बाजारांत नाहींतर नई दिल्लींत. ते कशाला यायला बसले आहेत सदरबाजारांत ? आणि समजा एखादा आला तरी तुम्हांला एक सांगून ठेवतों दारूच्या मैफलींत किंवा ह्या अशा ठिकाणी माणसं एकमेकांचीं बिंग कधीं बाहेर फोडीत नाहींत. आपण जाऊं तर खरं. "

सदर बाजारचा पूल ओलांडून कुतुबरोडला लागल्यावर पहिल्याच वळणावर ते उजवीकडे वळले. आंतल्या चौकांत चारी बाजूला ओळीनें खोल्या होत्या. एकएका दालनाच्या, दुकानासारख्या रस्त्यावर आलेल्या. कांहीं खोल्यांचीं दारें बंद होतीं. कांहींचें एक झडप उघडें होतें. आणि बाहेर दारखंब्याला कंदील टांगलेला होता.

आधीं त्यांना त्याचा अर्थ कळला नाहीं. त्यांना वाटलें बंद दारें रिकाम्या दुकानांचीं असतील. पण मग त्यांनीं पाहिलं, ज्यांना गिऱ्हाइकें मिळत त्या दिवा आंत घेऊन दार लावीत. आणि बाकीच्या एक झडप उघडें ठेवून बाहेर दिवा टांगून गिऱ्हाइकांची वाट बघत बसत. इतर सगळ्या बाजारपेठा बंद झाल्यानंतर उघडणारी आणि गजबजणारी ही बाजारपेठ पाहून त्यांना मोठी गंमत वाटली, आणि ते दारांच्या पुढून जाऊं लागले.

आपापल्या दारांतून किंवा दारासमोरच्या पायऱ्यांवर कुणी बायका बसल्या होत्या, कुणी उभ्या होत्या कळकट, हाडकुळ्या, सुकट, दोंदिलि, दांताड्या, कुणी सिगरेटचा तिखट कडवट धूर सोडीत होत्या; कुणी तंबाकूच्या पिचकाऱ्या टाकीत होत्या. कांहींच्या हातीं हुक्का होता. त्या स्वतःला इतरांपेक्षां विशेष प्रतिष्ठित समजत होत्या. आणि मधल्या चौकांतून त्या खोल्यांच्या समोरून मंडईत गिऱ्हाइकें हिंडावींत तसे करमणूक विकत घेऊं इच्छिणारे कुंजडे-कहार, ठेलेवाले कुलीवाले, फेरीवाले आणि खोमचेवाले हिंडत होते.

एका दारावरून जात असतांना त्यांच्या कानावर शब्द आले,

" आइये बाबूजी, माल देखिये ना ? "

त्यांनीं मागें वळून पाहिलें. पलिकडल्या दारांत बसलेल्या एका लंड बाईचा दण्ड हातांत धरून एक पुरभय्या चांचपून पाहत होता. रस्त्यावर जरा पुढें उभ्या असलेल्या आपल्या सोबत्याला तो म्हणाला,

" एक रुपया बताती है."

" अजी माल देखो न. " असें म्हणून त्या बाईनें आपला पदर खांद्यावरून सांवरून घेतला. त्यामुळें पदराखालचा भाग अधिक उघडा पडला. ती पुढें म्हणाली, " मालके दाम होते हैं."

" दोनों का रुपया लेती हो तो पूछो. " सोबत्यानें सुचवलें.

" अजी जाव भाय, बडी अठन्नी देनेवाले आये ! ऐसीही कोई सडी-पडी होगी सो मिलेगी. ऐसा माल आठ आनेमें मिलने लगा ! सूरत तो देखो. अठन्नी देरिये हैं. "

जरा पुढच्या बाजुनें, नाकीडोळीं नीटस, रंगानें उजळ पण दिसायला निबरट अशी एक बाई एका दारांत उभी होती. बिनबाह्यांचा ब्लाऊज, उंच टाचेचे बूट, ओठांना लाल रोगण, आणि गालांना गुलाबी-पूड अशी अगदीं अपटुडेट वेशभूषा होती तिची.

पांढरपेशा पोरगेलासा आणि जरा नवखाच दिसणारा एक गृहस्थ तिच्या दुकानाची पायरी चढत होता. त्याला तिनें विचारलें,

" क्या चाहिये ? "

" यही—दाम पूछते हैं, " त्यानें जरा दबकत उत्तर दिलं.

" कैसे दाम ? "

" यही—अपने—तुम्हारे..."

तिनें एकदां त्याच्याकडे खालपासून वरपर्यंत नीट न्याहाळून पाहिलें, आणि त्याचा रागरंग ओळखून ती म्हणाली,

" कितने पैसे लाए हो ? "

त्यानें एक पांचाची नोट दाखविली.

" आइये, आइये, " असें म्हणून त्याला आंत घेऊन तिनें दार बंद केलें.

" चला पुरे झालं. आपली गंमत पाहण्याची हौस फिटली. " वासुदेव म्हणाला.

" आपण अजमेरी दरवाज्याकडे जाऊं, चलतां ? इथल्या बायका गलिच्छ आहेत अगदीं. तिथल्या बऱ्या आहेत म्हणतात ! पहा. म्हणत असाल तर.—"

" माफ करा- हें इथं पाहिलं तेवढं पुरे आहे. आणखी पाहायची इच्छा नाहीं. "

एवढें बोलून तो तिथून झपाट्यानें बाहेर पडला, दीनानाथही त्याच्या मागोमाग निघाला.

वासुदेव घरीं पोंचला तों मध्यरात्र झाली होती. त्याचा सगळा दिवस वाईट गेला होता. त्याला अगदीं उबगल्यासारखें झालें होतें. अगदीं कंटाळल्यासारखा होऊन, निजण्याची तयारी करून तो चारपाईवर पडला. सगळीकडे सामसूम होतें. फक्त पलिकडे लाला सुलेतानमलच्या आवारांत होळीसाठीं आसपासच्या बायका जमल्या होत्या. त्यांतून जैतुनचा धारदार चढा आवाज ढोलक्याच्या तालाबरोबर हवेंत उठत होता. पण तिकडे त्याचें लक्ष नव्हतें- दूर कुठें तरी कांहीं गाणें चाललें आहे एवढेंच त्याला क्षीणपणें जाणवत होतें पण त्याला झोंपही येत नव्हती. जैतुनची शेलारी अंगकाठी, आणि फुलवन्तीची फुलांच्या झेल्यासारखी अंगलट त्यावेळीं त्याच्या डोळ्यांसमोर येत नव्हती. रोज रात्रीं अंथरुणावर पडलें म्हणजे तो निजायच्या आधीं आपल्या बायकोची आठवण करीत असे. पण त्यावेळीं त्याला तिचीही आठवण झाली नाहीं.

त्याचें मन सदर बाजारांत पाहिलेल्या त्या दृश्यांनीं घेरलें होतें. तिथे पाहिलेल्या बायकांपैकीं एकीचें दोंद, दुसरीचें दांताड, तिसरीचें थलथलीत स्तन, चवथीचें अर्ध-भरल्या पोत्यासारखे फतकल, पांचवीचे शुष्क भकास डोळे, आणि शेवटीं पाहिलेल्या बाईचा तो विटल्या घाणेरड्या कापडाचा ब्लाऊझ हीं सगळीं एकमेकांत गुरफटून गेलीं होतीं. आणि त्यांच्या विकृत, विरूप आकृति एखाद्या दुःस्वप्नासारख्या त्याला भेडसावीत त्याच्या डोळ्यांसमोर नाचत होत्या. जैतुनची लवचिक अंगकाठी, फुलवन्तीची गुबगुबीत अंगलट ह्यांना तिथं वाव नव्हता. इतकेंच नव्हे तर सर्वांगांतून गोड लहरी नाचवणारीं, स्पर्शसुखाच्या परिस्तानांत नेणारीं स्त्रीसहवासाचीं त्याचीं सारींच सुवर्ण स्वप्नें सदर बाजारच्या त्या दुःस्वप्नानें त्यावेळीं पार नेस्तनाबूद करून टाकलीं होतीं.

---




> "सोरटी सोमनाथाचें पुनरुज्जीवन करणें म्हणजे ही असलेली नेट वाढविणें व नवीनच मिळालेल्या स्वातंत्र्याच्या अगदीं घरांतच शत्रु निर्माण करणें नाहीं काय!"

आमच्या हिंदू लोकांच्या अंगांत एक हजार वर्षांपासून भिनलेले दोष काढून टाकण्याची व नवे गुण शिकण्याची इच्छा आमच्यांतील सनातनी, जैन वगैरे लोकांना अद्याप होत नाहीं. हें लक्षण चांगलें नव्हे. पाकिस्तान हिंदुस्थानापासून कायमचें अलग झालें व हिंदुस्थानचे दोन तुकडे झाले ते सध्यांतरी कायमचे असें वाटतें. या पाकिस्तानाच्या सुरुवातीस जवळजवळ आज एक हजार वर्षें होतील. पाकिस्तानची सुरुवात गझनीचा सुलतान महंमुद याच्या सोरटी सोमनाथावरील स्वारीनें झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण त्यावेळेपासून हिंदुस्थानावर स्वाऱ्या झाल्या व त्यांत बहुतेकांना यश आलें इतकेंच नव्हे तर पहिल्यानें सिंध व त्याच्यामागून हिंदुस्थानचे इतर भाग परकीयांच्या ताब्यांत जातां जातां हिंदुस्थानचा सर्व प्रदेश परतंत्र व दास्यमग्न झाला, तो परकीयांच्या गुणामुळें असेल पण स्वकीयांच्या दोषामुळें मुख्यतः परकी सत्तेखालीं गेला यांत बिलकुल संशय रहात नाहीं. याप्रमाणें मराठी राज्य इंग्रजांच्या हस्तगत होण्यास आपसांतील फूट, आळस आणि थोडक्यांत समाधान मानण्याची वृत्ति हीच मुख्यतः कारण झाली. त्याचप्रमाणें भरतखंडाचें परकीय साम्राज्यांत विलीनीकरण होत होतें हे आपणांस इतिहासावरून दिसून येतें.

सोरटी सोमनाथ गझनीच्या महंमुदानें केवळ एका स्वारींत नेस्तनाबूद करून टाकला. सोमनाथाच्या रक्षणाकरितां अनेक रजपूत राजे जमले होते परंतु मुसलमान जेत्यांनीं आपल्या सैन्यापुढें गाई व बैल यांचे मोठाले कळप ठेवल्यामुळें गोरक्षण इच्छिणारे ते रजपूत राजे एकही घाव न घालतां नामोहरम होऊन पळाले अशी ऐतिहासिक आख्यायिका आहे. आतां सोरटी सोमनाथाचें पुनरुज्जीवन करण्याचें घाटतें आहे. त्याच्या सुरुवातीस सौराष्ट्रानें गोवधबंदीचा कायदा जारी केलेला आहे. त्यामुळें एखाद्या नवीन महंमुदानें कोट्यावधी रुपये घेऊन तो हिंदूंचा नवीन देव हिंदूंना विकून 'बुत् फरोष' म्हणजे मूर्तिविक्रेता होण्यापेक्षां 'बुत् शिकन्' म्हणजे मूर्तिभंजक होणें आपल्यास पसंत आहे असें म्हटलें तर त्याचा काय दोष?

सोमनाथाची पुनरुज्जीवित मूर्ति अगदीं जुन्याप्रमाणें ठेवावयाची असें त्या मूर्तीचे चालक आज म्हणतात. पूर्वीची मूर्ति अधांतरी होती अशी एक आख्यायिका आहे. ती मूर्ति फोडतांच त्यांतून कोट्यावधी रुपयांचें जवाहिर व संपत्ती निघाली असा ऐतिहासिक उल्लेख आहे. कवि "साद" यानें देशोदेशींच्या गोष्टी सांगितलेल्या आहेत. त्यांतच आपण सोमनाथास गेलों होतों असें तो वर्णन करतो. सोमनाथाचे पूजक ब्राह्मण अगदीं ओंगळ असत व त्यांच्या कांखेतून घामाची घाण येत असतांही गंधाचे टिळे लावून ते सोमनाथाच्या पूजेस जात असत असें तो वर्णितो. त्याचप्रमाणें एक दोरी ओढून ते सोमनाथाच्या मूर्तीकडून उजव्या हाताचा आशीर्वाद देत व भक्तांना फसवीत असत असें तो म्हणतो. या एकंदर जुन्या वर्णनापैकीं सोमनाथाचे भक्त कोणकोणत्या गोष्टी पुन्हा अंमलांत आणणार? कारण जुने उल्लेख पाहून ती सोमनाथाची मूर्ति अगदीं पूर्वीप्रमाणें जशीच्यातशी करण्याचा त्यांचा उद्देश आहे.

सर्वांत आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे एका काळीं ज्यांचा मला निकट परिचय थोडे दिवस आला होता, त्या काकासाहेब गाडगीळांसारख्या भावनाशून्य व वस्तुस्थिति पाहून त्याप्रमाणें वागणाऱ्या पुढाऱ्यानें हा पुनरुज्जीवनाचा घाट काढला आहे, असें खुद्द त्यांच्याच लेखावरून आढळतें. हा लेख कांहीं महिन्यांपूर्वीं "विविधवृत्त" मध्यें प्रसिद्ध झाला होता. एका काळीं मदन मोहन मालवीयांच्या चिरंजीवानें एका विशिष्ट प्रसंगीं "ब्राह्मण" म्हणून घृतकुल्या मधुकुल्या चापण्यास आमंत्रण केलें असतां "बाबा, मी ब्राह्मण आहे कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. तूं म्हणतोस तर मी येतों. मी अजून आंघोळ केलेली नाहीं, माझ्या गळ्यांत जानवें असतें किंवा नसतें — बहुधा नसतेंच." असें त्याला सांगून केवळ त्याच्या आग्रहामुळेंच आपण ते आमंत्रण स्वीकारलें अशी हकीकत एकावेळीं काकासाहेबांनीं आम्हास सांगितल्याचें मला पक्कें स्मरतें व त्यावरून भावनांचा अभिमान धरून या बदलत्या काळास अनुचित अशी गोष्ट त्यांच्याकडून कधींही होणार नाहीं असें मला वाटत होतें. परंतु अगदीं अलीकडल्या त्यांच्या कित्येक लेखावरून त्यांनाही सुप्त भावना जागृत झाल्या असें वाटूं लागलें व सोरटी सोमनाथाचें पुनरुज्जीवन करण्याचा घाट त्यांनींच काढला असें ते म्हणतात त्यावरून या जागृत भावनांचा कळस झालेला दिसतो.

सोरटी सोमनाथ तर राहूंद्याच परंतु त्याहून जुनीं अशीं ट्रॉय, कार्थेज वगैरे सुप्रसिद्ध शहरें कित्येकवेळां बेचिराख झालीं. व त्यांना पूर्वींचें वैभव मिळालें नाहीं असें इतिहास सांगतो. रोम, कॉन्स्टॅन्टिनोपल वगैरे शहरें पुनरुज्जीवित झालीं खरीं, परंतु त्यांचें पहिलें वैभव कायमचें गेलें. कॉन्स्टॅन्टिनोपलचें इस्तंबूल होऊन राहिलें व तें हल्लीं तुर्कांजवळ असलें तरी त्याचें पहिलें महत्त्व साफ गेलें हें जाणून टर्कींनेंच तेथून आपली राजधानी हलवून दुसरीकडे अंकारा येथें नेली. हा केमालपाशाचा खरा गुण आम्हांस पूज्य वाटतो. केमालपाशाचें व आमच्या पुढाऱ्यांचें वर्तन यांत हा इतका फरक आहे. प्रत्यक्ष श्रीकृष्णानें मथुरेसारखें अद्याप टिकून असलेलें परंतु शत्रूंनीं ग्रासिलेलें राजधानीचें शहर सोडून द्वारका आपली राजधानी केली. या इ. स. पूर्वी तीनशें वा तीन हजार वर्षांपूर्वींच्या उदाहरणावरून आपणांस काय धडा मिळतो?

गोपालकृष्णानें गोवधबंदी सुरू केली असें हल्लीं मानण्यांत येतें. त्या कृष्णाला मथुरा आणि व्रज हीं दोन्हीं सोडून द्वारकेस जावें लागलें. श्रीकृष्णानें गोवधबंदी सुरू केली होती असा उल्लेख आपणांस आढळत नाहीं. उलट धेनुकासुरासारख्या बैलाचें रूप घेणाऱ्या राक्षसाला त्यानें बिनदिक्कत ठार केलें व हा गोवध त्याला दोषास्पद आहे असें यांचे कित्येक नम्रशील भक्तदेखील मानीत आले. परंतु भावनेला यत्किंचितही मान न देतां कालानुरूप वर्तन करावयाचे हेच गुण आपणास निदान

श्रीकृष्णापासून केमालपाशापर्यंतच्या मुत्सुद्यांगोठायीं आढळून येतो. सोमनाथाचें पुनरुज्जीवन याच्या अगदीं उलट व केवळ भावनानुकूल कसें आहे तें पाहूं.

हिंदुस्थानचें आतां अवशेष राहिलेलें संघराज्य हें फुशारकी मारतें कीं तें "सेक्युलर" आहे. 'सेक्युलर' या शब्दाचा मराठी अर्थ हल्लीं करतात त्याप्रमाणें 'धर्मातीत' आहे. परंतु तो योग्य नाहीं, कारण हें राज्य सर्व धर्मांच्या पलिकडे गेलेलें नसून अगदीं अज्ञानमूलक धर्माच्याही अलीकडेचें असें पूर्णपणें ऐहिक गोष्टींशी संबद्ध आहे. 'सेक्युलर' या शब्दाचें भाषांतर पेशवाई मराठींतील समर्पक व अर्थपूर्ण, परंतु हल्लीं नागव्या वाटणाऱ्या व त्या शब्दाला नेसविण्याकरितां दोन फुल्या वापराव्याच्या अशा धर्म ×× या शब्दानें पूर्ण मराठी होईल. या धर्म ×× हिंदुस्थानच्या संघराज्यांत सर्व धर्मांना सारख्या रीतीनें वागविण्यांत यावयाचें आहे अशी प्रतिज्ञा करूनही पहिलें निमसरकारी व निमधार्मिक कृत्य म्हणजे गझनीच्या महमुदाच्या सोमनाथावरील स्वारीची आठवण करून देणारे व त्यामुळें हिंदुमुसलमानांची तेढ कायम करणारें नाहीं काय? आज सोमनाथाचें देऊळ पडित आहे. त्यांत मूर्ति नाहीं. परंतु सोमनाथाच्या नांवावरून व त्या जागेच्या एकंदर ठेवणीवरून पूर्वी जर मूर्ति असलीच तर ती दर्शनी होती व मूळ सांबाची पिंडी होती. ती बहुतेक स्वयंभू असेल असें वाटतें. बारा जोतिर्लिंगापैकीं मुंबईच्या वाळुकेश्वराची पिंडी स्वयंभू असून हल्लीं जेथें गव्हर्नराचें वास्तव्य असतें त्या गव्हर्मेंट हाऊसच्या प्राकारांत ती होती. पोर्तुगीज लोकांनीं ती हिंदूंचा बिभत्स देव म्हणून ती पिंडी फोडून टाकली. पुढें कांहीं दिवसांनीं राम कामती या सारस्वत गृहस्थानें राज्यकर्त्यांची परवानगी घेऊन त्या पिण्डीचे तुकडे एकत्रित करून हल्लींच्या बाण गंगेजवळील वाळुकेश्वराच्या देवाल्यांत नेऊन ठीकठीक स्थापन केले व अजूनही बारा जोतिर्लिंगाची यात्रा करणारे यात्रेकरू हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतून येऊन या स्वयंभू वाटणाऱ्या पिण्डीचें दर्शन घेतात व तिची पूजा करतात. सोमनाथाचें रक्षण करणारा भक्त याप्रमाणें निघाल्याचें ऐकींवत सुद्धा नाहीं व हल्लीं कोणत्याही स्वयंभू पिंडीचें तेथें अस्तित्व नाहीं. हिंदुस्थानच्या संघराज्यानें ज्याप्रमाणें कायद्याच्या एका फटकाऱ्यासरशीं बहुपत्नीकत्वाची अनादि चाल, आज सुधारलेल्या देशांत लाजिरवाणी समजली जाते म्हणून, नाहींशी करून एकपत्नीत्व हाच धर्म प्रचलीत केला, त्याप्रमाणें इतरांस बिभत्स वाटणारी ही लिंगपूजाही जर कायद्यानें बंद केली तर ते योग्य होणार नाहीं काय? निदान ज्या ठिकाणीं स्वयंभू किंवा इतर प्रकारचें लिंग नाहीं अशा सोमनाथाच्या देवळांत नवीन लिंगाची स्थापना करणें गैर आहे. हल्लीं खानापुरास स्थापन केलेलें चक्रवर्ती लिंग मूळ एका साहेबानें तयार करून अमेरिकेंस एका प्रदर्शनांत पाठविलें होतें. तीं लिंगाची कल्पना बिभत्स आहे म्हणून त्यास प्रदर्शनांत स्थान न देतां तें परत पाठविण्यांत आलें व अनेक वर्षांनीं अगदीं अलीकडेच खानपूर येथील संकेश्वर मठाच्या सारस्वत स्वामींनीं त्या लिंगाची खानापूर मठांत अगदीं गाजावाजानें स्थापना केली ती योग्य म्हणतां येईल. परंतु सोमेश्वराच्या देवळांत अशा लिंगाची स्थापना करणें म्हणजे हिंदु लोकांना आधुनिक सुधारलेल्या एकेश्वरवादी किंवा निरीश्वरवादी राष्ट्रांच्या उपहासास पात्र करणें नाहीं काय?

अगोदर मूर्तिपूजा Heathen किंवा Pagan वृत्तीचा अवशेष असें सुधारलेल्या राष्ट्रांत अगदीं मूर्तिपूजक रोमनकॅथॉलीक लोकांत सुद्धां समजलें जातें. एखाद्या मुलीनें जर हिंदुधर्म न सोडणाऱ्या गृहस्थाशीं लग्न केलें तर तिनें Heathen (खेडवळ अडाणी) नवरा केला असें कॅथॉलीक किरिस्ताव सुद्धां समजतात. मूर्तिपूजा—आमच्याकडील साधुसंतांनीं सुद्धां गौण मानली आहे. मातीचें पार्थिव लिंग करून त्याची पूजा केल्यास ती त्या मातीला पोंचत नाहीं तर त्या मातीनें निर्दिष्ट केलेल्या शंकररूपी ईश्वरास पोंचते असें तुकाराम महाराज म्हणतात; परंतु हा पर्याय काढलेला आहे. हें तत्त्वज्ञान मूर्तिभंजकांना पटणारें नाहीं. आज एक हजार वर्षें सोमनाथाच्या दगडी भिंतींत मूर्तीपूजा चालूं न देणाऱ्यांचें राज्य होतें व आजही सोमनाथाच्या अगदीं नजीक निकटवर्ती पाकिस्तानच्या मूर्तिभंजक मुसलमानांचें राज्य आहे व घडोघडीं त्या राज्याशीं आमचा वाद होतो आहे. सोमनाथाचें पुनरुज्जीवन करणें म्हणजे ही असलेली तेढ वाढविणें व नवीनच मिळालेल्या स्वातंत्र्यास अगदीं घरांतच शत्रु निर्माण करणें नाहीं काय? लियाकत अलीखान या पाकिस्तानच्या आजकालच्या चालकानें ईदसारख्या सणाची संधि साधून विषारी प्रचार नुकताच केला. तशा प्रचारास खाद्य पुरविणें सोमनाथाच्या पुनरुज्जीवनानें होणार नाहीं काय? "छातीचा कोट असेल त्यास मातीच्या कोटाची जरूर नाहीं. ते स्वतःचें संरक्षण सहज करतील." असें शाहूमहाराजांनीं पुण्याची तटबंदी करणाऱ्या नानासाहेब पेशव्यास सांगून पाठविलें. परंतु छातीचा कोट असलेलें पुणें, मातीची प्रचंड भिंत असलेला चीन देश किंवा दगडाच्या भिंतीआड स्वतःचें रक्षण करूं पहाणारा रोमन राज्यांतील ब्रिटन व इतर अनेक देश यांचा अनुभव इतिहास सांगतो. हे कोट देशाचें रक्षण न करतां उलट शत्रूंना ते कोट फोडून येण्यास उत्तेजन देतात. सोमनाथाच्या दगडी भिंती व त्याच्या दक्षिणेकडील दगडी किल्ला हाच धडा शिकवीत आहे. त्याकडे आमच्या पुढाऱ्यांनीं दुर्लक्ष करावें काय?

मुसलमान, ख्रिश्चन वगैरे लोकांची गोष्ट सोडली तरी हिंदुस्थानांत पूर्वापार चार्वाक वगैरे निरीश्वरवादी झाले आहेत. आजही मूर्तिभंजकपणांत अभिमान मानणारे कित्येक हिंदु आहेत. कायद्याच्या एखाद्या फटक्यासरशी सोमनाथाची नवीन मूर्ति समुद्रस्तुप्यंतु होण्याचा संभव नाहीं काय?

सोमनाथाचें पुनरुज्जीवन करावयाचें तर पूर्वीच्यासारखी मूर्ति किंवा देऊळ यांची कांहींच गरज नव्हती. सोमनाथाच्या पूर्वीच्या देवळामागें "भाटकुंड" या नांवाचे एक कुंड अजून आहे त्या ठिकाणीं श्रीकृष्णाचे देहावसान झाले असें म्हणतात. कृष्ण हा मानवी पूर्णावतार समजला जातो. सर्व मानवी गुण व दोष त्याच्या चरित्रांत पूर्ण उत्कटतेनें दिसून येतात. कृष्णाचें कार्य यशस्वी झाले कीं अयशस्वी झाले हा एक गहन प्रश्न आहे कृष्णानें कामरुपदेशांत म्हणजे हल्लींच्या आसामच्या अगदीं टोकास स्वारी करून तींत यश मिळवले परंतु शत्रूंनीं ग्रासलेले मथुरेचे राज्य त्याला त्या तेजोभूमींत निर्वेधपणें कायम करितां आलें नाहीं. सरते शेवटीं त्याला सोळाहजार बायका घेऊन द्वारकेसच कायम मुक्काम करावा लागला. श्रीकृष्णाचें कार्य यशस्वी झालें किंवा नाहीं या प्रश्नाचें उत्तर श्रीकृष्णानेंच दिलें. पण तें उत्तर उघड उघड अनिश्चित असून त्यांतून वाटेल तो अर्थ काढतां येतो. त्याची हकीगत मनोरंजक व बोधप्रद असल्यामुळें येथें द्यावीशी वाटते.

कौरव व पांडव यांच्या युद्धाला सुरवात होणार इतक्यांत उत्तंक नांवाचा ऋषी फार घाईच्या, जरूरीच्या व लांबच्या प्रवासास निघाला होता. आपला प्रवास आटोपून तो येतो, इतक्यांत

भारतीय युद्ध आटोपून कृष्ण द्वारकेस स्वगृहीं जातांना त्याला भेटला व त्यानें कृष्णाला विचारलें " मी लांबच्या प्रवासाला निघालों. कौरव आणि पांडव यांच्यावाजूनें सर्व भारतीय क्षत्रियांचें युद्ध जुंपणार व घोर संहार होणार अशी बातमी होती. पण त्यांचा समेट करण्यास तुझ्यासारखा अवतारी पुरुष शिष्टाई करणार असें मी ऐकलें होतें. कृष्णा, त्या बाबतींत काय झालें? तूं यशस्वी झालास ना? दोन्ही विरुद्ध पक्षाचा समेट घडवून तो संहार तूं टाळलास ना!" कृष्णानें उत्तर दिलें " मी प्रयत्न केला त्यास यश आलें नाहीं. एकंदर वीस अक्षौहिणी क्षत्रिय या युद्धांत मेले. फक्त पांच पांडव आणखी दोघे तिघे जण राहिले. अभिमन्यु, घटोत्कच वगैरे पांडवांचीं मुलें देखील या युद्धांत कामास आलीं. कौरव तर एका खेरीज सर्वही मेले. त्यांत दुर्योधन दुःशासन वगैरे अगदीं घोर यातना होऊन मेले!"

ते ऐकून उत्तंक ऋषींनीं कांहींएक न बोलतां आपल्या हातांत पाणी ओतुन घेतलें. ते पहातांच कृष्ण म्हणाला कीं " तुझा मला शाप देण्याचा विचार दिसतोय, दे बापडा. गांधारीनें मला—सर्व यादव वंशाला शाप दिला आहे त्याहून तुझा शाप भयंकर असणार नाहीं. परंतु हा शाप देऊन तूं मात्र मोठ्या कष्टानें मिळविलेलें पुण्य घालवून बसणार त्यापेक्षां अगोदर माझें ऐकून घे, व नंतर तुला वाटेल तसें कर."

उत्तंक ऋषि जरासा शांत होऊन म्हणाला " बोल काय ते!"

कृष्ण म्हणाला " अगोदर मला सांग कीं तूं मला मानव समजतोस कीं देव समजतोस? जर तूं मला मानव समजत असशील तर युद्ध टळावें म्हणून जितकें कांहीं मनुष्याला शक्य होते तें सर्व मी केले, परंतु त्यांत मला यश आलें नाहीं व शेवटीं हें घनघोर युद्ध झालें—वरें तूं मला देव समजत असशील तर या देवाचा—म्हणजे माझा—कांहींतरी गूढ हेतु असला पाहिजे. तो तुझ्यासारख्या मनुष्याला सांगूनही पटणार नाहीं हेंच माझें उत्तर."

हें ऐकतांच उत्तंकनें हातांतील पाणी फेकून दिलें व तो निमूटपणें तेथून आपल्या कामास चालता झाला.

या कृष्ण अवताराचा उद्देश काय असावा याचा तर्क करण्यापलीकडे आम्हांलाही कांहीं करतां येत नाहीं. परंतु पांडव व यादव यासुद्धां सर्व क्षत्रियांचा संहार झाल्यामुळें हिंदुस्थानांत शकांचीं गणराज्यें स्थापन झालीं आणि वैभवास चढलीं. याच एका राज्यांतून शाक्य-यमुनी बुद्ध हा प्रकट झाला. कर्मण्येवाधिकारस्ते ' हें कृष्णाचे वचन त्यानेंच अगदीं साध्या शब्दांत सांगितलें. " माझ्या शब्दावर विश्वास ठेव. माझें वचन हा धर्म समजून त्याप्रमाणें चाला व तुमचा अखेरचा तरणोपाय तुमच्या स्वतःच्या एकवटलेल्या शक्तींत आहे, हें ओळखा " हा भगवान् बुद्धाचा अगदीं साधा संदेश होता. कृष्णाच्या साध्या वचनावर ज्याप्रमाणें माध्व-भाष्य शांकरभाष्यापासून गीतारहस्यापर्यंत अनेक ग्रंथ होऊन शेवटीं त्याचे साधे सांगणें अगदीं क्लिष्ट झालें. त्याचप्रमाणें बुद्धाचा उपदेश विद्वानांनीं त्याचे निरनिराळे अर्थ करून महायान हीनयान वगैरे पंथ निर्माण करून, त्याचे शिष्य म्हणविणाऱ्यांना अगदीं विकट करून ठेविला. देवाचें अस्तित्व आहे वा नाहीं या प्रश्नाची आपणांस बिलकुल गरज नाहीं असें सांगणाऱ्या बुद्धाला देवाचा अवतार बनविलें. यज्ञाकरितां हिंसा करूं नका, पोटाकरतां करावयाची असेल तर खुशाल करा असें सांगून डुकराच्या मांसाची कढी न पचल्यामुळें जो बुद्ध मरण पावला त्यालाच त्याच्या हिंदुस्थानांतील शिष्यांनीं पूर्ण अहिंसेचा प्रचारक ठरविलें. हिंदुस्थानाबाहेर मात्र मासे व मांस यांचे भक्षण बुद्धानुयायांकडून होतें. चीनांत व जपानांत तर झुरळीं उंदीर आणि बेडूक यांचे मांस फार स्वादिष्ट म्हणून बुद्धानुयायी खातात, असें ऐकतों. असो. भगवान् बुद्धानें ज्याचा उपदेश आशिया खंडात फैलावला आणि संघामध्यें एकंदर शक्ती आहे असा उपदेश केला त्या भगवान कृष्णाचें सोमेश्वर हे स्मशान म्हणतां येईल. ख्रिश्चन लोकांच्या स्मशानाप्रमाणें हें स्मशानही वृक्षराजीनें वगैरे अत्यंत रमणीय करतां येण्यासारखे आहे तेथें श्रीकृष्ण, बुद्ध व महंमद गझनीसुद्धां जगास मान्य झालेल्या मूर्तिपूजक आणि मूर्तिभंजक व्यक्तींचे पुतळे उभारून ती जागा अनेक संस्मरणीय प्रसंगांची आठवण देणारी अशी करतां येण्यासारखी आहे. सोमनाथाचें असलें पुनरुज्जीवन खरेंखुरें धर्म ×× आणि देशास हितकारक असें होईल. याच्या उलट सोमनाथाची जुन्याप्रमाणें मूर्ति आणि तिची पूजा व ती करणारे केवळ मूर्तिपूजक यांचे तेथें स्थान म्हणजे या नवीनच स्वातंत्र्य मिळालेल्या हिंदुसंघाला एक भीतिस्थान आणि निरनिराळ्या मताच्या व धर्मांच्या लोकांत वाढ भाजविणारें स्थान होऊन राहील.

सोमनाथाचे दरवाजे म्हणून तेथें जे दरवाजे उभारण्यांत देणार आहेत ते वस्तुतः सोमनाथाचे नसून हिंदू शिल्पकलेचेही नमुने नाहींत. लॉर्ड एल्जिन या व्हॉइसरॉयनें केलेल्या काबूलवरील स्वारीचे स्मारक म्हणून त्यानें हे दरवाजे हिंदुस्थानांत आणून टाकले व ते सोमनाथाचे दरवाजे आहेत अशी भूमिका पसरून दिली. या दरवाज्यामुळें इंग्रजांच्या येथील सार्वभौमत्वाचें हिंदुस्थान व पाकिस्तान यांच्या जुन्या व हल्लीं नष्ट झालेल्या गुलामगिरीचे मात्र स्मारक होणार आहे. एकंदरींत अशा नकली गोष्टींचो जोड देऊन जुने म्हणून सोमनाथाचें पुनरुज्जीवन करणें आजच्या पुनरुज्जीवित स्वतंत्र भारताला साजेसें नसून उलट कांहींसें घातक आणि अपमानकारक होणार आहे.

सरदार वल्लभभाई पटेल आणि काकासाहेब गाडगीळ यांसारख्या पुढाऱ्यांनीं या गोष्टींचा फेरविचार करावा आणि सोमनाथाची पूर्वीची जुनी व्यवस्था पुन्हा जिवंत करूं नये ही माझी विनंती त्यांच्या कानीं पोहोंचविणारा व ती फलद्रूप करणारा जर माझा समान धर्मीय मला भेटला तर या लेखाचा खरा उपयोग झाला असें समजून मी स्वतःला धन्य मानीन.

अरे-मार, मार-दुसरी गोळी. पहिली त्याला येऊं गेलेली दिसत नाहीं.

## रु. १००० बक्षीस

खालील अभिप्राय खोटे आहेत हें सिद्ध करणारास रु. १००० बक्षीस देईन.

पत्र नं. १०७६-सीलबंद पाकिटाची बिनचुक उत्तरें पाहून तुमच्या दैविशक्तीबद्दल मला फारच अचंबा वाटला.-दाव्हरेकर

पत्र नं. १०७४-उत्तरें वाचून माझें पूर्ण समाधान झालें. -मि. काळे

पत्र नं. १०१४-मनपसंत मुलीशी लग्न झालें. -मि. नाखवा

पत्र नं. १६४९-दोन महिन्याचे आंतच सुस्वरूप व भाग्यवान मुलीशीं लग्न झालें. -मि. नागकर

पत्र नं. १०४२ बी.-तुमचे ताईतानें धंदा जोरांत चालला आहे. शत्रू भयंकर त्रासांत पडला आहे. -मि. विनायकराव.

पत्र नं. १०९०-दुसऱ्याच दिवशीं नोकरी लागली? -मि. मोडसे

पत्र नं. १००८-तुमचे ताईतानें कांहीं आशा नसतांना मी परिक्षेंत कशी पास झालों याचें आश्चर्य वाटतें. -मि. लेले

पत्र नं. १०३३-माझी मुलगी बी. ए. पास झाली. -मि. बी. एम्.

पत्र नं. १०६१-मी सुखरूप प्रसूत होऊन मुलगा झाला. -सौ. पांडे

पत्र नं. १०५२-पुत्रप्राप्तीचा योग दिसला. -सौ. पारख

पत्र नं. १०२७-आंगठी हातांत पडतांच एक सौख्यप्रद भावना मनांत उचंबळून येऊन आंगठींत कांहींतरी विलक्षण शक्ति असल्याची प्रचीति आली. मि. क्वाडरस

पत्र नं. १०५५-तुमची मॅग्नेमेस्मर आंगठी वापरण्यास सुरवात केल्यापासून तिचा प्रभाव दिसून आला.-मि. गजानन

पत्र नं. १०४२-ए.-पाठविलेलें उत्तर एका व्यक्तीवर अतिगुणकारी झालें. मि. त्र्यंबक

**अशी अनेक पत्रें आमचे ऑफिसमध्यें समक्ष पहा.**

सल्ल्याची फी रु. ५ [ पांच फक्त ]

भेटण्याची वेळ : सकाळीं ९ ते १२ व संध्याकाळीं ४ ते ६.

जन्मतारीख अगर लिहिण्याची वेळ कळवा.



## --तुमचीं संकटें--

पुढीलपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी काळजींत तुम्ही असालच. मग काळजी दूर करण्याकरितां माझ्या **दैवी शक्तींचा** उपयोग करून घ्या. हजारोंनीं सुदृढ प्रकृति, संपत्ति व संततीसुख मिळविलें. तुम्हीही जरूर भेटा व पुढें येणारा धोका समक्ष पहा. नाहींतर खालीं दिलेले ताईतांपैकीं आपल्या संकटाप्रमाणें घ्या. आणि आपलें जीवन सुखी करा.

**प्रेम-विवाह-संतती, ग्रहदशा-नोकरीधंदा-विद्याभ्यास-संपत्ति कोर्टकचेरी-भांडणतंटा-जादूटोणा भूतपिशाच्च-संरक्षण.**

**जर भेटूं शकत नसाल तर—**

तुमच्या काळजीचे कोणतेही चार प्रश्न सीलबंद पाकिटांतून मला पाठवा. मीं उत्तरें आणि उपाय सीलबंद पाकिटासह रु. ३-०-० च्या व्ही. पी. नें पाठवीन.

## —माझीं सुप्रसिद्ध यंत्रें—

**मोहिनीकामविलास**

प्रेम आणि लग्नांत यश. तुमचा प्रेमी तुमचा गुलाम बनेल, भांडणाचा नाश. साधारण शक्ति रु. २१ स्पेशल शक्ति रु. ५१

**मनमोहिनी अत्तर**

तुमच्या शरिरास त्या अत्तराचा सुवास येतांचि दगडासारख्या हृदयासही पाझर फुटून तुमची छाप कोणाहीं स्त्रीपुरुषावर पडून ते तुमच्याकडे आकर्षिले जातील. किं. रु. २१

**मनमोहिनी काजळ**

हें काजळ डोळ्यांत घातलें तर तुम्ही ज्या माणसावर नजर टाकाल तो तुमचेकडे आकर्षित होईल. तुमचे वरिष्ठांची तुमचेवर मर्जी राहील. जिकडे तिकडे तुमचीच छाप पडेल. नजरेची कमजोरी दूर होते. किंमत रु. २१

**मॅग्नोमेस्मर अंगठी**

ही अद्भूत अंगठी वापरतांना सर्व शरिरांतून एक अतिसूक्ष्म विद्युत्प्रवाह वाहत राहून नववीर्य निर्माण होतें. नवचैतन्य प्राप्त होऊन वृद्धासही तारुण्याचा आनंद उपभोगतां येतो. गलितगात्रांस हरपलेलें तारुण्य प्राप्त होतें. किं. रु. ११ स्पेशल रु. २१

**धन्वन्ति ग्रहनाशक**

अनिष्ट ग्रहपीडा दूर होते. दैव उदयास येतें. नोकरी, धंदा, कोर्ट-कचेरी व परिक्षेंत यश. रेस, सट्टा, लॉटरीमध्यें अचानक धनलाभ. सांपत्तिक स्थिति सुधारून शान्तीसुखाची लाभ होतो. किं. एक वर्षाकरितां रु. ११ तीन वर्षाकरितां रु. २१. सबंध आयुष्याकरितां रु. ५१.

**शक्ति-बाण**

भूत पिशाच्च, जादूटोणा यांपासून संरक्षण, अपघात, आजारपण, शत्रू-हल्ला यांपासून रक्षण. शत्रूची करणी शत्रूवर उलटून त्यास त्याच्या दुष्ट हेतूबद्दल प्रायश्चित्त मिळतें. किं. साधारण शक्ति रु. २१. स्पेशल शक्ति रु. ५५.

**संतान-सुख**

संततीहीनास सुलक्षणी, भाग्यवान संततीचा लाभ होऊन मोक्षाचा मार्ग खुला होतो. स्त्रियांचे गर्भाशयाचे रोग बरे होऊन त्या संततक्षम होतात. किं. साधारण शक्ति रु. ५१. स्पेशल शक्ति रु. १०१.

**मॅग्नो प्लॅनेटरी अंगठी**

ग्रहपीडेप्रमाणें निरनिराळ्या खड्यांच्या अंगठ्या बनविण्यांत आल्या आहेत. ह्यापैकीं जरूर ती अंगठी वापरल्यानें शरिराभोंवतीं असें एक मॅग्नेटिक वर्तुळ निर्माण होतें कीं ज्यामधून पापग्रहाची दृष्टि आपणावर पडूं शकत नाहीं. किं. रु. १५; स्पेशल रु. ५१.

*Note*—It is better to correspond in english

टीप : अधिक माहिती आणि उत्तरासाठीं दीड आण्याचीं तिकिटें पाठवा.

**प्रो. अशोक**

अध्यात्मज्ञानी व आकर्षणतज्ञ

६४ नवी पेठ, मढीघाट,
लकडी पुलाजवळ,
(D.P.B.) पुणें-२



## प्री ति

कवि—शांता शेळके

कधीं तरी तूं येशिल या आशेंत
काढियली मी जागुन सारी रात
—आणि हाय, तूं अखेर जैं आलास
श्रान्त नेत्र हे होते तैं झोपेंत ?

देहलालसेमध्यें प्रीतिची पूर्ती
भक्ति कराया लागे आधीं मूर्ती
बन्धन पडतें शब्दांचें भावांना—
प्रभो ! काय ही तव जगतीची रीती !

स्नेह प्रेम वा शुष्कच अवघीं नातीं
अखेर जो तो ज्या त्या स्तव या जगतीं
पाश निर्मितों आधीं हे आम्हीच
अन् विव्हळतों तुटतांना ते अन्तीं !

ताऱ्यापरि तूं दिससी द्युतिची रास
दवबिंदूपरि विशुद्ध रूपविलास
स्पर्शूं ? छे ! दंव विरतें हें स्पर्शानें
अन् ताराही शिळाच होई खास !

'प्रीती प्रीती' म्हणुनी आलों जवळीं
प्रकृति आम्हा बघुनी हांसे गालीं
क्षुद्र तियेचे साधुनि गेले हेतु—
आणि आंसवें आतां अमुच्या भाळीं ?

पूर्त जाहली प्रीति तरीही काय ?
अखेर सारें देहसुखार्थच हाय !
हृदय हवें ! तें गूढ परी अत्यंत
लाभ तयाचा व्हाया काय उपाय ?

प्रीतिसुगन्धें जीव धुन्द हो म्हणुनी
सन्निध आलों कण्ठिचली ही रजनी

हाय ! फुलाचें येइ कलेवर हातीं–
आणि गन्ध तर गेला दूर उडोनी ?

विषयाचा हा कर्दम–जरी हें ज्ञात
कमल प्रीतिचें फुलवूं बघतों त्यांत
खपुष्पापरी दूरच परि तें राहे–
आणि माखती कर्दमेंच हे हात !

अम्रावरतीं मस्त मंजरी बहरे
मेघावृत नभं धुन्द वाहती वारे
सौंदर्ये हीं देखुनि मज परि वाटे
क्रूर निसर्गे पाश योजिले सारे !

रक्तवर्ण हा पलाश ये बहरून
जरठ त्यावरी एकहि नुरलें पर्ण
प्रीतिफुलांनीं हृदय बहरतें तेव्हां
असाच जातो विवेक अखिल गळून !

आकर्षक तूं गूढ मला गमलास
स्पर्श करावा तुज, वाटे जीवास–
सन्निध येतां गूढ तुझें परि विरलें
अन् स्पर्शाची आतां नुरली आस !

पुष्पाचें या रूप भुलवि नयनांस
गन्धानें तर मूर्च्छा येई मनास–
स्पर्शतांच त्या रंग परन्तु विरती
गंधाचाही उरे ना लवलेश !

फसवणूक ही कुठवर तरि होणार ?
दुःखांचे या काय असे तरि सार ?
हास्यें, अश्रू, निराशा नि उन्माद–
किंवा यासच म्हणताती संसार !

सुख क्षणिक तरि युगसम भासे मजला
अपार तरिही अन्त असे दुःखाला
सुखदुःखांचीं सुमनें मायासूत्रीं–
गुंफुनि जीवनहार प्रभूनें केला !

अनन्त नीलाकाश पसरलें वरतीं
प्रभुकृपेचीं तेथें सुमनें फुलतीं
शान्तपणें घे भोग जिवा भोगून–
कृपा तीच लाभेल तुलाही अन्तीं !















# भागी

— महादेवशास्त्री जोशी

आदल्या दिवशीं पारवड येथील मारुतीच्या मंदिरांत मर्तूचं लग्न लागलं आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं भावाची वरात घेऊन भागी आपल्या गांवीं आली. अगोदर घरीं न जातां तिनें वधूवरांना गांवांतल्या भटवाड्यावर नेलं. दोन्ही खांद्यांवरून माळेसारख्या लोंबणाऱ्या उपरण्याचे दोन्ही पदर दोन हातांत धरून मर्तु त्या प्रत्येक घरांतल्या 'जाणत्या' माणसांच्या पायां पडला. त्याच्या पाठोपाठ, कोऱ्या साडीचा बोंगा सांवरीत पिवळ्या अष्टपुत्रींत झाकलेले हिरव्या चुड्याचे नाजुक हात जोडून वधूहि ओणवली. पुरुषांनीं नुसत्या आशीर्वादावरच भागवलं; पण बायकांनीं मात्र आपापल्या गांठोड्यांतून अेकेक खण काढून तिच्या हातीं दिला. अेक बाअी वधूची ओटी भरायला लावतांना तिला म्हणाली.

"अे लाजऱ्ये, बघूं तुझं तोंड!"

भागी अशा वेळीं चट्कन पुढें होअी अन् तिची हनुवटी वर अुचली. अेक क्षणभर ते निरागस काळेभोर डोळे लुकलुकत. ती कोवळी वेल अन् तिच्या शेजारीं अुभं असलेलं मर्तूचं वठलेलं झाड पाहून पहाणारांच्या मनांत बोंचल्यासारखं होअी. झाल्या गोष्टीबद्दल आतां बोलून काय व्हायचं होतं! पण अेका तोंडाळ बाअीला रहावलं नाहींच. तिनं भागीचा अुपालंभ करायचा या अुद्देशानंच म्हटलं.

"भागे, भावजय तर फांकडी मिळवलीस बाअी!"

भागीला हवं होतं तें नेमकं हेंच. याच शब्दांसाठीं तिचा जीव तहानला होता. तिनें आंगणाच्या मेरेमोकडे जाअून तंबाकूची पिचकारी टाकली, हातांतल्या चुन्याच्या डबीचं पक्‌दिशीं झांकण दाबलं अन पिशवी कमरेला खोंचीत ती पुढें आली.

"काय सांगूं काकी तुला! आज पांच सहा वर्सं जिवाचा आटापिटा करीत होतें. याच्या अुमरीच्या झिलग्यांचीं लग्नं होअून त्यांना दोन दोन लेकरंबाळं पण झालीं. पण या मर्तूकडे कोणी बक्केल तर शप्पत. ज्या मुलीच्या बापाकडे शब्द काढावा, तो आपला नाकंच मुरडायचा. शेजारचा अेक मेला बाप्या... नांव घेत नाहीं त्याचं. मला अेक दिवस म्हणतो काय, 'भागे, तुझ्या भावाचं लगीन आतां मसणवटींत. कार्जाच्या लांकडांसंगत...' असा राग आला त्याचा! त्याच्या पुढ्यांत छातीवर हात मारला. म्हटलं, "मर्तूचं लगीन करीन तरच नांवाची भागी! नाही केलं तर त्या आअी-

बापाचं नांव सांगायची नाही. तुला आपली मिशी उतरून ×× त घालायला लावीन!"

"तें खरं ग! पण मर्तु आता पस्तिशीच्या घरांत सहज आला असेल. अन् मुलीचं वय कांहीं बारा वर्षांपेक्षा अधिक दिसत नाहीं. कशी दिली ग हिला मुलीच्या बापानं?"

"फुकट नाहीं दिली. धा 'कुंडो' भात, अेक खांडी नाचणे अन् सुरती शंभर रुपये अेवढं 'देजं' घातलं ना त्यांच्या डोंबल्यावर. तेव्हां कुठे राजी झाला."

"मग बरोबर! पण अेवढे पैसे काढलेस कुठून? साजुभटानं दिले वाटतं?" दुसरी अेक गोटू-पाटल्यांची वाजी अधिक खोलांत शिरली. भागीनं अेक तिवळ्यांत मुरका मारून घेतला.

"दुसरं कोण देणार? ह्यांची चाकरी करतें, मग त्यानं नको का द्यायला?"

भागी हातिवारे करून बोलत होती. बोलतांना तिचा हर्ष पोटांत मावत नव्हता. आज तिनं 'शिखरी काळ्या' लावल्या होत्या. असाध्य तें साध्य करून दाखवलं होतं. वाडींतल्या हेव्यादाव्यांनीं बोलणाऱ्या शेजाऱ्यांच्या नाकावर टिचलं होतं. कां नाहीं तिचा हर्ष ओसंडणार! पाठचा भाऊ खरा; पण आओबाप मेल्यावर पोरासारखा तिनं त्याचा प्रतिपाळ केला होता. लहानपणींच नवरा मरून भागी माघारी आली होती ती जणूं मर्तुसाठींच! खंडित होअूं पहाणाऱ्या माहेरच्या वंशवेलाला तिनं आज पाणी घातलं होतं. देवाची दया असली तर तो पुढें फोफावेल अेवढं समाधान तिनं आज नक्की मिळवलं होतं.

पाखरं आपल्या घरट्यांत शिरण्यापूर्वी अन् दारांतल्या संकासुरानं आपलीं पानं मिटून घेण्यापूर्वी मर्तूची धरभरणी लागली. बारा वर्षांची सगुणा अेका खोपटांतून दुसऱ्या खोपटांत आली. फरक अितकाच कीं पहिल्या खोपटाचा कुड कारवीच्या काठयांचा होता तर या खोपटाचा हिंदळीच्या काठ्यांचा. माणसं वेगळीं. परिस्थिति तीच. तींच चार गाडगीं-मडकीं. तींच चार दोन पटकुरं, लक्तरं. तोच पेटता परसा अन् त्याच्या शेजारीं तसाच राखेचा [illegible] सगळ्या दृष्टींनीं घर 'स्वच्छ'! अुंदरांना तिथें बिळ करावं असं कधीं वाटलं नाहीं. चोरानं त्या घराकडे कधीं ढुंकून पाहिलं नाहीं.

सगुणा अजून आपल्या नव्या साडीचोळीच्या नादांतच होती. हात खालींवर करतांना तिच्या नव्या चुड्याचा किंकिणध्वनि अुठला कीं तो ऐकतांना तिच्या हृदयांतहि तशाच सुकल्हरी अुठत होत्या. जोडवीं घातलेलीं आपलीं सुकुमार पावलं तिला धांवून धांवून वघावींशीं वाटत होतीं. आपण कोणाची तरी 'बाअील' झालों आहों अन् आपला 'नवरा' म्हणून कोणीतरी प्राणी निर्माण झाला आहे याची तिला मुळींच जाणीव नव्हती. त्या दृष्टीनें तिनं मर्तूकडे कधीं पाहिलंच नव्हतं.

पण शेजारच्या वृद्ध नारींनीं तिला मधें घेअून ती गोष्ट तिच्या मनावर ठसवली. 'अेकलंस पोरी मर्तु तुझा घोव. जल्माचा सोंगडी. आतां त्याच्या संगं नांदायचं. त्याची चाकरी करायची. त्याच्या अुष्ट्यामाष्टयांची 'अळशीक' धरायची नाहीं. आणि अशा प्रकारें पढवलेली सगुणा घोव म्हणून जेव्हां मर्तूकडे पाहूं लागली, तेव्हां तिला काय दिसलं?

अेक हाडांचा पिंजरा. मर्तु अुंच अेरंड वाढला होता; पण अंगावर तिळभर मास नव्हतं. कमरेचा करदोटा सारखा खालीं घसरत असायचा अन् यानं तो सारखा वर ओढीत असायचं. मेगाळलेले गाय, छातीला लहानसा खळगा, डोळे वर आलेले, बुबुळाभोंवतीं पीतधूसर रंगाची तबकडी अन् तिच्यावर तांबड्या तांबड्या रेषा हीं त्याच्या शरीरावरचीं कायम लक्षणं होतीं.

हें 'ध्यान' अेकदां डोळेभर पाहून घेतल्यावर सगुणा त्या वृद्ध स्त्रियांचा उपदेश आठवून मनाशीं म्हणाली, 'हा का माझा जल्माचा सोंगडी? ह्याची का चाकरी करायची? ह्याच्या का उष्ट्यामाष्ट्याची अळशीक धरायची नाहीं?......शीः ऽऽ!' तिनं तोंड फिरवलं अन् ओकारी आल्याचा अभिनय केला.

त्या दिवशीं भागी साजुभटाच्या घरीं कामाला गेली होती. मर्तु पडवीवर अेकटाच विडी वळीत बसला होता. घरांत कांहींतरी खटखट करणाऱ्या सगुणेकडे लक्ष असल्यामुळें कुड्याच्या पानांतून तंवाखू खालीं गळून पडत आहे याची त्याला दाद नव्हती. आंत वावरते ती आपली बायको आहे, या अेकाच अननुभूत भावनेनं तो मधून मधून लाजरं लाजरं हसत होता. बिनतंवाखूची ती वोटभर लांब विडी वळून झाल्यावर त्यानं दाराकडे बघून आपल्या मतें प्रभावी स्वरांत हुकूम सोडला.

"आग हाड वांयच्!"

तो हुकूम अैकतांच सगुणेला मागच्या अेका दिवसाची आठवण झाली. वाडींतलाच अेक तरणा वांड पोरगा अर्जुन तिच्या पडवीवर येअून टेकला होता. काळाच; पण नितळ गोटीवंद होता तो. नेसला होता लंगोटीच; पण ती साध्या पंचाची नसून रुंद चौकोनी अशा रुमालाची होती अन् त्याच्या मूळ तांबड्या रंगावर कसली तरी वेलबुट्टीहि होती. त्यानं आपल्या केसांचा भांग वळवतांना जें तेल लावलं होतं त्याची तकाकी अजून त्याच्या तोंडावर दिसत होती. विन बाह्यांचा तलम गंजीफ्रॉक त्याच्या अंगांत होता. त्यांतून त्याची छाती झांकूनहि न झांकल्यासारखी दिसत होती. अेखादा कारकून कानावर जिथें लेखणीला विसावा देअील तिथें त्यानें चांफ्याचं फूल खोवलं होतं. सगुणा जितकी त्या फुलाकडे तितकीच त्याच्या आंगठशाकडे अन् रुवावाकडे पहात राहिली होती. त्यानं दुसऱ्या कानावरची विडी हातांत घेअून सगुणेला फर्मावलं होतं.

"अगो! आग हाड वांयच!"

आतांचा मर्तूचा जो हुकूम तोच त्याचाहि होता. पण त्या शब्दांत रग होती. तो अवमानिला जाणार नाहीं याचा आत्मविश्वास होता. ते अेका 'पुरुष'च्या कंठांतून आलेले शब्द होते. काष्ठपुतळीसारखी अुभी असलेली सगुणा त्या शब्दांसरशीं चाबूक मारल्यागत घरांत धांवली होती. तिनं जळतं कोलीत आणून त्याच्यापुढें धरलं होतं. 'मोठे कांहीं उपकार केले नाहींस' अशा बेफिकीरपणानं तिच्यावर अेक नयनबाण सोडून त्यानं तें तिच्या हातून घेतलं होतं. आणि त्यामुळें सगुणेला कित्ती कित्ती गोड वाटलं होतं!

पण मर्तूचे ते शब्द अैकून तिच्या कपाळांत तिडीक अुठली. त्या शब्दांत जीवच नव्हता. जणूं कुल्या जिभेवरून अन् पिंजलेल्या ओंठांतून ते बाहेर पडले होते. तिला त्याचं प्रेमहि वाटलं नाहीं अन् भयहि वाटलं नाहीं. ती लवंगी मिरची अुंबरठ्यावर येअून अुभी राहिली. तिरस्काराच्या नजरेनं मर्तूचं काळीज विंधीत ती त्याला म्हणाली,

"हें मेलें सोंग विडी ओढणारं. परशाजवळ जायला पाय मोडले वाटतं!"

मर्तु चमकूलाच ते शब्द अैकून. त्याला वाटलं कीं अेखादी धामीणच फुसकारते आपल्या अंगावर. त्या चिमुरडीला खरं म्हणजे तो घावरलाच. पण भागीनं त्याला वेळोवेळीं बजावलं होतं. 'नव्या नवसांची बायको म्हणून तिला चढवून ठेवशील बरं का! तिच्याशीं 'लुलुगुलु' करायला









लागलास कीं तिनं तुझ्या डोक्यावर मिर्‍यें वाटलींच म्हणून समज. तिला कशी धाकांत ठेवतोस तें बघायचं आहे मला.'

आणि त्यानं ठरवलं कीं या अुर्मटपणाबद्दल तिला हस्तप्रसाद चारलाच पाहिजे. त्याच्या हृदयाच्या कुठल्यातरी सांदीकोपर्‍यांत पेंगळून पडलेला नवरेपणा अुठून अुभा राहिला. पण जवळपास कुठं लांकूड, काठी दिसेना. शेवटीं हात अुगारून त्याला पुढें व्हावं लागलं. पण सगुणेनं चटकन् अंगणांत अुडी मारली. तिच्या पाठोपाठ तोहि तेंच करूं पहात होता. पण पायरीनें त्याला दगा दिला. सगुणेनं हात ओवाळून त्याला वेडावलं. सर्व नव्हे तर शुभ्र दंतपंक्तींच्या पहार्‍यांतून आपल्या लालचुटुक 'जिभली'चं टोंक बाहेर काढून. मर्तु परत अुठून दोन चार ढांगा टाकतो तों ती कानांत वारं भरलेल्या वासरासारखी धूम पळाली. घामाघूम झालेल्या मर्तूनं मग कुंपणाच्या आखाडयावर उभं राहून त्याला पाठ होत्या तेवढ्या सगळ्या शिव्यांची आवृत्ति म्हटली, तेव्हां कुठं त्याचा भडकलेला वैश्वानर शांत झाला.

अर्ध्या पाऊण तासानं सगुणा चौफेर टेहेळणी करीत घरांत शिरली तों मर्तूनं कुठेंतरी तोंड काळं केलं होतं. तिच्या पाठोपाठ भागीहि उगवली. डोक्यावरचा लांकडांचा भारा आंगणांत आदळून पायरी चढल्यावर तिनं विचारलं,

"मर्तु कुठें गेला ग?"

"गेला मसणांत!" सगुणा चटकन अुत्तरली. अैन कातरवेळेला भावजयीनं उच्चारलेले ते शब्द भागीच्या जिवाला लागले.

"रांडला, मातलय गो?" म्हणून भागीनं सगुणेचे दोन्ही गाल कुसकरले. "फुन्हा असलं अभद्र बोललीस तर जिभेला चुरका देईन समजलं!" भागी तिला लोटून देतां देतां म्हणाली. मर्तूला दाखवली तशी भागीला जीभ काढून दाखवली तर आपल्या पाठीचं धिरडं होईल ही सगुणेची खात्री पटली. भटवाडीवरच्या मुलींसारखी आपण गोरी भावजय मिळवली म्हणून अेका काळीं भागीला अस्मान ठेंगणं झालं होतं. पण आतांशा तिला संभाळावी कशी हाच प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला होता. सगुणेचं घरकामांत मुळीच लक्ष नव्हतें. ती फक्त सांगितल्या कामाची. मनांत असलं तर भाकर्‍या वाटोळ्या सुंदर भाजी. पेजहि हवी तशी जाड पातळ शिजवी. पण एकदा अर्जुनाची छाया पडली कीं मग लागलीच त्या कामाला हळद!

पाण्याला गेली तर घागर पाटाच्या कडेला ठेवून ती खुशाल कोणत्याही कुळागरांत शिरे. तिला कोणाची पोफळं नको असत. तिला कोणाचीं नारिंग-तोरिंगंहि नको असत. तिला हवीं असत तीं फक्त फुलं. फूल दिसलं कीं ती वळंघलीच तिथें. जाअीजुअीच्या कळ्या जोडीजोडीनं गुंफून बघतां बघतां ती सर करायची अन् डोक्यांत माळायची. गुलबक्षीची 'हातमोडी' ची वेणी तर तिला छानच साधे. श्रावणांत कुठेंहि फुलणारीं नखाअेवढीं तुंग्याचीं नाजुक शुभ्र फुलं तिला नथ अन् आंगठ्या करायला अुपयोगी पडत. कातरपानी जास्वंदीचे अुमलते कळे, देठ लांब अन् लवचीक असल्यामुळे तिच्या कानांत छान लोंबत. दोन्ही नाकपुड्यांत दोन वकुळीचीं फुलं ठीक बसत. अशी 'पुष्पावती' बनून कडेवरच्या भरल्या घागरीनिशीं ती 'द्रुतविलंबित' वृत्तांत घरची वाट चालूं लागली कीं वाडींतले तरुण झिलगे हातांतलं काम टाकून डोळ्यांवाटे तिला पिअून घेत.

आणि हें पाहिलं कीं भागीचा जीव जळूं लागे, 'मेल्यांचे डोळे फुटतले' म्हणून ती त्यांच्यावर बोटं मोडी. अर्जुनानं तर तिच्यावर मोहनास्त्रच टाकलं होतं. सगुणा त्याच्याशीं लोण्याहून मअू अन् मधाहून गोड व्हायची. मर्तूला या गोष्टींची 'द्वन्द्व फिर्याद' नसे. त्यानं अेकदा दोनदा तिच्याशीं 'नवरेपणा' चं नातं जोडण्याचा प्रयत्न केला होता: पण त्यांत त्याचे ओठ चांगलेच पोळले होते. त्यानंतर तिच्या वाटेला जायचं नाहीं हा अकरणीरूपक निश्चय त्यानं पक्का करून टाकला होता.

पण या नामर्द भावाची सर्व प्रकारें पाठराखीण झालेल्या भागीच्या अंगांत जो मर्दपणा होता, त्याला ही गोष्ट कशी सहन व्हावी! तिनं अर्जुनाला अेक दिवस हटकून सगळं जाब विचारला. त्याला 'दुसर्‍याचीं घरं बुडवणारा चांडाळ' म्हटलं. 'परत सगुणेच्या फंदांत पडलास तर माझ्या डाव्या पायाच्या खेटराशीं गांठ आहे, असी तंबीहि दिली.

पण अर्जुन कसला खटनट! तो भागीच्या 'सहनिंग्रा वुगाच्या' लाभून बसला होता. आपल्या नितळ भांगावरून सफाअीदार हात फिरवीत त्यानं तिला फटकारलं.

"खेटरांच्या गोष्टी त्या साजुभटाला सांग. तो घेअील अैकून. आधीं आपल्या पायांखालीं काय जळतं तें पहावं माणसानं. साजुभटाची बायको तुझ्या नांवानं कडाकड बोटं मोडते तें कधीं पाहिलं आहेस का? आपण दुसर्‍याचं घर बुडवते अन् लोकाला गिन्यान शिकवायला येते. तु-तुझ्या—"

भागी अर्जुनाचं पारिपत्य करायला गेली अन् स्वतःच्या वर्मावर घाव घेअून परत आली.

पुढें सगुणेला अर्जुनापासून तोडण्याची तिनं शिकस्त चालवली. शक्यतोंवर तिला आपल्या बरोबर वागवायचं, तिच्यावर जागता पहारा ठेवायचा अन् हें शक्य नसेल तिथें तिच्यामागें हेर पाठवायचे, असा तिनं कडक बंदोबस्त केला. पण तरीहि जें काय व्हायचं तें होअीच. अर्जुनानं अंतरांत घातलेली साद सगुणेला अैकूं येअी अन् सगुणेची आर्त अुत्कंठा त्याला कुठूनहि खेचून आणी. बोलून चालून अेका डबक्यांतले बेडूक! अेकमेकाला घसटल्यावांचून त्यांचा निभाव लागायचा कसा!

अेक दिवस तर भागीच्या डोळ्यादेखत तो योग आला. साजुभटाच्या कुळागराची खणणी वेणणी चालली होती. कुळवाडणी हारीनें बसून केळी-पोफळींच्या खालीं वाढलेलं तण अुपटीत होत्या अन् त्यांनीं साफसूफ केलेले ते जमिनीचे पट्टे, तरुण झिलगे कुदळींनीं खणून काढीत होते. बायकांच्या रांगेत सगुणा होती. पुरुषांच्या ओळींत अर्जुन होता. साजुभटाच्या घरचं काम म्हणून मर्तूहि आला होता: पण त्याला कुठं कुदळ पेलत होती! तो 'बायकांत पुरुष लांबोडा' बनून दांत्री कोयतीनें गवत खुरपण्याचं बायकी कामच करित होता. त्यांना रंजवण्यासाठीं अधून मधून तो जात्यावरच्या ओव्याहि म्हणे. त्या कुळवाडणी त्याला आपल्यांतलाच अेक समजत अन् निस्संकोच मनानं आपलीं स्त्रीजीवनांतलीं रहस्यं त्याच्यादेखत अेकमेकींशीं बोलत.

अितर वेळीं तर या प्रकारानं सगुणेला डोकं नारळ्यागत झालं असतं. पण आज अर्जुन जवळ होता. त्याची निडी पेटवण्याची अैट तिला दिसत होती. त्याच्या कुदळीचे 'दणदण' घाव तिच्या कानीं येत होते. त्याच्या ओठांतून अलगद सुटलेली शीळ पोफळींच्या हिरव्या झुबक्यांवर नाचत नाचत दिगंतांची भेट घ्यायला निघाल्याचं तिला कळत होतं. त्यानं गुणगुणलेल्या लावणीचे रंगेल शब्द कानांच्या कुपींत शिरतांच तिच्या कायेवर आनंदाचे अंकुर फुटत होते. त्यामुळें काम करणारा तिचा हात न कळत स्तब्ध होत होता. डोळ्यांच्या पापण्या जड होअून निद्रं पुहात होत्या.

तिची ही प्रणयधुंद अवस्था भागीच्या लक्षांत यायला वेळ लागला नाहीं. अितर कुळवाडणीहि अेकमेकींना डोळे मोडूं लागल्या. भागीला विलक्षण चीड आली. पण अर्जुनाला कांहीं अुणं दुणं बोलण्याची तिची ताकद नव्हती. तो आपल्या सीमारेषेच्या आंत होता. म्हणून ती मग सगुणेवरच घसरली.





तिनं आपल्या भावाचं पौरुष सर्वांच्या देखत प्रस्थापित करावं या अिराद्यानं त्याला म्हटलं.

" बघतोस काय ? घाल तिच्या कमरेंत अेक खोंट. रांडेला काम कराायला नको अन् ' टिवल्या बावल्या ' नाचवायला हव्या ! "

भागीचे बंधुराज अुठले अन् त्यांनीं प्रथम आपल्या गेंगाण्या स्वरांत अेक सोज्ज्वळ शिवी अुच्चारली. हातांतल्या कोयतीअैवजीं आपली पसरणारी कासटी सांवरीत सांवरीत तो सगुणेच्या समोर अुभा ठाकला. तीहि अुठून अुभी झाली. तिनं दुसरं कांहींहि केलं नाहीं. आपल्या हातांतली अुपटलेल्या गवताची मूठ, मुळांना चिकटलेल्या मातीसह मिच्दिशीं त्याच्या तोंडावर मारून तिनं कुळागरांतून सूंबाल्या केला.

तें पाप्याचं पितर आपल्या चिमचिमणाऱ्या डोळ्यांची कष्टानं अुघडझांप करीत कितीतरी वेळ तिथेंच अुभं होतं. स्त्रीपुरुषांच्या तुफान हास्याचा संमिश्र खळाळ त्याचीं कर्णरंध्रं पुरून काढीत होता. तो प्रकार दिसला तेव्हां नुकत्याच फुटूं लागलेल्या मिसरुडीच्या टोकाला पिळल्यासारखं करून अर्जुन ओठांतल्या ओठांत पुटपुटला. ' यंव रे बहाद्दरीण—! ' आणि भागीहि आपल्या अद्दष्टाला हात लावून अुद्गारली. ' हें काम अनावर झालं आता ! '

सगुणेला आता पंधरावं संपत आलं होतं. तिच्या पायांच्या पोटऱ्यांना आकर्षक घाट आला होता. नितंब वाटोळे चक्राकार झाले होते. कांचेची अन् पितळेचीं संमिश्र कांकणं खेळवणारीं तिचीं मनगटं फुगीर गोंडस बनलीं होतीं. पाठीच्या कण्यानं आंत जातां जातां तिच्या अुराची अुभारणी केली होती. यौवनानं अुदार हस्तानं दिलेली ही दौलत आपल्या फाटक्या पदरांत संभाळतांना अतांशा तिच्या जिवाची तारांबळ होत होती. तिच्या अंगप्रत्यंगांतून निथळणारी तारुण्याची नव्हाळी पाहून भागी मनांतल्या मनांत देवाला नवस करीत होती. ' देवा ! लवकर अेकदा हिला पदर येअूं दे. ही अेकदा ' घोवाची ' ' बाअील ' झाली कीं मग तरी हिचं अुधळणं थांबतं का पाहूं. '

आणि तो प्रसंग पुढें लवकरच आला. भागीनं ' फलशोभना'ची तयारी केली. साजुभटानं मुहूर्त सांगितला. भागी मोठी चतुर होती. मानसशास्त्रांतले कांहीं प्राथमिक धडे कोणी न शिकवतांच तिला ज्ञात झाले होते. तिनं न्हाव्याला बोलावून मर्तूची ' रेघ ' धरायला लावली. तेल लावून आपल्या हातानं त्याला आंघोळ घातली. त्याच्या अंगाचा खंडीभर मळ धुवून काढला. कपाळीं गंधाचा टिळा रेखला. लग्नांतलं तें सांवळींत घडी करून ठेवलेलं उपरणं त्याला पांघरायला दिलं. आपल्या मतें त्याला तरुण अन् मदनाचा पुतळा बनवून पुण्याहवाचनाच्या पाटावर बसवलं.

रात्रीं जेवणंखाणं उरकल्यावर विडीचा दम मारून खोकत बसलेल्या मर्तूला घरांत दवडून भागीनें बाहेरून दाराला हळूच कडी लावली. घरांत परसा पेटत होता. किंचित् बावरलेली, किंचित् हृत्कंप अनुभवणारी, ती यौवनरसाची मूर्त आपल्या आंबट ओल्या केसांचा मोकळा झोत पाठीवर सोडून त्या अग्निज्वालांच्या प्रकाशांत लकाकत उभी होती. तिच्या डाव्या गालावर प्रकाशलहरी थुयथुयत होत्या अन् उजव्या गालावर छाया सांद्र झाली होती. अग्निज्वाला जराशी अधिक उंचावली कीं प्रकाश अलिकडे येऊन छायेच्या हृदयांत घुसूं पाही अन् ज्वाला खालीं दवली कीं छाया तिकडच्या राज्यावर थोडा वेळ आपला अंमल बसवी. यौवनाच्या रंगभूमीवर साक्षात् शृंगार राजाचा नटनाच होता तो !

मर्तु अेक पाअूल पुढें टाकता तर... ! आपल्या नाथेला जागता तर... ! अेक खंबीर पण प्रेमानं ओथंबलेला हात निश्शंकपणें तिच्या खांद्यावर टाकता तर... ! न जाणो; कदाचित् ' विप्रीत ' तें ' सुप्रीत ' हि झालं असतं.

पण भागीच्या अनुभवांनीं, विशेषत: अवसानघातकी हृदयानं त्याला दगा दिला. तो जिथें उभा होता, तिथेंच खिळला गेला. निर्जीव... निष्प्रभ... निश्चेतन... ! समोर परसा धगधगत असूनहि त्याच्या अंगांत अूब नव्हती. मोकळ्या केसांची सगुणा त्याला ' काळकामूर्ति ' वाटत होती.

अेक क्षण... दोन क्षण... तीन... पांच... दहा... अन् कितीतरी ! निर्भर अेकांतांत असलेल्या त्या दोन जीवांमधलं अंतर अेका तसूनेंहि कमी झालं नाहीं. अेवढा वेळ पायांच्या नखावर जखडलेली तिची नजर आतां त्या ' स्थाणु पुरुषा'कडे वळली. परशांतली पेटती आग आतां तिच्या डोळ्यांत चढली. थरारता अधर तिनं आतां दातांखालीं धरला. तिनं मानेला जो झटका दिला त्यासरशीं अुघड्या अुरोभागी सूक्ष्म संवेदना करणारे तिचे चुकार केस झटकन् राशींत जाअून मिसळले. लगेच तिनं दरवाजाकडे झेप घेतली.

पण दार बाहेरून बंद होतं.

" भागल्या, आधी दार अुघड. " बाहेर कानोसा घेत बसलेल्या भागीच्या कानावर विद्युत्पात झाला.

" पड गुमान आंत. बाहेर येते म्हणे अवदसा ! "

भागीचे हे शब्द विरतात न विरतात तोंच दार धडधडूं लागलं. आंत काय प्रळय मांडला आहे तो पहावा म्हणून भागीनं कडी काढली अन् तीं दाराच्या चौकटींत भिंत बनून अुभी राहिली. सगुणा तिच्या हाताखालून बाहेर निसटली. ' कुठें चाललीस ? ' म्हणून भागी अुलट वळून विचारते तोंच ती काळ्या रात्रीच्या पोटांत कुठल्या कुठे गप झाली.

ही घटना अितकी अनपेक्षित घडली कीं कितीतरी वेळ तीं दोघं भावंडं अेकमेकांसमोर ' आ ' वासून अुभीं होतीं.

अेक विशिष्ट वाट धरून सगुणा सुसाट धावूं लागली. रातकिड्यांनीं आपल्या ' किर् किर् ' शब्दांत अेकमेकांना पृच्छा केली. ' काय रे, काय प्रकार आहे हा ? ' पिंपळावरच्या पर्णराजीनें ' सळसळ ' करून त्यांना अुत्तर दिलं. ' बायकांच्या जातीचे हे ' भोग ' तुम्हांला कळावयाचे नाहींत बाबांनो ! ' दिवा भीतांनीं ' घु घूऽऽ अु ' करून त्या ' खंडिता ' नव युवतीला धीर दिला. ' भिअूं नकोस मुली. तूं वाट चुकली नाहींस. तुला ज्या डोंगरावर जायचं आहे, तो आतां अगदीं जवळ आहे. '

सगुणा त्या डोंगराच्या पायथ्याशीं आली. त्याच्या मधल्या पठारावर तिला जायचं होतं. तिथेंच तिचा अर्जुन होता. त्यानं झेपेल तेवढी त्या डोंगरावरची झाडी तोडून तिथे नाचणा पेरला होता. शेत चांगलं लागलं होतं. कणसांत नुकतचं दूध भरत होतं. दिवसेंदिवस दिवसानं दाणा पोसत होता. रानडुकरांना त्याचा वास लागला होता. भेकरं, चितळं, आपल्या आकर्ण नेत्रांनीं तो पौष्टिक खुराक पाहून गेलीं होतीं. अेवढे श्रम घेतले त्यांचं फळ पदरांत पाडून घ्यायचं तर आता त्या शेताची राखण करणं जरूर होतं. अर्जुनानं त्याचसाठीं पठारावर खोप अुभारली होती अन् तो आता नगनिवासी झाला होता. त्याच्या शेताच्या दोन्हीं अंगांना त्याच्या जोडीदारांचीं शेतं होतीं अन् तेहि ' पर्वतपे अपना डेरा ' करून तिथें राहिले होते.

सगुणा चढण चढूं लागली अन् पूर्वदिशा कृपाळूपणें हसली. आश्विन वद्य चतुर्थीचा चंद्र रोहिणीशीं लाडीगोडी करीत डोंगरकडा चढून उभा राहिला. उभ्या शेतावर पिठूर जादू पसरली. शेतकऱ्यांच्या वर्दळीनं मळलेली शेतामधली नागमोडी वाट सगुणेला स्वच्छ दिसूं लागली. सगुणेचा हव्यासी जीव संतुष्ट होईल अितकीं झेंडूचीं, गुंडीचीं, मखमलीचीं फुलं शेतांत सर्वत्र अुमललीं होतीं. ' आम्हांला पदरांत घे ' म्हणून तीं तिला आमंत्रण




करीत होती. पण यावेळीं तिला सवड नव्हती. तिचा आर्त जीव त्या वरच्या खोपीकडे लागला होता. अेकेका पावलानं ती तें स्थान जवळ करीत होती. तिला चढतांना दम लागला होता; पण मधे क्षणभर थांबण्याची मात्र अिच्छा नव्हती. ती अेकदम तिथें जाऊनच विसावणार होती.

पण अेकाअेकीं हवा बदलली. क्षितिजाच्या कडेकडेनं पांगलेल्या अन् दऱ्याखोऱ्यांच्या कुशींत झोंपलेल्या मेघांना वरून आज्ञा सुटली. 'मैदानांत अेकत्र व्हा.' वाऱ्याचा झडाड सुटला. सगळे जलबादल गिरिशिखरावर दाटीवाटीनं जमले. पुन्हा दुसरा हुकूम आला. 'आगे कूच!' पहिला हल्ला झाला तो चंद्रावर. प्रियवसतीची वाट दाखवणारा तो तिचा आकाशांतला डोळा अेकदम वुजला. ती बावरून चारी दिशांना पाहूं लागली. पण सगळीकडे काळे पडदे लागले होते. ज्यानं दिशा गिळल्या, डोंगर गिळले तो सर्वभक्षक अंधार आतां आपल्यालाहि गट्ट करणार असं सगुणेला वाटलं. तिनं मुक्त हांक फोडली "अर्जुनाऽऽ!' पण प्रतिसाद दिली ती गडगडाटानं पाठोपाठ तिरकस जलधारा तिच्या तोंडावर अन् काळजावर सपासप आदळूं लागल्या. डोळ्यांत शिरणारं पाणी अेका हातानं पुसावं दुसरा हात निढळावर आडवा टेकवावा अन् अेकेक पाऊल पुढें टाकावं असं करतां करतां ती बेजार झाली. शिवाय वरून खळाळत येणारे ओहोळहि पावलांवर आदळून तिच्या गतीला विरोध करूं लागले.

पण कांहीं झालं तरी तिला आतां मागे फिरणं शक्य नव्हतं. पर्जन्यवृष्टिच नव्हे; तर अंगारवृष्टि, पाषाणवृष्टि झाली असती तरी तिला आतां पुढेंच पाअुल टाकायला हवं होतं.

शेवटीं अेकदां डोंगरपठाराला तिचा पाय लागला. धांवत जाऊन तिनं अर्जुनाच्या खोपीचं कवाड उघडलं. त्याच्या खोपींतहि धारा लागल्या होत्या. डोक्यावर झालेल्या अभिषेकानं त्याला जागं केलं होतं. रॉकेलाचं टमरेल ढणढणा जळत ठेवून तो त्यांतल्या त्यांत कोरड्या असलेल्या जागीं गोवडी पांघरून अन् हातपाय पोटाशीं घेअून बसला होता.

आणि या क्षणाला सगुणा कुडकुडत, शहारत, ओठांच्या पाकळ्या थरथरवीत निथळत्या अंगानं त्याच्यापुढें अुभी होती. ठायीं ठायीं गांठी दिलेलं तें अपुरं अेकवस्त्र तिच्या अंगाला चिकटून बसलं होतं: दोन्ही हातांची घडी करून तिनं आपल्या दोन्ही भुजा घट्ट धरल्या होत्या. वाऱ्या पावसानं झोडपलेली ती कर्दळी आधारासाठीं अर्जुनाकडे डोळे लावून कशीवशी अुभी होती.

अर्जुनाचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. विस्मयचकित होअून तो अुठला अन् पुढें झाला.

"सगुणे? तूं अिथें? अन् अशा अनुधार पावसांत!"

"होय अर्जुना! मला आता बोलवत नाही. थंडीनं मरतें मी—"

"तें आधी अंगावरचं ओलं सोडून टाक बघूं."

सगुणेनं अेकवार जिकडे तिकडे पाहिलं. ओलं सोडायचं खरं; पण... दुसरं काय होतं तिथे वेढून घ्यायला! निरुपायानं अधोवदन होअून तिनं खांद्यावरचा पदर ओढला. आणि दुसऱ्याच क्षणाला अर्जुनानं चांदीचं कडं घातलेला डावा हात लांब करून आपली अर्धी घोंगडी तिच्या अनावृत कायेभोवतीं लपेटली.

बाहेर अजून मेघ गरजत होते. विजा लवलवत होत्या. पायथ्याकडे धांवणाऱ्या जलप्रवाहांचा धोधाट घुमत होता. वादळी वारा त्या खोपीला अधून मधून हादरे देत होता. कुठल्यातरी बाजूला वाऱ्यानं पिळवटून मोडणाऱ्या वृक्षांचा 'कर्र, कर चेर कर्र, ऽऽ' असा अंतकालचा हृदयभेदक शब्द कानावर आदळत होता.

पण बाह्य जगांत थैमान घालणाऱ्या या संहार भैरवाची सगुणेला आतां यत्किंचितहि कदर नव्हती. ती निर्भय, निश्चिंत, निरांतक झाली होती.

× ×

ती रात्र संपली. वादळी पावसाचा तो बेभान आवेशहि ओसरला. नवा दिवस अुगवला अन् अर्जुनाच्या अेकमार्गी जीवनांत त्यानं अेक नवी समस्या अुभी केली. सगुणा आली होती ती परत जाण्यासाठीं नव्हे. पण त्यानं तिला ठेवून घेणं हें कायद्याचं अतिक्रमण होतं. तो धास त्याला पचणारा नव्हता. पुष्कळ विचार करून त्यानं ठरवलं कीं भार्गानं आपली फिर्याद करण्यापूर्वी आपणच सगुणेला कॅप्टन डिमेलोच्या पुढे उभी करावी.

कॅप्टन डियेलो हा वाळपर्ई तालुक्याचा सर्वाधिकारी होता. गडी जेवढा अुमदा तेवढाच न्यायनिष्ठुर. पुढे येणारीं प्रकरणं तो तडकाफडकी निकालांत काढी. अन्यायाला तो अुग्र शासन करी; पण न्याय देतांना माणुसकी विसरत नसे. अर्जुन त्याच्यापुढें फिर्याद मांडूं लागला.

"ही आमची शेजारीण सगुणा. नदींत जीव द्यायला निघाली होती. अेवढा मोठा दगड गळ्यांत बांधला होता. मी नेमका तिथें पोंचलों म्हणून वर ओढून काढली. अन् माझ्यावर पुढे मागे किटाळ येअूं नये म्हणून हिला तुमच्यापुढें घेअून आलों आहें."

त्या गोऱ्या साहेबानं आपले घारे डोळे सगुणेवरून अर्जुनावर रोखले. किंचित् मान वांकडी करून तो कांहीं क्षण तसाच पहात राहिला. अर्जुनाला भाले भोसकल्याच्या वेदना होअूं लागल्या. त्यानं अुभं केलेलं असत्य त्या अुग्रसेनापुढे कोसळण्याच्या बेतांत आलं.

"माझ्या टेबलावरची ती 'पाल्मतोरी' पाहिली आहेस ना? पांच मिनिटांत तुझे तळहात गरगरून फुगतील. खरं काय तें सांग."

"सांगतो सायबा! पण मला मारूं नको..माझा कांहीं अन्याय नाहीं. हीच...हीच रात्रीं माझ्याकडे डोंगरावर आली." अर्जुनानं आंवढे गिळीत कशींबशीं हीं वाक्यं अुच्चारलीं.

अन् लगेच साहेबाचा मोहरा सगुणेकडे वळला. पुनश्च तसेच धारदार शब्द अुमटले.

"काय ग अे पोरी! तूं गेली होतीस रात्रीं याच्याकडे?"

सगुणेनं होकारार्थी मान हालवली. सत्य उघड्या अंगानं पुढे येअूं लागलं.

"तुला यानं बोलावलं होतं?"

सगुणेची मान नकारार्थी हालली.

"मग कां गेलीस त्याच्याकडे?"

"सायबा मला तें तोंडानं सांगतां येणार नाहीं. बापानं कसाबकरणी करून ज्याच्या गळ्यांत मला बांधली, त्या माझ्या नवऱ्यालाच अिथे बोलावून आण. म्हणजे मी न सांगतांच तुला सगळं कळेल..."

'मेलेलं कोंकरूं आगीला भीत नाहीं' या अवस्थेला सगुणा आता गेली होती. त्यामुळें तिनं धीटपणें अुत्तर दिलं. आपणासारख्या कर्दनकाळापुढें न चांचरतां बोलणाऱ्या त्या मुलीचं साहेबाला कौतुक वाटलं. त्याला आतां या प्रकरणाच्या मुळाशीं जाणं भाग होतं.

लगेच राजदूत रवाना झाले. दोन तासांच्या आंत त्यांनीं मर्तूला साहेबापुढें हजर केलं. मनु भेदरून पांढरा फटक पडला होता. भागी त्याची पाठ राखीत होती म्हणून ठीक. नाहीतर त्यानं अुभ्या अुभ्या जीव घालवला असता. साहेबानं 'कळकी नारायणा' वरून अेकदां नजर फिरवली.






"हा का तुझा नवरा ?" त्यानं अविश्वासदर्शक शब्दांत विचारलं पोर्तुगालच्या हवेंत वाढलेल्या त्या साहेबास अितक्या तरुण पोरीचा अेवढा म्हातारा नवरा असूं शकेल ही कल्पनाच करवेंना. पण सगुणा तर होकारर्थी मान हलवीत होती म्हणून पुन्हा त्यानं विचारलं 'खरंच ?'

आत सगुणेच्या अैवजी भागीनंच अुत्तर दिलं.

"हो खरंच ! हाच तिचा छेद अन् ही याची बाअील. रांड रात्रीं पळून गेली. तिला नवरा नको हा....हा अर्जुन धगड पाहिजे."

साहेबानं असे लाल डोळे केले तिच्यावर ! भागीला पुढं जें काय बोलायचं होतं तें आतल्या आंतच गुदमरलं.

"काय रे मर्तु तुझं वय काय ?"

"म...म...माकां ठाअुक नाय. राण्याच्या वंडांत मियां अीस वर्सांचो आसलंय."

"म्हणजे वंडाळा झालीं आतां वीस वर्षं अन् तुला चाळीस होय ना ?"

"ह्य सायबा"

"अेवढ्या लहान पोरीशी लग्न करायला शरम वाटली नाहीं तुला ?"

"मी नाय केलं. माझ्या भैणीनं केलं. या... या... भाभीनं केलं—"

साहेबानं त्याचा वकूब ओळखला. त्यानं भागीला प्रश्नमुद्रा केली.

"मी लगीन केलं. फुकट नाही. हिच्या बापाला सुरती शंभर रुपये मोजले अन् हिला आणली."

"हिला नांगराला जुंपली होतीस का नाहीं कधीतरी—?" साहेब कडवट अुपहासानं बोलला अन् त्यानं सगुणेला म्हटलं, "अे पोरी, तूं गुलाम आहेस यांची. जा यांच्या घरीं. नांगर ओढ अन् या नवरोजीला पाठुंगळीस घेअून बाजाराला चल."

हेंहि बोलणं अुपरोधिकच होतं. पण सगुणेला त्याचा रोख कळला नाहीं. तिचं काळीज गलबललं. ती काकुळती येअून विनवूं लागली.

"सायबा, मला तुझ्या 'बंदखणीं'त घाल. पण याच्या घरीं मात्र धाडूं नको. मी अिथे तुझ्या पुढे जीव घालवीन. हा काय नवरा आहे होय ? जिती बाअी सोडच, पण मेलं मढं तरी याला नवरा म्हणून जवळ करील का ?"

साहेब आपल्या भुऱ्या मिशांत हंसला. त्याला सगुणेची दया आली. पण त्यालाहि कांहीं कायद्याचीं बंधनं होतीच. काडीमोड झाल्याशिवाय तो मर्तूचा तिच्यावरचा हक्क नाकारूं शकत नव्हता. सहजगत्या त्यानं आणखी प्रश्न मर्तूला विचारला.

"लग्न रजिस्टर झालं आहे का ?"

"नाहीं साहेब !"

साहेबाचे डोळे लकाकले; तो अेकदम गरजला.

"मग लग्न केलं कसं ?"

"अिथें नाहीं केलं. गोवा हद्दीच्या बाहेर."

अेकदम समस्या सुटली. साहेबाच्या मनांतला निर्णय कायद्याच्या कक्षेत आला. त्यानं निक्षून सांगितलं.

"हें लग्न पोर्तुगीज कायद्याला मान्य नाहीं. वाटल्यास मी तुला शिक्षाहि करूं शकेन. अेका पोरीला तिच्या मताविरुद्ध तूं घरांत घातलीस हें कलम तुझ्यावर लागू होअील. पण मी तुला सोडून देतों. माझ्या समोरून तुम्ही दोघं अेकदम चालतीं व्हा."

बायको हातची गेली, या दुःखापेक्षां आपण झाकल्या पाठीनं सुटलों याचा आनंदच मर्तूला अधिक झाला. अुद्वेग, संताप, हें सगळं कांहीं खळबळत होतं तें भागीच्या पोटांत. ती मोठ्या कष्टानं कचेरीच्या पायऱ्या अुतरली. जातां जातां तिच्या कानीं साहेबाचे शब्द पडले.

"सगुणे ! तुला वाटेल त्याच्याशीं लग्न लावून तूं संसार करायला मोकळी आहेस."

याच्याशीं सुद्धा केलं तरी चालेल ? सगुणेनं अर्जुनाकडे बोट करून विचारलं. तिची अुत्कंठा जणूं उतू जात होती.

"आता कसं मनांतलं बोललीस ? 'हा काळुराम' तुला आवडला असला तर याच्याशीं कर. म्हणजे जेव्हां जेव्हा तूं जीव द्यायला जाशील तेव्हां तेव्हा हा तुला हक्कानं वर काढील. काय खरं कीं नाही अर्जुन ?" साहेब खो खो हसत सुटला. आपल्या खोटेपणाला पुन्हा अेकदा त्यानं डिवचलं हें लक्षांत येअून अर्जुन लाजला.

भागी अन् मर्तु वेळसअीच्या पुलापर्यंत पोंचलीं नाहींत तोंच या दोघांनीं त्यांना गांठलं. सगुणा आतां जमिनीवरून चालत नसून अंतराळांत तरंगत होती. मर्तुचं दळभद्र तोंड पाहून सगुणेनं त्याला वेडावण्यासाठीं पुन्हा अेकदा जीभ बाहेर काढली.

"देअीन दोन तोंडांत. मेलेल्याला असं मारूं नये समजलं ?" अर्जुनानं सगुणेचा हात ओढून तिला पुढे ढकलली. तीं दोघंहि त्यांच्या पुढें सटकलीं. मर्तु आपल्या वहिणीचं सांत्वन करूं लागला.

"कशाला बघतेस तिच्याकडे ! जाअूं दे गेली तर. मला असली चमकढबळी बायकोच नको."

त्यावर भागी मर्तूच्या तोंडापुढें हात नाचवून त्याच्यावर अुसळली...

"जळ्ळं तुझं तोंड मेल्या ! कशाला दादल्याच्या जल्माला आलास ? दांड झाला असतास तर अेखाद्यानं बांधाच्या भरीला तरी घातला असता—"



अनुक्रमणिका










## चिरंतनाचा ध्यास

कवि : **वा. भ. बोरकर**

अम्हांला चिरंतनाचा ध्यास
महानतेच्या ज्योतिर्जगतीं अखंड अमुचा वास
महानतेस्तव अमुची काया
महानतेस्तव अमुची माया
महान बघतों लहानांतही म्हणुनि तयांचे दास

क्षमा जान्हवी अमुची माता
सत्य प्रभाकर अमुचा जनिता
भ्राते अमुचे समग्र भूतें घर अमुचें आकाश

दारिद्र्याची अमुची दीक्षा
सत्वाची प्रतिपदीं परीक्षा
विपर्यास, छळ, निंद्रा यांतुनि अमुचा योगाभ्यास

जें जें देवें दिधलें हातीं
खडे कोळसे अथवा माती
त्यांतुनि त्याच्या स्वप्नमूर्तिंचा घडवूं उदय विकास

संकल्पाचें वरितां कंकण
स्वर्ग देहि न अम्हां विलोभन
निर्मूं नूतन स्थान दिगंतीं वितरित ध्रुवप्रकाश

ज्या सेवेचा मणी बांधिला
सतिसम जीवन वाहुं त्याजला
ती अपुरी तोंवरि विटेवरि तिष्ठवुं भगवन्तास

अंगिकारिली ज्यांची निष्ठा
त्यांच्यास्तव ठोकरूं प्रतिष्ठा
परलोकाहुनि प्रियतर आम्हां श्वानाचा विश्वास

या जगताची व्यथा हराया
राजमंदिरीं रचूं सराया
स्वयें वरूं वनवास यौवनीं, पुत्रोत्सवि संन्यास

क्रांतिप्रसवा अमुची शांति
श्रद्धेंतच अमुची विश्रांति
विश्व आमुचें शरीर आम्हीं त्याचे श्वासोच्छ्वास

मौनीं अमुच्या मंत्र मुक्तिचे
तपांत अमुच्या सृजन शक्तिचें
कोमल करुणेंतुनी कलांचा दिव्यानंद विलास

जाळा अथवा उठणीं लावा
क्षय वृद्धी ना अमुच्या भावा
चित्त आमुचें नित्य विदेही स्मितमुख आणि उदास

समिधांसम या तनुचीं काष्टें
जाळुनि येथिल हरूं अरिष्टें
निज भस्मांतुन ऊर्ध्व दिशेंतुन अमुचा पुढें प्रवास



अनुक्रमणिका








मौलिक विचार व भाषा शैली—प्रा. द. के. केळकर यांच्या लेखनांतले हे दोन्हां सद्गुण या लेखांत तुम्हांला आढळतील !—

देशाचें नांव भारत, देशभाषा हिंदी व देशलिपि देवनागरी ही त्रयी भारतनेत्यांनीं उचलून धरली ही अभिमानास्पद गोष्ट होय. भारताच्या तुलनेनें पाहिलें असतां मूठभर विस्ताराचें आयर्लंड आणि सयाम हीं राष्ट्रें जर आपलीं नांवें बदलून घेण्यांत भूषण मानतात, तर भारतालाही आपलें प्राचीन अभिमानास्पद नांव पुन्हा प्राप्त झाल्याबद्दल आनंद कां न व्हावा ? देशाचेंच नांव जेथें बदललें, तेथें आतां परकीयांच्या विक्षिप्त उच्चारामुळें कर्णकटु झालेलीं मुत्रा ( मथुरा ) किरकी (खडकी) बायकुला (भायखळा) अशांसारखीं नांवें लवकरच स्मृतिशेष होतील असें आपण धरून चालूं या. या बाबतींत नागपूरनें आघाडी मारली आहे व महाराष्ट्रांतील इतर शहरेंही त्याच्या मागोमाग जातील यांत शंका नाहीं.

पण ह्या बाबतींत इंग्रजांनीं अपभ्रष्ट केलेल्या नांवापुरतेंच न थांबतां मुसलमानी अमदानीनें आपल्यावर लादलेलीं नांवेंही बदलावयास तरी काय हरकत आहे ? तुम्ही म्हणाल, हें धोरण सर्वस्वी संकुचित वृत्तीचें आहे. राष्ट्रप्रेम हेंही खालच्या दर्जाचें ठरवून आपण आतां जागतिक प्रेमाची भाषा बोलूं लागलों आहोंत ना ? मग आतां मुसलमानी नांवें बदलण्याची भाषा कां बोलतां ? यावर पहिलें उत्तर हें कीं मुसलमानांनीं पाकिस्तानचा हट्ट धरला नसता तर मुसलमानी नांवें बदलण्याचा विचार सुचला असता तरी सोडून द्यावा लागला असता. पण आतां पाकिस्तानच्या स्वातंत्र्याच्या हट्टाला एकदा मान्यता दिल्यावर त्यानें शेंकडों वर्षें आमच्यावर लादलेल्या खोगिरी तशाच राहूं द्यावयाच्या कीं काय ? तर देवनगरी लिपि हीच अखिल भारताची लिपि होय याबद्दल आपण जराशी कणखर वृत्ति स्वीकारली, तशीच अहमदनगर, हैद्राबाद, अहमदाबाद यांची व्याद्दही आतां काढून टाकणें इष्ट होणार नाहीं का ? हैद्राबादनें स्वतंत्र भारताच्या पोटांत खंजीर खुपसण्याचा जो प्रयत्न केला, तो आपण वेळेवर बोथट करून टाकला ही अभिमानास्पद घटना होय. आतां तो सर्वस्वी काढून त्याचे भाषावार तीन तुकडे करून त्याचें नांवही विसरण्याकरितां व योग्य वेळीं आपण सावध झालों याबद्दल स्वतःची पाठ थोपटून घेण्याकरितां हैद्राबादला 'विजयनगर' हें नांवही लवकरच देण्यांत आलें, तर तेंही भारत नांवासारखेंच जनतेला इष्ट असेंच वाटेल.

तुम्ही म्हणाल, आपली दृष्टी विशाल असावयास नको कां ? होय, हवी तर ! पण विशाल दृष्टीची भाषा ही कमरेत कस नसलेल्या म्हाताऱ्याला शोभत नसून छाती पुढे काढून ताठ उभारणाऱ्या स्वतंत्र बलवान राष्ट्राला शोभते. गेलीं शेदीडशें वर्षे आपण पारतंत्र्याच्या संधिवातानें अंथरुणाला खिळून पडलेलो होतो, ते आतां कोठे उठून बसूं लागलो आहोंत. इतर राष्ट्राच्या बरोबरीनें चार पावलें प्रथम टाकू या—आणि मग त्यान्याही पुढे धांव मारण्याची जागतिक पुढारीपणाची भाषा बोलूं या. तेव्हां अखंड जगाला एकत्र आणण्याची भाषा बोलण्यापूर्वी भारताच्या अखंडत्वाची कल्पना तरी प्रथम आत्मसात करूं या ! आणि हे प्रायश्चित्त हे आजच्या दररोजच्या घटना पाहूनच पटू लागेल. उदाहरणार्थ डॉलरच्या तुलनेने पौंडांची किंमत कमी करण्याचे इंग्लंडने ठरविल्यावर इतर अनेक देशांबरोबर भारतानें ते मान्य केले, पण फेटाळून लावले कोणी तर पाकिस्ताननें ! हट्टी मुलानें बापालाही वाकुल्या दाखवाव्या तशांतला हा प्रकार. या नुसत्या वाकुल्याच न ठरतां ऐंशी कोट रुपयांची धूळ डोळ्यांत फेंकली जाणार नाही ना अशाही धक्यानें भारत आतां आपले डोळे चाळून पाहूं लागला आहे. व अनंत आकाशाकडे पाहण्याच्या ध्येयवादी दृष्टीला थोडी मुरड घालून पायाशी असणाऱ्या खाच खळग्यांकडेही तो आतां लक्ष देऊं लागला आहे. आणि तें लक्ष देण्याला नुकतेच पाळण्यांत लोळूं लागलेल्या पाकिस्तानचेंच उदाहरण तेवढे लागू नसून अमेरिकेसारख्या श्रेष्ठ व प्रौढ राष्ट्राचेंही आहे हे कसें विसरून चालेल ? काश्मीरचा प्रश्न तडजोडीनें सोडवावा असा सल्ला अमेरिकेच्या [illegible] ट्रूमननें [illegible] दिला तेव्हां 'भारताच्या पुरुषोत्तमालाही [illegible] आश्चर्याचा धक्का बसला' असे स्पष्ट उद्गार काढावे लागले. हा एकच धक्का नसून असे अनेक धक्के खाण्याचा कणखरपणा जितका लवकर आपल्या आंगीं उतरवतां येईल तितका भारतानें उतरविला पाहिजे. लोकमताला वळण लावण्याची जबाबदारी प्रमुख वर्तमानपत्रावर असल्यानें उदाहरणादाखल टाइम्स सारख्या श्रेष्ठ दर्जाच्या पत्रालाही आपल्या ध्येयाला मुरड घालण्याची आवश्यकता कशी मान्य करावी लागली आहे हें जातां जातां सांगण्यास हरकत नाहीं. महिन्या सव्वामहिन्यापूर्वी टाइम्सनें इमरसनचें वचन उद्धृत करून प्रतिपादन केले होते कीं राष्ट्रीयतेची संकुचित दृष्टी सोडून आपण आतां मानवतेची भाषा बोलूं या !

गेल्या आठवड्यांत हातीं आलेला टाइम्सचा अंक ( १७ सप्टेंबर ) उघडून मुख्य अग्रलेखाकडे दृष्टि टाकतो तों काय आश्चर्य ! सुमारें महिन्यापूर्वी लिहिलेल्या अग्रलेखांतील विचारांना इतक्या लवकर पायबंद घालावे लागतील असे लेखकाच्या स्वप्नींहि आले नसेल तो घालावा लागला. कारण दक्षिण आफ्रिकेत दहापांच पिढ्या स्थिर झालेल्या युरोपियनांनीं आतां नवीन येणाऱ्या युरोपियनांवरच दोन नवीं बंधनें लादलीं आहेत. त्याचा अर्थ म्हणजे वाटेल तितक्या गोऱ्या लोकांना दक्षिण आफ्रिकेंत येण्याच्या स्वातंत्र्यावर बंधन घातले असून आफ्रिकन सरकारला इष्ट वाटेल तेवढ्या मर्यादेत संख्येला आंत घेतले जाईल हाच होय. आणि दुसरे बंधन म्हणजे आंत घेतलेल्यांही नागरिकांना निवडणुकींतील मताधिकार देशांत येईल, ते पांच वर्षे आफ्रिकेंत तो स्थिर झाल्यानंतरच ! आणि आशियांतल्या [illegible] तर त्याने देशाच्या ठराविक भागांतच वसाहत केली पाहिजे व ठराविक भागांतच उद्योग व व्यापार केला पाहिजे अशीं बंधनेंही घालण्यांत आलीं. नुकताच पांच वर्षांपूर्वी एक नवीन कायदा करून तर तेथें राहणाऱ्या हिंदी प्रजेचा मतदानाचा हक्कही हिरावून घेतला आहे. या घातुक फूत्कारावर

अनुक्रमणिका

मान्यता देण्यांत यावी या विषयीं अखिल भारतीय पंडिताचे मन वळविण्यांत पाणिनीनें यश मिळविले, त्यामुळें त्याचा भगवान पाणिनी म्हणून जो गौरवपूर्ण उल्लेख करण्यांत येऊं लागला तो अनाठायीं होता असें कोण म्हणेल ? जातां जातां हेंही सांगितलें पाहिजे कीं वरिष्ठ वर्गाची भाषा पाणिनीनें स्वीकारली ती प्राकृत भाषा प्रांतपरत्वे भिन्न होती व संस्कृत भाषा भरतखंडांत पंडितांना तरी परिचित होती यामुळेंच. पण अखंड भरतखंडातील भाषा स्वीकारतांना त्यांची दृष्टि व्यापक होती हें मात्र नामांची व क्रियापदाची अनेकरूपें उदाहरणार्थ " त्वाम्–त्वा अनेन–एनेन, धेनवे –धेन्वै व जहाहि, जहिहि–जहीहि " अशी रूपें त्यानें मान्य केली यावरून सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ही पाणिनीय दृष्टि, बौद्ध व जैन यांनीं न स्वीकारतां आपले ग्रंथ प्राकृत भाषेंत ग्रथित करण्याचा त्यांनीं नवा पायंडा पाडला. पण आपल्या मताचा प्रभाव अखंड भरतखंडावर पाडावयाचा असेल तर प्रांतपरत्वें व कालपरत्वें बदलणाऱ्या भाषांच्या रूपाकडे [illegible] देवां अखंड भारतांत शेकडों वर्षे मान वर करून ताठ उभी राहणाऱ्या संस्कृत भाषेचेंच ग्रहण केले पाहिजे हें त्यांच्यापैकीं कांहींना कळून चुकलें. म्हणूनच अशोकानें आपले शिलालेख पाली भाषेंत लिहिलें तरी ते अखंड भारताला समजणें कठीण पडूं लागल्यामुळें अखंड भारतांत आणि अखंड कालाला परिचित राहणारे शिलालेख वा ताम्रपट हें पाणिनीय संस्कृतमध्येंच लिहावे, ही विचारसरणी अशोकानंतर तीन चार शतकांतच नृपवरांना पटूं लागली. नृपवरांना पटूं लागली येवढेंच नव्हे तर बौद्ध धर्मीय श्रेष्ठ साहित्यिकांनाही पटूं लागली हें तर विसरतांच कामा नये. या संबंधीं बौद्ध धर्माच्या श्रेष्ठ ग्रंथकारांपैकीं नुसत्या अश्वघोषाचा उल्लेख केला तरी पुरे होईल ! आधीं अश्वघोष हा बौद्धपंथातील एक श्रेष्ठ ग्रंथकार, शिवाय त्यानें चरित्र लिहिलें तें भगवान् बुद्धाचें आणि ज्या काळीं तें लिहिले तो काळ इसवी सनाच्या सुरवातीचा म्हणजे पाली भाषेचा पुरस्कर्त्या अशोकानंतर तीन शतकाच्या सुमाराचाच ! असें असून त्यानें बुद्धचरित्र लिहिले ते कोणत्या भाषेंत तर बौद्ध जैनांनीं बहिष्कृत केलेल्या संस्कृत भाषेंत, म्हणजे अश्वघोषापूर्वी कित्येक शतकें इहलोकीं चमकून गेलेल्या पाणिनीनें निश्चित स्वरूप दिलेल्या संस्कृत भाषेंत !

अश्वघोषाचा हा दंडक सर्वांनीं उचलला नाहीं हें सांगावयास नकोच. पण अश्वघोषासारख्या श्रेष्ठ बौद्ध ग्रंथकाराला अश्वघोषाचे अखंड भरतखंडांतील अतुलनीय सामर्थ्य पटलें होतें, येवढ्याच गोष्टीकडे आपलें लक्ष वेधावयाचे आहे. अश्वघोषाचे व्यापक धोरण सर्वांनाच पचनीं पाडणें कठिण होते. त्यामुळें प्राचीन भारतांतील कांहीं राजांनीं संस्कृतास कोपऱ्यांत सारून प्राकृत भाषांना सिंहासनाधिष्टित करण्याचा कांहींसा अट्टाहास केल्याचे उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ दहाव्या शतकांतील काव्यमीमांसाकार राजशेखर लिहितो कीं " ऐकिवांत आहे कीं मगधचा राजा शिशुनाग यानें आपल्या अंतःपुरांत 'ट' वर्ग व श ष स वगैरे दुरुच्चार शब्दांना बंदी केली. ऐकिवांत आहे कीं शूरसेनाच्या कुविंद राजानें जोडाक्षरांची हकालपट्टी केली. " आणि जैन पंथ स्वीकारलेल्या कांहीं संस्कृत पंडितांनींही ही परंपरा पुढें चालविली. उदाहरणार्थ १० व्या शतकांतील पुष्पद या कवीनें अपभ्रंश भाषेमध्यें काव्यें लिहिली असून त्याची भाषा ग्रंथाच्या नांवाप्रमाणें यशोधर चरित्राचें जसहरचरिउ यामध्यें झालेल्या रूपांतराच्या भाषेंत लिहिलेली आहेत. जोडाक्षरें टाकण्याचा अतिरेक पुढें इतक्या थराला गेला कीं प्राकृत भाषाही गुळमुळीत बुळबुळीत होत गेली. मराठी भाषेनें त्या प्रवृत्तीला प्रारंभीच कांहीं प्रमाणांत तरी धक्का दिला हें नमूद केलें पाहिजे. मराठी भाषेला जुने लेख म्हणजे श्रवण बेळगोळा येथील गौतमेश्वर पुतळ्याच्या पायावर खोदलेलें 'श्री चामुण्डराये करवियलें' व 'गंगाराजे सुत्ताले करवियले' हे होत...या लेखांत श्री, ण्डा व त्त ही जोडाक्षरें प्राकृत व अपभ्रंश भाषेप्रमाणें सैल न करितां जशीच्या तशी कणखर ठेवली आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मात्र हें धोरण सर्वत्र स्वीकारलें गेले नाहीं व स्वीकारलें जाणें त्या काळीं अशक्यही असेल. म्हणूनच सामान्य जनाला आपले विचार पटवून द्यावयाचे तर त्यांच्या बोलभाषेचा शक्यतों स्वीकार केला पाहिजे हें ज्ञानेश्वराला आवश्यक वाटले असावें म्हणूनच प्रसाद-दानाच्या ऐवजीं पसायदान असे शब्द तो वापरीत असावा. पण पुढील कवींना संस्कृतशीं [illegible] मिळते घेणें आवश्यक वाटले असावे म्हणूनच ज्ञानेश्वरानीं वापरलेलें पसाय सारखे शब्द मागे पडून त्यांच्या जागीं प्रसाद सारखें संस्कृत शब्द मिरवूं लागलें. आणि नामदेव तुकाराम यांच्या मधल्या मुसलमानी अमदानींत फारशीची टोळधाड येऊन गेली तिला संतांनीं तोंड दिले तरीही जो शब्दवृक्ष टोळधाडीनं निष्पत्र केला त्यावर शिवाजीनें संस्कृत पाणी शिंपून पुन्हा संस्कृत शब्दाची पालवी–राजव्यहारकोश रचवून घेऊन–त्याला फुटूं लागली. आपले विचार सामान्यजनापर्यंत पोचवावयाचे तर मातृभाषेच्या द्वारें पोचविले तरच पोंचतील हें ओळखून मुकुंदराजादि संतकवींनीं मराठीचा स्वीकार केला. पण मुकुंदराजाच्या 'विवेक सिंधू'च्या एका चाहत्याला ह्या ग्रंथाचे संस्कृतमध्यें भाषांतर झाल्यास अखंड भारतांत स्थान मिळेल असे वाटल्यावरून त्या चाहत्यानें म्हणजे गोपाल मुद्गलानें त्याचे संस्कृतमध्यें भाषांतर केले. महानुभावांचाही संस्कृत विरुद्ध मुक्तेश्वर, ज्ञानेश्वर यांच्या इतकाच कटाक्ष होता. पण या पंथातील सोळाव्या शतकांतील चक्रपाणी व्यास यालाही महानुभावांचा वेदतुल्य ग्रंथ जो सूत्रपाठ त्याचेंही संस्कृतमध्यें भाषांतर केल्या शिवाय राहवेना. तात्पर्य हा सर्व पूर्वेतिहास लक्षांत घेतला तर अखिल भारताची भाषा म्हणून मान मिळविणारी हिंदी अथवा भारती ही जितकी संस्कृतप्रचुर होईल तितके अखंड भारताच्या दृष्टीनें हितावह होईल हें मनास पटवून देणें कठीण जाणार नाहीं. मात्र संस्कृतमधून शब्द घेतांना कविवर्य मोरोपंतानें घेतलें इतक्या प्रमाणांत न घेतां सुलभतेवर लक्ष ठेऊन स्वीकारावें म्हणजे झाले.



# फांद्यावरली जाई

— र. वा. दिघे

" गेल्या पांच वर्षांत आमचा गांव कित्ती तरी वाढलाय. त्या समोरं दोन गिरण्या दिसतात ना त्या बाबांनीं बांधल्या आहेत. बाबांच्यामुळं तर या गांवाला महत्व आलंय. इथली लोकसंख्या निदान दसपट तरी झालीय बाबांच्या गिरण्यांमुळं."

" खरंच. मी लहानपणीं इथं आलों होतों तेंव्हां किती चिमुकला होता हा गांव !"

" तुम्ही आलां होतां इथं ? मला नाहीं तें आठवत ?"

" कसं आठवणार ? येवढीशी चिमुरडी होतीस तूं तेव्हां. आमच्या बकुळीवर मी चढलों कीं नागवी यायचीस बकुळं मागायला."

" इश्श ! "

" इश्श ! आतां इश्श करून कसं चालेल ? " विलासनें शोभेचा हात आपल्या हातांत घेतला व तो समोरच्या सुंदर देखाव्याकडं पहूं लागला.

शोभा गांवच्या श्रीमंत बाबासाहेब इनामदारांची एकुलती एक मुलगी. व विलास त्याच गांवांतील सुखवस्तु तात्यासाहेबांचा नातू. शोभा मुंबईच्या कॉलेजांत बी. ए. च्या वर्गांत होती तर विलास पुण्यास एम्. एस्सीचा अभ्यास करीत होता. विलासचे वडील गरीब होते. आपलं मोठं कुटुंब काटकसरीनें सांभाळीत त्यांनीं विलास व त्याचीं भावंडें यांना युनिव्हर्सिटीचं शिक्षण दिलं होतं. त्यांत त्याना बरंचसं कर्जहि झालं होतं. विलास हुशार विद्यार्थी होता. त्याच्या मनांत अमेरिकेला जाऊन संशोधनाचं कार्य करण्याचं होतं. परंतु गरिबीमुळं तें शक्य नव्हतं. तात्यासाहेबांनीं मुत्सद्दीपणानें शोभा व विलासच्या लग्नाचा योग जुळवून आणला. बाबासाहेब लग्न झाल्यावर आपल्या भावी जामातास अमेरिकेला पाठवून वर चाळीस हजार रुपये वरदक्षिणा पण देणार होते. शिवाय त्यांच्या पश्चात् त्यांची सर्व इस्टेट शोभेकडं म्हणजे विलासकडंच येणार होती. बरं, शोभा तरी वाईट मुलगी होती ? बिलकुल नाहीं. ती चांगलीच सुंदर होती. फक्त श्रीमंतींत लाडालुडांत वाढल्यामुळं प्रकृतीनं ज़रा नाजुक होती येवढेंच.

"आपण त्या कड्यावर जाऊन बसूंया." विलासनें शोभेचा हात धरून ओढला.

" छेः आतां माझा पाय उचलत नाहीं. आपण इथंच बसूं या. "

" वर गेलों म्हणजे चांगली शोभा दिसेल. "

" शोभा आहे तशीच दिसेल. मात्र शोभेचा कडेलोट झाला तर तुमची मात्र चांगलीच शोभा होईल. बघा इथं. इथूनच मी आमच्या गांवची सगळी शोभा दाखवितें. "

विलास न् शोभा डोंगराच्या मध्यभागावर असलेल्या एका कड्यावर बसली.

"तो बघा आमचा गांव. झाडांच्या शेंड्यावर दिसते ती आपली आगाशी. त्याच्यासमोर तुमचं घर. मंगलोरी कौलं आहेत तीं पांढरपेशांची घरं न केंबळीचीं छपरं दिसतात त्या शेतकऱ्यांच्या न् गिरणीकामगारांच्या झोंपड्या. पलिकडे रेल्वेरस्ता न् विजेचे तारखांब. तिथून डोंगराच्या पायथ्यापर्यंत शेती लागून राहिली आहे. त्या शेताच्या बांधापासून रान सुरू झालं आहे."

"मागं आदीवासींच्या झोंपड्या पाहिलेल्या आठवतात मला. त्या कुठं दिसत नाहींत?"

"त्या काय. अर्ध्या डोंगरावरच्या झाडींत धूर निघत आहे तिथं आहेत."

"त्या झोंपड्या मी पाहिल्या तशाच आहेत. त्यांत गांवाप्रमाणं कांहीं बदल नाहीं. पण ती पत्र्यांच्या घरांची कॉलनी कसली? कंट्रोलच्या दिवसांत येवढा नवा कोरा पत्रा कुठून मिळविला या लोकांनीं?"

"अहो ती तुमच्या काँग्रेसची करामत आहे. ती आदिवासींची वसाहत आहे सर्वोदय फंडातून बांधलेली. म्हणतात पन्नास हजार रुपये खर्च केले आहेत आन आणखी पन्नास हजार खर्च होणार आहेत. रेडिओन् बंगीचा यावर सर्व अडलं आहे."

"कुणी आदिवासी त्या कॉलनींत राहतात?"

"छट्. चिट् पाखरूं नाहीं तिथं. नुसता वेस्ट ऑफ मनी आहे. काँग्रेसच्या इतर नाटकांप्रमाणेंच हेंहि एक नाटक आहे. काय म्हणे दारूबंदी, द्विभार्याप्रतिबंध, अधिक धान्य पिकवा मोहिम. त्यांतलाच हा एक फार्स."

"केंबळाच्या घरांऐवजीं पत्र्याचीं घरं सरकारनें दिलीं विचाऱ्यांना हा फार्स झाला?"

"अहो पहिल्या पावसाचा ताशा वाजूं लागला पत्र्यावर त्याबरोबर आदिवासींची डोकेदुखी उठली. न् ते तिथून पळाले न् परत आपल्या झोपड्यांत येऊन राहिले. बोलून चालून जंगलचे लोक ते. त्यांना आपली वेडं पाजणं म्हणजे जुलूम आहे. विचारे आतांपर्यंत रानांत राहत आले. रान हेंच त्यांचं जीवन. त्याचं शिक्षण ते घरच्या घरींच देतात आपल्या मुलांना. तें त्यांना विसरावयाला लावायाचं आणि दुसरं जीवनहि द्यावयाचं नाहीं ही राक्षसी भूतदया आहे. मेंढराला, अस्वलाला थंडी वाजते म्हणून गरम कोट घालण्याचा न् माकडांना कानटोप्या. त्यांतलाच हा प्रकार आहे. विचाऱ्यांना पन्नास हजारांची शेती दिली असती तर पोटभर खाल्लं तरी असतं त्यांनीं. आणि तुम्हीं काँग्रेसचे लोक, तुम्हीं पक्कं ध्यानांत ठेवा कीं हे आदिवासी इथले खरे रहिवाशी. Quit India सगळ्यांना म्हणायचा यांनाच अधिकार आहे." शोभा इनामदाराच्या विरुद्ध असलेल्या काँग्रेसवर तोंडसुख घेऊं लागली.

"काय सुंदर आहे दरींतलं तळं!" विलास काँग्रेसचा अंध भक्त होता. त्यानें विषय बदलण्याकरितां सुरवात केली. "जणुं सृष्टिदेवीचा आरसाच, अन् त्यांत तीं आपलं रूप न्याहाळीत आहे. बघ तर खरं. डोंगर, रानं, आकाश, त्यांतील रंग, बाजूचा काठ त्यांत कसा चितारला आहे तो!"

"अन् त्यांत एकच कमळ फुललंय. दिसलं तुम्हाला?"

"मला तर दोन दिसताहेत."

"छट्. एकच आहे, तुमची नजर डिफेक्टिव्ह आहे."

"माझी नाहीं तुझी. एक कमळ तळ्यांत न एक डोंगरावर. दोन्हीहि भारतीय संस्कृतीचीं प्रतिकं आहांत." विलासनें शोभेच्या गालावर एक चापट मारली.

"चल. डोंगरावरच्या पुष्पाला मी तळ्यांतील पुष्प अर्पण करतों."

"आपल्याच्यानं नाहीं खुलवणार त्या काव्याकुठ्यांतून. आणि तुम्ही पण जाऊं नका. घरीं गेल्यावर पण गड्याला पाठवूं."

"तूं नको. येऊंस. मी आतां घेऊन येतों. तोंपर्यंत तूं खालीं उतरं न शंकराच्या देवळाजवळ माझी वाट पाहा." विलास संस्कृत काव्यांतील कमलाच्या स्तुतीनें भरलेले श्लोक स्वतःशीं गुणगुणत पायाखालची दरी उतरूं लागला.

थोड्याच वेळांत विलास तळ्याच्या जवळ आला. तळ्याच्या काठांनं गर्द झाडी व मोठमोठ्या धोंडी होत्या. त्यांतून वाट काढतांना त्याला जपून पाय टाकावे लागत होते. अखेर तो शेवटच्या धोंडीवर चढला आणि—आणि आतां खालीं उडी मारणार तों थबकून जागच्या जागीं उभा राहिला. त्याचे डोक्यांतील भवभूति, कालिदास एकदम नाहींसे झाले. शांकुतल, मेघदूत, ऋतुसंहार विसरून गेले. कारण त्याला त्या तळ्यांत एका कमला ऐवजीं दोन कमलें दिसलीं होतीं. एक पाण्याचे वर तर दुसरें पाण्यांत. एक वास्तव तर दुसरें प्रतिबिंब. एक आर्य संस्कृतीचें प्रतीक तर दुसरें अनार्य. परंतु दोघें नग्नसौंदर्यानें ओथंबलेलीं.

तळ्याच्या कातळावर गुडघ्यांनीं रांगून, टेकलेल्या तळहातांवर झोक सांवरीत आदिवासीची एक षोडशी विवस्त्र वक्षःस्थलानें पाण्यांतील आपल्या प्रतिबिंबाकडे एकाग्रतेनें पाहत होती. तिची आकृति पाठमोरी दिसत होती. पोलादी कमानीप्रमाणें पाठ वांकवून कड्यावर आलेल्या निसुंल्या कमरेच्या वाघिणीप्रमाणें ती तोलांत वांकली होती. तिची आंबवर्णी कातडी मावळल्या सूर्याच्या प्रकाशांत रेशमाप्रमाणें चकाकत होती. तोंडवळ्यांत ती विशेष सुंदर नव्हती परंतु पाण्यांत दिसणाऱ्या तिच्या गोल चेहऱ्याचा प्रफुल्लपणा विलक्षण होता. सबंध मांड्या व पोटऱ्या उघड्या ठेवून कमरे भोंवती ती घट्ट लुगडें नेसली होती. त्यामुळें तिच्या निरोगी न निर्दोष सौंदर्याचा पूर्ण प्रत्यय येत होता. तिच्या मांसल व पुष्ट अवयवावर कुठेंहि सूक्ष्म देखील रेषा नव्हती त्यामुळें ते निघोट झाले होते. परमेश्वरानं काढलेल्या त्या कसदार सुंदर चित्रांत कामदेवाशिवाय कुणीहि फारक केला नव्हता. त्यानें मात्र ठिकठिकाणीं मोहक वक्रता निर्माण केली होती. तिच्या नुकत्याच वाढीस लागलेल्या गोल व घट्ट स्तनांनीं तर बंडच पुकारलें होतें.

अनार्य मदनाच्या अचानक दृष्टीस पडलेल्या या रानटी शस्त्रानें विलास घायाळ झाला. क्षणभर तो स्वतःला विसरून गेला. एका मनानें त्याला सांगितलें कीं अशा एका रानवट मुलीची लाज अशा तऱ्हेनें चोरून पाहणें पाप आहे, असभ्य आहे, संस्कृतीच्या विरुद्ध आहे. तर दुसरें मन त्याला समजावीत होतें 'पाप मनांत असतं पाहण्यांत नसतं. माझ्या जागीं एखादा कवि किंवा चित्रकार असता तर त्यानें ही सुवर्णसंधि घालवली असती काय? पहिलं मन त्याला सांगत होतं कीं तोंड फिरीव, पळ, निदान डोळे तरी मिटून घे बाबा. त्याच वेळीं दुसरं त्याला दरडावीत होतं कीं प्रथम तूं प्राणी, नंतर मनुष्य, नंतर साधु आहेस. पण मी तुझे पाय न डोळे खिळवून टाकल्यावर तूं काय करशील?

इतक्यांत ती मुलगी हंसली. तिनं आपल्या यौवनाचा कठिणपणा तपासून पाहिला व अंगांत चोळी चढविली. तळ्याच्या बांधावर एक जाईचा वेल पसरला होता. खडकावर त्याची पुष्पवृष्टी चालू होती. खडकावरील फुलांची पुष्पभूषा संपल्यावर त्या आदिवासी मुलीनें जाईच्या फुलांचे पानासुद्धां तोडलेले तुरे आपल्या केसांत खोविले!







अनुक्रमणिका



# जाहिरातीसाठीं विषय अनेक असूं शकतील !

पद्धतशीर प्रसिद्धि केल्यानें मालाचा खप वाढून वार्षिक विक्री वाढते असा सर्वत्र अनुभव आहे. तेव्हां जाहिरात नियमितपणें करणें जरूर आहे.

पण कोणत्याहि मालाची प्रसिद्धि कुठल्याही प्रकारानें आम्ही करूं शकतो. मालानुरुप जाहिरात प्रकारांचें वर्गीकरण आणि खर्चाचें पद्धतशीर अंदाजपत्रक करण्यामधील आमचा अनुभव मोठा आहे.



कोणत्याही प्रसिद्धिबाबत आमचा सल्ला प्रथम घ्या

**टॉम अँड बे (अॅडव्हरटायझिंग)**

लक्ष्मी रोड, पो. बॉ. नं. ५७४, पुणें २

वर्तमानपत्रें, होर्डींग्स, पोस्टर्स, सिनेमा, रेल्वेज्, ट्रॅम्वेज्, कमर्शिअल डिझाइन्स, ब्लॉक्स्

DESIGNED BY TOM & BAY

अनुक्रमणिका

तिची वेषभूषा संपते न संपते तोंच तिच्याच वयाच्या आणखी सात आठ मुली रानांतून आरडाओरडा करीत तिथं आल्या व त्यांनीं तळ्यांतील पाण्यानें आपलीं दिवसाभरीच्या श्रमानें मळलेलीं व थकलेलीं शरीरें स्वच्छ धुऊन काढलीं व शांत केलीं. नंतर त्यांनीं बरोबर आणलेल्या लतापुष्पांनीं आपले आंबाडे सजवले. तेव्हां विलासला कळलें कीं आर्य संस्कृतीनें गौरविलेल्या लज्जेकडं लक्ष देण्यास त्यांना वेळ नाहीं, तशीच ऐपत पण नाहीं. जंगलजीवनानें त्यांची संकृति तयार केली आहे. त्या मुलींत कुणी शेलाट्या तर कुणी बांधेसूद घाटाच्या मुली होत्या. सर्वांचीं शरीरें लवचीक होतीं. परंतु विलासनें पाहिलेल्या पहिल्या मुली इतकी कुणी गोंडस किंवा मोहरेदार नव्हती. निवडणुकींत आदिवासींची कल्याणी ठरली असती ती. आणि खरोखरी ती कल्याणीच होती त्यांची: कारण सर्व मुलींचीं फुलं माळून झालीं तेव्हां तळ्याच्या बांधावरील हरळीच्या कुरणांत कल्याणी गाणं म्हणत नाचूं लागली, तेव्हां बाकीच्या मुली भरभर तिच्या भंवती गोळा झाल्या व तिनं दिलेल्या तालावर फेर धरून रानभेकरींप्रमाणें नाचूं लागल्या. कमालीच्या गरिबींत वाढलेल्या त्या साध्या मुलीचे कपडे साधे होते. त्यांच्या गळ्यांतील कांचेचे मणी, पोत, पितळेच्या साखळ्यांच्या कानबाळ्या कोपरवलासाचे गोट व बांगड्या, डोईंतील फुलं सर्व कांहीं साधं होतं. त्यांचे गळे पण साधे होते आणि त्यांतून त्यांच्या साध्या जीवनाची कहाणी सांगणारं गाणं पण साधं होतं. कल्याणी गोड आवाजांत गाणं सांगूं लागली.

सागाची साल गोळा केलीन वये ।
एकच गोहिला बांधलान वये ।
बाजारांत नेऊन इकलान वये ।
एकच दिडकी आलिन वये ।
दिडकिचं दाणं घेतलन वये ।
घरच्या वाटेला लागलुन वये ।
इकडं तिकडं नंदरलं वये ।
एकच फक्का मारलान वये ।
सांजेला घरांत आलुन वये ।
माळ्याला निसण लावलिन वये ।
दह्याचा ठिला काढलान वये ।
इकडं तिकडं नंदरलं वये ।
एकच फुरका मारलान वये. ।

जसजसं तें लोकगीत रंगूं लागलं तसतसा नाच रंगूं लागला. नाचांतून नाच निघाले. उलटसुलट फेर सुरू झाले. डाव्या उजव्या बाजूला लवून, लंगडीच्या उड्या मारून, फिरक्या काढीत गिरक्या मारून पोरी नाचूं लागल्या. त्यांचीं लवचिक शरीरें लव्हाळ्याच्या पातीप्रमाणें वांकत होतीं. त्यांच्या आकृतींच्या जिवंत रेषा हालत होत्या. जणुं एखाद्या फिरकत्या फुलांची रंगीत उघडमीट लवलवते आहे. जेव्हां त्या उलटा फेर धरीत त्यावेळीं कर्दळी वनच रंगण धरून व एकमेकींच्या पायांत पाय घुसडून नाचत आहे असें वाटे. विलास त्यां जानपदनृत्यांत पूर्ण रंगला. कल्याणी व तिच्या सख्या यांच्या शरीरांच्या घाटाचं तासकाम नाचांत आपोआप कसं घडतं याचं प्रात्यक्षिक त्याला पाहण्यास मिळालें. नाच चालूं असतांना एक मुलगी नाचांतून बाहेर पडली व म्हाताऱ्या बाईसारखी काठी टेकीत मुली न्याहाळीत फिरूं लागली. मधून मधून ती मुलींना विचारीत होती.

" मला शा देते अवदसा काय ?"

मुली उत्तर देत.















"मी नाय फुई तुझी जाय."

दुसरी एक मुलगी नाचांतून बाहेर पडली व नाचाबरोबर फिरत म्हातारीला विचारूं लागली,

"कुठं हाय वये माझी जाय
झोडून काढतों मोरी गाय."

हा प्रकार चाललाय तोंच रानाच्या झाडींतून एक धिप्पाड आदिवासी तरुण तीरासारखा धांवत आला न् तो विलासच्या कल्याणीला धरून ओढूं लागला. तोंडानं तो म्हणत होता,

"ही पाहा माझी गोरी जाय
गोरी जाय माझि मोरी गाय"

आतां मुलींनीं फेर सोडला व त्या तरुणाला हाताला जें सांपडलं त्यानं टोणपण्यास सुरुवात केली. परंतु त्यानें कल्याणीची मिठी सोडली नाहीं. तो तिला झाडीकडं फरफटत ओढून नेऊं लागला.

विलासच्या संस्कृतीला हें सहन झालं नाहीं. तो आपला आडोसा सोडून त्वेषानं निघाला व कल्याणीजवळ आला. मग त्या दोघांच्या मध्यें पडून कल्याणीला सोडवूं लागला. त्याला पाहतांच सर्व मुली पळून गेल्या. विलासनें बळ केलं पण त्या तरुणानें कल्याणीला आपल्या छातीजवळ जास्तच आवळून धरलं. विलास जास्तच जोर करूं लागला. त्या धांदलींत त्याच्या हाताला कल्याणीच्या स्तनांचा स्पर्श होत होता. परंतु त्यानें कदर केली नाहीं. संकोच वाळगला नाहीं. तरी तो त्या तरुणाची जबरदस्त मिठी सोडवूं शकला नाहीं. तेव्हां त्यानें कल्याणीला पाठीमागून कव घालून धरलें व त्या तरुणाच्या कुशींत ढोपराची ठोकर दिली. तरुण कोलमडत जाऊन लांब पडला. कल्याणी पण तशीच लांब जाऊन आपटली. विलासनें तिला धरून उठविलें व उभें केलें. त्याच्याआंत आदिवासी तरुण पळून गेला.

"लागलं नाहीं ना?" विलासनें विचारलें.

"नाय." पिंपळाच्या पानाप्रमाणें कांपत व विलासकडे रोखून पाहत तिनें उत्तर दिलें. विलासच्या तेजानें ती दिपून गेली, हसीं कां रूपानें हें कांहींच कळत नव्हतें. परंतु ती लाजली मात्र नव्हती हें खास. उलट विलासचा पुष्ट देह ती टक लावून न्याहाळीत होती.

"नांव काय तुझं?"

"वांदरी."

"वांदरी! इतक्या सुंदर मुलीचं नांव वांदरी कसं?"

वांदरी गाळांतल्या गालांत हसली.

"व्हय. वांदरावानी अचपळ म्हून बाबा मला अशी साद घालतो."

"आणि तुला धरलं त्याचं नांव काय?"

"रुमणा."

"थांब. मी त्याचा पुरा बंदोबस्त करतों. अहो म्हातारबा, इकडे या." विलासनें पाऊलवाटेनें चाललेल्या एका म्हाताऱ्याला हांक मारली. तो विलासजवळ येऊन उभा राहिला.

"काय नांव तुमचं?"

"दादा, पिंगळ्या म्हणतात मला."

"पिंगळ्या, रुमणाला तूं ओळखतोस?"

"कां? दुमणाचा पोरगा हाय तो."

"त्यानें या पोरीला धरली होती. कुठं गेली ती? पळाली वाटतं?" विलासनें वळून पाहिलें तर वांदरी अदृश्य झाली होती, "वांदरी नांव आहे बघ तिचं."





अनुक्रमणिका

" पन संमद्या पोरी तर आतांच नाचत व्हयां इथं. "

" अरे नाचांतूनच त्यानं तिला ओढली. "

" अस्सं व्हयं. तो खेळ हाय पोरांचा. "

" दुरण्यावाल्या मुलांच्या अंगावर हात टाकणं खेळ ! "

" त्यांत पाप-बाप नाय. नाचाच परकार हाय तो. "

" सगळ्या नाचांत असंच करतां तुम्ही ? "

" दादा, नाचानाचांत लई परकार हायेत. मी दखवतो तुम्हाला. तुमी इनामदाराचे जांवई हात. म्हून उद्या तिसरा पार उलटला कीं आमच्या वाडींत या. म्हंजी आमी समदं परकार दावं नाचाचं. "

आतांपर्यंत कंबरेच्या तोस्तानातील तंबाखू घेऊन केसांत ठेवलेल्या आपेल्याच्या पानाची विडी वळण्याचं काम म्हाताऱ्यानें चालू ठेवलें होतें. ती विडी पुरी झाली होती. तील म्हाताऱ्यानें तोस्तांनातील कप भरला न चकमकीनें विस्तू पाडून तो सिलगावला. नंतर विडी फुंकीत तो निघून गेला. विलासहि कमळ न काढतां घरीं आला.

त्या रात्रीं आजोळच्या सोप्याच्या माडींत विलास जेव्हां झोपावयास गेला तेव्हां त्याला समोरच्या इनामदाराच्या वाड्यांतून वाजाच्या पेटीचे सूर ऐकूं आले. त्या घळवणांतून शोभेची किरटी चोरटी ह्रस्व 'इ' दीर्घ 'ई' किंचाळत होती. त्या विद्रूपीचं गाणं थांबलं तेव्हां कवळोखांतून ढोलाच्या साथीवर पाझरणारे लोकगीताचे कर्णमधुर सूर व नाचाचा जल्लोष त्याच्या कानांत शिरला. रात्रभर त्यानें आदिवासींच्या वाडींतून येणारी नाचाचीं गाणीं व ढोलाचा आवाज ऐकला. वांदरीची गोंडस मूर्ति त्याच्या मनःचक्षूसमोर सारखी येत होती. तो मनांतल्या मनांत तिची शोभेबरोबर तुलना करीत होता. एक वेळ त्याला वाटलें कीं आपणहि वाडींत जाऊन त्या वनवासी लोकांत सामील व्हावें. परंतु त्याच्या वडिलांचं आर्थिक संकट, स्वतःची महत्त्वाकांक्षा, त्याचप्रमाणें चाळीस हजार हुंडा व मोठ्या इस्टेटीचा वारसा इतक्या गोष्टी त्याच्या समोर उभ्या राहिल्या व सासरच्या लोकांत वाईट दिसेल म्हणून तो वाडींतले आवाज मिटल्या डोळ्यांनीं ऐकत पडून राहिला.

दुसरे दिवशीं कुणी संशय घेऊं नये म्हणून विलासनें शोभेला वाडींतील नाचाच्या आमंत्रणाची माहिती सांगितली व कसंबसं वाडींत त्याच्याबरोबर जायचं तिच्याकडून कबूल करून घेतलं. शोभेनें तोंडाला पावडर फासली, ओठ रंगवले, सेंट अंगावर ओतलें व जार्जेटचं पातळ नेसून ती रानांत जावयास सिद्ध झाली. मग उन्हं खालीं गेल्यावर त्या दोघांनीं पाचूंच्या डोंगरावरून पवळ्याच्या वेलाप्रमाणें चढणाऱ्या तांबड मातींतील गवंडानें वाडी गाठली. वाटेनें आदिवासींचीं मुलं, मुली, बापे न बायका जंगलांतील जीवनकलहांत मग्न असलेले त्यांना भेटले. कुणी मासे झोळींत होतें, कुणी चिकोटीनं पक्षी पकडीत होते, कुणी मधमाशांच्या पोळ्यांच्या मागं लागले होते तर कुणी रानांतून लाकूड वाहून आणीत होते. अनादि कालापासून ते जंगलांत राहत आले. आर्य, शक, हून आले. पण त्यांनीं जंगल सोडलं नाहीं. बुद्ध, अशोक यांनीं मानवता सुधारण्याचा प्रयत्न केला पण ते होते तसेच राहिले. साम्राज्यं आली गेलीं मोंगलांनीं, पठाणांनीं ऐश्वर्य भोगलीं पण ते कोरडे राहिले. ते आर्य संस्कृतीला भुलले नाहींत, मुसलमानी ऐष-आरामांनीं त्यांच्या तोंडाला पाणी सुटलें नाहीं, गोऱ्या संस्कृतीची त्यांना महती वाटली नाहीं. त्यांनीं आपली अनार्य संस्कृति कायम ठेवली वगैरे गोष्टी शोभेनें विलासला सुनावल्या. तिला माहित नव्हतं कीं काल संध्याकाळींच विलासनं अनार्य संस्कृतीचं अंतरंग पाहिलं होतं.

डोंगर चढून ते दोघे वाडींत आले. वाडींतल्या झोपड्यांच्या केंबळावरून तांबड्या भोपळ्यांचे हिरवे ताणे पसरले होते. त्यांतून भोपळ्यांचीं मोठालीं पिवळीं फुलें उमललीं होतीं. कुंपणावरून व छपरांवरून घोसाळींनीं पिवळ्या घंटा लटकावल्या होत्या. मेडू न शेंड्यांनीं त्या ... झाकली होती. कारांदे न कोनफळें यांचे वेल ... चढून त्यांनीं हिरवी गर्दी उडवून दिली होती व झोपड्यांना शोभा आणली होती. मांडवावरून कारल्यांचीं तोरणं लोंबलीं होतीं. कुंपणावर गोकर्णीच्या निळ्या व कुरडू तेरड्यांच्या पांढऱ्या जांभळ्या फुलांनीं आरास मांडली होती. त्या झोपड्या हिरवे मुकुट घातल्याप्रमाणें दिसत होत्या व त्यांतून बेफिकीर आदिवासी बादशहाच्या ऐटींत बसले होते. कुणी बकऱ्यांचीं ओझीं घाशीत होते, कुणी त्यांना पिसें लावीत होते तर कुणी मासे पकडण्याच्या सुबक मळ्या तयार करीत होते. त्यांच्या सर्व कृतींत कला भरून राहिली होती.

विलास व शोभा वाडींत आल्यावर जेष्ठ आदिवासींनीं त्यांचं स्वागत केलें व झोपड्यांची मध्यभागीं तयार केलेल्या अंगणांत खाटली नाहीतर घोंगड्या हांथरल्या व त्यावर त्यांना बसविलें. अंगणाच्या एका कोंपऱ्याला पांढऱ्या चाफ्याचें झाड होतें. त्याखालीं नाचणाऱ्या मुली नि बायका जमल्या. बायकांच्या नंतर पुरुष नाचणार होते. मुलींच्या घोळक्यांत वांदरी होती. रुमणा पण पुरुषांच्या गोटांत बसला होता.

नाच सुरू झाले. मोराचा नाच, त्याचं झऱ्यावरचं पाणी पिणं, ...ची शिकार, भेकराची शिकार, त्याचे पानावर वाटे घालणें, घोळगाडा, कोरेगांवचा शिपाई, खताडी शेंत, बेडकांचा गोंगाट, असे गाण्यांचे विषय होते. मग रिंगा, घोरपड, पासोड्या, कुण्याचा नाच, मोऱ्या बैलाचा नाच सुरू झाले. 'घोरपड शिरली बिळा, मामुजी उचला ढेळा' हें म्हणतांना व 'आंब्याचं पात लवं, लव्ह्याचं पान लवं, तशी माझी मान लवं' हे रिंग्याचं गाणं म्हणतांना लहान मुलींनीं कमाल केली. परंतु या साऱ्या नाचांत वांदरीनें एकहि गाणं सांगितलं नाहीं. ही गोष्ट नायकाच्या लक्षांत आली व त्यानें तिला आग्रह केला पण ती कांहीं कबूल होईना. 'मला येतच नाहीं' असं म्हणूं लागली. तेव्हां रुमणाकडून तिला सांगण्यांत आलें त्याचंहि ती ऐकेना. जेव्हां रुमणानें ढोल उचलला तेव्हां वांदरीच्या मंजुळ कंठांतून खालील गाणं बाहेर पडलं.



प्रिये, एके काळीं आपण याच बाकावर बसून प्रेम केलें !

वांधावरलि जाई तूं लाइलि का मा (मी) लाइली ॥
लाइली हो संकर देवानं ॥ १ ॥
जाईच्या कऽळ्या तूं खुडिल्या का मा खुडिल्या ॥
खुडिल्या होऽऽ संकर देवानं ॥ २ ॥
जाईचीं फूलं तूं काढिली कां मा काढिली ॥
काढिली हो संकर देवानं ॥ ३ ॥
जाईचा गजरा तूं ईणिला का मा ईणिला ॥
इणीला होऽऽ संकर देवानं ॥ ४ ॥
जाईचा गजरा तूं घातिला का मा घातिला ॥
घातिला होऽऽ पार्वती देवीनं ॥ ५ ॥

ढोल घुमूं लागला, गाणं चढूं लागलं, नाच रंगूं लागला.

विश्रांतीकरतां मधीं नाच थांवला तेव्हां शोभा वांदरीला म्हणाली,

"आमच्या लग्नांत तूं नाच आणला पाहिजेस हं. मी खूप बक्षिस देईन तुला."

"हुं. आनुं कीं पन त्याला लई अवकाश हाय." वांदरीनें उत्तर दिलें.

नाच पुन्हा सुरूं झाला. कडव्याच्या पहिल्या ओळीचा शेवटचा भाग आला कीं वांदरी नाचांत उचललेला पाय वांकडा करी व हनुवटी उडवून शोभेकडं तो प्रश्न फेकी. दुसऱ्या ओळीला ती विलासकडे पाहून खुदकन् हसे. असं दोन चार वेळां झाल्यावर ढोलाचा ताल चुकला. त्यावरोबर वांदरीनें नाचांतून ढोल्यापुढं उडी मारली व ढोलावर वांकून ढोल नीट वाजविण्याबद्दल त्याला दम दिला नंतर तिनं नाचांतली आपली जागा धरली.

रूमणा जोरजोरानें ढोल वाजवूं लागला. वांदरीनें गाण्यांनाचण्यानी कमाल केली. मग तिनं नाचांत बांगडीचा नाच मिसळला. एकावरएक घासलेल्या बांगड्यांतून पोरी छुम छुम असे घुंगराचे बोल काढूं लागल्या. विलास न शोभा तल्लीन झाले. परंतु रूमणा चिडला. तो दोन तीन वेळां वांदरीच्या अंगावर ओरडला. 'नीट नाच कर' 'नीट सांग गाणं!' वांदरीनं त्याच्याकडं दुर्लक्ष केलं तेव्हां तो ढोलाची काठी घेऊन उठला व वांदरीला बदडूं लागला. हलकल्लोळ झाला. सोडवावयास गेलेल्या लोकांची आपापसांत मारामारी सुरूं झाली. तेव्हां शोभानें विलासला घरीं चलण्याची खूण केली.

त्या दिवसापासून वाडींतील ढोल वंद झाला होता. कारण वरींच डोकीं फुटलीं होतीं. विलास त्या दिवसापासून वाडीकडं गेला नाहीं. शोभाच्या टॉन्सीलस् सुजल्यामुळं तीही बाहेर पडत नव्हती. विलास मात्र वाडीचा डोंगर सोडून दुसऱ्या डोंगरांतून खूप भटकूं लागला होता. डोंगरांत आदिवासींची वरीच वस्ती होती. त्यांच्यांत मिसळून त्यांच्या रीतीभाती, त्यांचं जीवन यांचा त्यानें अभ्यास सुरूं केला. तो त्यांच्या शिकारींतसुद्धां सामील होई.

एके दिवशीं अशाच तऱ्हेनें डुकराची पारध करीत असतांना शिकाऱ्यांची व त्याची चुकामूक झाली. त्याला वाट सांपडेना. भटकत तो एका धोंडीजवळ आला. धोंडीला टेकून वांदरी उभी होती.

"वांदरी, इथं काय करतेस?"

"तुझी वाट पाहत हाय!"

"कशाला?"

"तूं वाट चुकलास. तुला वाटेला आनाया."

"तुला काय माहित मी वाट चुकलोंय?"

"आमी समद्या वाया फाट्याला आलतं. मी लांबून हेरलं तुला. हें घे" वांदरीनं दोन्ही हातांत धरलेलं मधाचं पोळं विलासच्या ओठाजवळ आणलं.

"खा" वांदरीनं पोळं तसंच धरून आग्रह केला.

"मला तहान लागली आहे"

"मीं दावते झिरा."

वांदरीनं विलासला शेजारच्या कपाऱ्यांतील पाझरावर नेलं व कुड्याचा द्रोण करून त्यांत पाणी दिलं. त्यानें विलास हुशारला.

"वांदरी, माझ्याकरतां किती डोंगर चढून आलीस."

"त्यांत काय मोठंसं हाय. हे पाहा तुझ्या करतां मी किती सोसलं?" वांदरीनें अंगावरचे माराचे वळ दाखविले.

"खरंच. डुमणच्या पोरानं तुला कां मारलं?"

"मी तुझ्यावर न त्या पांढऱ्या डोळंफोडीवर (पालीवर) जुळवून गाणं सांगू लागलें म्हून त्यानं मारलं."

"आमच्यावर होतं तें गाणं?"

"व्हेयत्ना."

"पण त्याला तुला मारायाचं कारण?"

"माझी न त्याची बोली ठरलीय. आमच्यांत नाचांतून पोरीला जो जवरीनें नेईल त्याच्याशीं लगीन होतं. रुमणा इतकी अमच्या पोरांत कुणाची ताकद नाय. पुस्कळांनीं मला ओढून पाहिलं. पन त्या दिवशीं तूं मला त्याच्या हातांतून हिसकलं तवापून मी तुझी झालीय असं त्याला वाटतं?"

"असं होय." विलास मोठ्यानं हंसला.

"तूं नाय झालास माझा?" वांदरीनं सरळ प्रश्न केला. तिच्या चेहऱ्यावर कामुकता, लोभ किंवा मनोदौर्बल्य बिलकूल नव्हतें. लायक जोडीदार मिळविण्याचा तो सवाल होता.

विलासनें तिला उत्तर दिलें नाहीं. तो पोळ्यांतील मध खाण्याच्या मिषानें वेळ काढीत होता.

"नाय आवडत मी तुला?" वांदरीनं उजून विचारलें. उत्तर नाहीं.

"त्या ढवळ्या डोळंफोडी परीस, त्या ढोलीतल्या डुमापरीस (घुवडा-पेक्षां) मी कमीं हाय? काय हाय डुमाचा आवाज? आन नाचतायी येत नाय तिला माझ्यावानी. कां नाय आवडत मी तुला?"

असल्या प्रश्नांना काय उत्तर द्यावयाचें असतें तें विलासला माहीत नव्हतें तें त्याच्या संस्कृतींत नव्हते. तो मुखदुर्बळाप्रमाणें मुकाट उभा राहिला.

"मी आवडत नाय ही श्रेष्ठ खोटी हाय. त्या दिवशीं धोंडीच्या आड लवून मला आंगभर कशासाठीं हेरीत व्हतास?"

"तुला काय माहीत? तूं तर पाठमोरी होतीस."

"मीं माझ्या डाव्या डोळ्याच्या कोनांतून हेरिलं. पाण्यांत माझी छाया तुला दिसत व्हती न तुझी मला."

"आतां मात्र मी कबूल करतों कीं त्या दिवशीं तूं मला आवडलीस." विलासला मराठी लेखकाच्या एका कादंबरींतील वाक्य आठवलें. त्याचा त्यानं इथं उपयोग केला.

वांदरीनें खुदकन् हसून विलासच्या हातांतील मधाचें पोळें काढून घेतलें व ती तें उरें पोळें खाऊं लागली.

"लई येळ झाला. आमच्या बाया रेकतील."

मधाचें पोळें खात व आनंदांत उड्या मारीत ती दरीपार गेली.

त्या रात्रीं वांदरीची न शोभेची तुलना करीत विलास सोप्याच्या माडींत झोपावयाला गेला. झोपण्याच्या पूर्वी त्यानें दिवा विझवला. त्याबरोबर त्याला कांवलस्तक अशी एक शीळ ऐकूं आली. त्याचं सर्व अंग थरारलं. त्यानें सज्जांतील दरवाजा उघडला व बाहेरच्या अंधारांत डोकावून पाहिलें. बकुळीच्या झाडाखालीं वांदरी उभी होती. समोरच्या माडींत फिकट न नाजुक शोभा डोळे फोडून कसल्या तरी ग्रंथाचें वाचन करीत होती. बकुळीखालीं जीवनानं रसरसलेली वांदरी निसर्गाच्या संदेशाप्रमाणें छातिकोटें उभी होती. तिचं प्रेम स्वैर होतं, तिची निवड स्वतंत्र होती. तिचं जीवन, नाच, गाणं, वनसंचार यांनीं रंगलेलं होतं. विलास बेहोष झाला पण त्यानं संयम केला. आपल्या महत्त्वाकांक्षेचा चुराडा करून उघरल्या आवुध्यानीं मातीं करण्याचं धाडस त्याच्यांत नव्हतं. त्यानं दरवाजा लावून घेतला. वांदरी थोडा वेळ थांबली. मग 'बांधावरली जाई, नं लाइली का ना लाइली' हें गाणं गात ती तेथून निघाली.

दुसरे दिवशीं वडिलांचं पत्र आल्याची सबब सांगून विलासनें तारापूर सोडलें. त्यानंतर तो माहीच्या महिन्यांत लग्नतिथीच्या दिवशीं परत तारापूरला आला. लग्न कडाक्यानं झालं. इनामदारांनीं खूप खर्च केला. वरात थाटाची झाली. खूप दारूकाम उडालं.

इनामदारांनीं व्याह्यांना गोडी व तिखटी अशा दोन्ही थाटाच्या मेजवान्या दिल्या.

रात्रीं तिखटी मेजवानी चालू होती तों इनामदारांच्या आंगणांत ढोल वाजला व 'बांधावरल्या जाईचं' गाणं व नाच सुरू झालों. मेजवानी संपल्यावर वऱ्हाडी मंडळी आंगणांतील बैठकीवर नाच गाणं ऐकण्याकरितां येऊन बसली. नाच वांदरीनं आणला होता. ढोल्या रुमणा होता.

माहीच्या थंडींत चांदणं कोसळत होतं. परंतु नाच इतक्या जोराचे झाले कीं नाचणाऱ्या पोरी घामेजल्या. निरनिराळ्या तऱ्हेच्या गाण्यांतून नाच व नाचांतून गाणीं निघालीं. वांदरीनं पहाटे शेवटचं गाणं सुरू केलं.

भोजा भरतारा, मला संगं न्याल काय  
मला संगं न्याल काय  
मला आंगठि घ्याल काय  
मी आंगठि घालिन माझ्या बोटाक पाल काय ॥

भोजा भरतारा, मला संगं न्याल काय  
मला संगं न्याल काय  
मला येळा घ्याल काय  
मी येळा घालिन माझ्या दंडाक पाल काय ॥

भोजा भरतारा, मला संगं न्याल काय  
मला संगं न्याल काय  
मला माळ घ्याल काय  
मी माळ घालिन माझ्या छातीक-पाल काय ॥

भोजा भरतारा, मला संगं न्याल काय  
मला संगं न्याल काय  
मला सरि घ्याल काय  
मी सरि घालिन माझ्या गळ्याक पाल काय ॥

अनुक्रमणिका








—हें प्रॉस्पेक्टस नसून जाहिरात आहे—

प्रॉस्पेक्टसची मूळ इंग्रजी प्रत मे. रजिस्टार ऑफ कंपनीज्, मुंबई, यांजकडे नोंदविली आहे.)

# टॉम ॲंड बे (ॲडव्हर्टायझिंग) लिमिटेड

रजिस्टर्ड ऑफिस—

९२९ सदाशिव पेठ, लक्ष्मीरोड, पुणें २

## संचालक मंडळ

(१) श्री. आर्. पी. ओक, D.A.F.C.M.A. (रिटायर्ड), चेअरमन नं. १ मिलिटरी अकौंट्स् को-ऑपरेटिव्ह बँक लि., डायरेक्टर, "वृन्दा पिक्चर्स लि." पुणें.

(२) डॉ. आर्. एच्. सोमण, डायरेक्टर, मॉडर्न इंडस्ट्रीज् लि. उद्यमनगर, डायरेक्टर, लोकमान्य इंडस्ट्रीज् लि. पुणें २

(३) श्री. जी. आर्. पेंढारकर, B.E. असि. इंजिनिअर (P. W. D.) रिटायर्ड

(४) श्री. सी. आर्. श्रॉफ, मुंबई. Ex. M. L. A.

(५) श्री. आर्. एन्. पटवर्धन, पुणें डायरेक्टर, प्रभात गॅरेज लि. पुणें

(६) श्री. एन्. एस्. दाते, लॅंडलॉर्ड, पुणें २

(७) श्री. डी. डी. दलाल, G.D. (Art) (एक्स ऑफिशिओ) मुंबई

(८) श्री. एस्. के. कात्रे, D. C .E. (एक्स ऑफिशिओ) डायरेक्टर, तांबे कात्रे आणि कं. लि. पुणें.

(९) श्री. जी. व्ही. तांबे, पुणें २ (एक्स ऑफिशिओ) डायरेक्टर, तांबे कात्रे आणि कं. लि.

—शेअर्ससाठीं त्वरित अर्ज करावेत—

मॅनेजिंग एजंट्स्

**मे. तांबे कात्रे आणि कं. लि.**

**९२९ सदाशिव पेठ, लक्ष्मी रोड, पुणें २**

## अधिकृत व विक्रीस काढलेलें भांडवल—रु. ५,००,०००

## —रुपये पांच लाख—

सदर भांडवल रु. १०० चा एक, ५ टक्के क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स शेअर्स याप्रमाणें १००० शेअर्स,—रु. ५० चा एक ऑर्डिनरी शेअर, याप्रमाणें ७,५०० शेअर्स,—व रु. ५चा एक डिफर्ड शेअर, याप्रमाणें ५००० शेअर्स अशा तऱ्हेनें विभागलेलें आहे. यांपैकीं रु. [illegible],०००चे दर्शनी किंमतीचे शेअर्स डायरेक्टर्स, प्रमोटर्स, त्यांचे स्नेही व आप्तेष्ट यांनीं घेतले आहेत, अगर घेण्याचें कबूल केलें आहे.

**शेअर्सच्या रकमा खालीलप्रमाणें भरावयाच्या आहेत.**

| शेअर | अर्जासोबत | अर्जमंजुरीनंतर | १ला व २रा हप्ता (प्रत्येक वेळीं) |
|---|---|---|---|
| (अ) ५ ट. प्रेफरन्स | रु. २५-०-० | रु. २५-०-० | |
| (ब) ऑर्डिनरी | रु. १२-८-० | रु. १२-८-० | रु. २५-०-० |
| (क) डिफर्ड | रु. ५-०-० | | रु. १२-८-० |

**कंपनीचे उद्देश**— कंपनी मुख्यतः मेमोरॅन्डम् ऑफ असोसिएशनमध्यें नमूद केलेल्या हेतुसिद्धीकरितां स्थापन झालेली आहे. दुसऱ्या जागतिक युद्धानंतर आज हिंदुस्थान स्वतंत्र झाला असून, आंतरराष्ट्रीय व्यापारी पेठेंत उच्च स्थान मिळविण्याच्या दृष्टीनें आपला व्यापार, कारखाने व उद्योगधंद्यांची झपाट्यानें वाढ होत आहे. या सर्व उन्नतीकरितां प्रत्येक उद्योगपतीला जाहिरातशास्त्रज्ञ व सल्लागारांची विशेष आवश्यकता आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन, विशेषतः कमर्शिअल आर्ट, ब्लॉकमेकिंग, कलर प्रिंटिंग, न्यूज् पेपर, सिनेमा, रेल्वे व होर्डिंग्स् पब्लिसिटी व त्याकरितां आवश्यक असलेले प्रॉडक्शन, कॅलेंडर्स व पुस्तक प्रकाशन वगैरे जाहिरातक्षेत्रांतील सर्व कार्याची जबाबदारी कंपनीनें पार पाडावयाची ठरविली असून, त्याकरितां आवश्यक असलेली प्रिंटिंग, ब्लॉकमेकिंग मशनरी मागवून कारखानदार व उद्योगपतींना त्याचा फायदा मिळवून देण्याचा कंपनीचा मुख्य उद्देश आहे. गेलीं बारा वर्षें या धंद्यांतील अनुभव असलेले व **टॉम ॲन्ड बे** या मूळ कंपनीचे मालक **श्री गणेश विठ्ठल तांबे** यांचा या कंपनीच्या कार्याशीं अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध असल्यानें कंपनीच्या संचालक मंडळास असा विश्वास वाटतो कीं, जनतेनें दाखविलेल्या सक्रिय सहानुभूतीचा व गुंतविलेल्या पैशांचा योग्य मोबदला कंपनी खात्रीनें देऊं शकेल.

—बँकर्स—

(१) इंपिरियल बँक ऑफ इंडिया, पुणें २

(२) प्रेसिडेन्सी इंडस्ट्रिअल बँक लि. पुणें २

—ब्रोकर्स—

श्री. एम्. व्ही. गोखले, Cer. A.I.B. (LONDOM). ६७, अपोलो स्ट्रीट, फोर्ट, मुंबई

—ऑडिटर्स—

(१) मेसर्स के. एम्. वर्तक ॲंड कं. २३१, हॉर्न्बी रोड, मुंबई १

(२) मेसर्स पी. जी. भागवत, मुंबई १

—कायद्याचे सल्लागार—

(१) श्री. एस्. जी. फडके, M. A., LL. M., पुणें २

(२) श्री. व्ही. वी. देशमुख, B. A. LL. B. पुणें २

अनुक्रमणिका

भोजा भरतारा, मला संगं न्याल काय
मला संगं न्याल काय
मला डाळ घ्याल काय
मी डाळ खाइन माज्या तोंडाक घाल काय ॥
भोजा भरतारा, मला संगं न्याला काय
मला संगं न्याल काय
मला साडि घ्याल काय
मी साडि नेसिन माज्या ढुंगाक घाल काय ॥
भोजा भरतारा, मला संगं न्याल काय
मला संगं न्याल काय
मला चोळि घ्याल काय
मी चोळि फेडिन माज्या……

सर्व पोरींनीं एकमेकींनी धक्के मारून नाच मोडला. तेव्हां तात्यासाहेबांनीं वांदरीला विचारलें.

" ये मोठी वांदर, तुझा भोजा भरतार कोण आहे तो दाखव ना."

वांदरीनें ढोल्याचा कान पकडून ओढीत आणलें व मंडळीच्या समोर त्याला उभं करून ती म्हणाली,

" हा पघा. ढुमणाचा भोरगा रमणा."



अनुक्रमणिका




— ज्यो. भू. वसंत लाडोबा म्हापणकर

— संख्या-शास्त्राप्रमाणें या वर्षातील अंकांची बेरीज आठ येते. ह्या आठ या अंकावर शनीचें (म्हणजेच सारांशानें सोशालिस्ट पक्षाचें) स्वामित्व आहे! त्या दृष्टीनें राष्ट्राचें तेज आणि बळ वाढेल!

" ॐ सह नाववतु ॥ सहनौ भुनक्तु सहवीर्यंकरवावहै ॥ तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥ "—कठोपनिषत् ॥

(आम्हीं उभयतांनीं एकत्र रहावें, एकत्र सेवन करावें, एकत्र सामर्थ्य संपादन करावें, आमचें अध्ययन आम्हांला तेजस्वी करणारें असावें, आमच्याकडून एकमेकांचा द्वेष न घडो !— )

संसारापासून, समाजापासून अलिप्त राहाणाऱ्या ब्रह्मचर्या-संन्याशांपेक्षां समाजाशीं एकरूप होऊन त्यांच्यांतील अशुद्धि नाहींशी करून, अन्याय निवारणासाठीं झगडणारे कर्मवीर संसारीच अधिक महत्त्वाचे!...शरीराला जसें अन्न तसा मनाला उत्साह अतिशय आवश्यक आहे. आपल्या आर्यांच्या सर्व सणांत मोठ्यांत मोठा आनंदाचा, अगदीं बालापासून वृद्धांपर्यंत चैतन्याचा—सणांत सण म्हणजे 'दिवाळी' हा होय! या दिवाळीच्या सणाचा प्रमुख हेतु सगळीकडचा अज्ञानांधःकार नाहींसा करून त्या ठिकाणीं उजेडाची, प्रकाशाची जिवंत जागति ज्योत तेवती ठेवणें, अज्ञान हा अवनतीचा पाया असून 'ज्ञान' हें उत्कर्षाचें, व प्रगतीचें मूळ आहे हें ठसविणें. आणि अज्ञानाची हकालपट्टी करून सत्यज्ञानाची दिवाबत्ती पाजळणें हाच! व हा उद्देश या उत्सवाचे बाबतींत ध्यानांत धरण्यासारखा आहे; आणि त्याच बरोबर दुसरीहि एक बाजू उत्सवाचे मुळाशीं असावी असें म्हटल्यास तें वावगें होणार नाहीं असा विश्वास वाटतो.

आपला हा हिंदुस्थान देश 'कृषिप्रधान' (शेतीप्रमुख) आहे. या देशांतील बहुतेक सण हे शेतकरी कामकरी वर्गाच्या स्वास्थ्याशीं संबंधित आहेत. आणि स्वाभाविकच आहे. "जरी रुसे शेतकरी बिचारा! जगांत होईल अनर्थ सारा॥" शेतकरी सुखी तर जग सुखी!...पैसे पिकविणाऱ्यांपेक्षां धान्य पिकविणारेच समाजास अधिक आवश्यक असतात. जुन्या काळच्या लोकांनीं ही गोष्ट अचुक हेरली होती आणि म्हणून शेतकऱ्यांच्या संतोषाशीं आपला संतोष नेऊन सोडला होता; त्या आनंदाला आपला आनंद नेऊन भिडविला होता. दिवाळीचा सण हा अर्धा अधिक पावसाळा संपून गेल्यावर हिंवाळा सुरू होण्याचे सुमारास येतो. कारण, शेतकरी या दरम्यान धान्यादिकांनीं समृद्ध असतो. शेतीची कामगत बहुतेक त्याची आटोपलेली असते; तो मोकळा झालेला असतो. त्यानें अगोदर काढलेल्या कष्टांचें, त्रासाचें, दगदगीचें चीज व्हायला ही वेळ त्याला महत्त्वाची असते. म्हणूनच हा सण त्याला उमेदीचा वाटतो.

पावसाळ्यांत शेतकरी शेतीच्या कामगिरीमुळें चिखलमातीनें माखलेला असतो. त्यामुळें त्याच्या आंगाला थोडीशी दुर्गंधीहि येणें शक्य असतें. शेतीच्या कामगतीच्या दगदगीमुळें स्वस्थपणें त्याला जेवायूला खायलासुद्धां फुरसद नसते. तो सारखा वाऱ्यापावसांत-थंडी, चिखलांत वावरत असतो. या वेळीं त्याची त्वचा खरखरींत व रांकट आणि घट्ट अशी होत असते. अनेक ऊन—पाऊस शेतीबरोबर त्याच्यावरहि पडलेलें असतात. शेतीच्या मशागतीच्या व्यापांमुळें आपल्या इष्ट मित्रांकडे, सग्यासोयऱ्यांकडे जायला यायला, मित्रमंडळीशीं गप्पागोष्टी करायला, बहिणीभावांची विचारपूस करायल बिल्कुल वेळ नसतो, इतकेंच नव्हे तर आपल्या देहाची सुद्धां शुद्ध त्याला नसते. कारण शेताची राखण, संरक्षण त्याला रात्रंदिवस जागत्या पहाऱ्यानें करावयाची असते. दिवाळी कडच्या दिवसांत या दगदगींतून तो मोकळा झाल्या कारणानें त्या सर्वांचा राग-रोष तो काढूं शकतो. स्वतःच्या देहाकडे झालेल्या दुर्लक्षाचीहि त्याला जाणीव होते. दिवाळीच्या दिवसांत सुगंधी द्रव्यांनीं अभ्यंगस्नानाचें महत्व अतिशयच सांगितलेलें आहे. आणि 'शेतकरी-राज्यांत' ही गोष्ट मनाला अतिशय पटते. कारण शेतकऱ्याच्या शरीराचा खरखरीतपण, रखरखीतपणा, घट्टपणा जायला त्याचप्रमाणें आंगाची दुर्गंधी मोडायला तैलमर्दन, सुवासिक उटणीं वगैरे लावून अभ्यंग स्नान आवश्यकच नाहीं काय?... खरोखरच विचारपूर्वक पाहतां स्नानाचा महिमाच तसा अलौकिक आहे यांत संशय नाहीं. स्नानापासून दहा गुण प्राप्त होतात असें आपल्या पूर्वजांनींच अनुभवांनीं लिहून ठेविलेलें आहे तें खोटें कसें ठरेल! स्नानापासून मन प्रसन्न असते, वाईट स्वप्नें पडत नाहींत, शरीराला स्वच्छता प्राप्त होते, आंगाचा मळ नाहींसा होतो, कांति तेज वाढतें, अंतःकरणांत हुरूप, टवटवी व नवचैतन्य-निर्माण होतें, दुखणीबाणीं सर्व जातांत, अग्नि प्रदिप्त होतो, स्त्री प्रसन्न असते, शीणभाग—थकवा निघून जातो. या उलट स्नान नित्य न केल्यानें आळस, मलिनता, रोग, दारिद्य, अग्निमांद्य प्राप्त होतात; थकवा येतो, चेहऱ्यावरची टवटवी जातें. आणि मनुष्य कसातरीच ओंगळ ओंगळ दिसतो. आपल्या हिंदु धर्मात तीन वेळां स्नान दिवसांतून करावें असें म्हटलें आहे. निदान एकवेळ तरी अवश्यच आहे. स्नानानें पावित्र्य वाढतें, बुद्धिस तेज येते.

माझ्या पहाण्यांत असे कित्येक ८०।८५ वर्षें पर्यंत जगलेले वृद्ध लोक आहेत कीं, जे रोज आपल्या सर्वांगाला निदान अच्छेर-अच्छेर पावशेर तरी तेल जिरवून मग त्यावर ऊन पाण्याची आंघोळ करीत असतात. तैलमर्दन (मालीश) आणि अभ्यंगस्नान यांचा दीर्घायुष्याशीं खास कांहींतरी निकटचा संबंध असावा असें वाटतें. महात्माजी सुद्धां आंघोळीच्या पूर्वी तैलमर्दन (मालीश) करीत असत असें म्हणतात. रात्रीच्या चौथ्या प्रहरीं—मोठ्या पहाटेला स्नान करणें आरोग्य दृष्ट्या अतिशय महत्वाचें आहे.

आपली दिवाळी ही सणांचें एक अजब घर आहे किंवा सर्व सणांचें तें स्नेहसंमेलन आहे असें म्हटलें तरी चालेल. दिवाळीचा सण पांच दिवसांचा मानला गेला आहे. पण खरें पहातां थेट नवरात्रापासून त्याची सुरवात होते आणि भाऊबीजेच्या भेटींत त्याचा आनंद

अनुक्रमणिका



# दोन चित्रांची गोष्ट.

**उपोद्घात**

आमची गोष्ट फारशी मोठी नाही. तिची सुरवात कुटुंबांतील लहानांच्या त्याचप्रमाणें म्हाताऱ्यांच्या बारीकसारीक आजारपणापासून वे गंभीरस्वरूपांच्या आजारांपर्यंत होते. विशेषतः आपल्या लहानग्या छकुल्यांचा परिचित शत्रू, डांग्या खोंकला व वृद्धांचा कायम दमा किंवा श्वास यांचा नायनाट करून कुटुंबांतील प्रकृतीस्वास्थ्य कसें कायम राखावें व कोणच्या औषधांनी खर्च वांचवावा व आरोग्य मिळवावें हाच या गोष्टींतील समरप्रसंग आहे.




मधला दुवा : पण या बोधचिन्हांनी अलंकृत झालेली औषधें अनेक कुटुंबांच्या उपयोगी पडून निरगांठींची उकल होते, संशय दूर होतो व कथेचा शेवट गोड होतो.

उपसंहार

# हूपसॅक

**डांग्या खोंकल्यावर औषध**

आणि

# श्वासकासारी

**दमा, खोंकला, श्वास वगैरेंवर**






## राजवैद्य गुणे यांचा
## शाहू आर्यौषधी कारखाना, लिमिटेड
## कोल्हापूर

SAK/Ma 1 TOM & BAY (R)

एजंटस् १ पुणें जिल्ह्याकरितां:–मे. अंबिका मे. स्टोअर्स, ११५२ ए, रविवार पेठ, पुणें २. • २ हैद्राबाद:–विजय मेडिकल स्टोअर्स. ३ वऱ्हाड व खानदेश:–जोशी आणि कं., अकोला, जळगांव. ४ मुंबई:–मे. जे. गोविन्द आणि कं., फर्ग्युसन रोड, मुंबई.



अनुक्रमणिका

कळसाला पोंचतो. शास्त्रांत प्रत्येक सणाचें महात्म्य आणि माहिती दिलेली असते. या दिवाळी विषयीं इतक्या कांहीं कथा आहेत कीं त्या सर्व लिहिल्यास 'दिवाळी महात्म्यच' एक मोठें होईल आणि तें लिहिणाराचें अगर छापणाराचें प्रसंगीं दिवाळेंहि निघेल! धनत्रयोदशीपासून भाऊबीजेपर्यंत आज या सणाची व्याप्ती आहे. दिवाळी हा गृहस्थाश्रमी सण आहे; जनतेचा सण आहे; मुख्यतः शेतींत राबणाऱ्या श्रमिकांचा सण आहे; शेतकऱ्याकामकऱ्यांचा सण आहे. माझ्या मतें हा सण शेती कसणाऱ्या किसानांनाच साजरा करण्याचा खरा मक्ता आहे. काळा बाजार करणाऱ्यांना नाहीं. पण आज परिस्थिती वेगळी आहे. आज काळाबाजारवाले हा सण विजेच्या रोषणाईंत चैनीच्या पेयांत साजरा करितात आणि आणि शेतकरी?...हाय हाय!...त्याच्याकडे मिणमिणत्या पणत्या लावण्या इतकेंहि तेल नसतें ... कृषिप्रधान-शेतीप्रधान देशा, ... काय ही तुझी...दुर्दशा! महात्माजी म्हणत, " लंगोटी लावलेला शेतकरी किसान सिंहासनावर बसलेला बघेन त्यावेळीं माझ्याडोळ्यांचें पारणें फिटेल!"...ही त्यांची आंतरिक ओढ आपण सर्वांनीं सफल करावयास नको काय?—" इडापिडा पळो बळीचें राज्य येवो" आज दिवशीं वर्षानुवर्षं आम्हीं, आमच्या साऱ्या अमंगलाचा नाश होऊन बळीचें राज्य येण्याची सदिच्छा प्रगट करीत आलों. आजहि करितों व पुढेंहि करीत राहाणार. आमच्या बळीचें राज्य येणार का? बटु वामनानें कपटनीतीनें तीन पावलांला व्यापील एवढी भूमि मागून घेतली, मनानें उदार न सज्जन पण वृत्तीनें भोळा असलेल्या बळीराजानें तीन पावलांच्या भूमीच्या दानाचें उदक बटुवामनाच्या हातावर सोडलें. त्याचा परिणाम तेव्हांपासून आज या घडीलाही भारताच्या भोळ्या जनतेला वामनाच्या कपटनीतीच्या पावलाखालीं दडपून टाकण्यांत होत आहे. उठा, जागृत व्हा-दिवाळीचे दिवस! निसर्गाच्या अमोल लेण्यांनीं नटलेलें सारें वातावरण कसें नसानसाला उत्तेजित करीत आहे. कोणता मंत्र जपाल आज? संघटित होऊन वामनाच्या कारवाईला हाणून पाडून बळीचें राज्य आणूंच आणू हा होय!...बळीराजानें दानाचें व्रत घेतलें होतें. मागणारा जें कांहीं मागेल ते बळिराजा त्याला देई. बळिराज्यांत जीवहिंसा, सुरापान, अगम्यागमन, चोरी आणि



विश्वासघात या पंचमहापापांचें नांवहि ऐकूं येत नव्हतें. सर्वत्र दया, दान आणि उत्साह चालत होते. बळीनें शेवटीं वामनमूर्ती श्रीकृष्णाला सर्वस्व अर्पण केलें. बळीच्या या दानशौर्याचें स्मारक म्हणून श्री विष्णुनीं बळीच्या नांवानें तीन अहोरात्रीचा सण ठरविला. तोच आपली दिवाळी, आश्विन कृष्ण १४ ते कार्तिक शुद्धप्रतिपदा. हिला बलिप्रतिपदा म्हणतात. बळीच्या राज्यांत आळस, मलिनता, रोग, आणि दारिद्र्य यांचा अभाव होता. बळीच्या राज्यांत म्हणजेच लोकांच्या हृदयांत अंधःकार नव्हता, सर्वजण प्रेमानें राहात असत. द्वेषाला, मत्सराला किंवा असूयेला कांहीं कारणच नव्हतें. कारण बळीचें राज्य इतकें लोक कल्याणकरी होतें कीं, प्रत्यक्ष श्रीविष्णु त्याचे द्वारपाल म्हणून त्याच्या दरवाजावर उभे राहिले होते, बळीच्या राज्यांत श्रेष्ठ कोणी-नाहीं कनिष्ठ कोणी नाहीं असेंच सारें वातावरण होतें. विक्रमसंवत् बलिप्रतिपदा म्हणजेच कार्तिक शुद्ध प्रतिपदेला सुरु होतें. विक्रमसंवत् २००६ सुरू झालें! प्लव नाम संवत्सरे असें नामाभिधान येतें याला!

संख्याशास्त्रा प्रमाणें या वर्षातील अंकांची बेरीज आठ येते. 'आठ' या अंकावर शनीचें स्वामित्त्व आहे. पंचमहाभुतें आणि त्रिगुण (सत्त्व-रज-तम) मिळून आठ अंक तयार होतो. हा अंक शक्तीचा द्योतक मानण्यांत आला आहे. आप-तेज-वायु-आकाश आणि पृथ्वी या पंचमहाभूतांपासूनच जगाची उत्पत्ति आहे. आणि शेवटीं लयहि त्यांतच आहे. मनुष्य मरतो म्हणजे या पंचमहाभूतांत विलीन होतो होय!...पवित्रता आणि शक्ति यांचें वास्तव्य या आठ अंकांत आहे. आठ अंक समता व बंधुत्त्व वाढविणारा असून, व्यक्ति, समाज सुधरविणारा आहे. 'शनी' चें स्वामित्त्व म्हटल्यावर पुष्कळांस तें कसें तरी वाटणें स्वाभाविक आहे. बहुतेक लोक शनीला वाईट गणतात व शिव्याहि घालतात. पण मला तसें वाटत नाहीं. वणव्यांतून गेल्या शिवाय विजयाचा वारसा मिळत नाहीं. विक्रमराजाला शनीनें छळलें म्हणतात. पण मी तर म्हणतों शनीनें त्याचें तेज वाढविलें. शनीने त्याला अमर केलें. हें वर्ष त्या दृष्टीनें म्हणजे अंकशास्त्राच्या दृष्टीनें पहातां भारतीयांना, विक्रमाच्या वंशजांना दिव्यांतून नेणारें असलें तरी समता, तेज, बळ वाढविणारें आहे; भारतियांचा स्वाभिमान जागृत करणारें आहे, फुटीरवृत्ती घालविणारें आहे, दैन्य दूर करणारें आहे. विजयाचें आणि पराक्रमाचें

आहे. शनीच्या अम्मलाखालीं शेती-शेतकरी सुखी व धान्यानें समृद्ध बनेल. दिवाळीच्या सणाचा जो मुख्य हेतु शेतकरी व कामकरी लोकांचें स्वास्थ्य ते या वर्षी-म्हणजे 'या संवत्सरी-सिद्धीस जाईल. जरी कांहीं दुःखदायक घटना या वर्षी घडल्या तरी जनतेनें आपला धीर खचूं देऊं नये. धान्य मोहीम आघाडीवर ठेवावी. मुख्य यशाची गुरुकिल्ली तेथेंच आहे. पडजमिन लागवडीस आणावी. शक्य तितकी जास्त कसवट करावी. आपल्या सरकारला सहाय्य करून भारत सरकारचें हात बळकट करावे. इतरांपेक्षां शेतकरी —कामकरीच हें कार्य अधिक बळकटीनें एकजुटीनें करूं शकतील! बळीचें राज्य म्हणजे बलवान् लोकांचें राज्य! ..नीतीनें बलवान्, भक्तीनें बलवान्, शक्तीनें बलवान्, कृतीनें बलवान्, विचारानें बलवान्, समतेनें बलवान्, श्रद्धेनें बलवान्, अहिंसेनें बलवान्, विद्येनें बलवान् अशा लोकांचें राज्य होय!... लोकशाही ती हीच!...महात्मा गांधींच्या आत्म्याला, शांती अशानेंच मिळेल. त्यांचें स्वप्न साकार होईल. या विक्रम वर्षानें आपल्यास या दृष्टीनें ज्योतिषशास्त्राधारें खचित मदत होण्यासारखी आहे. प्रयत्न आणि दैव यांची [illegible] झाला! ते पहा, ते पहा महात्माजी हंसत मुखानें आशीर्वाद देण्यासाठीं तुमच्या पाठीशीं उभे आहेत!..." मूकं करोति वाचालं पंगु लंघते गिरिम्। यत्कृपा तमहं वन्दे परमानंद माधवम्॥"

> त्या टेकडीचें केवढें भाग्य. इथें कितीक प्रेमी जीवांचे मीलन झाले, कितीक आणाभाका घेतल्या गेल्या. इथल्याच कातळावर बसून कितीक प्रतिभावान् रुवींनीं आपली कवनें वाऱ्यावर सोडून दिली—आणि...




गेले वरें ते दिवस ! मनांत विचार येतो आणि चटका वसावा तशी मनाची स्थिति होते. म्हणजे मी रेशनिंगच्या धान्यावद्दल म्हणत नाहीं किंवा पाण्यांत दूध घालून रुपया शेरानें विकल्या जाणाऱ्या दुधाचाहि मी विचार करीत नाहीं. परवां सहज मी पुण्याच्या फर्ग्युसन टेकडीवर फिरावयास गेलो होतों. आणि तिथें कातळावर पाय सोडून बसल्यानंतर जे विचार माझ्या मनांत तरंगूं लागले, ज्या मधुर, कोमल भावना माझ्या हृदयांत जागृत झाल्या, पूर्व सुखदुःखांच्या ज्या सांठवणी हृदय फोडून बाहेर पडल्या त्यांचीच गर्दी माझ्या मनांत उसळली आहे आणि त्यानेंच माझ्या मनाला चटका वसला आहे. नाहीं म्हटलें तरी अंतर्मन कळवळून म्हणत आहे ' गेले वरें ते दिवस ! '

खरोखरच गेले. कारण या टेकडीवर आतां कॉलेजांतील त्या अल्लड मुलामुलींची किलबिल ऐकूं येत नाहीं. संध्याकाळच्या वेळीं सहज टेकडीवर उभें राहिलें कीं चारी वाजूंच्या रस्त्यांनीं मुलांचे आणि मुलींचे तांडेच्या तांडे जणुं टेकडीवर चाल करून यावयाचे. तिथून सृष्टिसौंदर्य जें दिसावयाचें तें खरोखर रम्य. पण भावरम्य असें सौंदर्य आमच्या काव्यदृष्टीला जें दिसावयाचें तें म्हणजे वांकडींवांकडीं वळणें घेत जाणाऱ्या कालव्याचें. म्हणजे कालव्यावर आमची नजर खिळत असे असेंच कांहीं नाहीं. पण संथपणें वाहणाऱ्या त्या कालव्याजवळील अरुंद रस्त्यानें संथ, कोमल पावलें टाकीत ज्या देवता जात येत असत त्यांच्या हालचालींमुळें आम्हांला तो रस्ता प्रिय वाटत असे. त्या कालव्यावर कसे लहानसेच पूल टाकलेले आहेत. त्यांतील सर्वांच्या परिचयाचा म्हणजे " हार्मोनियम ब्रिज ". कोणी हें सुंदर नांव दिलें कोण जाणे ! त्या पुलाच्या खालींच ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचें वेठें असें निवासस्थान आहे. असें म्हणतात कीं त्या बंगल्यांतून हार्मोनियमचे सुस्वर सूर बाहेर पडत असत आणि या पुलावर वसल्यानंतर वाऱ्यावरोवर तरंगत येणाऱ्या सुरांनीं सहलीसाठीं आलेल्या लोकांचीं मनें प्रसन्न होत असत. पण आम्हांला विशेष प्रिय असे तो म्हणजे त्याच्या शेजारचाच लाकडी पूल. कोणा एका प्रेमवीरानें त्याचें नांव ' Bridge of Sighs ' असें ठेवलें होतें. केवढा वेदविवाद चाले त्या नांवाबद्दल. कोणी त्याला आगरकर ब्रिज असें नांव ठेववें असें आग्रहानें प्रतिपादीत. कारण स्त्रीविद्यार्थिनींची आगरकर रेसीडेन्सी त्याच्याच टोकाशीं आहे. कोणी म्हणत त्याला स्वतंत्रता पूल म्हणावें. कारण आगरकर वसतिगृहांत कोंडलेल्या विद्यार्थिनी तो पूल ओलांडला म्हणजे टेकडीवरील स्वतंत्र वातावरणांत पाऊल टाकीत असत. पण मला वाटतें त्या प्रेमवीरानें दिलेलें नांवच खरें सार्थ नांव होय. तें नांव किती हृदयस्पर्शी होतें हें आज कळणार नाहीं. पण त्यावेळीं याच पुलावरून मुलींची सारी रहदारी असे. आणि फिरून परत आल्यानंतर तो पूल ओलांडला म्हणजे वांकड्या फाटकांतून मुली जेव्हां अंतर्धान पावत तेव्हां कितीक प्रेमवीर उसासे टाकीत असत. मग त्या पुलाला Bridge of Sighs असें म्हणावयाचें नाहीं तर काय ?

पण गेले वरें ते दिवस ! म्हणजे तो पूल तसाच आहे. पण एके काळीं ज्या टेकडीनें पुण्यांतील कितीक कविमंडळे प्रसवलीं, आणि जेथील चालत्याबोलत्या काव्यानें कितीक कविहृदयांना स्फूर्ति दिली ती टेकडी आतां काव्यहीन, ओसाड, रुक्ष झाली आहे. जुन्या आठवणी हृदयांत कशा ताज्या आहेत. पण काळ मात्र इतका झपाट्यानें बदलत चालला आहे कीं जुनें जग जाऊन नव्या जगांत आपण वावरत आहोंत असेंच वाटूं लागतें. वीस पंचवीस वर्षांपूर्वींचाच तो काळ. पण त्यावेळीं पोशाख होता तो आतां राहिलेला नाहीं. त्यावेळच्या चालीरीती नव्हे केशभूषाहि ओळखूं न येण्याइतकी बदलली आहे. कवि यशवंतांनीं त्या काळच्या तरुणीचे वर्णन करतांना म्हटलें—

> " कुरळ्या बटा पवनासवें हळु नाचती निटिलावरी
> स्वकरांगुलि फिरवून सांवरसी तया वरचेवरी "

पण आजच्या तरुणी केस मागें फिरवून, करकचून बांधूनच टाकीत आहेत तर त्यांच्या ' कुरळ्या बटा ' कपाळावर येतील तरी कशा आणि करांगुलीनें नाजुकपणें त्या सारण्याचें भाग्य त्यांच्या वांट्याला कसें येणार ? विचारे यशवंत पापभीरुपणें त्या तरुणीला इशारा देत होते—

> " भरल्या पथीं फिरतेस तूं चुकतेय तूं मुलि हेंच की
> जनदृष्टि ना कधीं सारखी, कुणी घातकी कुणी पातकी "

त्या काळाची तुम्हांला कल्पना येणार नाहीं. पण आज जितक्या खेळमेळीनें मुलें आणि मुली कॉलेजांतून हिंडतात फिरतात, सिनेमा पाहतात, तितक्या खुलेपणानें मुलींशीं वागतां येत नसे. कुठें एखादा चोरटा कटाक्ष, कुठें स्मित हास्य, आणि कधीं सटीसहामासीं एखाद्या संमेलनाच्या प्रसंगीं किंवा निवडणुकीच्या वेळी 'ढलज्ज कुजबुज' एवढीच आमच्या सह-शिक्षणांतील सहजीवनाची मजल. म्हणूनच माधव ज्यूलियन यांनीं आपल्या ' विरहतरंग ' या खंडकाव्यांत म्हटलें होतें—

> " ज्याला दैववशात् रुचूनि मिळते विद्यार्थिनी-संगत,
> त्या स्नेहांत विशुद्ध गोड अभयें जो राहतो रंगत,
> त्याला कुत्सित रुक्ष, शिष्ट नि दुजे ज्यांच्या मनीं मत्सर,
> सारे त्याजवरी तुटूनि म्हणती, ' हा बो वघा मंचर ' "

विद्यार्थिनी-संगत, ही त्याकाळीं केवढी भाग्याची गोष्ट मानली जात असे आणि मत्सरी व कुत्सित लोकांच्या कडून या भाग्यवंताला केवढा त्रास सोसावा लागत असे याचेंच माधवरावांनीं स्वानुभवानेंच वर्णन केलें आहे. माधव ज्यूलियन दिवंगत होऊन आज बरींच वर्षे लोटलीं आहेत. त्यांच्या काव्यगुणांचें व विद्वत्तेचें स्मारक रुपानें आज चीज झालेलेंहि दिसत आहे. पण एकेकाळीं केवळ विद्यार्थिनी-संगतीचा त्यांना लाभ झाला म्हणून त्यांच्याविरुद्ध शिष्ट समाजांत जें काहूर उठलें होतें आणि ज्या असहिष्णुतेची शिसारी येऊन त्यांच्या कविमनानें तळमळून उद्गार काढले होते—

अनुक्रमणिका








" नातें पुरुष स्त्रीमधिं तें एकच बाटे, ऐसें उफराटें.
ज्यांचें मत त्यांचें बच यावें नच कार्नी ! तेथें चल राणी "

ह्या उद्गारांतच त्या काळच्या स्त्रीपुरुष संबंधाचें यथार्थ चित्रण आढळून येतें.

पण विद्यार्थिनी-संगतीचें भाग्य ज्यांच्या वांट्यास आलें त्यांनाच समाज निंदेचीही झळ सोसावी लागली. कॉलेजांतील कांहीं युगकर्त्या विद्यार्थिनी आपल्या तरुण सवंगड्यांबरोबर हंसत खेळत येत. पण क्वचितच असें दृश्य दिसावयाचें. बाकीच्या मुली पुंजक्या पुंजक्यानें येत आणि चटका लावून निघून जात. मग ज्यांना ही विद्यार्थिनी-संगत मिळत नसे त्यांनीं त्या थोड्याच भाग्यवंतांचा हेवा केला तर त्यांत काय नवल ? आणि लक्षांत ठेवा, रविकिरण मंडळाच्या उदयाचा तो काळ. त्या मंडळांतील सप्तर्षि अशा मिठ्ठास कविता करीत असत कीं नुकतेंच कॉलेजांत आणि साहजीकच टेकडीवर पाऊल टाकलेले विद्यार्थि त्यांच्या त्या शब्दसृष्टींतच विहरत असत. गिरीशांची ' अभागी कमल ' नुकतीच विस्मृतीच्या पडद्याआड गेली होती, आणि यशवंतांचा भरदार आवाज तरुणांच्या कानांत घुमूं लागला होता. त्यांच्या निःसंकोची प्रेमकाव्याचे भाट बनणें ही त्यावेळच्या विद्यार्थ्यांची चूष झाली होती. कवि-गायक म्हणून यशवंत हे त्यावेळीं विद्यार्थ्यांचे जितके आवडते होते तितकेच रसिक वृंदावर माधव जूलियन् यांनीं आपल्या प्रतिभेची छाप टाकली होती. मला आठवतें टेकडीच्या पायथ्याजवळून जो लहानसा रस्ता जात असे त्या रस्त्यानें कांहीं विद्यार्थी तालावर पावलें टाकीत म्हणत असत.

" करीं या लोंबते माव्या नसे तोटा मुहूर्ताला
पढ़ं दे आज दोघांना तुझा मी तूंहि हो माझी "

माधवरावांच्या कवितेचें एवढें वेड असे तरुणांना त्यावेळीं. पण अर्थात् हें आपलें काव्यांतलेंच प्रेम. प्रत्यक्ष व्यवहारांत मुलींशीं बोलणें हा सुद्धां धिटाईचा प्रकार मानला जात असे तिथें 'तूंहि हो माझी' असें म्हणण्याची छाती कोण करणार ? शेंकडा पन्नास टक्के प्रेमाचा तो मुका काळ. " मी तयार आहें रे, पण ती कुठें आहे " असें तो तरुण हळहळत उद्गारला " या धर्तीवरच त्यावेळच्या लघुकथा लिहिल्या जात. सायंकाळी काळ्या चंद्रकळा नाहीं तर उंची इरकली किंवा महेश्वरी लुगडीं नेसून मुली टेकडीवर जावयाच्या. त्यावेळीं विकच्छ लुगड्यांची तर राहोच, पातळांचीहि प्रथा पडलेली नव्हती. पायांत चपला आणि भरदार बुचड्यावर एकादेंच सपर्ण गुलाबाचें फूल किंवा बटमोगऱ्याची कळी खोवलेली असाव-याची. फिरावयास निघालेल्या त्या मुली. त्यांना घाई तरी कसली ! संथ पावलांनीं त्या कधीं एकमेकींच्या खांद्यावर हात टाकून, तर कधीं फारच प्रेमानें हातांत हात घालून, आपल्याकडे निरखून पाहणाऱ्या विद्यार्थ्यांकडे बेपर्वाईनें नजर टाकीत, आणि सोसाट्याने येणाऱ्या वाऱ्याशीं मोकळेपणानें खेळत, टेकडीवर स्वैरसंचार करीत असत. त्या मुलींचा नजरेंत भरण्याइतक्या मोहक नसत. पण आरोग्याचें तेज, सुसंस्कृतपणाची आकर्षकता आणि घरंदाजपणाचा स्वाव त्यांच्या मुद्रेवर असे आणि चालण्या-बोलण्यांतहि प्रतीत होत असे. थोरामोठ्यांच्या मुलीच त्या. सेवानिवृत्त हुजुर मामलेदार किंवा सबजज्ज किंवा निदान गव्हर्नरे झालेला सबरजिस्ट्रार असेच त्यांचे पालक असत. बहुतेकांनीं आपल्या मुलींसाठीं एखादा आय्. सी. एस्. नाहींतर बॅरिस्टर, निदान चढू घातलेला सरकारी हापीसर हेरलेला असावयाचा. सगळ्यांनाच कुठून म्हणा मनाजोगते वर मिळणार ? कांहीं महत्त्वाकांक्षी विद्यार्थी स्वतःची तशीच समजूत करून घ्यावयाचे आणि






मग आपल्याच मनाला निवाळा द्यावयाचे, "यांना का सगळ्यांनाच आय्. सी. एस्. मिळणार आहेत? खाऊंच्या मनांत मांडे. अरे बाबा, अखेरीस ही आपलीच धन आहे." पण असे महत्त्वाकांक्षी तरुण विरळाच. बहुसंख्य विद्यार्थी मानसपूजेंतच धन्यता मानावयाचे. दुरून मिळणाऱ्या दर्शनावरच जेथें त्यांची तहान भूक भागत असे तेथें कधींकाळीं भेटीचा योग आला किंवा प्रसंगानें ओळखदेख झाली तर आपलें भाग्य शिगेस पोचलें असेंच त्यांना वाटावयाचें. फारफार झालें तर माधवरावांच्या शब्दांत ते स्वतःच्या मनाशीं म्हणाले असतील,

"असाच लोभ असूं दे कधींतरी पुढतीं
कथीन हृद्गत माझें करीन आळवणी."

पण पुढेंच काय, केव्हांहि त्यांना हृद्गत सांगायची कोटली वेळ आली असणार?

—पण एके दिवशीं टेकडीवर प्रचंड वादळ उठलें. म्हणजे निसर्गाचें वादळ नव्हे. एका नव्या कादंबरीनें साऱ्या तरुण वर्गाला झंझावाताप्रमाणें हादरवून टाकलें आणि त्याची प्रतिक्रिया नेहमींप्रमाणें फर्ग्युसन टेकडीवरहि झाली. मराठींतील पूर्वीच्या किंवा नंतरच्या कोणत्याहि कादंबरीनें 'बंधनाच्या पलीकडे' या श्री. पु. य. देशपांडे यांच्या कादंबरीइतकी वाचकांची पकड घेतली नसेल. चर्चा, वादविवाद, टीका, आणि गुद्दागुद्दी-सुद्धां-यांची एकत्र झुंबड उसळली सगळीकडे. टेकडीवरील शांत वातावरणांतहि चर्चेचे फटाके उडूं लागले आणि त्याहीपेक्षां एक नवल वर्तलें आणि ते हें कीं स्त्री-पुरुष संबंधांत एकदम एक नवीन पायंडा पडल्यासारखें झालें. कल्पना करा, जेथें तरुण तरुणींच्या प्रेमाची खातरी पटली तरी त्या तरुणीची नजर धरणी न्याहाळीत असे तीच तरुणी एकदम प्रियकराच्या खांद्यावर मान टाकून "अरु, अरु, तूं कित्ती कित्ती रे चांगला आहेस" असें धिटाईनें एकेरी बोलूं लागली म्हणजे ती सामाजिक जीवनांतील क्रांतीच नव्हे तर काय? 'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीचे गुणदोष काय असतील ते असोत. पण एवढें खरें कीं त्या कादंबरीनें दोन प्रेमी जीवांच्या वागणुकींतील बरेचसे टप्पे मात्र सोयीनें गाळले. ओळख आणि प्रेम यांच्या दरम्यान किंवा 'अहो' आणि 'तूं' यांच्यांतील मजल गांठीपर्यंत जो वेळ जात असे, किंवा जी ओढाताण होत असे ती प्रभाकर–लता वा शांता–अरुण या जोडगोळ्यांनीं कशी सफाईदार रीतीनें सुरुवातीपासूनच दूर केली. त्यानंतर काल ओळख झालेले दोन जीव एकमेकांना खेटून बसूं लागले आणि वाऱ्याच्या मंद लहरींनीं "कित्ती कित्ती रे" असे कांहींतरी शब्द टेकडीवर पसरविले म्हणजे आम्ही म्हणत असूं "खपला गडी!" किति लवकर खपूं लागले गडी त्यानंतर. आणि तेथून कॉलेजांतील सहजीवनालाहि एक नवीन वळण मिळालें. कदाचित् त्या सुमारास सामाजिक परिस्थितिही बदलली असेल. देशांतील राजकारणाला जें उग्रतर स्वरूप येत चाललें होतें आणि ज्याच्या प्रभावानें तरुण भावनाशील स्त्रीपुरुषांचीं मनें एकमेकांच्या समीप येऊं लागलीं होतीं त्याचाहि तो परिणाम असेल. पण 'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीनें त्या गतीला वेग दिला एवढें खरें.

अर्थात् बंधनांच्या पलीकडे वगैरे कोणी गेलें नाहीं. पण काव्याच्या अंतराळांत जे लोक विहार करीत होते ते जरा गद्यसृष्टींत, साधारणपणें जमिनीवर चालूं लागले. दुरून मानसपूजा बांधावयाची, वेणींतून चुकून फूल पडलें तर तें उचलून घेऊन प्रीतिदेवतेचें तें वरदान मानावयाचें, अंतर्यामींचे बोल प्रगट न करतां प्रीतिदेवतेच्या चिंतनांत नुसतें झुरत रहावयाचें, ही जी कविहृदयाची रीत असे ती गद्यसृष्टींत पार बदलली. हळूहळू स्त्री आणि पुरुष यांच्यामधें जी एक प्रकारची पोलादी भिंत उभी

अनुक्रमणिका






असे ती भाईशी होऊं लागली. तरुण विद्यार्थी वर्ग जो बेछूट होऊं लागला. आगरकर रेसीडेन्सींच्या आवारांत विद्यार्थ्यांची वर्दळ सुरू झाली आणि आजवर मुलांकडे उद्धटपणानें तरी नाहीं तर चोरटेपणानें तरी पाहणाऱ्या मुली बेछूट मुलांना प्रतिशब्द देऊं लागल्या. फर्ग्युसन टेकडी हें त्या बदलत्या प्रवाहांचें निदर्शक चिन्हच होतें. आतां Bridge of sighs वरून दुसतेच मुलींचे पुंजके फिरावयाला येईनासे झाले. मुलामुलींचे संमिश्र घोळके, आतां कधीं वाङ्मयावरची चर्चा करीत, तर कधीं राजकारणांतील मतभेदांचा ऊहापोह करीत, तर कधीं थिऑसफीच्या आचारविचारांची स्तुति करीत मोकळेपणानें टेकडीच्या अंवतीभोंवतीं फिरूं लागले. फिरतांफिरतां सहप्रवाशांची एकादी जोडी थकून कातळावर बसावयाची आणि मग आपोआप जणुं निसर्गनियमानुसार त्या घोळक्यांचें जोडीजोडींत रूपांतर व्हावयाचें. ‘ बंधनाच्या पलीकडे ’ या कादंबरीनें वैचारिक दृष्टीनें कितीसा धक्का दिला असेल कोण जाणे. पण तरुणांच्या आचारावर तिनें इष्ट तो परिणाम घडवून आणला यांत शंका नाहीं. तरुणतरुणींच्या जीवनांत संकोचाचा जो पडदा असे तो त्या कादंबरीनें दूर केला आणि मुलांना आणि मुलींनाहि धीट बनविलें.

याच धिटाईनें मुलामुलींच्या सहजीवनांत रंग भरला आणि राजकीय बंडखोरीच्या पुढील काळांत जेव्हां सारें समाजजीवन पोळून निघूं लागलें तेव्हां त्या सहजीवनांत जितका मोकळेपणा आला तितकीच अद्भुतरम्यताहि निर्माण झाली. बंधनांचा तिटकारा, सत्तेबद्दलचा असंतोष आणि ध्येयवादा-बद्दलचें आकर्षण असें त्यावेळच्या तरुणतरुणींच्या मनःस्थितीचें वर्णन करतां येईल. म्हणून कोठल्याहि प्रकारें त्याच्यावर दडपण येऊं लागलें म्हणजे त्यांचें मन उसळी घेऊन त्याचा प्रतिकार करावयाला प्रवृत्त होई. राजकीय असंतोषाचें हें वारें मुलांमध्यें जसें शिरलें तसेंच मुलींमध्येंहि. आणि त्यानें सामाजिक जीवन आमूलाग्र बदलून टाकलें. आतां भावुक हळवेपणाला तर स्थान राहिलें नाहींच उलट ध्येयवादाकडे आकर्षिला जाणारा तरुण–तरुणींचा वर्ग एकमेकांबद्दलचा भक्तिभाव सोडून राजकीय सहप्रवासी या नात्यानें बरोबरीनें वागूं लागला, खांद्याला खांदा लावून लढूं लागला. पूर्वींचें तें चिंतन, प्रेमविव्हलतेचे उसासे, ‘ कित्ती कित्ती रे छान आहेस तूं ’ असे लाडिक उद्गार आतां नाहींसे झाले, ऐकूं येईनासे झाले. आतां किंचित् छाती वर काढीत आणि चेहऱ्यावर गंभीर भाव आणून आपल्या कपड्यां-बद्दल बेफिकीर असलेले विद्यार्थी टेकडीच्या आसपास हिंडत. मुलीहि फिरावयाला येत. पण त्यांचेहि पोषाख साधेसुधे असत. पांढरीं शुभ्र पातळें, खादीचे ब्लाऊज, आणि पाठीवर केसांचा लांब सडक शेपटा असा त्यांचा नवीन पेहराव असे. उंचीं इरकली आणि महेश्वरी लुगडीं लग्नकार्य, समारंभ किंवा स्त्रीपरिषदेचें अधिवेशन यांसारख्या प्रसंगां-साठीं ठेवणींत ठेवलेलीं असावयाचीं. आर्थिक परिस्थितीचा ताण म्हणून म्हणा किंवा गांधीजींच्या राजकीय आचारांबद्दलच्या ओढीमुळें म्हणा साधीं पातळेंच हळूहळू रूढ होत चाललीं होतीं. मुलींच्या वागणुकींतहि निर्व्याज साधेपणा आणि निर्भीड मोकळेपणा आला होता. आतां त्या खुशाल मुलांच्या रेसीडेन्सींत जाऊन चहा पीत आणि मग बरोबरच टेकडीवर फिरावयाला येत. कधीं ‘ नचिकेत लॉज ’मध्यें थिऑसफिस्टांच्या तरुण पुढाऱ्यांचीं बौद्धिकें होत. मग कधींमधीं शेजारच्या बाभळीच्या बनांत अशोक वनांतील सीतेसारख्या भासणाऱ्या कांहीं मुली आत्मचिंतनांत निमग्न होऊन बसलेल्या आढळत. युवक संघाच्या झंझावाती प्रचार-चळवळींचाहि तो काळ. सभा-परिषदा, मिरवणुकी-हरताळ यांनीं कॉलेजजीवन ढवळून जात असे. विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या मनाला बंध राहिला नाहीं. त्यामुळें

एकप्रकारच्या राजकीय उन्मादानें तरुण, भावस्पर्शी मनें ग्रासून गेलीं. त्या उन्मादाचा मनावर जो ताण पडत असे त्यांतून विरंगुळा मिळण्यासाठीं चुळवळी करून दमलेभागलेले तरुण जीव या रम्य टेकडीवरील चिरपरिचित कातळांवर सुखानें अंग टाकून देत. पूर्वीचें काव्यमय जीवन आणि आजचें चळवळीच्या धगींत पोळून निघणारें त्यांचें भीषण जीवन यांतील दोन ध्रुवांचें अंतर कीं त्यांना जाणवत नसेल? पण पूर्वीच्या स्वप्नरंजनांतील विलास त्यांत नसला तरी ध्येयवादी जीवनांतील तेजस्विता आणि उदात्त महत्त्वाकांक्षेनें भारून गेलेल्या अंतःकरणाच्या अनिर्बंध भराऱ्या मारीत असे त्याचा आनंद, यामुळें त्या तप्त जीवनालाहि एकप्रकारची अवीट गोडी प्राप्त झालेली असे. त्शांत सहप्रवासी म्हणून कॉलेजांतील विद्यार्थिनींची त्यांना जी साथ मिळत असे त्यामुळें साधारणपणे वैराण वाटणाऱ्या त्या जीवनांतहि एक प्रकारचा ओलावा निर्माण होत असे.

फर्ग्युसन टेकडीला जर वाचा असती तर तिनें या कितीक सामाजिक स्थित्यंतरांचा सुगंधमधुर इतिहास किती हृदयस्पर्शी रीतीनें सांगितला असता! पण सुरुवातीलाच तिथें घडलेल्या एका ऐतिहासिक घटनेची रोमांचकारी आठवण मात्र ती सांगितल्याशिवाय राहती ना! त्या टेकडीचें केवढें भाग्य. इथें कितीक प्रेमी जीवांचे मीलन झालें असेल, कितीक आणाभाका घेतल्या गेल्या असतील, इथल्याच कातळावर बसून कितीक प्रतिभावान् कवींनीं आपलीं कवनें वाऱ्यावर सोडून दिलीं आणि इथल्याच एका कातळावर भारत सेवक समाजाचे आद्य संस्थापक कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं आजन्म देशसेवेची शपथ घतली. प्रेमी जीवांचीं कूजनें, प्रीतीनें वेड्यापिशा झालेल्या तरुणतरुणींचे निःश्वास, बेजबाबदार कॉलेज जीवनांत रंगविण्यांत येणारीं उच्च व अवास्तव शब्दचित्रें यांनीं त्या निर्जीव भूमीला प्रसन्नता आणली असेल. पण त्याग आणि सेवेचा जो आदर्श या टेकडीवर ~~जन्मला~~ आला आणि ज्याचा सुगंध त्या टेकडीच्या आसमंतांत अद्यापही दरवळत आहे, त्यानें मात्र तिला एकप्रकारें चैतन्यस्वरूप दिलें आहे, तिला एकप्रकारची उदात्तता प्राप्त करून दिलेली आहे. त्या उदात्त पार्श्वभूमीमुळेंहि त्या टेकडीकडे अजूनहि माझ्या मनाला ओढ लागते आणि पंचवीस वर्षांपूर्वीच्या सामाजिक जीवनांतील कालखंड जे तेथें कोरल्यासारखेच मला दिसतात त्यांची आठवण होऊन कधीं कधीं वाटतें 'गेले वरें ते दिवस!"

खरोखरच गेले! म्हणजे मी शोकविव्हल होऊन म्हणत नाहीं. काळ काय कोणासाठीं थांबतो थोडाच. आणि त्याचा प्रवाह जसा वाहत असतो तशीं जगांत स्थित्यंतरें होत असतात. चालीरीति, वेशभूषा, आचार-विचार, मतें आणि ध्येयेंहि बदलतात. त्यांत वाईट तें काय? पण मला वाईट वाटतें तें एवढेंच कीं ज्या टेकडीमागें एवढी उज्वल परंपरा आहे. जिच्या लहानमोठ्या कातळावर कितीक दुखदुःखाच्या आशानिराशेच्या आठवणींचीं पुटें चढलीं आहेत त्या टेकडीला अशी हुतकी कळा कां यावी? या टेकडीची रम्यता नाहींशी कां झाली आहे? मी म्हणतों तुम्ही त्या टेकडीच्या उंच शिखरावर एकदां जाऊन सभोंवार दृष्टि टाका. ज्यांना गांधीजींनीं आपला गुरु मानलें त्या भारतसेवक गोखल्यांचें जिवंत स्मारक तुम्हांला पायथ्याशींच दिसेल. दुसऱ्या बाजूला फर्ग्युसन कॉलेजचा केवढा विश्वसंसार पसरलेला आहे, पलीकडे भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटची लहानशीच इमारत आहे. पण केवढें विशाल संशोधन तेथें चाललेलें असतें. समोरच्या झाडींत पुणें शहर दडलेलें आहे. आणि आगोठीच्या सुमाराला तुम्ही पाहिलेंत तर काषाय रंगानें नटलेली मुठा नदी दुथडी वहात असलेली तुम्हांला दिसेल. आणि हा पाहा खालींच जो कालव्यावर लांकड पूल दिसत आहे तो Bridge of Sighs! इथूनच कुणी देवता टेकडीकडे येत असलेली पाहून माधवरावांनीं सहज स्फूर्तीनें—

"तव लंबवर्तुळ चेहरा, लव हांसरा लव लाजरा" अशा नितांत सुंदर काव्य पंक्तींनीं तिचें वर्णन केलें. पण—

पण त्याच रम्य जागीं आज

"सत्राणें उड्डाणें भुःभुःकार वदनीं"

अशा आरत्या म्हटल्या जाव्या हा दैवदुर्विलासच नव्हे तर काय म्हणूनच कांहीं कांहीं वेळीं वाटतें 'गेले वरें ते दिवस!' आणि मन विषण्ण होतें.

---

> महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास दक्षिण कोंकणांत मराठी रंगभूमीचें पहिलें मंगळाचरण ज्या एका कल्पक कलावन्तानें गायलें त्यालाच आद्य नाट्याचार्यत्वाचा मान दिला पाहिजे !




# मंगलाचरण

— म. भा. भू. ज. र. आजगांवकर

मनुष्यप्राण्याच्या आनंदांत भर घालून त्याला प्रसन्न आणि उत्तेजित करणाऱ्या ज्या अनेक कला आहेत त्यांत नाट्य आणि गायन या कलांची गणना प्रामुख्यानें करण्यांत आलेली आहे. आज सुमारें चार सहस्त्र वर्षे ही कला आपल्या भारतवर्षांत प्रचलित असून भरतमुनींनी ' नाट्यशास्त्र ' या नांवाचा ग्रंथही लिहिलेला आहे. श्रीरामचंद्राचे पुत्र कुश आणि लव यांनीं वसिष्ठ ऋषींच्या आश्रमांत रामायणांतील कांहीं कथाभाग नाट्यरूपानें करून दाखविल्याचा उल्लेख आढळतो. कृष्णावतारींही सांब, गद वगैरे यादव युवक द्वारकेंत नाटकांचे प्रयोग करीत असत. पुढें ऐतिहासिक कालांत भास, कालिदास, शूद्रक, भवभूति, जयदेव, हर्ष, नारायणभट्ट, विशाखदत्त इत्यादि प्राचीन नाटककारांनीं आपल्या कल्पनाचातुर्याचा आणि प्रतिभासंपन्नतेचा बराच मोठा भाग ह्या भारतीय नाट्यकलेचें सौंदर्य आणि वैभव वाढविण्याच्या कामीं खर्च केलेला आहे; आणि वेदांत्यांनीं देखील परमात्म्यास सूत्रधाराचा वेष देऊन आणि मायादेवीस नटी बनवून आपली नाट्यप्रियता व्यक्त केली आहे. जुन्या संस्कृत कवींच्या नाटकांचे प्रयोग जत्रांतून उघड्या मैदानावर होत असत आणि ते रात्रभर चालत असत. विस्तीर्ण मैदानावर प्रयोग होत असल्यामुळें शाकुंतलांतला दुष्यंत राजा रथांत बसून रंगभूमीवर प्रवेश करीत असे यांत नवल नाहीं. पुढें दुर्दैवानें परदेशीय लोकांच्या स्वाऱ्या या देशावर होऊं लागल्या व कालांतरानें त्यांची राजसत्ताही येथें सुरू झाली. त्यामुळें, इतर कांहीं कलांप्रमाणें, नाट्यकलेसही अवनतावस्था प्राप्त झाली.

सांगलीचे कै. विष्णुदास भावे हे महाराष्ट्रीय रंगभूमीचे जनक होत. हें देशावरील नाट्यकलेच्या बाबतींत जरी कदाचित् सत्य असलें तरी, कोंकण हाही महाराष्ट्राचाच भाग असल्यामुळें व कोंकणांत आज सुमारें दोन-अडीचशें वर्षें ही कला प्रचलित असल्यामुळें सबंध महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास वरील विधान पूर्णपणें निरपवाद नाहीं. दक्षिण कोंकणांत ही कला पहिल्यानें ज्या कल्पक मनुष्यानें आणली त्यालाच आद्य नाट्याचार्यत्वाचा हा मान खरोखर मिळाला पाहिजे. एका कर्नाटकी नाटकमंडळीचे नाट्यप्रयोग पाहून आपणास ही मराठी नाटकाची कल्पना सुचली असें विष्णुदास भावे यांनीं लिहिलें आहे, यावरून दक्षिण कोंकणांत होणारे नाटकांचे प्रयोग त्यांच्या अवलोकनांत आले नसावेत हें उघड आहे. विष्णुदास भाव्यांच्या जन्मापूर्वी निदान शंभर दीडशें वर्षें तरी सावंतवाडी, मालवण, वेंगुर्लें, आणि गोवें या भागांत हे दशावतारी नाटकांचे प्रयोग होत असत व अद्याप होत असतात. भारत, रामायण, भागवत आणि इतर पुराणग्रंथ यांतील आख्यानें नाट्यरूपानें या दशावतारांत दाखविलीं जातात. जुन्या काळीं, बहुतेक अक्षरशत्रु लोकांच्या हातीं ही कला असल्यामुळें तिचें स्वरूप बरेंचसें ओबडधोबड होतें हें खरें, परंतु ती नाट्यकलाच होती यांत संशय नाहीं. माझी अशी समजूत आहे कीं ज्या कर्नाटकी नाट्यकलेच्या अवलोकनानें विष्णुदास भाव्यांस मराठी नाट्यप्रयोग करून दाखविण्याची स्फूर्ति झाली त्याच कर्नाटकी नाट्यकलेचें अनुकरण आमच्या दक्षिण कोंकणांतील दशावतारी नाटकांच्या आद्यप्रवर्तकानें केलें असावें. आणि भावे यांची नाट्यकला आणि ही दक्षिण कोंकणांतली जुनी नाट्यकला यांत जें पुष्कळच साम्य आढळतें त्याचें कारण दोन्ही नाटकांचें उगमस्थान एकच आहे हें होय. एका काळीं दक्षिण कोंकणावर कर्नाटकी राजांची सत्ता होती, त्या कालांत कानडी आणि कोंकणी लोकांचा संबंध आल्यामुळें, कानडी लोकांच्या नाट्यकलेचें अनुकरण कोंकणी लोकांनीं केलें. देशावर मात्र पाऊणशें वर्षांपूर्वी विष्णुदास भाव्यांनीं मराठी नाटकें पहिल्यानें सुरू केलीं ही गोष्ट खरी, आणि तेवढ्यांपुरता त्यांचा यथोचित मान व्हावा, हें उचितच होय. दक्षिण कोंकणातलीं हीं दशावतारी नाटकें म्हणजे शुद्ध धांगडधिंगा, असें समजण्याचें कारण नाहीं. देशावरील लोकांत त्यांची थोडी तरी कल्पना यावी म्हणून त्या संबंधाची संक्षिप्त माहिती येथें देतों.

हीं दशावतारी नाटकें करून दाखविणारी एक स्वतंत्र जातच तिकडे आहे. ग्रामदेवतांची सेवाचाकरी करण्याचें काम या जातीच्या लोकांकडे असतें. वेंगुर्लें तालुका, सावंतवाडी संस्थान व गोमंतक या भागांतील बहुतेक गांवांत या लोकांची वस्ती आहे. या जातीचे लोक ' देवळी ' या नांवानें तिकडे प्रसिद्ध आहेत किंवा होते. सर्वच गांवचे देवळी नाटकें करितात असें नाहीं. आजगांव, आरोली, खानोली, परूळें, वालावल चेंदवण. वेंगुर्लें, मोचेमाड, पार्से अशा आठ दहा गांवांतच हे नाट्यसंच आहेत व त्याचेच प्रयोग वर्षांतील एका ठरविक कालांत बहुतेक सर्व गांवांतील ग्रामदेवतांच्या देवालयांतून होत असतात. दिवस व तिथि ठरलेलीं असतात. प्रत्येक नाट्यसंचाच्या ' वर्सली 'चे गांवही ठरलेले आहेत. शिधा आणि कांहीं ठराविक बिदागी देवाच्या खजिन्यांतून त्यांना देण्यांत येते. नाटकाला लागणारें सर्व सामान ते लोक स्वतः तयार करितात. गणपतीची लांकडी रंगीत सोंड. शारदेचा मोर, मुकुट, मोठमोठ्या लांकडी मण्यांच्या बेगड लावलेल्या माळा वगैरे सामान सुताराच्या मदतीनें तयार करण्यांत येतें. ज्या तिथीला ज्या गांवांतील देवालयांत प्रयोग करून दाखवावयाचा असेल त्या तिथीला तेथें उपस्थित होऊन देवळांत मुक्काम करावयाचा व मध्यरात्रीच्या सुमारास नाटक सुरू करावयाचें आणि तें उजाडेपर्यंत चालवावयाचें. सुरुवातीस हातांत झांज घेऊन सूत्रधार आणि मृदंगी हे दोघेच रंगभूमीवर येतात. बराच वेळ मृदंगी आणि झांज वाजविल्यावर नमन सुरू होतें. बाजूला मशालजी हातांत पेटती मशाल घेऊन उभा असतो. आरंभींचें मृदंगवादन ऐकण्यासारखें असतें. सूत्रधारानें गणेशस्तुतिपर म्हटल्यावर, समोर बसलेल्या एखाद्या प्रेक्षकाच्या डोक्याचा रुमाल घेऊन त्याचा पडदा धरतात आणि पडद्याच्या आंत गणपति

आणि गोपाळ येऊन उभे राहतात. पडद्याखालून, घुंगुर घातलेले त्यांचे पाय दिसूं लागतांच प्रेक्षकांची उत्सुकता वाढून, पडदा केव्हां बाजूला होतो याची ते मोठ्या कुतूहलानें वाट पाहतात. पडदा दूर होतांच कृष्ण व गोपाळ गणपतीला दोन्ही बाजूंनीं धरून नृत्य करूं लागतात हे नृत्य फार पाहण्यासारखें असतें त्या नृत्यास अनुकूल अशीं पद्यें सूत्रधार म्हणत असतो. परंतु गायनापेक्षां वाद्य आणि ताल यांजवर विशेष भर देण्यांत येते. पद्यांची रचना अगदींच ओबडधोबड असते. आरंभींच्या ह्या पात्रांचीं भाषणेंही ठराविक. गणपति आणि गोपाळ यांचें नृत्य झाल्यावर जाड संभाचें जानवें घातलेला गणपतीचा पुजारी हातांत तांब्या घेऊन येतो व त्याचें थोडेंसें नृत्य झाल्यावर अंगांत आल्यासारखें करून तो घुमूं लागतो. मग सूत्रधार त्याला विचारतो, "अरे, तुझ्या अंगांत कोणता देव संचरला आहे?" पुजारी सांगतो, "डोंगरावर पडलेल्या पावसाचें पाणी आपोआप खालीं वाहून येईल असें करणारा तो मी देव. स्त्री गरोदर असली तर नऊ महिने भरतांच ती प्रसूत होईल असें करणारा तो मी देव." पुजाऱ्याच्या अंगांत आलेल्या देवाचें हें अचाट सामर्थ्य ऐकून श्रोते अगदीं थक्क होऊन जातात गणपतीची पूजा करून पुजारी गेल्यावर मोरावर बसून शारदा येते. "शारदे दीसकोमिदें कमलमृदुपदें" हें ठराविक पद सूत्रधार म्हणतो व त्या तालावर सरस्वती, मोराचें डोकें हातांत धरून, नृत्य करिते. हें नृत्यही फार प्रेक्षणीय असतें. सूत्रधारास वरप्रदान करून सरस्वती अंतर्धान पावल्यावर झाडाचे डाळ डोक्यास बांधून माधवी येतो व उड्या मारीत पुढेंमागें नाचूं लागतो. लागलीच एक गोपी येते न ती माधवीच्या पाठीवर थाप मारून "माझी आणि श्रीकृष्णाची भेट करूनदे" अशी त्याला विनंति करिते. दरम्यान दाढीवाला ब्रह्मदेव रंगभूमीवर येऊन एका कोपऱ्यांत ठाण मांडून बसतो. इतक्यांत विचित्र पोषाक केलेला शंखासुर येतो. ग्राम्य विनोद करून प्रेक्षकांस हंसविण्याचें काम हें पात्र करितें. सूत्रधाराबरोबर कांहीं वेळ त्याचा अचकटविचकट संवाद झाल्यावर त्याचें लक्ष्य ब्रह्मदेवाकडे जातें व त्याचे वेद तो हरण करितो. ब्रह्मदेव विष्णूचा धांवा करितो. विष्णु येऊन शंखासुराशीं युद्ध करितो व त्याचा वध करून ब्रह्मदेवाचे वेद त्याला परत देतो. इतकें झाल्यावर नाटकाचा पूर्वरंग संपतो. पहिला सूत्रधार जाऊन त्याच्या जागीं दुसरा सूत्रधार येतो. हा मनुष्य जरा बहुश्रुत व हजरजबाबी असावा लागतो. एखाद्या पात्रास आयत्या वेळीं त्याचें भाषण आठवेंनासें झालें म्हणजे तें पात्र समोरच्या पात्रास "सांगतों, श्रवण कर" असें म्हणून सूत्रधाराकडे बोट दाखवितें व त्याचें भाषण पद्यरूपानें किंवा क्वचित् गद्यांतही सूत्रधार म्हणून दाखवितो.

दक्षिण कोंकणांतल्या या जत्रांतं महाभारत, रामायण व भागवतादि पुराणें यांतील आख्यानें नाट्यारूपानें दाखविण्यांत येतात. नटांच्या अशिक्षितपणामुळें या नाटकांचें स्वरूप जरी थोडेंसें ओबडधोबड असलें तरी रसिक सहृदय मनुष्यास स्वतःचें मनोरंजन करून घेण्यासारखा बराच भाग त्यांत असतो, यांत संशय नाहीं. विराटपर्व, सीतास्वयंवर, वत्सलाहरण, महिषासुरवध, द्रौपदीवस्त्रहरण, ताटिकावध, नृसिंहावतार, सुरथसुधन्वा प्रमिलाख्यान, चित्रसेन गंधर्व वगैरे लोकप्रिय पौराणिक आख्यानें प्रत्यक्ष प्रयोगरूपानें रंगभूमीवर पहावयास मिळत असल्यामुळें लहान मुलांस, स्त्रियांस व प्रौढांसही महाभारत रामायणादि पुराणेतिहास ग्रंथांतील मनोरंजक व बोधप्रद कथांचा परिचय सुलभतनें करून घेतां येतो. या दशावतारी नाटकांत वीर आणि करुण या दोन रसांवरच विशेष भर असतो. नटांस युद्धाची आवड फारच. राक्षसपात्रें राळ उडविल्याशिवाय आणि अलल्ल डुर्रची कानठळ्या बसविणारी गर्जना केल्याशिवाय रंगभूमीवर यावयाचींच नाहींत. एखादें राक्षसपात्र नेपथ्यांतून रंगभूमीवर न येतां मुद्दाम उलट दिशेनें प्रेक्षकांच्या घोळक्यांतून वाट काढीत आणि अलल्ल डुर्र करीत येऊं लागलें म्हणजे पोरें घाबरून किंकाळ्या फोडावयाचीं! नारसिंह किंवा महिषासुरमर्दिनी यांच्या भूमिका करणाऱ्या नटांच्या अंगांत संचार झाला म्हणजे नारळ फोडून त्याचें पाणी त्यांच्या डोक्यावर ओतल्याशिवाय त्यांचा क्रोधानल शांत होणें कठीण! तसें न केल्यास नारसिंह हिरण्यकशिपूच्या आणि महिषासुरमर्दिनी महिषासुराच्या नरडीचा घोट घेईल ही भीति! आमच्या आजगांवांतल्या एका ८० वर्षांच्या वृद्ध नटानें मला एकदां मोठ्या दिमाखानें सांगितलें कीं "हीं हल्लींचीं पोरें रावणाचें काम काय करणार? मी जेव्हां सीताहरणांत रावणाची भूमिका करीत असें तेव्हां माझी गर्जना ऐकून शिरोड्याच्या बाजारांतले लोक जागे व्हावयाचे!" आजगांवच्या देवळापासून हा शिरोड्याचा बाजार सुमारें दीड मैल आहे! तरुण पिढीचे लोक दुर्बल आणि नाजुक झाल्यामुळें, त्यांना अशी दीड मैलावर निजलेल्या लोकांचा निद्राभंग करणारी गर्जना करतां येत नाहीं व त्यामुळें रावणाच्या कामांत रंग भरत नाहीं अशी या वृद्ध नटाची तक्रार होती. आणि ती खोटी होती असें माझ्यानें म्हणवत नाहीं. कारण मोठ्यानें ओरडणें हाच त्या वेळीं राक्षसपात्राचा मुख्य गुण समजला जात असे दक्षिण कोंकणांतल्या या दशावतारी खेळांत,

नृत्याचे कांहीं प्रकार व खड्गयुद्ध, मल्लयुद्ध, मुष्टियुद्ध वगैरे युद्धप्रकार फार प्रेक्षणीय रीतीनें करून दाखविण्यांत येतात. त्यावेळचें मृदंगवादनही श्रवणीय असतें. युद्धाच्या वेळीं म्हणावयाचीं कांहीं ठराविक पद्यें आहेत तीं सूत्रधार झांजेच्या तालावर म्हणत असतो. एखादें स्त्रीपात्र किंवा पुरुष पात्र शोक करूं लागलें कीं प्रारंभ 'हर हर ! हे परमेश्वरा !' हे शब्द त्यानें उच्चारावयाचे. रंगभूमीवर सीता किंवा तारामतीसारखी महापतिव्रता स्त्री आली तरी "गरगर" नयना फिरवीत आली कविची मनमोहिनी" हेंच पद सूत्रधार म्हणणार !

दशावतारी नाटकांतले नट अशिक्षित असले तरी प्रसंगविशेषीं त्यांच्यांतला एखादा नट समयसूचकता दाखवून कसा हास्यरस निर्माण करतो यान्चीं एकदोन उदाहरणें येथें देतों. एकदां एका प्रयोगांत घटोत्कच आणि अभिमन्यु यांचें युद्ध झाल्यावर, "तुम्हीं दोघेही चुलत भाऊ आहांत" असें नारदानें त्यांना सांगितलें. तेव्हां घटोत्कचानें सुभद्रेकडे बोट दाखवून आपल्या आईस-हिडिंबेस विचारलें, "आई, ही कोण ग ?" ती म्हणाली, "ही तुझी काकू." तेव्हां घटोत्कच तिला विचारतो, "हिला मी तोंडांत टाकू ?" नंतर अभिमन्यूकडे बोट दाखवून तो हिडिंबेस विचारतो, "आई, आणि हा ग कोण ?" ती म्हणते, "हा तुझा भाऊ." घटोत्कच विचारतो, "मी याला खाऊं ?" विराटपर्वांत बल्लव झालेला भीम पाकगृहांत खुर्चीवर बसून आपल्या हाताखालच्या बल्लवाचार्यांवर देखरेख करीत असतां, एक बल्लवाचार्य त्याला येऊन विचारतो, "महाराज, आमटींत तिखट किती घालूं ?" भीम सांगतो, "अडीच मण घाल." सैपाकी म्हणतो, "इतकें तिखट घातलें तर आमटी फार तिखट होऊन ती कोणी खाणार नाहीं." भीम म्हणतो, "आमटी फार तिखट होऊन ती कोणी खाणार नाहीं हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. तर हा विराट महाराजांच्या इभ्रतीचा प्रश्न आहे. आमटींत अडीच मण तिखट घालण्याचें सामर्थ्य विराट महाराजांस आहे कीं नाहीं हा मुख्य प्रश्न आहे. लोकांच्या सुखदुःखाचा, आवडीनिवडीचा विचार करण्याचें आपणास कारण नाहीं" हा थेट खाडीलकरी थाट आहे असें कोण म्हणणार नाहीं ?

वरील वर्णन हें ५० वर्षांपूर्वीच्या दशावतारी खेळांचें वर्णन आहे. गेल्या ५० वर्षांत, या खेळांत कालपरत्वें पुष्कळच बदल झाला असला पाहिजे हें उघड आहे.



## येशिल का आज दुपारीं

कवि : कुसुमाग्रज

भर दिवसां माझ्या दारीं
येशिल का आज दुपारीं ?
    तिमिराचा तूं सांगातीं
    तिमिरांकित होतां धरती
    तिमिर[illegible] नाहत रातीं
तिमिरासह येसि समोरीं !
येशिल का आज दुपारीं ?
    तट शिसवी काळोखाच
    राहतं उभे रात्रीचे
    दापीत नाद, चरणाचे
सरपटसी त्या आधारीं !
येशिल का आज दुपारीं ?
    पसरतो [illegible] मार्गांत
    अजगरावरी अेकान्त
    लाजून सादिकोनांत
सावल्या फिरत संसारीं !
येशिल का आज दुपारीं ?
    वस्त्रांतुनि निथळत पडतीं
    तिमिराचे थेंब सभोंतीं
    शरमेंत कोंदली प्रीती
शंकेंत भावना सारी !
येशिल का आज दुपारीं !
    रे तूं न तुझी पण छाया
    थरकाप्त ये दारीं या
    भाविकता जाउन विलया
भीतींची हो रहदारी !
येशिल का आज दुपारीं ?
    तिमिरांतिल आराधन हें
    प्रियकरा न आतां साहे
    साफळून जीवन राहे
साचतसे डोह. विखारी !
येशिल का आज दुपारीं ?



अनुक्रमणिका




घड्याळाचे लयदार ठोके पडले. आणि आवाजाची दुनिया जागृत झाली. सावकाश, आळशीपणानें नव्हे. तत्परतेनें घाईनें ! अनाउन्सर्नें आपल्या खरदार मधासारख्या आवाजांत कार्यक्रमाचा पुकारा केला. मग फेड आउट फेड् इन्–आणि गाण्याचे स्वर झिरपूं लागले. अनाउन्सरनें कार्यक्रमाची तपशीलवार नोंद एका लठ्ठ बुकांत केली. खिटया वर खालीं झाल्या. खुंट्या पिरगळल्या गेल्या. सुया अस्थिरपणें नाचत राहिल्या. ऑफिसर ऑन् ड्यूटीनें छापील कातीव अक्षरांतला चेक पुढें काढून ठेवला. त्यावरच्या सहींत एक सुंदर वळण होतें. रेडिओंतून झरणारे सूर तशींच सुंदर वळणें घेत होते.

अनाउन्सरनें काचेच्या खिडकींतून शेजारच्या स्टुडिओंतल्या गायकाला ओळखीचा सलाम केला. गायकानें प्रतिसलाम केला आणि कांहीं तरी खूण केली. साथ थोडा वेळ तशीच वाजत राहिली. मग स्वरांनीं पद व गोड वळणें घेतलीं. गायकाच्या विचारांनीं निराळींच वळणें घेतलीं. अनाउन्सर उठला, गर्रकन् वळला आणि स्टुडिओच्या बाहेर गेला. सिगरेट् ओढायला. कार्यक्रमाविषयींची त्याच्या आवाजांतील अपुलकी आणि औत्सुक्य केव्हांच हवेंत विरून गेलीं होतीं. आणि आतां सिगारेटचा धूर हवेंत विरत होता.

एकामागें एक कार्यक्रम नुसते दाटीवाटीनें लागून राहिले होते. कुठचा तरी एक प्रचंड पोलादी खांब हवेंत एकामागून एक ध्वनीचे रंगीबेरंगी बुडबुडे उधळीत होता. बातम्या फेकल्या गेल्या, मग किरट्या आवाजांतील भावगीतें. शुष्क आवाजांतील रागदारी. क्वचित् संभावपूर्ण स्वरांचा फुलोरा आणि रागांच्या रम्य स्वराकृति. भाषणें, संवाद, नाटकें, संगीतकें, दाणेदार आवाज, किरटे आवाज, भरदार आवाज, पसरट आवाज ! संभाषणांचे धागे ! तुटके, पिळदार, चमकदार कंटाळवाणे ! त्या धाग्यांवरून धावणारे भावनांचे बिंदू ! प्रसंगांच्या गुं-

गुंती ! घटनांच्या चमत्कृति ! रागीट स्वभाव, प्रेमळ स्वभाव, नुसतेच स्वभाव. स्वरसृष्टींत एक निराळेंच बदलतें विश्व निर्माण झालें होतें. रंगीबेरंगी बुडबुड्यांच्या आकृति निर्माण होत होत्या आणि हवेंत विरत होत्या. आणि तें विश्व, त्या आकृति निर्माण करण्याकरितां, आपल्या श्वासांनीं निर्माण करण्याकरितां एक माणसांचें चिमुकलें विश्व त्या रेडिओस्टेशनमध्यें निर्माण झालें होतें. विविध प्रकृतींचीं, विविध विचारांचीं माणसें एकत्र जखडलीं गेलीं होतीं. त्या ध्वनिविश्वाच्या लहरींप्रमाणें आपल्या जीवनाचा आकार बदलत होतीं. नव्हे, तो अपरिहार्यपणें बदलला जात होता. एखाद्या प्रचंड हवाई छत्रीला धरून असहाय्यपणें इतस्ततः हेलकावे खाणाऱ्या या माणसांप्रमाणें त्यांची अवस्था झाली होती.

कधीं सुष्ट, कधीं दुष्ट, कधीं करारी, कधीं पुळचट, कधीं शहाणीं, कधीं मूर्ख अशा माणसांचीं सोंगें त्या दुष्ट आणि सुष्ट, पुळचट आणि करारी, मूर्ख आणि शहाण्या माणसांना रंगवावीं लागत. कधीं हसावें लागे, तर कधीं रडावें लागें, कधीं बोलावें लागे, कधीं मूक रहावें लागे. किरकोळ वामन राक्षसाची भूमिका करी. नाचरी निरा, साध्वी सिंधूचें हृदय पिळवटून निघालेले शब्द उच्चारित असे. न्यायला म्हणून पचं थू करणारा चंगीभंगी गणपत स्वरांच्या भव्य आकृति वातावरणावर खोदीत असे. आभासमय पण एका अर्थानें अधिक सत्य असलेल्या विश्वाची निर्मिति करण्याकरितां आपल्या खऱ्या जीवनाला खोटीं वळणें त्या माणसांना द्यावीं लागत होतीं. आणि मग त्या खोटयतलाही खरेपणा जाणवे.

खरें आणि खोटें यांच्या अस्पष्ट आणि अस्थिर सीमारेषेवर एकदां इकडे आणि तिकडे झुकणारें असें त्यांचें एक स्वतंत्र चिमुकलें विश्व होतें. ऑफिस आणि स्टुडिओ यांत तीं माणसें सारखीं भुरभुरत होतीं. दोन शेंडे घातलेल्या आणि लाडिक बोलणाऱ्या मुली, ऐटबाज सूट घालून इस्तरीचे चालणारे तरुण ! मालमूद काँग्रेसछाप पोषाख, शेरवाणीची मिजास ! पार्शांचो स्टाइल रिंगचा नखरा ! चालण्यांतली लचक, बोलण्यांतली चमक, नजरेंतले गहिरें पाणी ! असें वाटावें कीं हीं माणसें नाहींतच, तर रेडिओस्टेशनच्या मुलामा दिलेल्या पिंजऱ्यांत बंद करून ठेवलेले पोपट आहेत आणि कोणी छचोर नटवी स्त्री ह्यांच्यापुढें लाल डाळिंबाचे दाणे धरून ह्यांना बोलायला लावते.

आणि असेंही वाटावें कीं यांचें कांहींसे कृत्रिम हावभाव व बोलणें, यांचे रंगीबेरंगी कपडे, हीं सर्व सालपटें सोलून काढून हीं माणसें खरोखर आहेत कशीं तें तरी एकदां पहावें !

ह्या चिमुकल्या विश्वांतली एक श्यामा ! ठेंगणी, ठुसकी, देखणी ! पिकलेल्या सफरचंदासारखी ती दिसायची. आणि नेहेमीं कांहीं तरी हालचाल करीत असायची. आपल्या हातांनीं नेहेमीं ती गळ्यातल्या चेनशीं हा चाळा करायची. सारखें तिच्याकडे पाहत राहिलें तर अशी विचित्र कल्पना सुचावी कीं तिला कोणी गळफास घातला आहे, आणि ती तो सोडविण्याचा प्रयत्न करीत आहे. आणि मग त्या कल्पनेचें अर्थात् हसूं यावें. ती नेहेमीं तोंडानें पिना चावीत असे. सारखी बडबडत असे आणि तिला हंसू तर अनिवार यायचें कीं तिच्या डोळ्यांतून पाणी ओघळायचें.

पीन चघळीत, हा हातांतली पर्स त्या हातांत करीत ती ऑफिसांत आली. तिला उशीरच झाला होता. तिला एका अधिकाऱ्यानें हटकलें. " उशीर कां झाला ?"

श्यामा उभी राहिली. तिचा हात गळ्यांतल्या चेनकडे गेला. उशीर झाला ? उशीर ? कां बरं झाला ? सकाळीं ती उशिरा उठली होती. मग ईशीं भांडली होती. आईला वाटायचें, कीं ती कुकुलं बाळ आहे. तिला सगळं शिकवण्याचा यत्न करायची ती. ह्याचा अर्थ काय ?...पण..पण उशीर कां झाला होता ?—हो, ऑफिसांत येतांना वाटेंत तिला कुंदा भेटली होती, लग्न झालें होतें तिचें. आणि तिला एक मूल पण झालें होतें. सारखें आपलें, मुलाचें आणि नवऱ्याचें कौतुकच करीत होती. जणूं नवरा म्हणजे देवच. अगदींच old-fashioned. श्यामाला जीवनांत जी एक निराळी निराळीच मजा वाटायची, ती तिला समजलीच नव्हती. नाहीं पण उशीर कां झाला होता !...काय बुवा कटकट ! उशीर झाला म्हणून काय बिघडलें ? आणि हे शिष्ट नाहीं वाटतें उशिरां येत ? आणि काम न करतां टिवल्याबावल्या नाहीं का करीत ? फाड्दिशीं बोलावें आईला बोलतो तसें...

पण श्यामानें तसें केलें नाहीं. अशा प्रसंगीं काय करायचें हें तिच्या मनोवृत्तीनें केव्हांपासूनच ठरवून ठेविलें होतें. तिनें मान खालीं घातली. डोळे अर्धवट मिटले आणि खालचा ओठ आंत दुमडून अपराधी मुद्रा केली. लहानपणीं हें ती नैसर्गिकपणेंच करीत असे. पुढें तिला समजायला लागलें कीं आपण असा चेहरा केला कीं छान दिसतो. आणि मग पुरुष आपली अपराध विसरतात !

अपेक्षित परिणाम झाला. आणि तो अधिकारी पुढें निघून गेला. मग श्यामानें आपल्या मैत्रिणींकडे पाहून डोळे मिचकावले आणि ती हंसली. झालें. तें सगळें खोटें होतें हें तिनें इतरांना पटवलें आणि स्वतःलाही पटवलें. मग तिनें धीटपणें तिखट शब्दांत त्या अधिकाऱ्यावर टीका केली. म्हणजे काय, श्यामा घाबरली नव्हतीच ! छे मुळींच नाहीं ! सगळें नाटकच होतें तें !

आपल्या टेबलाजवळ ती गेली. तिनें इकडचे कागद तिकडे केले, परत तिकडचे इकडे केले. मग मोठ्या कष्टानें तिनें थोडें काम केलें. कामाबद्दल तिची मुख्य तक्रार अशी होती कीं काम पुरें व्हायला फार वेळ लागतो. दुसरी अशी कीं एकदां सगळें काम संपवून टाकायचें आणि मजा करायची असें कधींच होत नाहीं. पुन्हां पुन्हां नवीन काम येत असतें आणि तें करावें लागतें. बरें तें करून भागत नाहीं तर तें बरोबर करावें लागतें. म्हणून काम तिला फार कंटाळवाणें वाटायचें. कुरकुरत तक्रार करीत ती काम करीत होती. तिची धांवती टीका रंगांत येत होती. इतक्यांत त्या खोलींत मन लावून काम करणारा कोणी मनुष्य होता तो ओरडला, " कोय बडबड चालविली आहे मला जरा काम करूं द्याल कीं तुम्हीं ? "

श्यामा चपापली. तिला अगदीं शरमल्यासारखें वाटलें. लहानपणीं एकदां चोरून खात असतां वडिलांनीं तिचा कान पकडला होता, त्याची तिला आठवण झाली. खरें म्हटलें म्हणजे आपलें सारें जीवन तिला त्या चोरून खाण्यासारखेंच वाटे. त्यांत तिला चोरटा आनंद वाटे आणि एक प्रकारची भीति पण वाटे. श्यामाचा गोंधळ उडून गेला. आपला असा गोंधळ उडवून घेणाऱ्या परिस्थितीचा तिला फार राग आला. तिला वाटलें कीं आपण घरीं रागानें जशा उशा भिरकावून देतों आणि आईला फाडफाड बोलतों तसेंच आतां पण करावें. ती फणकाऱ्यानें म्हणाली, " माहीत आहे, मोठें काम करणारे आहेत ते ! बाकीचे काय काम करीत नाहींत कीं काय ?"

खरोखरच ती रागावली होती. आणि ती रागावली होती ह्यांत कांहीं विशेष नसलें तरी ती खरोखर रागावली होती ह्याला फार महत्व होतें. पण रागावणें ह्या गोष्टीला तिच्या घराबाहेरच्या जीवनाच्या कल्पनेंत स्थान नव्हतें. तें सगळें गमतीचें जीवन होतें त्यांत रागावणें रडणें ह्या सगळ्या गमतीच्याच गोष्टी होत्या. आणि आतां तर ती खरीखुरी रागावली होती. आणि खरें रागावलें म्हणजे केवढी जबाबदारी पडते ! कांहीं तरी कृती करावी








लागते, अगर काहीं तरी संयम दाखवावा लागतो. आणि तें तर नको होतें. तें तर टाळायचें होते.

ती जरा भांबावली. पण ही काहीं अशा प्रकारची पहिली घटना नव्हती. अशा प्रसंगांतून कसा मार्ग काढायचा तें तंत्र तिला माहित होतें. तिनें खांदे उडवले, भिंवया उडवल्या. आणि ती खुदकन् हंसली. स्वतःच्या रागाचें तिनें गंमतींत रूपांतर केलें.

इतक्यांत कोणीतरी जातांजातां आपल्या बोटांनीं तिच्या मानेला गुदगुल्या केल्या. आणि शामाला फार फार गंमत वाटली. त्या संवेदना फार सुखदायक होत्या. ज्या गंमतीनें आपलें सारें जीवन भरून टाकावें असें तिला वाटायचें ती गंमत त्या संवेदनांत होती. त्यापुढें तिला काम करणें शक्यच नव्हतें. ती उठली आणि तिनें उगाच इकडे तिकडे फेऱ्या घातल्या, कोणाला तरी टेलिफोन केला. निरनिराळ्या लोकांच्या टेबलाशीं जाऊन तिनें खेळकरपणा केला.

मग कुठल्या तरी नाटकाच्या तालमीकरितां ती स्टुडिओंत गेली. त्या नाटकांत तिला खूप रागवायचें होतें, रडायचें होतें आणि निष्ठुरपणें अनेक गोष्टी करायच्या होत्या. दैवाशीं झुंज द्यायची होती. हातीं आलेलें सौख्य झिडकारून एकटेंच कुठेतरी जायचें होतें. विलक्षण तन्मयतेनें शामानें ती भूमिका केली. त्यांतल्या सगळ्या भावना मनःपूर्वक अनुभवल्या. ते सारें ती खरोखर जगली. त्या उत्कट पातळीवर जगली. कारण हें सगळें तिच्या गमतीच्या व्याख्येंत बसत होतें.

तें काम केल्यावर तिला फार हलकें हलकें वाटलें. हंसण्याची वडवडण्याची आवश्यकता राहिली नाहीं. गळ्यातली चेन ओढण्याचा चाळा बंद झाला. मनाची मरगळ नाहींशी झाली. गंमतीत जी गंमत वाटेनाशी होऊं लागली होती ती पुन्हां वाटूं लागली. आणि त्याच वेळेला मनांत कांहींशी जाणतेपणानें आणि काहींशी अजाणतेपणानें एक नवीनच कल्पना रुजूं लागली. ज्याच्याकरितां धडपडण्यांत जीवनाचें सार्थक आहे म्हणतात, त्याकरितां धडपडण्याचें सोंग वठवून जर मनाला आनंद व समाधान लाभतात, तर खरी धडपड करण्याची आवश्यकता काय? आणि जो खरा आनंद होतो म्हणतात तो तरी कांहीं प्राप्त करून घेतलें यापेक्षां धडपड केली ह्याचाच असतो ना? म्हणजे तो नुसत्या मनाच्या आणि शरीराच्या हालचालींतच प्राप्त होतो ना? मग त्या हालचाली खरोखर केल्या अगर सोंग म्हणून वठविल्या तरी त्यांत फरक तो काय?

ह्या पातळीवर विचार करण्याइतकें शामाचें मन प्रगल्भ नव्हतें. पण मनुष्याचा पुष्कळसा शहाणपणा आणि पुष्कळशा मूलभूत समजुती विचार करून प्राप्त अगर निर्माण होत नाहींत. अनुभवाच्या संस्कारानींच त्यांची निर्मिती होत असते. शामाचें देखील तसेंच झालें होतें. आपोआप ही कल्पना तिच्या मनांत रुजली होती.

स्टुडिओंतून बाहेर पडल्यावर ती चहा प्यायला हॉटेलांत गेली. आणि तिच्या मागोमाग नाटकांत काम करायला येणारा एक तरुण गेला.

तो म्हणाला, "चला. चहा प्यायला जाताय ना. मला पण जायचंय्. आपण बरोबरच जाऊं या."

एवढें बोलतांना त्याचा चेहरा घामानें थबथबला. त्याच्या श्वासाला घाई सुटली. त्याच्या घशांतला गोळा अनेकदां वर खालीं झाला.

शामाला आश्चर्य वाटलें. कांहींशी भीति देखील वाटली. आतां वादळ होणार या कल्पनेनें वाळवंटांतल्या तंबूच्या दोऱ्या कोणी घट्ट पकडून ठेवाव्या तसें कांहींस तिच्या मनांत झालें. तिच्या मनांत आलें कीं त्याच्या-

बरोबर जाऊं नये. पण तो इतक्या अनपेक्षितपणें आला आणि हें बोलला कीं शामला कांहीं करतां आलें नाहीं. तिला कळायच्या आधींच ती त्याच्याबरोबर हॉटेलमधल्या एका चिमुकल्या खोलींत जाऊन बसली.

त्यानें तिच्याकडे आदरानें तारवटलेल्या डोळ्यांनीं पाहिलें. आणि घशांतला गोळा सारखा वर खालीं करीत ती कितीतरी वेळ घुटके गिळत राहिली. त्याच्या त्या मुद्रेकडे पाहून शामाला वाटलें कीं त्याच्या नाकांवर शाईचा भला मोठा ढिपका पाडावा. आणि तिने खुदकन् हसायचा देखील प्रयत्न केला. पण ती घाबरली होती आणि तिच्या मनातलं कोणतं सुकटलेलं, फिकटलेलं इच्छा तशीच घशांतला गोळा वरखालीं करत त्याचें बोलणं ऐकायला उत्सुक झाली होती.

त्या तरुणाने तिची स्तुती करायला सुरवात केली. त्या स्तुतींत पुनरुक्ती पुष्कळ होती. कारण जेवढी स्तुती करावी असं त्याला वाटत होत तेवढी करण्याइतकी कल्पनाशक्ती त्याच्याजवळ नव्हती. आणि शिवाय बोलतांना तो फार चांचरत होता. पण आपल्या व्यक्तित्वाचा अपुरपणा त्यानें आपल्या भावनेच्या उत्कटतेनें भरून काढल्या आणि परोपरीनें बोलून अनेकदां आपल्या घशांतला गोळा हलवून त्यानें तिला सांगितलें कीं ती एक देवता होती. मग त्यानें तितकीच कुलावळ करून सांगितलें कीं तो एक फालतू निरुपयोगी मनुष्य होता. आणि मग तिचा हात आपल्या हातांत घट्ट पकडून त्याने, ‘देवतेनें ह्या फालतू प्राण्याला आपल्या पदरांत घ्यावें’ अशी विनंती केली. त्याचें प्रेम इतकें उत्कट होतें कीं त्यामुळें तिची बांगडी पिचली.

तो जें बोलला आणि त्यानें जें केलें ते अतिशय बावळटपणाचें व मूर्खपणाचे होतें. पण त्याच्या मनांतलें प्रेम मात्र सुंदर व पवित्र होतें.

शामा वेड्यासारखी त्याच्याकडे पहात राहिली हे सगळें तिला पूर्णपणें परिचित होतें. नाटकांत अनेक तरुणांनीं तिच्यावर असें प्रेम केलें होतें आणि तिनेंही अतिशय सुंदर भाषणें करून त्याचा स्वीकार अगर अव्हेर केला होता. तें सगळें तिनें रंगून तादात्म्य पावून केलें होतें. पण आतां आज तिची दांतखिळी बसली. काय बोलावें अगर काय करावें तें तिला कळेना. तिला भीति वाटली. पळून जावेसे वाटलें पण तें सगळें हवेहवें देखील वाटलें. आणि त्यामुळें तिला अधिकच भीती वाटली.

तो सगळा ताण तिला असह्य झाला. तिला वाटलं कीं घरीं आरशा अडवर संतापानें नये संतापाने आणि भराभर उड्या फेकून द्याव्या, तिला वाटले कीं आरशा फोडावे आणि तो फुटलं असली ती खरोखर फार बरें झालें असतं. पण ती रडली नाहीं. ती घाबऱ्या घुबऱ्या उठलं आणि म्हणाली. “सोड मला, सोडा मला” एखादें झुरळ झटकावें तसं तिनें त्याला झटकून टाकलें आणि ती तिथून निघून गेली.

त्या तरुणाचा चेहेरा एकदम पडला त्याचें डोकें गरगरूं लागलें. खरोखरच आपल्या नाकावर शाईचा डाग पडला आहे असें त्याला वाटूं लागलें. आपण इतकें उत्कट प्रेम केलं हा कांहीतरी गावढळपणा झाला, ह्यांत कांहीतरी चुकलं असं त्याला वाटलें. आणि हें फार वाईट झालें. एखाद्या भेदरलेल्या कोंबड्यानें जसें फडफडत तिडबिडत जावें तसा तो निघून गेला.

श्यामा परत ऑफिसमध्यें आली तिनें खांदे व भुंवया उडवून हंसण्याचा प्रयत्न केला. पण ते तिला तितकसें जमलं नाहीं. गळ्यांतली चेन ती सारखी ओढत होती. इतक्यांत कोणीतरी तिला एका वक्त्याबरोबर स्टुडिओंत जाऊन बसण्याची विनति केली. सुन्नपणें तिनें तें ऐकलें आणि ती स्टुडिओंत गेली. स्टुडिओचा दरवाजा बंद झाला आणि सारी आवाजाची वर्दळ बंद



अनुक्रमणिका

पडली. सारें कसें शांत सुन्न झालें. स्टुडिओंतल्या थिजलेल्या प्रकाशांत स्तब्ध घसलेला तो वक्ता गोठून गेल्यासारखे. तिला वाटलें. तिला त्याची भीति वाटूं लागली. बोलण्याच्या तयारीनें तो घुटके घेत होता त्या आवाजाचीही धास्ती वाटूं लागली. तिला वाटलें कीं त्या खोलीला कोणीतरी गुदमरून टाकते आहे. आणि टककन् लाल दिवा लागला तेव्हां तिला वाटलें कीं त्या खोलीच्या ओठावर आलेला तो रक्ताचा थेंब होता.

नंतर भाषण सुरू झालें, व तिला वाटलें कीं कोणीतरी दुरून अज्ञातांतून आपल्या जीवनावर न्यायदान करीत आहे. आपल्याला कधीं न संपणाऱ्या नरकवासाची शिक्षा फर्मावीत आहे.

स्वतःचें थरकणारें डोकें तिनें घट्ट दाबून धरलें. आणि स्वतःच्या मूर्ख-पणाला हंसण्याचा प्रयत्न केला. अखेर भाषण संपलें आणि ती बाहेर आली तेव्हां तिला फार बरें वाटलें. आणि मग स्वतःच्या मनावरचें ओझें फेकून द्यावें या उद्देशानें तिनें हॉटेलांत घडलेली सगळी हकीगत आपल्या एका मैत्रिणीला सांगून टाकली. हंसत हंसत थट्टा करीत करीत तिनें तें सगळें सांगितलें. जणुं तो सगळा एक फार मोठा विनोदी प्रसंग होता आणि तें सगळें सांगून झाल्यावर ती खदखदां हंसली. इतकी हंसली कीं तिच्या डोळ्यां-तून पाणी ओघळलें.

अखेर तिनें त्या त्रासदायक प्रसंगाची गंमत करण्यांत यश मिळविलें होतें, तिला हलकें हलकें वाटलें. खूप मोकळेपणानें बडबडावें असें वाटलें. आपल्या एखाद्या मित्राबरोबर बाहेर जाऊन चावटपणा करावा असेंही वाटलें. आणि मग तें फारच उत्कटतेनें वाटूं लागलें. असें करून ती त्या प्रेम कर-णाऱ्या तिरुणाच्या नाकावर शाईचा थेंब पाडणार होती.

आपल्याच नादांत ती ऑफिसच्या बाहेर पडणार होती. इतक्यांत तिला ऑफिसर्-ऑन् ड्यूटीनें कांहीं चेक कलावंतांना घेण्याची विनंति केली. आणि धांवतपळत तो कुठेंतरी निघून गेला. तिनें हंसत हंसत ते मोठ्या आंकड्याचे चेक कलावंतांना दिले आणि कायदेशीरपणें पावतीवरील तिकी-टाचा एक एक आणा कलावंतांकडून वसूल केला. त्या आण्यांच्या मजेनें खुळखुळवीत ती बसून राहिली. आयुष्यांत देखील अनुभवाच्या मोठ्या रकमा ती गंभीरपणें इतरांच्या स्वाधीन करणार होती आणि आण्यांचा मात्र आपल्या हातांत ठेऊन खुळखुळवणार होती. एवढ्या मोठ्यानें कीं त्या आवाजानें तिचें सगळें जीवन व्यापून जावें.

तेवढ्यांत त्या कलावंतांपैकीं एकानें तिच्या गालावर टिचकी मारली. तिनें दचकून त्याच्याकडे पाहिलें तो हंसून म्हणाला, "ही आणखी एक आणेली."

"इस्स !"

"आणखी पाहिजे का ?" तो ओठ जुळवून म्हणाला.

"वा ! चावटपणा काय चालवलाय तुम्ही !"

तो उंच, दांडगा, रुबाबदार होता. त्याचे केस सोनेरी होते. तो रेडिओचा एक उत्कृष्ठ कलावंत होता. अनेक प्रकारचे कार्यक्रम तो करीत असे. आणि आणि विशेष म्हणजे अगदीं सहजपणें व परिणामकारकपणें गंभीर भूमिका करतां येत-असतांना, तो मात्र अगदीं हंसतमुख असे. विशेषतः स्त्रियांशीं त्याची वागणुक फार धिटाईची व चावटपणाची असे. आणि गंमत अशी कीं बहुतेक स्त्रिया ती मुकाट्यानें सहन करीत इतकेंच नव्हे तर त्यांना ती आवडत देखील असे.

तो म्हणाला " तुम्हीं आमच्यांवर फार रागावलांत असें दिसतंय्. कधीं बरोबर चहा प्यायला येत नाहीं. फिरायला नेत नाहीं. "

" असें नाहीं कांहीं " श्यामा म्हणाली. आणि तिनें खांदे व भिंवया उडवल्या.

“ मग आज येतां का ? आपण जेवायलाच जाऊं कुठें तरी.” तो रेशमी आवाजांत म्हणाला.

तिनें अवश्य तेवढे आढेवेढे घेतले आणि अखेर ती कबूल झाली. “बरें ! मी एकदां घरीं जाऊन येते.”

ती घरीं निघाली. जातानां तिला वाटत होतें कीं सगळ्या गंभीर चेहेऱ्याच्या माणसांच्या नाकावर आपण शाईचे ठिपके पाडवीत आहोंत.

घर जवळ आलें तशी नेहेमींप्रमाणें तिच्या मनांत राग जमला. चिडखोरपणा फुत्कारूं लागला. कां, कोण जाणें पण घराविषयीं तिला नेहेमींच असें वाटत असे. घरीं तिला कांहीं गंमत वाटत नसे. आणि घरीं ती गंमतीदार वागत पण नसे.

ती घरीं पोंहोंचली तेव्हां तिची धाकटी बहीण बाहेर कांहीं तरी मजेंत खेळत होती. तिला तसें मजेंत खेळतांना पाहून श्यामाला राग आला. कांहींतरी कारण काढून श्यामा तिच्यावर खेंकसली. श्यामाचा अवतार पाहून ती मुलगी घाबरली. आपलें खेळणें तिनें सोडून दिलें. आणि एका कोपऱ्यांत अभ्यासाचा देखावा करीत बसली. आपण रागावल्यामुळें हा परिणाम झाला ह्याचें शामाला बरें वाटलें. आणि आपल्याला पहातांच धाकटी बहीण आपलें सारें व्यक्तिमत्व आकसून घेते ह्याचा तिला रागही आला. शामानें कपाळाला आंठ्या घालून तिच्याकडे पाहिलें. शामानें असें केलें म्हणजे काय होणार ह्याची तिच्या बहिणीला पुरती कल्पना होती. शामानें तिला जवळ बोलावलें असतें, तिला वेडेवाकडे प्रश्न विचारले असते आणि तिचे गालगुच्चे घेतले असते. शामाच्या बहिणीनें पुस्तकांत अधिकच मान खुपसली आणि मग तिला एकदम रडूं कोसळलें. शामा उठली आणि रागारागानें तिनें बहिणीच्या पाठींत धपाटा मारला.

शामावर अवलंबून असणारी आणि त्यामुळें मिंधी झालेली तिची आई तें पहात होती. पण ती देखील घाबरत घाबरत म्हणाली, “ कां ग शामा तिला उगीच मारलेंस ?”

शामा ह्याचीच वाट पहात होती. हें ऐकून तिनें हातपाय आपटून किंचाळायला सुरवात केली. “ मीं इतकें करतें, दिवसभर राबून जेवायला खायला घालतें त्यांची कोणालाच किंमत वाटत नाहीं. मी घरांत आलें कीं सगळ्यांचीं तोंडें वांकडीं होतात. मीं दृष्टीसमोर नकोशी वाटते. माझा दुःस्वास करतात...”

शामाची आई बिचारी घाबरली. आपलें खरोखरच कांहीं तरी चुकलें असें तिला वाटलें. शामाविषयीं तिला विलक्षण आदर वाटायचा. पुष्कळ पैसे खर्च करून रेडिओ विकत घेऊन ज्याअर्थी तिचा आवाज लोक ऐकतात त्या अर्थी ती फार कर्तबगार असावी अशी तिला खात्री वाटायची. आणि आपल्याला ती पोसते ह्याबद्दल तिला भयंकर कृतज्ञता वाटायची. तिनें अनेक प्रकारें शामाला आपली चुकी झाली असें दर्शविलें. चावपळ करून तिला खायला दिलें. तिच्याविषयीं आदर दर्शविणारे अनेक प्रश्न तिला विचारले. जितक्या प्रकारें लाचारी व्यक्त करतां येईल तितक्या प्रकारें केली.

पण आपल्या आईनें आपल्याशीं असें वागावें ह्यामुळें शामाला शरमल्यासारखें वाटलें. ही जाणीव फार त्रासदायक होती. म्हणून तिनें स्वतःची अशी समजूत करून घेतली कीं आपल्याला शरम वाटावी म्हणून आपली आई मुद्दाम असें करीत आहे. आणि ती आईवर अधिकच रागावली.

आपल्या गळ्यांतील चेन ओढीत ओढीत ती बाहेर येऊन आरामखुर्चीत बसली. आणि तिला स्वतःच्या ह्या चमत्कारिक वागणुकीचें नेहमींप्रमाणें आश्चर्य वाटलें. बाहेर नेहमीं खेळकरपणें वागणारी आपण घरींच अशी कशी तिरसट होतें तें तिला समजेना. तसें पाहिलें तर घरांतलें हें जीवन ही बहीण, ही आई, त्यांच्याकरितां ती करीत असलेली मेहनत, आणि







अनेक पटींनीं त्यांनीं केलेली तिची तरतफेड, ती कृतज्ञता तो जिव्हाळा–हेंच तिच्या जीवनांतलें सत्य होतें. पण गंमत अशी कीं तेंच तिला नकोसें वाटे, फेकून टाकून द्यावें असें वाटे. आणि त्याच वेळीं तें फेकून देणें म्हणजे कसलातरी आधार, कसलं तरी पकड सोडून देण्यासारखं आहे हें ठामपणें तिला जाणवे. म्हणूनच ती अशी त्रासल्यासारखी, चिडल्यासारखी वागायची.

गळ्यांतील चेन ओढीत ती थोडा वेळ बसून राहिली, आणि मग कपड्यांची झकपक करून चपला सटसटावीत ती बाहेर पडली. आईनें दाराला बिलगून भीतभीत विचारलें, "कुठें चाललीस?"

शामानें उत्तर म्हणून एक रागीट दृष्टिक्षेप टाकला. आणि मग जिना उतरतांना तिच्या मनाविरुद्ध तिला सांगावें लागलें कीं आपल्याला परत यायला उशीर होईल. कांहींही सांगण्याची तिच्यावर बळजबरी नव्हती. आणि तरी तिला तें सांगावें लागलें.

घराबाहेर पडल्यावर शामाला बरें वाटलें. तिचा सगळा त्रासिकपणा, चिडकेपणा लुप्त झाला. आणि ती नेहमींसारखी हंसरी आणि खेळकर झाली.

तो तिची वाटच पहात होता. उंच, धिप्पाड, देखणा! त्याचे सोनेरी केस! त्याच्या हातावरची, छातीवरची सोनेरी लव! दिव्याच्या प्रकाशांत तो किती छान व लोभनीय दिसत होता. तिनें आपला हात त्याच्या हातांत दिला आणि तीं दोघें त्याच्या घरीं गेलीं. एकटाच रहात असे तिथें तो.

ती त्याच्या मवाळ शब्दांत विरघळली. त्याच्या हातांत स्वतःला विसरली. एखाद्या पाळीव कुत्र्याला मालकानें जवळ घ्यावें तसें त्यानें तिला जवळ घेतलें होतें. आणि त्या कुत्र्यानें खुशींत येऊन मालकाचें अंग चाटावें तशाच हालचाली ती करीत होती. त्याचे अनुभवी हात तिच्या शरीराचें सारें सौंदर्य चोखंदळपणें तपासून पहात होते, तिच्या मनोवृत्तींनां फुलवीत होते. आणि तिच्या शरीराचा उपभोग देखील घेत होते. त्याचे ओठ तिच्या मनोवृत्तींनां चेतवींत होते, तिचें सौंदर्य शोषत होतें, आणि तिला फार फार बरें वाटत होतें. तिच्या मनोवृत्तींचा ताण कमी होत होता, आणि वाढतही होता. आणि तिचें मन तरी एका अर्थानें अगदीं शांत होतें. भावनांची खळबळ तिला मुळींच त्रास देत नव्हती. उलट तिला एका गोष्टीचें फार हसूं येत होतें. आपली प्रेमयाचना करणाऱ्या त्या मूर्ख बावळट तरुणाच्या नाकावर केवढातरी शाईचा ठिपका पडलेला तिला दिसत होता. आणि त्यामुळें ती खदखदून हंसली.

तो तरुणही हंसला. आणि मद्याचा प्याला त्यानें ओठाला लावला. एक दोन तीन चार हळु हळु मनांत एक प्रकारची तरलता आली—सैलपणा आला. वस्तूंच्या आकारांतील, विचारांच्या बाह्यरेषांतील स्पष्टपणा, कठोरपणा नष्ट झाली. सारें मृदु झालें. आणि मग मनांत खोल दडी मारून बसलेल्या विद्रूप, गिळगिळीत प्राण्यांनीं आपलीं डोकीं वर काढलीं; आपले जबडे विचकले. तें पाहून तो फिदीफिदी हंसला, चोरटें हंसला आणि मग खदखदां मोठ्यानें निर्लज्ज हंसला.

तिनें भेदरून त्याच्याकडे पाहिलें. त्यानें गढूळ चमत्कारिक नजरेनें तिच्याकडे पाहिलें. त्याची तिच्याशीं होत असलेली लगट वाढली. आणि मग एक अपमानकारक, किळसवाणी लगट त्यानें तिच्याशीं केली. तिनें त्याच्याकडे रागानें पाहिलें. तशी त्यानें हंसत हंसत पुन्हां तशीच लगट केली. ती संतापानें दूर सरकूं लागली. तशी त्यानें तिला घट्ट पकडलें आणि आपल्या तोंडांतली दारूची चूळ तिच्या तोंडावर थुंकली.

आणि 'कशी गंमत केली' असें म्हणत तो खदखदां हंसला.'

'कशी गंमत केली' असें म्हणत तो खदखदा हंसला.

तो खदखदा हंसला.

काय होतंय् तें कळण्यापूर्वीं . ती त्वेशानें उठली. आणि पायांतली चप्पल काढून तिनें त्याला फडाफड मारलें. ती किंचाळली, तिनें वाटेल तशा शिव्या दिल्या. आणि तिला पकडण्याकरितां जेव्हां तो हंसत लटपटत पुढें सरकला तेव्हां पदरानें आपलें तोंड पुसत ती घाईनें बाहेर पडली.

बाहेर सारीं माणसें गलबला करीत हंसत चाललीं होतीं. तिला वाटलें कीं आपल्या नाकावर पडलेला शाईचा ठिपका पाहून हीं सारीं खदखदा हंसत आहेत.

काय करावें, कुठें जावें तें तिला कळेना. आणि त्याच वेळेला कुठच्या तरी रेडीओवर तिला वादळाचा आवाज ऐकूं आला.

---



हे रहाटा! या स्त्रिया केवळ कटाक्ष-
प्रेक्षणानें मी मी म्हणणाऱ्यास वेडापिसा करून
सोडतात. मग तुला तर ही तरुणी आपल्या
नाजुक करानें ओढते आहे. तेव्हां तुझी
कोण दुर्दशा होत असावी! जाऊं दे.
उगीच कशाला दीनवाणा आक्रोश करतोस!




स्त्रीची योग्यता संतांना पटली होती असें वाटत नाहीं. स्त्री ही केवळ भोग्य वस्तु आहे, ती आपल्याला एका उत्कर्षापासून च्युत करील या भावनेनेंच सारे संत पिडलेले दिसतात !

सन्त वाङ्मयांत एक अत्यंत उद्वेगकारक प्रकार आढळून येतो. आपले सारे सन्त परमार्थाच्या मार्गावर होते. परमेश्वराची प्राप्ति हा त्यांचा एकच ध्यास होता. परंतु त्या मार्गांत स्त्रिया आणि मुलेंबाळें हीं फार विघ्नें आणतात आणि आपला त्या मार्गावरील प्रवास कठीण करून ठेवतात असा या सर्वांचा अभिप्राय आहे. अर्थात् जे आपल्या ध्येयाच्या आड येतात, त्यांच्या संबंधानें अवहेलनेनें बोलावें, त्यांना शिव्याही द्याव्या हें ओघानेंच येतें. तुमच्याआमच्यासारख्या साध्या माणसांनीं हा प्रकार केला, तर त्यांत कांहीं विशेष नाहीं. पण संत जेव्हां अपशब्दांचा भडिमार करूं लागतात तेव्हां मात्र आपण चिचकून उभे राहतों आणि कोणाच्या तोंडीं काय यावें यासंबंधींची आपली अपेक्षा फसल्यामुळें आपण थोडे खिन्न होतों व एरवी ज्यांना सन्त म्हणावयाचे ते सुद्धां प्रसंग आला म्हणजे तोंडाळपणा करतातच, असें आपण आपल्या मनाशीं पुटपुटतों. बायका-मुलांना रांडापोरें म्हणणें हा सन्तांचा नित्याचा खेळ होता. ज्यांनीं कधीं बायका केल्याच नाहींत आणि म्हणून ज्यांना पोरेंही झालेलीं नव्हतीं, त्या सन्तांनीं असा शब्दप्रयोग केला तर त्यांतल्या त्यांत दुर्लक्ष करण्यासारखी ती गोष्ट होईल. पण ज्यांनीं लग्नेंही केलीं होतीं आणि ज्यांच्या घरांत मुलाबाळांचा बाजारही चांगला भरलेला होता ते सुद्धां बायका-मुलांना कडाकड शिव्या देतांना दिसतात तेव्हां मात्र आपल्याला विस्मय वाटतो व रागही येतो. सन्तांनीं जर रागावण्याची परवानगी घेतलेली आहे तर ती परवानगी आपल्याला देण्याला सन्तांचे पक्षपाती लोक कुरकुर करणार नाहींत असा भरंवसा आहे. तथापि आपण आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सन्तांच्या बाजूनें जितकें न्यायाचें बोलतां येण्यासारखें असेल, तेवढें बोललें पाहिजे आणि मगच आपला राग प्रकट केला पाहिजे.

सन्तांचें ध्येय परमेश्वरप्राप्ति हें होतें; आणि ही प्राप्ति म्हणजे एक मोठा बिकट विषय आहे. हें एक दूरचें ध्येय आहे आणि त्याची वाट अत्यंत खडतर आहे. अर्थात् जर 'याचि देहीं याचि डोळां' हें ध्येय साध्य करावयाचें तर आपल्या मनाच्या व बुद्धीच्या सर्व शक्ति याच कामाला लावल्या पाहिजेत आणि त्या सर्वकाळ लावल्या पाहिजेत असें या सन्तांना वाटत असे. भौतिक शास्त्रांचा एखादा साधा शोध लावणारा शास्त्रीसुद्धां आपल्याला वर्षांनुवर्षें कोंडून घेत असे आणि जेवण्याखाण्यापुरतें एखादे वेळीं आपल्या बायकामुलांत जाऊन बसत असत हें आपल्याला माहीत आहे. एखादें लोकहिताचें काम अंगावर घेतलेले पुढारीसुद्धां अशाच प्रकारचा अलिप्तपणा ठेवीत असतात हेंही आपल्याला माहित आहे. आपल्या सर्व शक्ति, भावना, सर्व काळ जेव्हां एकाच कामाकडे लावाव्या, तेव्हांच हातीं घेतलेलें काम यशाला जातें असा त्यांचा अनुभव आहे. सृष्टीचें एखादें सामर्थ्य किंवा पुन्हां पुन्हां हेलकावे खाणारें एखादें छोटेसें लोकहित समजून घेण्यास किंवा साध्य करण्यास जर एवढ्या अलिप्तपणाची आवश्यकता असते, तर परमेश्वर प्राप्तिसारखें अत्यंत गहन ध्येय साध्य करून घेण्याला केवढ्या अलिप्तपणाची जरूरी पडत असेल हे सहज ओळखतां येण्यासारखें आहे. आपलीं लौकिक ध्येयें सहस्रांनीं जरी मोजलीं, तरी तीं सन्तांच्या ध्येयाच्या पासंगालासुद्धां पुरणार नाहींत. स्वाभाविकपणेंच त्या त्या मानानें अलिप्तपणाची आवश्यकता त्यांना जास्त भासत असली पाहिजे. बुद्धीचीं सर्व सामर्थ्यें आणि भावनांचें सगळें बळ या केवळ एका कामाकडे लावावें, तेव्हांच तें साध्य होण्यासारखें होतें. सन्त जर अर्धा पाऊण तास ध्यानस्थ बसले असते, आणि बाकीचा वेळ त्यांनीं बाकीच्या विषयांत, बायकामुलांच्या गोड संगतींत किंवा व्यवहाराच्या मादक हुलकावणींत घालविला असता, तर त्यांना आपल्या ध्येयाचें आसमानही कधीं पोहोंचतां आलें नसतें. म्हणून अलिप्त राहणें त्यांना प्राप्तच होतें.

कोणी विचारील कीं, संतांना जर एवढीं कामें होतीं, तर या प्रपंचाच्या कामांत ते पडले कशाला ? याला दोन उत्तरें आहेत. पूर्वीच्या काळीं लग्नें फार लहानपणीं होत असत. संत हे संत होण्याच्या आधींच वडील माणसांनीं त्यांचीं लग्नें करून टाकलेलीं असत. 'तुम्ही लग्नें करूं नका' असें ज्ञानेश्वरादिकांना त्र्यंबकांनीं सांगितलें होतें. म्हणून त्यांचीं लग्नें झालेलीं नव्हतीं. रामदास मात्र लग्नाचें वर्तमान ऐकतांच मंडपांतून पळून गेले अशी कथा आहे. बाकीच्या सन्तांचा कांहीं इलाज नव्हता. त्यांचीं लग्नें लहानपणींच झालेलीं होतीं. आणि पारमार्थिक ध्येय मनावर उदित होण्याच्या पूर्वींच त्यांना पितृपदही प्राप्त झालेलें होतें. याचा अर्थ असा कीं, संसाराचा जंजाळ हा आधींपासूनच उत्पन्न झालेला होता; व मग त्यांच्या सन्तत्वाचा उदय झाला होता. दुसरें उत्तर असें कीं, सन्त हे जरी संयमी असले, ध्येयनिष्ठ असले, बायकापोरें ध्येयाच्या मार्गांत येतात म्हणून त्यांना नको होतीं, तरी त्यांतील बहुतेकांना देहधर्म सुटलेले नव्हते. देहधर्म कोणाचे किती दांडगे हें ज्याच्या त्याच्या पिंडप्रकृतीवर अवलंबून असतें. ही प्रकृति ज्यांना अनुकूल असते, ते विशेष प्रकारचा संयम राखूं शकतात. परंतु जर का ती पिंडप्रकृति नाठाळ आणि प्रतिकूल असली, तर कितीही निग्रह केला तरी ती उसळून वर आल्याशिवाय राहत नाहीं. आणि तेवढ्यापुरता तो तो मनुष्य, त्याच्या दृष्टीनें, प्रमादशील बनतो. परन्तु ही केवळ पिंडाची हाक असते आणि तिला जाब देणें हें पिंडच करून घेतो. या आपत्तींत सांपडलेले सन्त एवढेंच कबूल करीत असतील कीं, हा जाब देणें हें अटळ आहे येवढेंच तें समजत त्या जाब देण्यांत कांहीं विशेष प्रकारचें सुख आहे, आपण त्यांत विशेष ममत्वानें रममाण व्हावें.

म्हणून ज्या दयाळूपणाबद्दल संत एवढे प्रसिद्ध होते, त्या दयाळूपणाचा अंगीकार करून जर त्यांनीं आपली भावना त्यांना समजावून सांगितली असती तर त्यांनीसुद्धां, आपले पति जे संत, त्यांचेंच अनुकरण केलें असतें, आणि त्यांच्या-प्रमाणेंच केवळ शरीरधर्मापुरता संबंध त्यांचेशीं ठेवून प्रपंचाच्या जंजाळांतून त्यांना मुक्त केलें असते, त्यांनीं त्यांच्या परमार्थाची वाट कमी विकट करून दिली असती. परंतु या दयाळू-पणाचा अंगीकार संतांनीं केलाच नाहीं. आपल्या ध्येयसिद्धीच्या बाबतींत स्त्रिया साहाय्यभूत होतील ही कल्पनाच त्यांना सुचली नाहीं किंवा पटली नाहीं; आणि म्हणून त्यांना आपल्या मार्गातील केवळ धोंड मानून ते त्यांच्या तिरस्काराला तयार झाले. स्त्रीची योग्यता संतांना पटली होती असें मला वाटत नाहीं. इतर अनेकांप्रमाणें मी सुद्धा संतांचा अभिमानी आहें. परंतु स्त्रीजातींतील मानवता त्यांना जितकी प्रतीत व्हावयास हवी होती, तितकी झाली होती असें मला वाटत नाहीं. स्त्री हा एक कमी दर्जाचा मानवप्राणी आहे, ती केवळ एक भोग्य वस्तु आहे, आपलें ध्येय तिला समजण्यासारखें नाहीं, आपल्या ध्येय-सिद्धीच्या मार्गांत तिचें साहाय्य खचितच होण्या-सारखें नाहीं, उलट आपल्या स्त्रीत्वाचें कौशल्य करून एका उदात्त मार्गांतून ती आपल्याला च्युत करील या भावनेनेंच सारे संत पीडलेले दिसतात. आणि म्हणून त्यांनीं स्त्रियांचा सरसकट निषेध केलेला आहे. संत मोठे होते खरे. परंतु प्रत्येक बाबतींत आणि प्रत्येक दिशेनें ते सम-कालीन लोकांपेक्षां मोठे होते असें मानणें चूकच आहे. सर्व दर्जेच्या मोठ्या माणसांच्या बाबतींत आपण हीच दक्षता बाळगली पाहिजे. कोणी एकादा मोठा विद्वान् असला. पुढारी असला, कलावंत असला, वक्ता असला, कीं तो सर्वच बाबतींत श्रेष्ठ असला पाहिजे असें लोक समजूं लागतात. परंतु हा भ्रम आहे. ज्या समाजांत ते उत्पन्न झालेले असतात आणि ज्या लोकांत ते वावरतात, त्यांच्याहून कांहीं विशेष प्रकारच्या बाबतींत ते उंच झालेले असतात; बाकीच्या बाबतींतील त्यांची उंची इतरांसारखीच असते. आपल्या लौकिक जीवनांत आपल्याला हें नेहमीं दिसून येतें. तेंच संतांच्या बाबतींतही खरें होतें असें म्हटलें पाहिजे. पुरुष हा श्रेष्ठ आहे, हाच कर्ता आहे, जें जें कांहीं थोर असेल, भव्य असेल, तें तें सारें त्याच्यापासून निघावयाचें आहे, त्याच्या मनांत उदित व्हाव-याचें आहे आणि स्त्रियांनीं फक्त चकित होऊन स्तिमित मनानें त्यांच्याकडे पाहावयाचें असतें व त्यांच्या कलानें वागून त्यांचें जीवित सुखी करावयाचें असतें हीच भावना संतांच्या ठिकाणीं-सुद्धां होती. 'गृहिणी सचिवः सखी मिथः' हें उद्गार कालिदासानें केलें होतें; आणि कालिदास हा एक केवळ कवि होता. दशसहस्र पुरुषांत एकजणसुद्धां स्त्रीला सचिव किंवा सखी म्हणजे मित्र, त्या काळीं मानीत असेल किंवा सध्यांसुद्धां मानतो असें मला बिलकुल वाटत नाहीं. स्त्रियांच्या संबंधांत रूढ असलेल्या अपसमजुतींच्या दलदलीं-तच संतसुद्धां उभे होते; आणि म्हणून त्यांच्या मानवतेचें यथार्थ ज्ञान झाल्यानें जो मित्रभाव त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावयास हवा होता तो उत्पन्न झालेला नव्हता. आणि म्हणून आपल्याच ध्येयसिद्धीसाठीं संतांना त्यांचा उपयोगही करून घेतां आला नाहीं. त्यांनीं स्त्रियांना फक्त शिवीगाळ मात्र केली.

नवलाची गोष्ट अशी आहे कीं परमेश्वराला आळवितांना संतांनीं त्याला कित्येकदां 'आई'







अनुक्रमणिका

किंवा मनानें त्यांच्यावर कांहीं गुंजारव करावा हा एरवींच्या प्रापंचिकांचा न्याय त्यांनीं कधींच खरा मानला नाहीं. एखादी गोष्ट केवळ अटळ म्हणून करणें आणि तिच्यांत कसलीहि गोडी न धरणें व तीच गोष्ट सुखाची व मौजेची म्हणून करणें व तिच्यांत मनानेंही रममाण होणें या दोन बाबतींत फार मोठी तफावत आहे हें कोणीही निःपक्षपाती मनुष्य मान्य करील.

सन्तांच्या बाजूनें आणखीही थोडें बोलतां येण्यासारखें आहे. पण तें बोललेलें सन्तांच्या पक्षपात्यांना पसंत पडेल कीं नाहीं याविषयीं शंका आहे. प्रत्यक्ष सन्तांना हें कदाचित् पसंत पडेल, पण त्यांची आणि आपली गांठ पडण्याचा संभव फार कमी आहे! आणि जें त्यांचें पक्षपाती सर्वत्र भेटतात, त्यांचें समाधान करणें फार कठीण आहे! तथापि संतांच्या बाजूचा आपल्याला सुचणारा मुद्दा सांगितलाच पाहिजे. परमेश्वरभक्तींत तीव्र, शुद्ध, प्रखर व कदाचित् उग्र अशा ज्ञानाचाच वापर जे करीत असतील, त्यांची गोष्ट निराळी. पण जे भक्तीच्या कामीं प्रेमळपणाचाही आश्रय करीत असतील, त्यांना या कामीं बराच धोका असतो. प्रेमळपणा या शब्दांत अनेक बारीक बारीक लाघवी गुणांचा अन्तर्भाव होतो. आणि जर हा प्रेमळपणा अंगीं असावयाचा तर सर्व तऱ्हेचें लाघव अंगांत आपोआपच भिनतें; आणि तें प्रत्येक ठिकाणीं प्रकट होतें. जीविताच्या एका अंगाला प्रेमळपणा दिसावा आणि दुसऱ्या अंगाला अत्यंत प्रखर आणि दारुण असा कडकडीतपणा व्हावा हें थोडेंसें कठीणच दिसतें. मनःपिंडांतील प्रेमळपणाचे पाझर सर्वच बाजूंनीं वाहत असले पाहिजेत. त्यांचा विरोध एका बाजूला कडाडून करतां येईल हें तितकेंसे शक्य नाहीं. परमेश्वराच्या भक्तींत सन्तांनीं प्रेमरस विलक्षण आळविलेला असतो. त्यांचीं मतें अत्यंत मृदु असतात, कमळापेक्षां कोंवळीं होतात आणि पाण्यापेक्षां पातळ बनतात. त्यांच्या मनाचे हे धर्म प्रपंचाकडे वळल्यावरोबर पाषाणासारखें आळून बसतील आणि अग्नीसारखें चटके देतील हें कसें बरें शक्य आहे? मानवी मन, मग त्याला तुम्ही चित्र म्हणा, अंतःकरण म्हणा, भावनाकोश म्हणा, एकच सारूप्यपिंड असतो आणि त्याच्या सहस्र छिद्रांतून त्या त्याच भावनांचा व वासनांचा आविष्कार होत असतो. संयम, संयम म्हटला तरी मनाचे स्वाभाविक धर्म कायमचे बुजवून टाकणें हें कुणालाही शक्य नसतें. अर्थातच परमेश्वरभक्तींत भिजून येणारा प्रेमळपणा हा जर स्त्रिया आणि मुलें यांच्या संगतींत कांहींसा प्रगट झाला, तर त्यांत सन्तांचा कांहीं दोष नाहीं. त्यांना त्याची लाज वाटली असती, तर तें त्यांच्या पेशाला धरून झालें असेंच म्हटलें पाहिजे. पण आपण [illegible] पाहत आहोंत कीं असें कां झालें असावें? हा मनःकोशांतील लक्षणांचा प्रकोप असतो आणि तो या एका कामीं सन्तांना जरी कांहींसा बाधक असला तरी तो होणें सन्तांना चुकवितां येण्यासारखें नव्हतें. संतांची बाजू आपल्याला जेवढी विधायकपणानें समजण्यासारखी होती तेवढी आपण सांगितली आहे. पण ती सांगूनसुद्धां 'रांडापोरें' या शिव्यांचें शल्य मनाला बोंचत राहतें.

ध्येय उंच असेल, मार्ग बिकट असेल, पण बायकापोरांना शिव्या देण्याचें कारण मात्र कळत नाहीं. अथवा थोडेंसें कळूनसुद्धां पण तें पुरें सांगतां. वास्तविक पाहतां संतांनीं आपलें मनोगत जर त्यांना गोडीनें सांगितलें असतें तर स्त्रिया त्यांना साहाय्यभूत झाल्या असत्या. स्त्रिया या माणसेंच असतात आणि एखाद्या गोष्टीचें अलौकिक महत्त्व पटवून दिलें असतां तें त्यांना पुरुषांपेक्षांहि लवकरच पटतें हें आपल्याला माहीत आहे.

















या नांवानें हांक मारली आहे. हें फार चांगलें आहे. परंतु संतांच्या हें ध्यानांत यावयास हवें होतें कीं प्रथम 'बायको असल्योशिवाय कोणीही स्त्री आई होऊं शकत नाहीं. संतांच्या पोटांत बायकांबद्दल मोठा राग; परंतु आईबद्दल मात्र त्यांच्या पोटांत प्रेमाचा महापूर. पण आतांच सांगितल्याप्रमाणें जिला आपण 'आई ' म्हणतों, ती आई होण्याच्या आधीं बायको होणें अवश्य होतें; त्याशिवाय आईपणाचा उद्भवच होणें शक्य नाहीं, या गोष्टीकडे त्यांचें लक्षच गेलें नाहीं. आई ह्या विभूतिमत्त्व प्राप्त होण्याला बायको ही जन्मभूमि असावी लागते. आणि म्हणून जर आई विषयीं इतकें प्रेमानें बोलावयाचें, तर बायकोविषयींसुद्धां निदान ओलाव्यानें बोलावयास हवें, एवढी गोष्ट संतांना पटावयास हरकत नव्हती. आपल्याला चांगल्या वाटणाऱ्या मार्गापासून जितक्या पुरुषांना बायकांनीं निवृत्त केलें असेल, तितक्याच पुरुषांना, सांसारिक प्रेमाच्या पोटीं, आयांनींसुद्धां निवृत्त केलें असेल. पण या लोकांचा केवळ बायकांच्यावर राग मोठा. तसेंच बायका मोह घालतात तर मोहित होण्याची प्रवृत्ति तुम्हां स्वतःत आहे हें या लोकांनीं ओळखावयास हवें होतें, म्हणजे तुम्ही स्वतःसुद्धां तुमच्या मार्गच्युतीला पुष्कळसे कारण आहांत, हें उघडउघड दिसत असतांना आपल्या चुकीची जबाबदारी बायकांच्या अंगावर कोलवून देऊन त्यांना वाङ्मयांत शिवीगाळी करणें हा प्रकार अत्यंत अनुचित आहे. संतांच्या हातून ही चूक झालेली आहे असें स्पष्ट म्हणावयास हवें; आणि ती कां झाली आहे, याचें कारण वर सांगितलेलेंच आहे.

आणखी एक विचार सांगून संतांचें हें रांडापोरांचें आख्यान संपविलें पाहिजे. मला कित्येकदां असें वाटते कीं संतिणींनीं जर वाङ्मय लिहिलें असते, तर काय झालें असतें? ज्या स्त्रियांनीं लग्नें केलेलीं आहेत, पण ज्या परमार्थ–मार्गांत पडलेल्या आहेत त्यांनीं पुरुषांविषयीं काय म्हटलें असतें? 'पुरुष हे आमच्या मार्गांतील एक धोंड आहेत, हे टोळभैरव आहेत, यांनीं आमच्या जीविताचा सत्यानाश केला आहे, हे आम्हांला परमार्थाच्या मार्गापासून दरदरा ओढून संसाराच्या खातेऱ्यांत लोटून देतात, असल्या संसारांतून सर्वांनीं बाहेर पडावें, असल्या पुरुषांच्या वाऱ्याला उभें राहूं नये आणि पोरांचें लेंढार आपल्यामागें लावून घेऊं नये, संसार ही एक सावली आहे, हा एक भ्रम आहे, ही माया आहे, हें स्वप्न आहे; हे पुरुष आपल्याला या मायेंत डांबून ठेवतात, असल्या सोटभैरवांच्या सावलीलासुद्धां उभें राहतां कामा नये; यांच्या तावडींतून आपण मुक्त झालों, तरच परमार्थाचा मार्ग सोपा होणार; आणि आपण परमेश्वराशीं एकरूप होऊं' असें कोणी संतिणींनीं लिहिले असतें तर सामान्य लोकांनींच काय, पण खुद्द संतांनींसुद्धां डोळे फाडून त्यांच्याकडे पाहिलें असतें. ते म्हणाले असते, "या बाया तोंडाळ आहेत, बायकांच्या जातीनें विनयानें बोलावें हें यांना माहित नाहीं, यांनीं आर्य संस्कृतीचा खून पाडला आहे, असें बोलणाऱ्या स्त्रियांना परमार्थाचा मार्ग सांपडणार नाहीं आणि त्यांचें ध्येयही गांठतां येणार नाहीं!" संतिणींच्या या काव्यावर संतांनींसुद्धां हेच अभिप्राय दिले असते. परंतु संत होणें हा आपला अधिकार आहे. आणि आपण कांहीं एका उंचावरून बोललें पाहिजे असाच थाट संतांनीं ठेवलेला असल्यामुळें सगळ्या समाजाच्या मनांत बायकांसंबंधी जी अवहेलना असते, तीच संतांच्या ठिकाणींही प्रकट झाली आहे. असो. सांगण्याचें तात्पर्य असें कीं ज्यांचें वाङ्मय वाचलें असतांना आपल्या मनांत अत्यंत उदात्त भावना उत्पन्न होतात, त्यांचे स्त्रियांसंबंधीचें उद्गार अतिरम्य उद्वेगकारक वाटतात. असे उद्गार त्यांनीं काढावे याचे कारण हेंच कीं स्त्रियांच्या थोर मानवतेची ओळख इतर लोकांप्रमाणेंच संतांनाही झालेली नव्हती.

[अनुक्रमणिका](#)









मालतीशीं आपण लग्न ठरविलें आहे असें मकरन्दानें सांगतांच विमला-वैनींचा चेहरा एकदम उतरला. इतका वेळ उत्साहानें बोलणारी त्यांची वाणी एकदम बंद पडली. त्या निश्चल पण शून्य नजरेनें समोर पाहत राहिल्या. पाहतां पाहतांच त्यांच्या डोळ्यांत पाणी जमा झालें.

त्यांचा हात पदराच्या टोकाकडे गेला, पण लगेच त्या उठल्या आणि घाईघाईनें आपल्या खोलींत निघून गेल्या.

खोलींत गेल्याबरोबर त्यांनीं आपलें अंग बिछान्यावर टाकून दिलें—आणि त्यांना हुंदका आला. पण त्यांनीं आपलें तोंड घट्ट आवळलें, हुंदका आंतल्या आंत गिळला आणि ओठ घट्ट दावून त्या तशाच पडल्या. त्यांच्या मनांतली खळबळ त्यांच्या ओठांची थरथर व्यक्त करीत होती. जरा वेळानें ती थरथरहि कमी झाली. त्यांची नजर भूतकाळांत शिरली. तिच्या समोर त्यांच्या जीवनाचा सारा लांबलचक प्रवास उभा राहिला. ज्या आगगाडीच्या रुळाशीं त्यांच्या जीवनाचें निकट साहचर्य, त्यांच्या शेजारून जाणाऱ्या सिग्नलच्या तारेप्रमाणें जडलें होतें ते रूळ—उन्हांत चमकणाऱ्या त्यांच्या प्रकाशरेषा, त्यांच्यावर पडणारी हिरव्या तांबड्या सिग्नलांची लकाकी,

दी. १७

सांधा बदलला म्हणजे येणारा खाटकन् आवाज, सारें कांहीं त्यांच्या दृष्टीसमोर उभे राहिलें.

चौदा पंधराव्या वर्षी त्यांचें लग्न झालें आणि त्यांची त्या रुळाशीं संगति जडली. त्यांचा नवरा दिनकर रेल्वेंत नोकर होता. एका आड स्टेशनवर त्याला नोकरी होती. लग्न करून त्यानें त्यांना तेथें आणलें. दुपारीं जेवणें होऊन तो कामावर गेला कीं घरीं अगदीं एकटें एकटें होई. दोन माणसांचें काम तें कितीसें असणार? शेजार असाहि फारसा नव्हता. पोर्टरच्या घरांत एक बाईमाणूस होतें. पण ती दुपारीं कोठेंशी कामाला निघून जाई. चार वाजतां दिनकर चहा घेऊन गेला म्हणजे त्यांना अगदीं काम नसे. मग त्या आपल्या खोलीच्या दाराशीं उभ्या राहत आणि आणि आगगाडीच्या रुळांकडे टक लावून पाहत बसत. साडेचार वाजतां एक मेलगाडी तेथून जाई, तिनें ही संवय त्यांना लावली. त्यांचे वडील एका गांवीं पोस्टमास्तर होते. मेलगाडीचा पोस्टाचा लाललाल डबा त्यांच्या समोरून धाधधाड करीत गेला म्हणजे त्यांचा जीव उचंबळत असे. त्यांचें मन डब्याबरोबर माहेरीं जाई. ती गाडी

अनुक्रमणिका

त्या दिशेकडे जाई तिकडे त्या निश्चल दृष्टीनें पाहत बसत. हळुहळु ती आडवी दृष्टीआड होई आणि तिचे रूळ मात्र डोळ्यांपुढें शिल्लक राहत. प्रकाशांतली त्या रुळांची चकाकी त्यांना वेध लावी. त्या कितीतरी वेळ त्या रुळांकडेच पाहत बसत. त्यांत त्यांचा वेळ कसा जाई हें त्यांचें त्यांनाच समजत नसे. कांहीं दिवसांनीं त्या रुळांभोंवतीं त्यांनीं आपलें एक स्वतंत्र विश्वच निर्माण केलें. त्या विश्वांत त्या तासन् तास रमून जात. दुपारच्या उन्हांत ते रूळ चमकूं लागले म्हणजे त्या तेजाच्या रेषांशीं त्यांची नजर खेळत राही. संध्याकाळच्या वाऱ्यांत रुळापलीकडील गुल्मीहराच्या फांदीची हालती सावली त्या रुळांवर नाचूं लागली कीं त्यांचें मन तिच्याशीं शिवाशिवीचा खेळ खेळे. एकाद वेळेस एकादी बकरी येऊन चार पाय जुळवून त्या रुळावर उभी राहिली आणि कान टवकारून पाहूं लागली म्हणजे, लहानपणीं रस्त्यालगतच्या तारांवर पाय जुळवून उभे राहण्याचा आणि तोल राखण्याचा खेळ त्यांनीं जो अनेकदां केला होता, त्याची त्यांना आठवण होई. सिग्नलची खेंचाखेंच झाली आणि त्या रुळाशेजारची सिग्नलची तार थरथर कांपूं लागली म्हणजे आपल्या आंतहि कसली तरी थरथर होते आहे असें त्यांना वाटे. मग त्या विनाकारणच अस्वस्थ होत आणि त्यांची तंद्री भंग पावे.

वर्षभरानें दिनकरनें आपला भाऊ मकरन्द याला शिक्षणासाठीं आणला आणि मग मात्र त्यांना आपल्या या विश्वाचा थोडा थोडा विसर पडूं लागला. मकरन्द त्यांच्याहून चारपांच वर्षांनींच लहान होता. त्याच्याशीं खेळण्याबोलण्यांत त्यांचा बराच वेळ जाऊं लागला.

आणि एक दिवस मकरन्दानें त्यांच्या जीवनांत संपूर्णतः प्रवेश केला.

—त्या दिवशीं दिनकर तापानें फणफणूनच घरीं आला. दोन दिवसांत कसला ताप आहे हें डॉक्टरांना कळण्यापूर्वींच, त्यानें जगाचा निरोप घेतला. विमलावहिनींना सारें जग गोठल्यासारखें झालें. त्यांची दृष्टि हलेना. तोंडांतून रडें फुटेना. शब्द बाहेर पडेना. त्या जागच्या जागीं खिळल्याप्रमाणें बसून राहिल्या. इतक्यांत मकरन्द शाळेंतून घरीं आला. घरचें दृश्य पाहून त्यानें एकदम 'दादा' असा हंबरडा फोडला आणि वैनीच्या गळ्याला जाऊन मिठी मारली. वैनींनीं एकदम त्याला पोटाशीं धरलें—आणि त्यांना वाचा फुटली. त्या रडूं लागल्या.

बराच वेळ तीं एकमेकांना धरून रडत होतीं. मग वैनी एकदम थांबल्या. त्यांना आंत कसली तरी चमत्कारिक शांतता वाटूं लागली. मकरन्दाला पोटाशीं धरून बसण्यांत समाधानाची कांहीं तरी अननुभूत प्रतीति येत आहे असें त्यांना वाटलें. लहानपणींच आपलीं लहान भावंडें पोटाशीं धरून त्या अनेकदां हंसल्या, खेळल्या, रडल्याही होत्या. लहानपणींच आई वारल्यामुळें लहान भावंडांशीं त्या विशेष निगडित झाल्या होत्या. पण आतां आकाश कोसळून पडलेलें असतांना, मकरन्दाला पोटाशीं धरून रडण्यांत त्यांना जें समाधान, जो आंतरिक आधार लाभला—या दुःखांतच जें एक आश्रयस्थान सांपडलें, तसा अनुभव त्यांना पूर्वीं कधीं आला नव्हता. त्यांना मकरन्दाबद्दल कांहीं तरी सर्वस्वीं नवीन असें वाटूं लागलें. त्यांनीं त्याला जरा दूर केलें, त्याच्या रडव्या चेहऱ्याकडे थोडें निश्चल नजरेने पाहिलें, पदरानें त्याचे डोळे पुसले, त्याचें तोंड कुरवाळलें आणि त्याला पुढ्यांत घेऊन त्या आडव्या झाल्या—

त्या भानावर आल्या तेव्हां त्यांचें जग वदललेलें होतें.

त्या एका लहानशा गांवांत राहायला आल्या. दिनकरच्या विम्याचे पैसे आले. घरची थोडी शेती होती तीहि त्यांनी विकली. आणि या पैशाच्या आधारावर त्यांनी मकरन्दासह नव्या आयुष्यास सुरवात केली. नवरा वारल्यानंतर त्यांना माहेरीं नेऊन त्यांचें शिक्षण पुरें करण्याचा विचार त्यांच्या वडिलांनीं त्यांच्यापुढें मांडला पण त्यांनीं वडिलांना नकार दिला. माहेरीं जाणें म्हणजे मकरन्दाला वाऱ्यावर सोडणें होतें. तो विचारही त्यांच्या मनाला स्पर्श करूं शकत नव्हता. मकरन्दाचा त्याग त्या करूं शकत नव्हत्या. त्याच्याशिवाय स्वतःच्या जीवनाचा विचार करणेंही त्यांना अशक्य वाटूं लागलें. कधीं मकरन्दाखेरीज आयुष्याची कल्पनाचित्रें त्या रेखाटत, पण अशा वेळीं आपल्या समोरून एकादी रिकामी उघडया डब्यांची भकास मालगाडी खडखड करीत जात आहे आणि ती कांहीं केल्या संपत नाहीं असा त्यांना भास होई.

काय वाटत होतें त्यांना मकरन्दाविषयीं, तें त्यांचें त्यांनाच सांगतां येत नव्हतें. एवढें मात्र खरें कीं त्यांना आपल्या धाकटया भावाबद्दल, नवऱ्याबद्दल–अगदीं कोणाकोणाबद्दल कधीं कांहीं वाटलें नाहीं असें कांहीं तरी मकरन्दाबद्दल वाटत होतें. मकरन्द हाच त्यांच्या जीवनाचा अर्थ बनला होता–पण त्याचा अन्वयार्थ त्या लावूं शकत नव्हत्या

मकरन्दाला सोडून आपलें स्वतंत्र जीवन आंखण्याची कल्पना त्यांना शिवली नव्हती. मकरन्दाच्या जीवनांतच जणुं त्यांनीं आपलें जीवन मिसळलें होतें. त्यांची नजर मकरन्दाच्या मूर्तीवरोबर फिरत असे. त्याच्या सुखांत त्या आपलें सुख शोधीत होत्या त्यांच्या आनंदाबरोबर त्या आनंदित होत; त्याच्या दुःखानें त्या विषण्ण होत. मकरन्द त्यांच्याशिवाय असा फारसा कधीं राहिलाच नव्हता, पण तो स्काऊटच्या कॅम्पला जाई तेव्हां त्यांना फार उदास, कंटाळवाणें वाटत असे. तो मॅट्रिकची परीक्षा पास होऊन एक स्कॉलरशिप मिळवून घरीं आला तेव्हां त्याच्या अंतःकरणांतला सारा अभिमान त्यांच्या चेहऱ्यावर उमटला होता. तो एकदां टायफॉइडच्या तापांत बरळूं लागला होता तेव्हां त्याच्या प्रत्येक शब्दागणिक त्यांचा जीव कासावीस झाला होता. मकरन्दाच्या जीवनापेक्षां आपलें जीवन कांहीं वेगळें आहे असेंच त्यांना दिसेनासें झालें होतें.

स्वतःच्या सुखासाठीं सुद्धां मकरन्दाला सोडून जाण्याची त्यांची तयारी नव्हती.

अगदीं अलीकडची, मकरन्द असिस्टन्ट जेलर होऊन इंदूरला आल्यानंतरची गोष्ट. गोखले नांवाच्या गृहस्थाशीं मकरन्दाची ओळख झाली आणि दोस्तीहि जडली. जिमखान्यांत जडलेली दोस्ती. तिच्यांत एक बेछूट मस्ती होती. गोखले मकरन्दाकडे वारंवार येत. मकरन्दाशीं बोलतांना त्यांच्या आवाजांत एक प्रकारचा आडदांडपणा असे. पण वैनीशीं बोलतांना तो कोठें तरी दडे पळे. एक प्रकारचें मार्दव, सभ्यता त्यांत लगेच दृग्गोचर होई. त्यांच्या वागण्यांत अतिशय अदबी निर्माण होई. स्त्रियांशीं वागतांना पुरुष अर्थात् असेच वागणार पण हळुहळू गोखल्यांच्या वागण्यांत एक प्रकारची निराळीच आस्था, आवाजांत निराळाच ओलावा आणि नजरेंत वेगळीच ओढ आहे असें वैनींच्या प्रत्ययास येऊं लागलें. पण वैनींना ती अस्वाभाविक वाटली नाहीं. अगर त्यांच्या वर्तनाचा तिटकाराहि आला नाहीं. गोखल्यांच्या एकंदर हालचालींत जो मर्द रुबाब होता तो त्यांना मुळांतच आवडलेला होता आणि त्यांच्याबद्दल अनुकूल ग्रह त्यांच्या मनांत निर्माणच झालेला होता. लवकरच त्या अनुकूलपणाला एक प्रकारचें घरोब्याचें आणि सौहार्दाचें स्वरूप आलें. मकरन्द व गोखले दिवाणखान्यांत बोलत बसले म्हणजे वैनी तेथें येऊन शिवण–टिपण करीत बसत. केव्हां केव्हां त्यांच्या संभाषणांत सामीलहि होत.

गोखले होळकर स्टेट रेल्वेंत नोकरीला होते. कधीं कधीं ते आपल्या ऑफिसांतल्या गंमती सांगत. यावेळीं वैनींना दिनकरची [illegible] आठवण होई–पण तिच्यांत विषादाच्या छटा क्वचितच [illegible] असत.

एक दिवस सायंकाळीं गोखले आले तेव्हां मकरन्द घरीं नव्हता. वैनींनींच त्यांचें स्वागत केलें. आणि त्या त्यांच्याशीं बोलत बसल्या. बोलतां बोलतां गोखल्यांनीं आपण लवकरच प्रवासाला जाणार असें सांगितलें आणि विचारलें,

" बोला, तुम्ही येतां का ? "

" आम्ही ! " वैनींनीं विचारलें, " तुमचं ठीक आहे हो. तुम्हांला रेल्वेकडून फुकट पास मिळतात. तुम्ही प्रवासाची चैन करूं शकतां. आमचं तसं नाहीं. "

" पण माझ्यापाशीं दोन पास आहेत, " गोखले म्हणाले. त्यांचा आवाज थोडा भेदक होता.

' दोन पास ' असें गोखले म्हणाले तेव्हां ते आपल्याला [illegible] बोलावीत आहेत हें वैनींच्या लक्षांत आलें. त्या एकदम अस्वस्थ झाल्या. थोडा वेळ थांबून विषयाला थोडी कलाटणी देण्यासाठीं त्यांनीं विचारलें,

" तुम्ही प्रवासाला नेहमीं एकटयानंच जातां ? "

" आजवर एकटयानं गेलों. आतां तुमची संमति असेल तर दोघांनीं जाऊं " गोखले म्हणाले आणि ते एकदम गप्प बसले. त्या गप्प बसण्यांत एक प्रकारचा खंडितपणा वैनींना जाणवला. त्यांनीं गोखल्यांकडे पाहिलें तों ते आपल्याकडे रोखून बघताहेत आणि त्यांच्या नजरेंत [illegible] ओढ आहे हें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या अधिकच अस्वस्थ झाल्या. आपलीं कानशिलें आणि कानाच्या पाळ्या गरम गरम होत आहेत असें त्यांना वाटलें. हातापायांत कसली तरी चमत्कारिक अशक्तता शिरत असलेली भासली. काय बोलावें हें त्यांना सुचेना. इतक्यांत मकरन्द आला. त्यांनी [illegible] करून त्या आंत गेल्या.

गोखल्यांच्या त्या उद्गारांनीं त्या अस्वस्थ झाल्या, पण [illegible] अस्वस्थपणांत एक गोड शिरशिरी अनुभवास येत असलेलीही त्यांना जाणवली. आपलें सारें शरीर कसल्या तरी आवेगानें भरलें आहे आणि तें हलकें हलकें होत आहे असें त्यांना वाटूं लागलें.

गोखले थोडा वेळ बसून निघून गेले. ते मकरन्दाशीं फारसें बोलले नाहींत हें वैनींच्या ध्यानांत आलें. मकरन्द आंत आला तेव्हां आपण त्याच्याशीं नेहमींप्रमाणें मोकळ्या मनानें बोलूं शकत नाहीं अशी विचित्र जाणीव त्यांना झाली. तो [illegible] कीं काय, त्या मकरन्दाशीं बोलूं लागल्या–पण आपण कांहीं–बाहीच बोलत आहोंत असें सारखें त्यांना वाटत होतें.

त्या वेळेपासून गोखल्यांच्या प्रवासाचा विचार त्यांच्या मनांत अधून-मधून घोळूं लागला. पण आपल्या- मकरन्दाच्या जीवनांत कसला तरी



युद्धांत एका शिपायाचें शिर शत्रूच्या तलवारीनें मानेपासून तुटून पडलें. पण भुईवर पडतांना तें [illegible] ! कां ? तर त्यास [illegible] कीं, [illegible] करण्याकरतां [illegible] होतें [illegible] मी आज [illegible] ! [illegible] झालें !

कि[illegible] निर्माण होत आहेसें जेव्हां जेव्हां त्यांना भासे तेव्हां तेव्हां त्यांना [illegible] अनुभव येई तोच याहि वेळीं आला. ते आगगाडीचे रूळ त्यांच्या नजरेसमोर नाचूं लागले. ज्या ज्या वेळीं त्यांच्या मनांत गोखल्यांच्या प्रवासाचे विचार येत त्या त्या वेळीं क्षितिजाच्या पलीकडे जात असलेले ते रेल्वेचे रूळ, त्यांवरून धांवणारी मेलगाडी त्यांना दिसूं लागे आणि ती दूर दूर जात टिंबाएवढी बनून अखेर अदृश्य होई !

प्रवासाला जाण्यापूर्वी गोखले एकदोनदां त्यांच्याकडे येऊन गेले. ते आले म्हणजे आपला जीव अगदीं तरल बनतो आहे असें त्यांच्या अनुभवास येई. गोखले प्रवासाबद्दल मात्र कधींच बोलले नाहींत. त्याहि बोलल्या नाहींत. तो विषय तीं दोघं टाळीतच होतीं.

[illegible]र दिवसांनीं गोखले प्रवासाला गेले. प्रवासांतून त्यांचें एक पत्र आलें. आपण गोखल्यांबरोबर गेलों असतों तर मकरन्दाला आपण असेंच पत्र पाठविलें असतें, त्यांच्या मनांत विचार आला. तो विचार त्यांना चमत्कारिक वाटला. आपण हें घर सोडून गेलों आहोंत आणि मकरन्द या घरांत एकटाच वावरतो आहे, असें दृश्य त्यांच्या नजरेपुढें उभें राहिलें. त्यांना तें फार विचित्र वाटलें. गोखल्यांबरोबर जाण्याचा खरा अर्थ पूर्वी त्यांना कधीं जाणवला नव्हता असा आतां जाणवला. गोखल्यांबरोबर जाणें म्हणजे मकरन्दाशीं ताटातूट. तो विचार असह्य होता. गोखल्यांचा विषय मनांतून काढून टाकण्याच्या उद्योगास त्या लागल्या.

पण मकरन्दच एक दिवस स्वतः होऊन दूर जाण्याचा प्रयत्न करणार नाहीं काय ? तो लग्न करणार नाहीं काय ? मकरन्दाच्या लग्नाचा विचार त्यांना इतका तापदायक वाटला कीं मनांत आल्याबरोबर तो मनांतून साफ काढून टाकण्याचा प्रयत्न त्या करूं लागल्या. पण त्याबरोबर तो विचार त्यांना अधिक अधिक त्रस्त करूं लागला. आणि त्या त्याच्याशीं अधिक अधिक झगडत होत्या.

आजवर त्यांनीं हा झगडा अनेकदां केला होता. त्याला अनेक रूपेंही प्राप्त झालीं होतीं. पण आज हा सारा झगडा फुकट जात होता. मकरन्दानें मालतीशीं लग्न ठरल्याचें सांगितलें तेव्हांचा त्याचा थंड निश्चयाचा आवाज त्यांना पुनः जाणवला. त्या एकदम विकल झाल्या आणि असहायपणें अश्रू ढाळूं लागल्या.

असें कांहीं तरी होईल याची कल्पना आपल्या लग्नाची बातमी वैनींना सांगतांना—मकरन्दाला होतीच. वैनी खोलींत निघून गेल्यावर तो बाहेर व्हरांड्यांत आला, आराम खुर्चीवर पडला आणि त्यानें एक सिगरेट पेटविली. भारावलेल्या नजरेनें तो सिगरेट ओढूं लागला. बराच वेळ तो शून्य नजरेनें सिगरेटच्या धुराकडे पाहत होता. जरा वेळानें त्याला स्वतःची थोडथोडी जाणीव होऊं लागली. त्याला वैनींचा खूप राग आला होता. त्याच्या अंतःकरणांत आज कसकसलीं स्वप्नें उमलत होतीं—आणि वैनी त्यांच्यावर राख फेंकीत होत्या !

रागातिशयामुळें त्याला पुनः सुचेनासें झालें. बाहेर मैदानांत पोरें क्रिकेट खेळत होतीं. त्यांच्याकडे तो शून्य नजरेनें पाहत राहिला. पाहतां पाहतां आपल्या मनावरचा ताण कमी होत आहे, आपला राग मावळत आहे, वैनीविषयीं आपुलकीची भावना आपल्या अंतरंगांत संचरूं लागली आहे असें कांहीं तरी त्याला वाटूं लागलें. त्याची नजर क्रिकेट पाहत होती आणि त्याच्या मनांत स्मृतींची कसलीतरी चाळवाचाळव सुरू होती. हळुहळू त्याला तो प्रसंग आठवला—

दिनकर वारल्यानंतर तीनचार महिन्यांतलाच तो प्रसंग. मकरन्द मुलांबरोबर क्रिकेट खेळत होता. पायाला पॅड वगैरे कांहीं नव्हतेंच. खेळतां खेळतां चेंडू पायाच्या नळीवर बसला आणि मकरन्द एकदम कळवळून खालीं बसला. आठ दहा दिवस तो अंथरुणांत होता. त्यावेळीं वैनींनीं त्याची जी शुश्रूषा केली तिने त्यांचें त्याला एक नवें दर्शनच घडलें. त्याचा पाय अतिशय दुखत असे. प्रत्येक वेदनेबरोबर तो कळवळे. त्यावेळीं ती वेदना वैनींच्या दृष्टींत उमटली आहे असें त्याला दिसे. दिनकर गेल्यावर त्याला मोठा धक्का बसला होता. त्याला एकदम निराधार वाटायला लागलें होतें. आपल्या मनाचें भिंग फुटलें आहे असें कांहींतरी त्याला वाटत असे. पण या दुखण्यांतील वैनींच्या वर्तणुकीनें त्याला आधार सांपडला. त्याचें मन सांधलें. एका अपूर्व बंधनानें तो वैनींकडे ओढला गेला.

वैनी त्याला किती प्रेमळपणानें वागवत! सकाळीं त्याला उठविण्याकरतां त्यांचा प्रेमळ हात त्याच्या मुखावर फिरे तेव्हां आपल्या चेहऱ्यावर कोणीतरी फूल फिरवीत आहे असें त्याला वाटे. जागें झाल्यावरोबर त्याची नजर त्यांच्या हंसऱ्या नजरेला भेटली म्हणजे त्याचें हृदय आनंदानें उलून येई आणि त्या आनंदांत त्याचा सबंध दिवस जाई. त्याचें खाणेंपिणें साधेंच असे, पण वैनींनीं त्यांत अमृत ओतलें होतें. दुपारचा चहा वैनींनीं मकरन्द शाळेंतून आल्याखेरीज कधीं घेतला नाहीं. परीक्षा आली कीं तो चूर, गंभीर वनत असे. विषण्णतेनें त्याचें मन व्यापलें जाई. वैनीहि त्यावेळीं गंभीर बनत, पण मुद्दाम हंसूनखेळून त्या त्याला आनंदित करण्याचा प्रयत्न करीत. परीक्षा आटोपल्याबरोबर त्याच्या आनंदाच्या ज्या हरिणउड्या पडत त्यांच्यावरोबर वैनींचाहि जीव नांचतो आहे असें त्याच्या अनुभवास येई.

दिनकर गेल्यावर त्यांच्या विन्हाडांत गरिबीच शिरली. इन्श्युरन्सचे आणि शेतीचे पैसे किती दिवस पुरणार ? पण वैनी शिवण काम शिकल्या–आणि इकडेचेतिकडचें शिवणकाम करून त्यांनीं संसारांतले उन्हाळेपावसाळे तरून जाण्याचा मोठ्या धैर्यानें आणि नेटानें प्रयत्न केला. वार लावण्याची इच्छा एकदां मकरन्दानें व्यक्त केली, पण त्यांनीं ती लगेच मोडून काढली. कॉलेजांत गेल्यावर त्याला स्कॉलरशिप्स वगैरे मिळूं लागल्या. त्यानें एकदोन शिकवण्याहि धरल्या. पण एकदां एक महत्त्वाचें पुस्तक घेण्यास त्याजपाशीं पैसे नव्हते. वैनींना हें कळल्यावरोबर त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. मुकाट्यानें त्या आपला एक उरलासुरला दागिना घेऊन सराफाकडे गेल्या आणि तो मोडून त्यांनीं पुस्तकाची किंमत उभी केली.

वैनी या मकरन्दाला आई, बहिण, मैत्रीण–सर्व कांहीं झाल्या होत्या. वैनीव्यतिरिक्त जीवनाचा विचार त्याच्याहि मनाला कधीं शिवला नव्हता.

पण त्याला एक मुलगी सांगून आली आणि त्या प्रकरणीं वैनी ज्या वागल्या त्यानें त्याच्या भावनांना जबरदस्त धक्का दिला. त्याच्या शेजारीं, स्नेहलता गंजमधेंच, सरवटे नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांची शांता नांवाची एक भाची होती. मकरन्दानें ती करावी अशी त्यांची फार इच्छा होती आणि तसें त्यांनीं त्याला एकदां बोलूनहि दाखविलें होतें. दिवाळीच्या सुटींत ती त्यांच्याकडे आल्यावर एक दिवस संध्याकाळीं फिरायला जातांना ते तिला घेऊन मुद्दाम त्यांच्याकडेच आले. शांता आलेली पाहून वैनी नाराज झालेल्या दिसल्या, पण मकरन्दाला यांत विशेष कांहीं वाटलें नाहीं. नवीन सुशिक्षित मुलींशीं वैनींना नीट वागतांच येत नाहीं अशी त्यांची समजूत झाली होती. कॉलेजांत असतांना त्याच्या वर्गांतील एक विद्यार्थिनी मिस् लवांदे त्याच्या घरीं येई तेव्हां त्या थिजल्यागत वागत हें त्याला माहित होतें. कदाचित् सरवट्यांची मुलगी दाखविण्याची ही नवीन पद्धति वैनींना पसंत न पडल्यामुळें त्या नाराज झाल्या असतील असेंही वाटलें. पण या नवीन अनौपचारिक ओळखीमुळेंच तो चूप होऊन गेला होता. शिवाय शान्ता त्याला आवडली होती. तिचें मोजकें वागणें आणि मोजकें बोलणें त्याला पसंत होतें. ती दिसायला अधिक नीटस असती तर त्यानें मुळींच विचार केला नसता. पण नकार देण्याचा विचार त्याच्या मनांत आला नव्हता. तिच्याशीं थोडा अधिक परिचय झाल्यावर मनाचा कांटा कुणीकडे कलतो तें पाहायचें त्यानें ठरविलें होतें. म्हणून पाताळपाण्याची ट्रिप ठरवून एक दिवस तिच्या संगतींतहि त्यानें काढला. तिच्या मोजक्या बोलण्यांत जी एक प्रतिष्ठा दिसली ती त्याला फार आवडली. त्याच्या मनांत हिंदोळे घेऊं लागला. इतक्यात ट्रिपच्या दुसऱ्याच दिवशीं खुद्द शांताचेंच त्याला एक पत्र आलें आणि तें वाचून तो चकित होऊन गेला. शान्तानें लिहिलें होतें,

"सा. न. वि.

मामांनीं मला तुमच्या संगतींत आणून तुम्हांला आणि तुमच्या वैनींना जो त्रास दिला त्याबद्दल क्षमा मागण्यासाठीं मी हें पत्र लिहीत आहे. वैनी माझ्याशीं फारशा कधीं वागल्या–बोलल्या नाहीत. मला वाटलें त्यांचा तो स्वभावच असेल. पण पाताळपाण्याच्या ट्रिपच्या वेळीं त्यांचा मला उलट अनुभव आला. त्या पुष्कळच आस्थेनें वागल्या आणि बऱ्याच बोलल्या. त्यामुळें माझ्यावर खरोखर जन्माचे उपकार झाले आणि त्याबद्दल मी त्यांची शतशः आभारी आहे. त्या काय काय बोलल्या तें सारें सांगण्याची गरज नाहीं. मुद्द्याचें तेवढें सांगते. आपण आगगाडीच्या रस्त्यानें काळाकुंडाकडे जातांना मध्येंच चोरलनदीच्या पात्रांत उतरून विश्रांति घेतली ना, तेव्हां त्या म्हणाल्या, "माझें जीवन या चोरल नदीसारखेंच आहे. ही पाताळपाण्याच्या ठिकाणीं कोसळते तशीच मी एकदां कोसळलें- कांहीं काळ माझ्या जीवनाचा अगदीं चुराडा झाला. मी कुठे तरी कशी तरी वाहवत गेलें असतें. पण मकरन्दामुळें सावरलें. या आगगाडीच्या रस्त्यामुळें आज आपण चोरल नदीची चवकशी करतों आहोंत ना ! तसेंच मकरन्दामुळें माझ्या आयुष्याचें झालं आहे." तुमच्या वैनी इतक्या थोर कवयित्री असतील याची मला कल्पना नव्हती. त्यांचें हें काव्य माझ्या दृष्टीनें फारच महत्वाचें आहे. तुम्ही आतां मी अगर माझ्यासारखी दुसरी कोणी यांचा नाद सोडून आपल्या वैनींचेंच काव्य फुलविण्याचा प्रयत्न केलात तर काव्यावर आणि जगावर आपले फार उपकार होतील.–शान्ता सप्रे."

शान्ताच्या पत्रांतील उपरोधानें मकरन्दचें काळीज कापत गेलें. त्याला वैनींचा फार राग आला. त्यांचें चमत्कारीक वागणें आणि असलें चमत्कारीक बोलणें त्याला अगदीं गैर वाटलें. आजवर मनानें तो वैनींपासून कधीं दूर गेला नव्हता तो प्रथमच या प्रकरणामुळें जाऊं लागला. वैनी बद्दल थोडेसे तिऱ्हाईतपणाचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. आजवर आपण एक प्रकारें वैनींच्या अंकितच होतों याची जाणीव त्याला होऊं लागली आणि ती जाणीव त्याला थोडीशी तापदायक वाटूं लागली. लग्नाचे विचार त्याच्या मनांत अधिक जोरानें उसळूं लागले. पण शान्ताच्या नकारानें तो फारसा त्रस्त झाला नाहीं. तिच्या पत्रानें त्याला जो धक्का दिला, त्यानें त्याला अशी जाणीव होऊन दिली कीं शान्ता आपल्याला कितीही आवडली असली तरी तिच्याबद्दल आलेलें अंतःकरणापासून प्रेम नाहीं. तिच्या पत्रानें त्याला खूप मनस्ताप झाला, पण तिच्या नकारानें आंत कोठें तरी सुटकेची छटाहि उमटत आहे असें त्याला जाणवलें. पण या पत्रामुळें लग्नाचे विचार त्याचें मन अधिक अधिक व्यापूं लागले.

अनुक्रमणिका






आर्शा लवकरच त्याच्या मनाला ओढ लावील अशी मुलगी त्याला भेटली. आर्. एस्. एस्. चा सत्याग्रह सुरू झाला आणि त्याच्या तुरुंगांत बरेचसे कैदी आले. एक दिवस एका कैद्याला भेटायला एक तरुण मुलगी आली. आपल्या भेटण्याची रीतसर परवानगी घेण्यासाठीं ती त्याच्याकडे आली तेंव्हांच तिच्या ठसठशीत बोलण्यानें आणि तजेल वागणुकीनें तिनें त्याचें लक्ष-वेधलें होतें. भावाशीं तिची मुलाखत झाली तेंव्हांचें त्यांचें बोलणें जें त्याच्या कानांवर पडलें त्यानें तर त्याचें मनच जिंकलें. तिचा भाऊ तिला बाहेरून कांहीं तरी आणून द्यायला सांगत होता. त्यावर ती ठाशीव स्वरांत म्हणाली, "मी असं कांहीं करणार नाहीं. तुम्ही स्वतःला सत्याग्रही म्हणवतां ना रे ? मग जेलच्या शिस्तीनं नको का वागायला ?" हे उद्गार ऐकल्याबरोबर मकरन्द त्यांच्यासमोर आला आणि तिच्याकडे प्रेमळ कौतुकाच्या नजरेनें पहात राहिला. त्या नजरेंत आतुरता होती. ती मालतीला जाणवल्यामुळें कीं काय ती एकदम लाजली आणि तिची नजर खालीं जमिनीला खिळली. तिचा चेहरा एकदम लाल लाल झाला. त्यानें तिला कचेरींत बोलावलें आणि तिच्या भावाला नियमानुसार शक्य त्या सार्‍या सवलती आपण देऊं असें आश्वासन दिलें. त्या मुलाखतींतच त्यांच्यामध्यें भावनेचा एक नाजुक धागा निर्माण झाला आणि पुढें प्रत्येक मुलाखतींच्या वेळीं त्याला रेशमाच्या गांठी पडत गेल्या. अखेरीस त्यांनीं विवाहबद्ध व्हायचें ठरविलें.

मकरन्दानें लग्न करावयाचें ठरविलें आणि आजवर आपण खरोखर किती परतंत्र होतों याची त्याला तीव्र जाणवी झाली. वैनींच्या मायेच्या पाशांनीं आपल्याला गुलामच बनविलें होतें असें त्याला वाटलें. आतां आपण सांगितलेली बातमी ऐकून वैनींना जें वाटलें ते पाहून आपल्या गुलामगिरीची जाणीव त्याला विशेषच झाली. वैनींचा त्याला फारच राग आला. त्या रागामुळें तो संत्रस्त झाला. त्याला कांहीं सुचेना. त्या विमनस्क स्थितींतच तो व्हरांड्यांत बसून राहिला.

इतक्यांत तुरुंगांत तास वाजला. त्यानें तो भानावर आला. त्यानें पाहिलें. समोर तुरुंगाच्या भिंती पसरल्या होत्या. त्या भिंती आतांसारख्या भकास आणि भयानक त्याला कधींच वाटल्या नव्हत्या. तुरुंगाचा दरवाजा उघडला होता. त्यांतून अनेकदां तो आंत बाहेर गेला होता. पण त्याचा क्रूरपणा त्याला आतांच जाणवला. बाहेरच्या बागेंत काम करणाऱ्या कैद्यांना त्या दरवाजांतून आंत नेण्यांत येत होतें. त्यांच्या पायांतला साखळदंड वाजत होता. त्या साखळदंडानें कैदी कसे जखडले जात असतील याची या वेळीं त्याला खरी कल्पना आली. साखळदंडांनीं कैद्यांच्या हातापायांना जे घट्टे पडतात ते एकदम त्याला आठवले. आपल्या मनालाही असेच घट्टे पडले आहेत असें त्याला वाटलें.

मकरन्द एकदम आवेगानें उठला. त्याने हातांची जोरानें हालचाल केली. जणु कसल्या तरी शृंखला तोडण्याचाच ते प्रयत्न करीत होते. त्यानें समोर पाहिलें. झाडांच्या सावल्या तुरुंगाच्या भिंतीवर पडल्या होत्या आणि त्यांची संध्याकाळच्या वाऱ्यांतील थयनाच भेडसावींत होती. त्यांची नजर इकडे तिकडे फिरली.

हिंवाळ्यानें सृष्टि किती करपून-आकसून गेली आहे तें त्याच्या ध्यानांत आलें. मेंदीच्या कुंपणावर धुळीचे थर बसलेले जाणवले.

तो उठला. आंत गेला. त्यानें कपडे केले आणि तिरीमिरीच्या पावलानें तो घराबाहेर पडला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मकरन्द जेलला गेल्यानंतर मालती त्याच्या घरीं आली. ती येणार हें त्याला ठाऊक होतें. न आली तर बरें असेंहि कालपासून त्याला वाटत होतें. पण येऊं नको असें तो तिला कळवूं शकत नव्हता. तिची वाट पाहून अस्वस्थ मनानेंच तो नोकरीवर गेला आणि ती दहासाडेदहाच्या वेताला आली. ती येणार हें वैनींना माहित नव्हतें. त्यांनीं तिला पाहिलेलेंहि नव्हतें. पण ती आल्याबरोबर ती कोण असेल हें त्यांनीं ओळखलें. तिला पाहिल्याबरोबर त्यांची नजर तिच्यावर आपाद-मस्तक फिरली. पण लगेच त्यांनीं आपला चेहरा फुलविला आणि हंसून तिचें स्वागत केलें. तिची उठबस केली, तिला सर्व माहिती विचारली, तिला चहा करून दिला, तिला घरभर फिरवून सर्व वस्तू दाखविल्या, मकरन्दाच्या आवडीनिवडीबद्दल त्या बोलल्या आणि त्यांनीं तिला पहिल्या भेटीची ओळख म्हणून एक उंची खणही दिला. मालती खूष होऊन गेली. मकरन्दाच्या घरांत फिरतांना, त्याच्या घरांतल्या वस्तू पाहतांना ती उत्साहानें न्हाऊन निघत होती. पावसाळ्यांत गुलमोहराच्या झाडावर पालवीच्या नवनव्या लहरी पसरतात तशा तिच्या अंतःकरणांत प्रसन्नतेच्या पसरत होत्या. या घरांतील वास्तव्याची मोहक स्वप्नें तिच्या नजरेवर तरळूं लागलीं. दीडदोन तासांनीं ती तरल पावलांनीं निघून गेली.

ती गेल्याबरोबर विमलावैनींनीं कपडे बदलले. लग्नांत वडिलांकडून त्यांना जें लुगडें मिळालें होतें तें त्या नेसल्या. नंतर मकरन्दाच्या खोलींत गेल्या आणि मकरन्दाच्या पॅडमध्यें पुढील मजकूर लिहिला—

"प्रिय मकरन्द,

कालपासून माझ्या अंतःकरणाच्या एका भागाला हात घालून कोणी तरी तें तोडून नेत आहे असें मला वाटत आहे. आजवर तुझें आयुष्य हा मी माझ्या आयुष्याचा भागच मानीत आलें. पण आतां त्याच्यावर हक्क सांगणारें दुसरेंच एक माणूस तूं आणलें आहेस. खरें म्हणजे मी तुझें अभिनंदन केलें पाहिजे. पण मला नाहीं करतां येत तें. हरकत नाहीं. आजवर तुझें सुख तेंच मी माझें सुख मानलें. आतां तुझ्या सुखासाठींच मला येथून निघून गेलें पाहिजे.

तुझी

वैनी"

त्या चप्पल घालून बाहेर पडल्या आणि त्यांची नजर समोरच्या पिंपळा-कडे गेली. पिंपळावरची बहुतेक पानें गळून गेली आहेत हे त्यांच्या ध्यानांत आलें. जीं थोडींबहुत होती तीं पिकली होती, वाळलीं होती. त्या जुनाट पिंपळाची एक फांदी मोडून पडली होती. तिचा सुकट-राखट भाग त्यांना जाणवला. त्या रस्त्यावर आल्या आणि उन्हाळयाच्या आगमनाची चाहूल त्यांना लागली. इतक्यांत तुरुंगापलीकडून रेल्वेच्या इंजिनाची शिटी त्यांच्या कानांत शिरली—आणि त्यांना एकदम ते आगगाडीचे रूळ आठवले. पण ते रूळ आतां सरळ नव्हते. त्यांनीं वेडेवाकडे अनेक आकार धारण केले होते. त्यांचा त्यांना निटसा बोधही होत नव्हता. मध्येंच ते दिसत-अस्पष्ट दिसत आणि नाहींसे होत. आणि मग जरा वेळ कांहीं दिसेनासें होई. मध्येंच एकदम ते रूळ वर्तुलाकार झाले, तिकडून मेलगाडी धडधड करीत आली आणि त्यांच्यावर स्वतःभोवतीं वाटोळी वाटोळी फिरत राहिली. वैनींना धसका बसल्यासारखें झाले. त्यांच्या शेजारून रस्त्यावरून एक लॉरी धाड-धाड करीत गेली. त्या तशाच अबोधपणें चालत होत्या. पुनः त्यांच्या दृष्टी-पुढें ते रूळ आले आणि आतां त्यांना दोरीला गांठ पडते तशी गांठ पडली. जरा वेळानें तें नेहमींसारखें सरळ झाले. पण आतां त्यांच्यावर सिग्नलचा हिरवा व तांबडा असे दोनही रंग एकदम नाचूं लागले आणि त्यांतून एक विचित्र रंगच निर्माण झाला. त्यानें त्यांची नजर दिपली आणि त्यांना कांहींच दिसेनासें झालें. त्या तशाच चालत होत्या. इतक्यांत त्यांना रूळावर एक शेळी चार पाय जोडून उभी राहिली आहे आणि शेजारची सिग्नलची तार तिच्या पायाभोंवतीं गुंडाळत आहे असें दिसलें. त्या दृश्याचें त्यांना हसूंच आलें. त्या थोडयाशा भानावर आल्या. रस्त्यावर आपल्या बाजूनें गिरणीचे मजूर जात येत आहेत असें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या झपाझप पावलें टाकूं लागल्या. त्यांच्या पायांत गति शिरली. रस्त्यावरच्या माणसांची जाणीव अंधुक होऊं लागली. त्या बराच वेळ तशाच निर्बोध चालत होत्या. कांहीं वेळानें आपण रेल्वेलायनीच्या बाजूनें चालत आहोंत असें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या एकदम उभ्या राहिल्या. त्यांनीं समोर पसरलेल्या आगगाडीच्या रस्त्याकडे पाहिलें. रस्त्यावरचे रूळ समोर सरळ गेले होते—आणि क्षितिजावर एकमेकांत मिसळून नाहींसे झाले होते. दुपारच्या उन्हांतली त्यांची चमक मात्र भासत होती. बराच वेळ त्या उभ्या राहून निश्चल नजरेनें ती चमक पाहात होत्या. हळुहळू त्या त्या चालू लागल्या. त्यांचें पाऊल पुढें पडे, तसें तें क्षितिज पुढें सरकूं लागलें—

आणि क्षितिजावर एकमेकांत मिसळून नाहींशा होणाऱ्या रुळांची चमकही पुढें सरकूं लागली!

---



## जशि धोब्याची मउ इस्तरी

कवि — बा. सी. मर्ढेकर

जशि धोब्याची मऊ इस्तरी
तलम फिरावी सुतावरूनी;
फाल्गुनांतील चंद्रकोर तशि
मलिन मनांच्या धाग्यांवरुनी
शिणेल धोबी यदाकदाचित्
पडेल खालीं चंद्रकोर अन्;
सुरकुतलेल्या मनोवृत्तिंना
पुनश्च कोठें भट्टी, भगवन !

★



## वैदुलाचे झालें ब्रह्मांड

कवि—कृष्णराव मराठे

आणि काळपुरुषाच्या पंक्तींतील एका
निळ्यागडद प्रचंड द्रोणास
चांदण्याच्या चोयटयां—त्स उसवल्या..
पुसांतली पंडी कलंडली त्यांतून
आणि चित्राहुतीचे वैदुल उडाले
कुठें तरी कसे तरी एका गली कुचींत
आणि वैदुलाचें झालें ब्रह्मांड
काळपुरुषाची व्याली एक रांड !

अनुक्रमणिका

# यांत्रिक-खेळण्यांत जपान-अमेरीकेला शह

## यंत्र-विशारद श्री. र. बा. काकोडकर ( मालक 'मेट् आर्टस्' ) यांची ओळख

### टायगर्स कोठून येतात ?

फुसकुल्या दिवाळीला केपा वाजवायला हे टायगर्स आले आहेत. कोठेंही गेलांत तरी यांचा संचार आहेच. फटाक्याच्या प्रत्येक दुकानांत हे ठाण देऊन बसलेच आहेत. अर्थात् हे शेंकडोंनीं आलेल्या या पोरांचें उत्पत्तिस्थान कोणतें यावद्दलची जिज्ञासा निर्माण होणें स्वाभाविक आहे.

### हे सर्व वांद्रेकर आहेत.

वान्द्रा येथें 'मेट आर्टस्' नांवाच्या कारखान्यांत हीं सर्व पिस्तुलें तयार होतात. या कारखान्याचे मालक श्री. र. बा. काकोडकर हे आहेत. श्री. काकोडकर 'पुणा इंजिनिअरिंग कॉलेज'चे बी. ई. असून ते स्वतःच तेथें जातीनें काम पाहत असतात. त्यांचा स्वभाव अत्यंत विनोदी आहे.

'मेट्-आर्टस्'चे उत्साही मालक



श्री. र. बा. काकोडकर.

### प्रेमळ मालक

कारखान्यांत आल्यावर ते प्रथम कामगारांची आस्थेवाइकपणें चौकशी करून नंतर आपल्या कामाला सुरुवात करतात. कारखान्यांतील कच्चा माल-पत्रा-यासंबंधी त्यांचें असें म्हणणें आहे कीं सरकार आपणाला तो फार कमी प्रमाणांत पुरवतें आणि केवळ कच्च्या मालाच्या अभावीं आज 'मेकॅनिकल कॉटेज इंडस्ट्रीज' पुढें येऊं शकत नाहींत, व जो माल सरकार आम्हांला पुरवतें-तो माल म्हणजे पत्रा हा समपातळींत असतोच असें नाहीं. 'मेकॅनिकल कॉटेज इंडस्ट्रीज'चा प्रसार जितका जास्त होईल तितका यांत्रिक खेळण्यासारखा माल जास्त वाहेर पडेल असें त्यांचें ठाम मत आहे.

### 'मेट आर्ट्स'ची स्थापना

१९४७ च्या एप्रिलमध्यें ते बी. ई. झाले व नोकरी करूं लागले पण स्वतंत्र विचारसरणीला नोकरी मानवेना म्हणून धंदाच करावयाचा असा कृतनिश्चय करून त्यांनीं वांद्रा येथें १५ ऑगस्टच्या स्वातंत्र्याच्या मुहूर्तावर आपल्या कारखान्याची मुहूर्तमेढ रोवली. सुरुवातीला त्यांना भांडवल मिळविण्यास फार कष्ट पडले. आजकाल केवळ पैसा असून चालत नाहीं तर कारखान्यासारख्या धंद्याला मालकीच्या जागेची अत्यंत आवश्यकता असते आणि आजकाल तशी सोय कोणीही बहुधा पागडीशिवाय करीत नाहीं; परंतु श्री. काकोडकर यांच्या सुदैवानें त्यांचे हितचिंतक श्री. भोजने यांनीं आपली जागा विनापागडी देऊं केली.

### प्रचंड प्रमाणावर पैदास

कारखान्याला चार-महिने होतात न होतात तोंच दिवाळी आली आणि पहिल्याच वर्षी या कर्तृत्ववान विशारदानें ५,००० पिस्तुलें मुंबईच्या वाजारांत रवाना केलीं व आपली स्वातंत्र्यांतील पहिली दिवाळी साजरी केली. सतत उद्योगानें आणि चिकाटीनें त्यांनीं आपला खप वाढवत वाढवत दुसऱ्या दिवाळीला म्हणजे १९४८ मधील दीपोत्सवांत २६००० पर्यंत नेऊन ठेवला. अर्थात् मधल्या काळांत ते स्वस्त बसले नाहींत. झायलो फोन, फर्निचर सेट, कौंटिंग फ्रेम इत्यादि तऱ्हेचीं नानाविध खेळणीं त्यांनीं तयार केलीं. यंदाच्या वर्षी त्यांच्या 'टायगर' पिस्तुलाला मागणी फार आली आणि यंदा तो आंकडा अजमासें एक लाख जाईल असा त्यांचा अंदाज आहे. पुढच्या वर्षासाठीं ते रिदम हार्प, तुतारी, स्पीड मोटर्स कंपास बॉक्स तयार करणार आहेत.

### उत्तम मोबदला, उत्तम काम

कारखान्यांतील कारागिरांना उत्तम पगार त्यांनीं देऊं केला आहे. कारखान्यांतील मजुरांना महागाई मिळत नसली, तरी पगार हा मिलमधील वा अन्यत्र महागाईसकट मिळणाऱ्या पगाराइतकाच मिळतो. प्रत्येक कारागिराला प्रतिवर्षी एकूण तीन-बोनस मिळतात, मिलमधील बोनस आणि या कारखान्यांतील बोनस यांमधील फरक इतकाच कीं मिलमध्यें बोनस देतांना महागाई वजा करतात, व मूळ पगारावर देतात; पण यांच्याकडे महागाई नसल्यानें बोनस हा फायदेशीर पडतो व आर्थिक अडचणी निभावून नेण्यास कामगारांना मदत होते.

सुट्या देण्याच्या बावतींतही त्यांनीं सढळ धोरण स्वीकारलें आहे. इतर कारखान्यांत रविवार वा अन्य कोणताही एक वार सुटीचा असतो. परंतु जर मध्येंच एखादा धार्मिक सण आला, तर कारखाना त्या सुटीच्या दिवशीं चालू ठेवण्यांत येतो. 'मेट आर्ट्सला' रविवारची सुटी तर मिळतेच शिवाय बरेच हिंदु कामगार असल्यामुळें हिंदु सणांच्या सुट्याही मिळतात. अर्थात् इतक्या सुखसोयी मिळाल्यावर कोणता कारागीर असंतोष व्यक्त करील ? मजुरांचें मानसशास्त्र त्यांना पूर्णपणें अवगत झालेलें आहे.

मजुरांबरोबर आपणही काम करावें अशी त्यांची जबरदस्त इच्छा व ती ते स्वतः अमलांतही आणतात. आपला मालक हा आळशी नसून, नुसता खुर्ची अडवणारा नसून, तो कुशल कारागीर आहे व आपण चुकल्यास त्याच्या चूक चटकन लक्षांत आल्याशिवाय राहावयाची नाहीं अशी कारागिरांची समजूत झाली, तर कारागीर कधींही चूक करणार नाहींत या विचारसरणीचे ते पुरस्कर्ते आहेत.

### मालाचें परदेशाचें धोरण

श्री. काकोडकर हे जितके स्वतःच्या विषयांत पारंगत आहेत, तितकेच ते व्यापारी धोरणही चांगल्या प्रकारें जाणूं शकतात. आज जपान व जर्मन आणि युद्धानंतर इंग्लंड व अमेरिका ही राष्ट्रें यांत्रिक खेळण्यांसाठीं म्हणून प्रसिद्ध आहेत आणि याचें कारण एकच आहे आणि तें म्हणजे सरकारचें हार्दिक सहाय्य. आज परराष्ट्रांत आपला माल एजंटामार्फत न पाठवितां तो जर ट्रेड कमिशनरकडून ट्रेड कमिशनरला पाठविला, तर मालाचा उठाव वाढेल. त्याचप्रमाणें सुरुवातीला झीज सोसून कांहीं काळ परराष्ट्रांत मालाची किंमत उतरविली व स्वराष्ट्रांत ती वाढविली, तर मालाचा प्रसार होईल व मालाची किंमत कांहीं काळानें स्वदेशांतही उतरवितां येईल.

इतःपर महाराष्ट्रीय भांडवलदारांनीं या यांत्रिक-खेळण्यांच्या धंद्यांत वा अन्य 'मेकॅनिकल कॉटेज इंडस्ट्रीज'मध्यें भांडवल गुंतवून केवळ भांडवलदार म्हणून नव्हे, तर त्या धंद्यांतील पहिल्या प्रतीचा तज्ज्ञ म्हणून गाजलें पाहिजे आणि महाराष्ट्रदेखील धंद्यांत मागें नाहीं हें जगाला पटवून द्यावें, एवढीच माझी हार्दिक इच्छा आहे असें ते नेहमीं म्हणत असत.

आनंदी स्वभाव, धडाडी आणि प्रखर बुद्धिमत्ता या त्यांच्यांतील गुण त्रयीनेंच 'मेट आर्टस्' अभ्युदयाप्रत जात आहे.

अनुक्रमणिका












म्यूझियममधल्या गंजलेल्या तलवारी चाचपून 'वर्तमाना'ची कंबर ताठ होते ?
इतरांचे असो, परन्तू 'भूता'ची भाटगिरी करण्याचा माझा रिवाज नाहीं
परन्तु भय्या ! सिद्धांताला अपवाद असतो महासागरांतल्या बेटासारखा...

हवेली तालुक्यातली ही हकीकत...सातारच्या परिसरांतला हा किस्सा...
पुणें जिल्ह्यांतली ही गोष्ट...आणि...मुम्बअी इलाख्यांतली ही सत्यकथा...
रसिका ! हृदयाच्या तातीवर मी हा "नाल आणि नौबत" छेडतो आहे
रंध्रारंध्राला कान बनव अंगावरल्या, केळीच्या लांब सडक पानासारखे;
हृदयाला कर नरम गरम, बराच वेळ घाट चढून आलेल्या पायताणाप्रमाणें
आणि अैक ही जालीम कविता, फ़ुप्फसांतील पान अन् पान पिसून टाकणारी

पांचवडला मी अेका सकाळीं गेलो ( अेका संपन्न इनामदाराच्याच पैशानें )
दोन प्रचंड घाटांना मुरडून चाटीत, खरी चाकाच्या जिभेनें डांबर-दगड
हेन्री फोर्डचा खुळेपणा मला आपल्या खांद्यावर घेऊन वेगांत चालला होता
दिवस पावसाळ्याचें होते, आणि माझ्या माथ्यावर रविबिंब झाकळले गेलें
आणि वरती कांहीं वेळानें मला इंद्रधनुष्यही पडलेले दिसले, सप्तरंगी...
इंद्रधनुष्य ? ज्ञानेश्वरांचा का अखेरचा निःश्वास विधात्यानें वर गोठून ठेवला !
शहाजानाच्या डोळ्यांतून ताजमहाल घडवितांना सांडलेले आसू वर स्थिर झाले
इंद्रधनुष्य ? बालकवींच्या त्या सात कवितांचा नवा संग्रह असेल कदाचित्
रसरसलेल्या रात्री राधेच्या दंडातून अुडालेला हा रेशमाचा बाजुबंद असेल...
सूर्यचंद्राच्या भोपळ्याच्या वीनावर अनुरुणन् करून ठेवलेली ही असावरी
तुकारामांच्या अभंगातील सासरी निघालेल्या कन्येच्या डोळ्यांतील हे भाव
उंमरखय्यामनें गडकऱ्यांना द्यावयासाठीं हातांत धरलेला हा अमृताचा पेला
स्वर्ग या शब्दातील 'र्ग' अक्षरावरील हा अेक अद्भुत रफार असेल...)
मदनानें रतीच्या अंगावर मारलेली ही जादुची फुंकर असेल...!

काल परवा घरें जळाली मोहोळासारखी, धुराच्या माशा बाहेर पडल्या
विध्वंसाच्या शून्याकारांत पराधें भरलीं होतीं पददलितांच्या संतापाचीं
गांवाचे वैभव हत्तींच्या पायाखालील जाओजुअींचें गजरे झालें होतें
कांहीं वेळ गेला, मी हांतातली सिगरेट मोठा 'दम' भरून टाकून दिली
आणि वाट चालूं लागलो, मागें—पुढें, आणी— वर पहात, न्याहाळींत
गांवाची वेस उसवली होती गिलाव्यांत पिकलेल्या शिताफळाप्रमाणें
नवलोबा, बहिरोबा— म्हाळसा म्हसोबा सारें खिन्न दिसत होते तेथें
थोबाडींत मारलेल्या विद्यार्थ्यांच्या गालासारखे
शेळ्या, लोकर कापलेल्या मेंढ्यां होत्या धनगरी कुत्र्याना भिअून धावत
रस्त्यानें 'कोंबड्यां' हिंडत होत्या जणुं जनान्यातील बेगमा
न जळालेले वाडे जुनें, तें मनांत जळत होते, आपण कां जळालों नाहीं म्हणून
देवाच्या म्हणून सोडलेल्या गाई दिसल्या खरी टयूबसारख्या फुगलेल्या.
आणि जमीन जीव तोडून नांगरणारे बैल मात्र पोटांत दुमडलेले...!
वारा गेलेल्या फुटबॉल सारखे...

चिखल तुडवीत मीं चालतो होतो, माझ्या कोंकणी वहाणा जड झाल्या
कडूलिंबाचीं झाडें पोपटांच्या थव्याशी बोलत होती 'गोड' 'गोड' गोष्टी
मध्येंच विजा अंगाला अळोखें पिळोखे देत होत्या रंगमहालातील राधेसारख्या
मी खुशींत चालतो होतो कारण माझ्या शहरी डोळ्यांना हें नवीन होतें
जें पहात होतो... जे स्पर्शीत होतो... तें नवीन आणि नवीनच होतें.
सूर्यबिंब आतां पुसट झालें, क्षयी नवऱ्याच्या बायकोच्या कुंकवाप्रमाणें
ओढा ओलांडून मी पुढें झालो. कोलंबसाच्या अैटीनें मी चाललो...चाललो
खाली आणि वर-कालीदासाच्या बापालाही न जमणारे काव्य होते
शंकराच्या देवळाचे शिखर वरच्या स्वर्गाच्या गालाला टिचकी मारीत होते
मंदीराचा गाभारा ऑपरेशन टेबलावरील पेशंटप्रमाणें गंभीर होता
बेलाची लाखोली होती वाहिलेली शाळुंका आणि पिंडी दडली होती त्यामध्यें

अमळशानें मी गांवातल्या नव्हें गांवाबाहेरल्या देवीच्या देवळाजवळ गेलो.
खालची जमीन अुखळली होती शंभर ठिकाणीं, काळपुरुषानें
देवी अष्टभुजांची होती, परन्तु ती भग्न होती...नाकावर छेद होता
अेक डोळा अुडाला होता...दोन हात अुतरले होते घणाच्या घावानें
मीं देवीचे दर्शन घेऊन झाल्यावर सिगरेट पेटविली आणि दम मारला
कोपऱ्यांत अेका, अेक म्हातारा,
थोबाडाचे हिरडे-बेहडे झालेला तो, केरसुणीनें झाडलेल्या कोळिष्टकासारखा
काळपुरुषाच्या मिरवणुकी पुढला तो 'बँड' होता, अखेरचा क्षणं तो असावा
कृतांत त्याच्या अुशाजवळ, ठेवलेल्या 'बमा' टाकायच्या मडक्याजवळ अुभा

अनुक्रमणिका

यम फासाला निरसगाठ मारून हुकुमाची वाट पहात होता
त्याला जाळणारा सागवान स्मशानाजवळच्या वखारींत पडला होता
त्यांचे थकलेले फाटलेले शरीर रामफळांतील गिरासारखें पिवळे पडले होते
मी त्याच्याकडे पाहूं लागलो...तो माझ्या, माझ्याचकडे पहात होता
मी त्याच्याकडें वळवलेले डोळे मागे...देवीकडे वळवले
पुढ्यांतल्या तक्तपोशीवर ठोकलेले रुपये पाहिले...चवल्या...पावल्या
नवसाचे म्हणून ठोकलेलें ते रुपयेसुद्धां...कित्येक जागीं नुसती भोकेंच होतीं
देवीच्या डाव्या बाजुला मोठ्या आकाराची नौबत होती तिकाटण्यावर
मी जवळ जाऊन पाहिलें...चामडे फुटलेले होते छपन्न जागीं आणि
ती नौबत, जवळ 'मण' वजनाची तांब्याची होती...तांब्याची
तांबे..........तांबे.........तांबे.........तांबे.........

येवढीं कंगाली असून या म्हाताऱ्या वहिवाटदारानेंही ती विकली नव्हती
मला अत्यंत आश्चर्य वाटलें; जी चोरलीही नव्हती चोरांनी
माझ्याकडे म्हाताऱ्याचे बारीक लक्ष होतें. माझ्या मनांत आलेला
विचार ओळखला त्यानें...मुखावरील भावावरून ओळखला
आणि तो म्हणाला, "तुमच्या मनांत काय आलं तें मी ओळखलं"
मीठ भरलेल्या माठांतील मिठाचे खडे कुडमुडावे तसें त्याचे शब्द होते
निजलेला तो अुठला आणि माझ्याकडे पाहूं लागला
त्याची तो टक पुढें माझ्याकडून वळली आणि त्या नौबतीकडे गेली
पाहतां पहाता मला ती अजस्त्र नौबत त्याच्या कपाळांत स्थिर दिसली
ती चपापलो...एकाद्या भूतमहालांत असल्यासारखें मला वाटलें
तो म्हातारा पुढें बोलला म्हणून बरें झाले...फार बरें झालें, बेश झाले
फार बरें झाले...असें मी मनांत म्हणत असतांनाच तो पुन्हा बोलूं लागला
तो म्हणाला "त्या नौबतीच्या पाठिमागें फार मोठ इतिहास आहे पाव्हण्या
तो म्हणाला "मराठ्यांच्या साम्राज्याची जीभ होती ही फाटकी नौबत"
तो म्हणाला "त्या नौबतीच्या वरच्या बाजूला कोनाड्यात हात घाल"
मी मंत्रमुग्ध झालों. मी हात घातला त्या वरच्या कोनाड्यात
आणि दांडूसारखीं दोन लांबोडी लाकडे बाहेर काढली हलके
अुजेडांत...ती लाकडें नव्हती हें मला कळून आले. तीं हाडें होती
माणसाच्या पोटऱ्याची तीं हाडें होती...लांबोड्या नळकांड्या त्या
साप डसल्यासारखा मी चपापलो...म्हातारा स्थिर गंभीरच होता.
"हीं हाडें...हीं हाडें...ह्या नळ्या...या दोन तंगड्याच्या नळ्या.
"या टिपऱ्या आहेत त्या फाटक्या नौबतीच्या...
"आणि त्या फाटक्या चामड्याकडें पहा...
मी पुन्हा टक लावून पाहूं लागलो झकाझक...पाहूं लागलो
त्या म्हाताऱ्यानें सांगितले म्हणून मी तिकडें पुन्हा पाहूं लागलो
त्या चामड्याकडें...अुसवलेल्या नौबतीच्या चामड्याकडें पाहूं लागलो
मी सावध झालो तेव्हां तो दमेकरी म्हातारा माझ्याजवळ आलेला दिसला
माझ्या खांद्यावर हात ठेवून तो म्हणाला "हे फाटलेले चामडे...
"हे या नौबतीचे चामडे...कातडे माझ्या...माझ्या...आमच्या
"घराण्यातील...दिवेकर घराण्यातील वंशपुरुषाच्या छाताडाचें आहे"
त्याची टकळी मग सुरू झाली; त्याची जीभ टाळूला लागली
त्याची जीभ माझ्या काळजाला निवडुंगाच्या फडाच आहे अशी वाटली

क्षण विरघळत होते त्या देवीच्या देवळांत...भंगलेल्या गाभाऱ्यांत
आणि इतिहासाला अज्ञात असलेला भाग मला अैकायला मिळाला

चंद्र केव्हां अुगवला आणि सूर्य केव्हां अुगवला हें मला कळलें नाहीं
अुजेड गेला कसा आणि अुजेड आला कसा हें मला ठाअूक झालें नाहीं
म्हाताऱ्याच्या तोंडाचे बोळके वाजत होते मशिनगन सारखें धडाडा
दिव्यत्वाला स्पर्श करणारी सत्यकथा तो मला सांगत होता
हजार कालीदास आणि दोन लक्ष तेरा हजार मनमोहनांना जमणार नाहीं
असें कथानक तो अडाणी थेरडा मला धडधडा अैकवीत होता

तो म्हणाला..."पावण्या! त्याचें असे झालें...सुमारें तीनशें वर्षांपूर्वी
शिवनेरीवर जन्माला आलेला पोरगा नामवी तलवार फिरवूं लागला
गांवागांवातले गुंड त्यानें जमा केले...त्यांना हत्यारबंद केले
प्रथम कुतुबशाही हसली...नंतर अदिलशाही हसली आणि फसली...आणि

पांचवड गावांत हरवा रहात होता...जन्मापासून तो अेका पायानें अधू...
म्हातारा बोलूं लागला...सूर्य आतां करपलेलें थालपीट झाला होता.
हरवाचा स्वभाव कृष्णाच्या पेंद्यासारखा आणि देहही तसाच
पेंद्याची कृष्णावर, तशीच हरवाची महाराजांवर भक्ति होती
गांवातली सगळी बरोबरीची मुलें महाराजांच्या सैन्यांत जमा झाली
पेंद्याप्रमाणेंच 'पंगू' असलेल्या हरवाला कोणीच 'ये' म्हणून म्हणेना
किल्ल्यामागून किल्ले...खेड्यामागून खेडीं महाराज जिंकू लागले...आणि
हरवा मनांतल्या मनांत दुःखी कष्टी होवूं लागला, झुरूं लागला
त्याचे गांवकरी 'दोस्तगण' छाती पुढें काढून त्याच्या पुढून जात
आम्ही यंव् केले! आम्ही त्यंव् केलें! असें त्याच्या समोर म्हणत
नसलेल्या मिशांना पीळ भरून ते त्याला दाखवीत...आणि शिवाय
नसलेल्या मिशांना पीळ भरून झाल्यावर नसलेली लिंबे ते त्यावर ठेवीत
मग ते हरवाला म्हणत..."फुकट रे फुकट तुझा जन्म हरवा"
मग हरवा आपल्या अधू पयाकडे पाहून दुःख भिजवीत बसे...।
रोज तो झुरत चालला, रोज त्याचे दोस्त त्याला हिणवूं लागले

आणि अेक दिवस हरवाला कळलें "राजे रात्रीं मुक्कामाला गावांत आहेत"

महाराज म्हणाले "हरवा! तुझी इच्छा असली तरी तुझा अुपयोग नाहीं"
महाराज त्याला म्हणाले "खरंच हरवा, रणांगणात तुझा अुपयोग नाहीं"
हरवा यावर कांहीं बोलला नाहीं. निमूट बसले त्याचे ओठ
जें त्याला सांगावयाच होते ..जे बोलायचें होते ते सारे डोळे बोलत होते
हृदयाच्या खेळासारख्या...फुगडी सारख्या...त्यांच्या पाण्यांतील पोरी
झटाझट फटाफट हलल्या आणि महाराजांना ते पाहिलें...नीट पाहिलें
त्या डोळ्यांतील निश्चय पाहून महाराजांनीं आपला बेत पार बदलला
खरे पहातां मराठ्यांचा राजा कृतनिश्चयी होता...अैरणी सारखा
परंतू त्यावेळीं हरवाच्या डोळ्यांत महाराजांचा निश्चय वितळून गेला
महाराज सकंप स्वरांत म्हणाले "हरवा! सध्या तूं काय करतोस?"
हरवा अुत्तरला "पत्रावळी करतो पळसाच्या पानाच्या, मी गुरव आहे
शंकराच्या देवळांतली वरली सारी चाकरी मीच करतो,...आणि...
आणि महाराज अुरलेल्या वेळीं देवळांतला नगारा मीच वडवतो..."
आणि...महाराज हंसलें, म्हणाले, पुरे

दिवस कांहीं तेजाच्या साईनिशी प्रातःकालच्या चुलीवर अुताला गेला
हरवा आतां महाराजांच्या सैन्यांत 'नौबतवाला' झाला
खुद्द हुजरातीच्या रिसाल्यांत, दिवसा मागून दिवस गेले








सिंहगडच्या करतलीत; पुरंदरच्या वेढ्यांत; जावळीच्या जाळ्यांत
पन्हाळ्याच्या पाताळयंत्रांत; सुरतेच्या संक्रान्तींत; गोल घुमटाच्या गळ्यांत
'आग्र्याच्या आत्ममंतात; दिल्लीच्या दगलबाजीत; हरेक हडेलहप्पींत
हरवाची नौबत सारखी अघाडावर वाजत राहीली टकाटक
नौबत वाजली भकाभक ! त्या नौबतीच्या ललकारांच्या लाटा
पूर्वेकडून पश्चिमेकडें; अुत्तरेपासून दक्षिणेकडें...शत्रूला गुंडाळीत गेल्या

महाराजांनी राज्याभिषेक करुन घेतला तेव्हां हरवाची नौबत वाजली
मुरारबाजीचे धड लढले कारण हरवाची नौबत झडली
" हरवाची नौबत आहे.. वाजत आहे...," महाराज कौतुकानें म्हणत
"म्हणून आमची हरघडी फत्ते आहे...हरवाची नौबत आमचे स्फूर्तिस्थान"
हरवाचा मान असा वाढला कीं त्याच्या नौबतीवर दसऱ्याला दरवर्षी
जेजुरीच्या खंडोबासारखा बेलभंडार पडूं लागला डावीअुजवीकडून
खुद्द मराठ्यांचा राजा, भवानी समशेरीची त्या नौबतीला वंदगी करी
हरवाच्या हीककतीला हिसाव नव्हता, हरवाचा हिसका आणि हिंमत
( मला गडकरी पछाडीत आहेत आतां ! ) हरवाची कीर्ती वाढत होती !
त्याच्या नौबतीच्या किर्तीला दिशांना दुमडता आले.

काळपुरुष चक्रवर्तींचा चट्टामट्टा करून आला होता...पुढें चालला होता
आणि मराठ्यांचा राजा गुडघी रोगानें रायगडला खाट अडवून पडला होता
अमावस्या आणि पूर्णिमा या दोन वहाणा घालून-दिक्काल चालला होता
पहाटेच्या चंद्राचे फिके पेढे खात, सातारच्या पेहेलवानासारखा
गागाभट्टापाशीं हरवा शिवाजीराजाच्या तब्यतीचा तपास घेवूं लागला जाम
तो विचारीं " क्षत्रीयकुलावतंस शिवछत्रपती महाराज सिंहासनाधीश्वर
आराम केव्हां करणार ?"
तो अष्टप्रधानांना पुसे,भवानी समशेरीचा मालिक गुडघ्यांत सुधारणार तरी कधीं?
मग पंडीतराव त्याला अुत्तर देत...मग सुमंत त्याला अुत्तर देत...
" हरवा ! प्रसंग बाका आहे; महाराजांचा आजार घातक आहे.
हरवा म्हणाला, "मी महाराजांच्या महालांत जाऊन त्यांच्या पायगतीं वसतो.
म्हणजे महाराज खाडकन अुठतील...कडाडा अुटतील नौबत अैकून
हरवा म्हणाला " मी नौवतीवर टिपरी टाकली कीं शिलेदाराचे घोडे
" भिमथडीची पातळ पायाची तट्टे अरवी जनावराशी हुज्जत घालूं लागतात.
" मी नौवत वाजवली कीं किल्लान् किल्ला जवान पोरीप्रमाणें दुर्जीत फुरफुरतो
" मी नौवतीवर टिपरी टाकली की आंतून हरहर महादेवाचा ललकार घुमतो
" माझी नौवत महाराजांना अैकू दे...त्यांच्या कानावर हा ललकार
" पडू दे...कीं सारें वेतास बात होअील, सारे फक्कड होअील !"
महाराज निजले होते...त्यांच्या पायागती त्यांचा आवडता कुत्रा होता
अुशागती दोनही बाजूला नातीं आणि गोतीं वसली होती...दूर बाजूला
वैद्यबुवा वसले होते, वटव्याच्या चार पांच पिशव्या पुढ्यांत होत्या.
महाराज शरपंजरीं पडलेल्या भीष्मासारखें पडले होते...
वेळ रात्रीची होती...आणि महाराजांनी आपल्या पापण्या मिटून घेतल्या
महाराजांच्या डोळ्यासमोरून पाळणा आणि ताटीच्या दरम्यानचे जीवन
शिवनेरी...................................आणि रायगड
आणि...
आणि त्या सकाळीं हरवाच्या नौबतीच्या अकटोविकटो धुमाकुळांत
अकराशे छत्तीस पिसाळलेल्या कुत्र्यांच केकाटणें सरमिसळ झाले झक्,
महाराष्ट्राच्या अश्रूंत रायगड, कितलीतील साखरेसारखा गरम होवून गेला
मराठ्यांच्या राजाला अखेरची वंदगी हरवाच्या नौवतीनं दिली भकभक

हरवा पेंद्यासारखा अन् महाराज कृष्णासारखे, हरवानें अन्न टाकले,
महाराजांच्या मरणानंतर हरवाची अेकसष्ठ दिवस नकूतास
नौबत बंद होती...खामोश होते हरवाचे हातातले काकूड...
आणि शोकाची अनागोंदी अंतःकरणांत थाटोपेते न आटोपेतें तोंच
पन्हाळ्याच्या कैदखान्यांतून साखळदंड तोडून पुढें पुंडसने कुस्करलेले
डोळे केसांना कुस्करीत...भेलांना मुरगाळीत योजनांना वाद देत...निघाले
रायगडच्या रायानें जमिनीवर पाय टाकला, हरवानें नौवतीवर टिपरी
परन्तू नौवतीचें चामडे हुरड्या सारखे पोळून काहनही आवाज काढीना
रायगडला रायानें तळपायाच्या चढावानें स्पर्श केला तेव्हां समोरून
दोन काळीकुळकुळीत मांजरें पांढऱ्या रंगाचे थावडस पक्षी तोंडात धरून गेलीं
कावळा वसलेली कडू निंबाची फांदी पारावरल्या दत्ताच्या परिसरातल्या
समअीवर पडली, दोन मळवट भरलेल्या मुली रायाला ओलांडून गेल्या
रायावर हरवा रुसला, गडावरला रायानें घातलेला धुमाकूळ हरवाला नामंजूर
वडीलकीच्या नात्यानें हरवानें रायाची समजूत घालून पाहिली परन्तु
हें सारें पाहून हरवाची नौबत निमूट झाली हरवाच्या पापण्या लाल झाल्या
हें सारें पाहून रायगडाहून हरवा निघाला नौबत घेवून, आला सज्जनगडला
कालचक्र विधात्याच्या हातांत, कागदी भिरभिऱ्यासारखे फिरत होते
दिवस सोडावॉटर प्रमाणें आणि रात्र रम प्रमाणें अेकमेकांत सरमिसळत होती
तारीख अेक महिना दोन इसवी सन सोळाशे एकूणनव्वदमध्ये
मुकरबखानानें पुण्याजवळच्या कोरेगांवजवळ संभाजीस दगलबाजीनें पकडला
तारीख अकरा महिना तीन इसवीसन तोच... राया रक्ताशीं रंग खेळला
संताजी घोरपड्यांबरोबरच्या भगव्या रिसाल्याच्या आघाडीवर.
हरवाची नौबत अड्म् तुड्म् । गड्म् गुडुम करूं लागली सजवून
ती नौबत वाजूं लागली आणि पुन्हा भिमथडी अुधळूं लागले चौफेर
ती नौबत पुन्हा गरम झाली आणि सह्याद्री थरारला गरमपणानें
ती नौबत वाजली जिंती आणि नागपूर यांच्या दरम्यान...

शत्रूला त्या नौबतीचा दरारा वाटूं लागला
आणि अेक दिवस हरवाला कैद केलें मसालेजंगानें
आणून ठेवलें आपल्या छावणींत हरवाला त्यानें विचारलें,
"आमच्याकडे चाकरीला रहाशील तर दोन गावें, दोन लवंडया..."
हरवा ताडकन् म्हणाला "तुझ्या दोन गांवावर कुत्री टांग वर करोत"
मसालेजंगानें हरवाला चार दिवस अुपाशी ठेवले
आणि पुन्हा अेकदां तोंच सवाल त्यापुढें टाकला...तोच सवाल टाकला
आणि तोंच जवाव त्याला हरवानें सुक्या थोबाडांतून अैकविला...तोच
पंधरावेळां असले सवाल...जबाबें झाले मसालेजंगाचे-हरवाचे
मग अेक दिवस हरवा निर्वाणीनें म्हणाला, "माझ्या नादी नको लागूस...
"माझा मालीक अेकच होता...आणि अेकच !
''मी कुणाचा...दुसऱ्या कोणाचा चाकर नाहीं...मी फक्त शिवाजीचा
" ते गेले तरी मी त्यांचाच चाकर...त्यांचाच चाकर मी...त्यांचाच
"बाल बुड्ढे होईपर्यंत माझ्या नौवतीनें मराठ्यांना मी विजय मिळवून दिला
"माझी नौबत आअी भवानीचा कृपाप्रसाद खुद्द मालीक याला बंदगी देत
"माझ्या नौबतींतून हरहर महादेवाचे ललकार येतात, अरे ती दैवी योजना"
पुन्हा छळ...पुन्हा छळ मसालेजंग आतां चिडला होता
मसालेजंगाचे डोके त्यावेळीं संभाजीला मारणाऱ्या औरंगजेबासारखें झाले










त्याचे म्हणणे येवढेंच होतें कीं ही जादुची नौवत आणि हा नौबतवाला... आपल्या चाकरींत रहावा आणि मग आपली ही जागजागीं फत्ते व्हावी या नौबतवाल्यासाठीं त्यानें अनेक 'अर्वुजी' माणसें खवुजासारखी फोडलीं आणि ते सारे...आतां...

दोन गांवे आणि दोन लवंल्याचे अमीप दाखवूनही हा विफल करीत होता. चिडलेल्या मसालेजंगानें अखेर एका चांदरातीं कैद करून वाहेर काडले त्याला आणि आपल्या शामियान्यांत आणलें, अखेरचे विचारले प्रथम प्रेमानें परंतु "मी जबाव दिला तो दिला मी जबाव अेकास देऊन चुकलो आहे, अखेरच्या, जबूच्या तोंडून हे शब्द संतापाला वेलाव्या मारीत वाहेर पडले "माझी चामडी सोलून तुझ्या नौबतीवर मढवलीस तरी...तरीसुद्धां...तरी या माझ्या तंगड्याच्या टिपऱ्या करून नौबतीवर वडवल्यास तरी सुद्धां तरी त्यांतून 'हरहर महादेव' असाच ललकार वाहेर येईल हवा गरजला...

( खंड पहिला समाप्त )



एका डुकराची आणि सिंहाची गांठ पडली.. तेव्हां डुकर सिंहास म्हणतो— "अरे, मीं पूर्वीं दहा वाघ, सात चित्ते आणि तीन हत्ती जिंकले. आज तुझी वरी गांठ पडली! होऊं दे युद्ध! सर्व देवता तें आज पाहोत!"

सिंहानें हंसून उत्तर केलें—"अरे डुकरा, तूं खुशाल जा आणि सर्वांस सांगत फीर कीं, 'मी सिंहास जिंकलें.' जाणत्यांस सिंहाचें आणि डुकराचें वळ किती असतें तें ठाऊक आहे!"

# कांचनमृग

तो त्या दिवशीं रात्रीं भेटला त्यानंतर पुन्हां कांहीं दिसला नाहीं. दिवस दंग्याचे होते ते. एकटा दुकटा माणूस रात्रीं अपरात्रीं सहसा रस्त्यावर दिसत नसे. काल भेटला तो उद्यां पुन्हां भेटेल अशी खात्री नव्हती त्या वेळीं. म्हणून मी दलालला विचारलें, का रे, तो अलीकडे दिसत नाहीं या नाक्यावर ? पण कानांवर आलें तें असें कांहीं विलक्षण कीं ऐकणाऱ्याच्या छातींत चिंतेचा गोळाच उभा राहावा.

कुठं असेल तो आज ? अंगावर धड कापड नाहीं, केसाच्या जटा झालेल्या, स्मृति विस्मृतींच्या रेघोट्यांनीं चेहरा आक्रसून निघालेला—इतका कीं तिऱ्हाइतास अनुकंपेच्या ऐवजीं भीति वाटावी—! पण डोळे ! त्याच्या डोळ्यांतली ती धगधगणारी आग ! हा इसम कुठल्या तरी भावनेनें पेटला आहे, जळतो आहे असेंच एखाद्याला वाटलें असतें.

आणि त्यानंतर मी ठरविलें. भर दुपारची वेळ होती. गांवदेवीच्या एका आडोशाच्या गल्लींत ती चाळ होती. अगदीं जुनी पुराणी. जिना चढून वर गेलो. तोच होता मजला. चौकशी केली. समजलें, इथेंच तो पूर्वी राहत होता. इतक्यांत दार उघडलें व एक पोक्त गृहस्थ बाहेर आले. ते वडील बंधू होते त्याचे. विषय काढतांच नकळत त्यांचे डोळे ओले झाले. जुन्या आठवणी जाग्या झाल्या. त्या आठवणींभोंवतीं कोळिष्टकं जमलीं होतीं तीं या निमित्तानं दूर झालीं. नजरेपुढं येतांच मनाला कष्ट होतात म्हणून कडीकुलुपांत बंद करून ठेवलेलें एकेक चित्र बाहेर यायला लागलें. चित्राचे विषय, आकृति, त्यांची अंगलट, त्यांतल्या भावना, रंग, त्यांची लयदारी—! चित्रावरून डोळे हालेनात ! कसे नी किती कुंचले नाचले, खेळले, बागडले असतील त्या हातभर चौकोनी अंगणांत ! इंद्रधनुष्याचा भुगा करून तर या चित्रकारानं रंग तयार केले नसतील !

दोन खणी खोली. आंत दमट काळोख भरलेला, आवतींभोंवतींच्या काबाडकष्टानं अहोरात्र कण्हणारा संसार ! इन मिन एक खिडकी. तीहि गल्लींत वाळत घातलेल्या कपड्यांनीं बंद झालेली. चुकून केव्हां तरी बाहेरच्या आभाळाचा तुकडा दिसायचा ! आणि अशा ठिकाणीं हा कलेचा महान् उपासक, एका दिव्य कलेच्या होमकुंडापुढें धून लावून बसलेला हा हटयोगी—

कसली साधना करीत होता तो ? कुठल्या कांचनमृगानं याच्या अखंड प्रतिभेला वेड लाविलें होतें ? का, कुणासाठीं, कशासाठीं हा आपल्या कुडींतले प्राण नि कुंचल्यांतले रंग पाखडीत होता ?



चित्रकार—[illegible]ुलकर

वनवासी पतिव्रतेच्या डोळ्यांतून अश्रूंनीं धुऊन निघालेलें काजळ, आपल्या पित्यासाठीं सर्वस्वावर पाणी सोडणाऱ्या पतीच्या धमनींतलें नीळ, आपल्या प्रियपत्नीच्या संसाराचं उन्हाळा करून वडील भावाची पाठराखण करणाऱ्या पुत्राच्या जटेंतली राख—काजळ, नीळ, राख !—आणि या तिन्ही विरागी नि विरक्त स्थायी रंगांची त्रेधा उडविणारे "कांचनमृगा"चे ते चंचल, मोहक नि भडक रंग !

उद्यां चित्रांतले रंग उडून जातील. चित्राचा कपटा चुरळ नि वाळवी खाऊन टाकील. चित्राचें नांव आणि चित्रकाराची सही यांची पुसटशी रेघही राहणार नाहीं. पण ज्या सहृदय डोळ्यांनीं त्या चित्रांचा आनंद आपल्या हृदय संपुटांत भरून ठेवला आहे तो आनंद मात्र काळाच्या बापासहि नष्ट करतां येणार नाहीं ! कारण या वीतभर हृदयांतच चराचर विश्वाला जन्म आणि अर्थ देणाऱ्या कलेचें अधिष्ठान असतें.

तें सारं खरं, पण कुठं आहे तो माणूस ? कुठं असेल तो चित्रकार ? कुठं गेला तो कलावन्त ? दोन वर्षांपूर्वी याच फुटपाथवर भर अपरात्रीं एका निश्चळ नजरेनें विजेच्या खांबाला टेकून तो उभा होता—

दोन वर्षं होऊन गेलीं—तो फुटपाथ, तो विजेचा खांब आणि ती अपरात्र मात्र अजून जशाच्या तशी आहेत आणि हाच कसा आणि कां दिसत नाहीं तिथं ? पेटलेल्या कापरासारखा भक्कन् हवेत उडाला का जळत्या उदबत्तीसारखी राख झाली का हिमालयासारखा जागणाऱ्या आगींतून वाफ झाली त्याची ?

त्याचा ठावठिकाणा त्या त्या चित्राखालीं आढळणाऱ्या "चित्रकार चिमुलकर" या सहीला तरी माहीत असेल का ?

अनुक्रमणिका







## सांजवात

[ लेखक : वि. स. खांडेकर
प्रकाशक : देशमुख आणि कं.
१९१ शनिवार, पुणे. ]

अर्धतपाच्या दीर्घ मुदतीनंतर श्री. वि. स. खांडेकर यांचा हा कथासंग्रह बाहेर पडलेला आहे. पुस्तकाच्या शेवटीं जोडलेल्या 'दोन शब्द' या वीस पृष्ठांच्या प्रस्तावनेंत आपल्या या पड्वार्षिक मौनाची कारणमीमांसा त्यांनीं केलेली आहे. युद्धकाळांत आणि त्यानंतर स्वातंत्र्यकाळांत समाजाची जी नैतिक अधोगति झाली आणि सर्व प्रकारचे सामाजिक अन्याय, विषमता यांनीं जी शीग गांठली त्यामुळें आपल्याला जोराचा धक्का बसला, आपल्या जीवनाचीं मूल्यें बदललीं, जुन्या निष्ठा ढासळून गेल्या आणि त्याचा परिणाम म्हणून मनांत जी अनिश्चिति आणि अस्वस्थता निर्माण झाली त्यांतून ही वाङ्मयीन निष्क्रियता उत्पन्न झाली होती असें त्यांनीं म्हटलें आहे. हे 'दोन शब्द' म्हणजे या सर्व सामाजिक दैन्याचें वक्तृत्वपूर्ण भाषेंत केलेलें वर्णन आहे. समाजरचना ही आतां 'समाजसत्तावादा'च्या पायावर झाली पाहिजे; पण त्याबरोबरच यंत्रयुगाबरोबर आलेली जडता, यांत्रिकपणा, अमानुषपणा यांच्या जाचांतून मानवी आत्म्याची मुक्तता केली पाहिजे इत्यादि प्रकारचीं आपल्या जीवनाचीं अस्पष्टपणें दिसणारीं नवीं मूल्यें त्यांनीं त्यांत दिग्दर्शित केलेलीं आहेत. भोंवताली चाललेला प्रचंड सामाजिक अधःपात पाहून त्याची भीषणता परिणामकारकपणानें वर्णन करणारा एकादा ...मेल झोला आपणांत हवा आहे अशी इच्छा प्रदर्शित करून स्वतःच्या त्या बाबतींतल्या 'दौर्बल्या'ची प्रामाणिक कबुलीहि त्यांनीं दिलेली आहे. खांडेकरांच्या जुन्या जीवनश्रद्धा ढासळल्या आहेत पण नव्या जीवनश्रद्धांनीं अजून त्यांची जाग घेतलेली नाहीं. "अंधारांतच का होईना, या नव्या जीवनश्रद्धांचा शोध करण्याची मी जी दुबळी धडपड करीत आहें, तिचें पुसट प्रतिबिंब" या संग्रहांतल्या कथांत वाचकांना आढळेल असें त्यांनीं म्हटलें आहे. खांडेकरांच्या मनःप्रवृत्तींत झालेल्या बदलांचा मागोवा घेणें स्वागतार्ह वाटेल यांत शंका नाहीं.

साहजिकच या संग्रहांतील बहुतेक कथा या कुठल्या ना कुठल्या तरी सामाजिक पार्श्वभूमीवर चित्रित केलेल्या आहेत. सामाजिक अन्यायांची जाणीव हा त्यांचा आत्मा आहे. विषमतेनें 'तिभंग' झालेल्या समाजाचें चित्रण त्यांनीं 'तीन जगें' या गोष्टींत केलेलें आहे. पराकाष्ठेच्या सामाजिक अधःपातांत देखील मानव्याचे, सुहृदयतेचे कांहीं प्रकाशकिरण दिसतात आणि तेवढी आशा जगावनावर पुन्हा श्रद्धा बसविण्यास पुरशी असते याचें वर्णन 'दोन मोसंबी' या गोष्टींत आहे. 'सांजवात' या कथेंत 'सांजवातीं' मागें दडलेली हृद्य अशी मातृहृदयाची कठोर कहाणी दिसून येते. "सोन्याची गाडी" ही कौटुंबिक गोष्ट आहे. मंत्रीपदावर चढलेल्या गृहस्थाचा आपल्या पुत्राच्या अधःपातामुळें कसा कठोर मनोभंग होतो याचें चित्रण या कथेंत आहे.

खांडेकरांच्या कलेविषयीं टीकाकारांचें जें मत आहे त्यांत बदल व्हावा असें मात्र या संग्रहांत कांहीं नाहीं. सूक्ष्म मनोविश्लेषण अतिशय परिणामकारकपणें पण कलात्मक रीतीनें करणाऱ्या आजच्या नवीन कथालेखकांच्या काळांतील वाचकाला हा संग्रह थोडासा पुनः पुन्हा वाचावासा वाटेल.

---

## स्मरणयात्रा

[ लेखक : आचार्य कालेलकर
प्रकाशक : देशमुख आणि कं.
१९१ शनिवार, पुणे. ]

अगोदरच सिद्धहस्त लेखक म्हणून आचार्य कालेलकर यांची ख्याति झालेली आहे. त्यांतून त्यांचें व्यक्तिमत्त्व हें अनेक कारणांनीं लोकांना आकर्षक वाटणारें असें आहे. अशा व्यक्तीकडून आपल्या जीवितेतिहासाचीं पानें लिहिलीं जाणें ही खरोखरच आनंदाची गोष्ट समजली पाहिजे. चरित्रें किंवा आत्मचरित्रें वाचतांना त्या चरित्रनायकाच्या कालखंडांतील सूक्ष्म सामाजिक आणि कौटुंबिक प्रवाहांवर प्रकाश पडत असतो आणि सामाजिक इतिहास साकल्यानें जरी नाहीं तरी अस्फुटपणानें त्यांतून प्रतीत होतो. चरित्रग्रंथापेक्षां आत्मचरित्रांत हृद्यपणा आणि रसवत्ता जास्त असते हा नेहमीचाच अनुभव आहे. आचार्य कालेलकरांसारख्या रसिक, संवेदनक्षम, विवेकी आणि तत्त्वचिंतनशील गृहस्थांबरोबर त्यांच्या शैशवांत आणि किशोरावस्थेंत प्रवास करून येणें हें खरोखर मनोरंजक तसेंच उद्बोधकहि आहे.

नुसता आठवणींचा संग्रह करणें हा लेखकाचा यांत हेतु नाहीं. आपल्या भूतकालाकडे त्यानें चिकित्सक आणि पृथक्करणात्मक दृष्टीनें पाहिलेलें आहे. अनेक घटनांतून आपल्या मनावर कसकसे संस्कार होत गेले हे त्यानें त्यांत विशद केलेलें आहे. गिरनिराळ्या घटना–प्रतिघटनांच्या संस्कारांतून माणसाचा मनःपिंड तयार होत असतो. त्यांतून बालपणीं होणारे संस्कार अनेकदां चिरस्थायी स्वरूपाचे असल्यामुळें जास्त महत्त्वाचे ठरतात. आठवण सांगून झाल्यानंतर कांहीं ठिकाणीं मोडक्याच पण मार्मिक शब्दांत तिचें जें तात्त्विक परिशीलन केलेलें आहे तें विचारप्रवृत्त करणारें आहे.

पण लेखकाची ही विवेचक बुद्धि कोठेंच डोईजड झालेली नाहीं. त्यांतला वैचारिक भाग हा अगदीं सहाजिकपणानें आलेला आहे. त्याला रुक्षतेचा भास कुठेंहि होत नाहीं. बहुतेक आठवणी कांहींतरी खुसखुशीत, माहितीनें, नर्मविनोदानें, भरलेल्या आहेत. कित्येक ठिकाणीं त्यांत आंतर्भूत असलेल्या स्वाभाविक विनोदानें त्या हसावयासहि लावतात. बालमनाचीं विविध अंगोपांगें, सर्वच लहान मुलांना असलेल्या विशिष्ट संवयी, त्यांचीं कल्पनासाम्राज्यें, त्यांचे खेळ, त्यांचे हर्षामर्ष, यांचीं अतिशय हृद्य वर्णनें सर्वत्र विखुरलेलीं आहेत.

वेड लावणारीं सृष्टिवर्णनें लिहिण्यांत कालेलकरांचा हातखंडा आहे. 'लाटांचें तांडव,' 'भक्तिकुसुमें' इत्यादि त्यांचीं पुस्तकें ज्यांनीं वाचलीं असतील त्यांना हें ठाऊक आहे. प्रवासवर्णनें किंवा सृष्टिवर्णनें हा या पुस्तकाचा विषय नाहीं. पण मधूनमधूनच ज्या ज्या वेळीं असा प्रसंग येतो त्या त्या वेळीं कालेलकरांच्या प्रमत्त भाषाशैलीबरोबर आपण वाहून जातों.

आयुष्याच्या उताराला लागल्यानंतर शैशवाकडे, बाल्याकडे सिंहावलोकन करून पाहणाऱ्या कालेलकरांचें या आठवणींतून सूचित होणारें व्यक्तिदर्शनहि आकर्षक आहे. लहानपणीं नेणतेपणानें एकाद्या भिकाऱ्यावर झालेला अन्याय त्यांना या क्षणापर्यंत मनाला खातो. अंमलदाराचा मुलगा असल्यानें कळत न कळत जे इतरांवर अन्याय झाले असतील त्यांची माफी लेखक मागतो. निर्भीडपणानें आपलीं असत्कृत्यें, आपले असद् विचार लेखकानें पुढें मांडलेले आहेत. झालेल्या पापांचा त्यानें जागजागीं झाडा दिला.

असून अन्याय झालेल्या व्यक्तींची क्षमा मागितली आहे. ज्यांनीं बुद्धिपुरःसर वा अभावितपणें कांहीं सुसंस्कार केले त्यांच्याविषयीं भरल्या अंतःकरणानें कृतज्ञता व्यक्त केलेली आहे. या आठवणींत प्रतिबिंबित होणारें लेखकाचें नितळ, पापभीरु मन हें वाचकाला आकर्षून घेतें.

अशा विपुल आठवणींनीं भरलेले आणि आपलें संपूर्ण जीवन चित्रित करणारे यापुढील खंड आचार्य कालेलकर, लवकरच प्रसिद्ध करतील अशी आशा आहे.

---

## समाधी व इतर सहा गोष्टी

[ लेखक : 'दिवाकर कृष्ण,
प्रकाशक : देशमुख आणि कं.
१९१ शनिवार, पुणे. ]

मराठी लघुकथा लेखकांच्या दुसऱ्या पिढींत 'दिवाकर कृष्ण' चमकून गेले होते. लघुकथांच्या क्षेत्रांत आज बरीच मोलाची भर पडत आहे आणि पूर्वींच्या विषयांतून आणि तंत्रांतून ती बाहेर पडूं पाहत आहे. सूक्ष्म मनोवगाहनाचीं सामर्थ्य असलेले कांहीं नवीन लेखक आज पुढें आलेले आहेत आणि त्यांच्या लघुकथा हा आजच्या नियतकालिक वाङ्मयांतला प्रमुख भाग झालेला आहे. या काळांतून मागें नजर टाकून एका जुन्या लेखकाच्या लघुकथांचा संग्रह वाचक हौसेनें वाचतील. भावनाशील मनांचा निरनिराळ्या परिस्थितींत होणारा कोंडमारा हाच बहुतेक गोष्टींचा विषय आहे. सर्वच चित्रण हलुवारपणें आणि सहानुभूतीनें केलेलें आहे.

डोळ्यांत भरण्यासारखा एक अतिशय ठळक दोष मात्र या गोष्टींत दिसून येतो. प्रत्येक गोष्टींत करुणरसाची तार जास्तींत जास्त खेंचण्याची लेखकानें जणूं काय प्रतिज्ञा केलेली आहे असें वारंवार वाटतें. एकाद्या गोष्टींत हें क्षम्य होईल पण मानसिक कोंडमाऱ्यामुळें दर गोष्टींतल्या माणसांचे धडाधड मृत्यु होतात असें दाखविल्यावांचून लेखकाला राहवत नाहीं असें पाहिलें म्हणजे ही एक विकृती तर नाहीं असें वाटूं लागतें. सर्व कथा अशा अकारण विषण्णतेंत समाप्त होतात. साहजिकच या अतिरेकी करुणरसामुळें गोष्टींची परिणामकारकता कमी होते. तरी पण सुटसुटीत सोपी आणि ऐटदार भाषाशैली कथा-विषयांतला हलुवारपणा यांसाठीं वाचक कथासंग्रहाचें अवश्य स्वागत करतील.

चकाकी कायम टिकविणारे रोल्डगोल्डचे दागिने मिळण्याचें
जुनें व विश्वासू टिकाण म्हणजेच

# मॅजेस्टिक

## ज्युवेलरी हाउस





| डिझाइन नं. | किंमत रु. आ. | |
|---|---|---|
| M 101 | ५-४-० | जोडी |
| M 102 | ६-१२-० | ” |
| M 103 | १४-१०-० | ” |
| M 104 | १३-८-० | |
| M 105 | १३-८-० | |
| M 106 | १६-४-० | |
| M 107 | ३-८-० | जोडी |
| M 108 | ३-०-० | सेट |
| M 109 | ३-०-० | ” |
| M 110 | ४-८-० | |
| M 111 | ५-१२-० | जोडी |
| M 112 | ६-०-० | ” |
| M 113 | ३-१२-० | ” |
| M 114 | ४-८-० | ” |
| M 115 | ८-८-० | |
| M 116 | २-०-० | जोडी |
| M 117 | ६-८-० | |
| M 118 | ६-१२-० | |
| M 119 | ८-८-० | |
| M 120 | [illegible]-८-० | |

● ★ ●

यांशिवाय इतर अनेक प्रकारचे आधुनिक फॅशनचे दागिने मिळतील.

मॅजेस्टिक सिनेमासमोर, गिरगांव, मुंबई नं. ४.

अनुक्रमणिका

विन्सेंट रोड, दादर
१६ जून १९३७

प्रिय गोपू,

अखेर एकदांचा सुखरूप मुंबईला येऊन पोहोंचलो. न पोहोंचायला काय झालं म्हणा ? "बोरगांव" चे अपघात कांहीं प्रतिदिवशीं होत नसतात. दुसरा कांहीं गोड अपघात गाडींतल्या गाडींत होतो कां म्हणून वाट पहात होतो; पण असे अपघात कादंबरींतल्या नायकांना फक्त होत असतात. आपल्या दैवी कांहीं असे अपघात लिहीलेले दिसत नाहींत. तसं म्हणशील तर माझा डबा कांहीं अगदींच "कोरडा" नव्हता. नागपूर ते मुंबईच्या रात्रभरच्या आणि पांचशेवीस मैलांच्या प्रवासांत चारदोन अपघात होण्याइतकी तरी सामग्री माझ्या डब्यांत निश्चित होती. पण आमच्या दैवीं अपघात आले ते अगदीं उलट प्रकारचे. माझ्या शेजारीं बसलेली ती बुरख्यांतली बिबी आठवते तुला ? आणि तिचें ते मेंदीनं रंगवलेलें गोरे हात ? तिचे तेवढें गोरे तळवेच काय ते आपल्याला दिसत होते. आणि तिचे बुरख्याच्या जाळीशीं एकाद्या पिंजऱ्यांतल्या पांखरासारखे फडफडणारे काळे डोळे ! गर्दीच्या पहिल्या रेट्यांत ती माझ्यापाशीं माझ्याच पथारीवर येऊन पडली, आणि पलीकडे पडला तिच्याबरोबरचा दाढीवाला म्हातारा. चप्पू तेव्हां हळूंच म्हणालासुद्धां कीं मध्याच्या जिवाची मुंबई इथेंच होणार ! कर म्हणावं आतां वाटेल तेवढा मुसलीम मास कॉन्टॅक्ट ! मी कोण 'कॉन्टॅक्ट' करणार म्हणा ? गर्दीनंच तिला आणि तिची पाठराखण करत तिच्या मागोमाग आलेल्या म्हाताऱ्याला जागच्याजागीं पैस वसविलं होतं.

गाडीचे धक्के आणि गर्दीचे धक्के...मला वाटत आनंद आहे ! तुम्हां सगळ्यांच्या तोंडाला पाणी सुटलेलं मला दिसत होतं. सुमनराव (वाचायला वाटलं तर हे पत्र दाखव) गुणगुणला, "मला मुंबईला जायचं तिकीट काढून कीं हो द्याना !" बटाट्या म्हणाला, "मध्याच्या जागीं आपण असतो तर बरें झालं असतं." तूं म्हणालास, "मध्याची जागा मिळायला बी. एस्. सी पहिल्या वर्गात पास व्हावं लागतं, मेडीकल कॉलेजांत प्रवेश मिळावा लागतो आणखी मध्यासारखा चेहरा असावा लागतो ! नाहींतर लेका बटाट्या, तुझ्यासारखी बळी फर्लांगभरावर दिसली तर एखादी हिंडींबासुद्धां सूंबाल्या करायची !"

तुमच्या सगळ्यांचा खिदळण्याचा आवाज अजून माझ्या कानांत घुमतो आहे. गाडीनं फलाट सोडला तेव्हां वाऱ्यावर उडवले जाणारे तुमचे पांच सहा रुमाल अजून माझ्या डोळ्यांसमोर फडफडताहेत. अगदीं गाडी वळण घेईपर्यंत मान बाहेर काढून मी तुमच्याकडे पाहात होतो. (खरं सांगतो, शेजारच्या गोषांतल्या सुंदर स्त्रीलासुद्धां मी त्यावेळीं पार विसरून गेलो होतो) गाडी बरोबरच कांहीं वेळ तुम्ही चाललात. मग सारेच्या सारे फलाटाच्या शेवटीं चवड्यावर उभे राहिलात. जिराफ देशपांडेचं डोकं मला बराच वेळ दिसत होतं. मग तुमचे हलणारे हात, मग नुसता जिराफ देशपांड्यांचा हात आणि मग क्षणार्धांत कांहीं नाहीं ! अगदीं सेकंदभरांत सारं स्वप्नवत् झालं. अगदीं दीडदोन मिनीटापूर्वी मी तुमच्याशीं बोलत होतो. तुम्हीं माझे निरोप घेतांना हात दाबत होतात. तो स्पर्श अद्याप माझ्या हातावर खुणा ठेवून होता, पण तुमच्यापैकीं प्रत्येकजण आतां माझ्या डोळ्यांआड झाला होता. आणि आपलं चार वर्षं एकत्र घालवलेलं आयुष्य नि त्यांतले सारे आनंदाचे प्रसंग, ती रात्र, रात्रीं केलेली जाग्रणें, त्या सहली, ते बरोबर पाहिलेले बोलपट, केलेल्या टवाळ्या, गणपति उत्सवाचे ते पावसाळी दिवस ! दिवाळींतले थंड, सुगंधित नितळ दिवस, परिक्षेच्या मोसमांतलं श्रमाचं उष्ण वायुमान ! नागपूर नगरांतले ते चार वर्षांचं संबंध आयुष्यच जणू आतां नेहमींकरितां मागे पडत होतं. तुमचे हलणारे हात पाहतांना कितीतरी गोष्टी मला आठवल्या आणि सद्गदित झाल्यासारखं वाटलं. शेवटीं जिराफ देशपांडेनं बटाट्याला लहान पोरासारखं कडेखांद्यावर उचलून मला "टा... टा" करायला लावलं, त्याचं मला हंसूहि येत होतं. मला वाटलं, मुंबईला कितीतरी गोष्टी मी पाहिन, पण तुमच्यासारखे मित्र मला मिळतील कां ?

मी जरासा Sentimental होतो आहे नाहीं कां ? पण तेव्हां मला Sentimental झाल्यासारखं वाटलं खरं. गाडीला दोनचार उलट सुलट झोके बसले तेव्हां ती यवनसुंदरी जवळ जवळ माझ्या मांडीवर कलंडली पण, माझं तरिहि तिच्याकडे लक्षच नव्हतं.

—अरेच्या ! त्या बुरख्यांतल्या बाईचं प्रकरण तसंच सांगायचं राहिलं. तर मी म्हणत काय होतो कीं तुमच्या विरहावर तिच्या संगतींचं 'औषध' कांहीं अगदींच वाईट नव्हतं. तुमच्या मनांत गाडी निघतांना जे विचार होते तसेच कांहींसे माझ्याहि मनांत होते. आणखी त्या बुरखेवालीच्या मनांतसुद्धां हेंच विचार नसतील कशावरून ? गाडीचे धक्के खात असतां तिनं "आंग-चोरपणा" मुळींच केला नाहीं. ती माझ्याकडे बुरख्यांच्या जाळींतून अगदीं "आडपडदा" न ठेवतां पहात होती, हें सुद्धां मी हेरलं होतं. मला वाटलं हिची वृत्ती कांहीं असहकाराची नाहीं म्हणून मी थोडं पलीकडे सरकून माझ्या पथारीवर तिला आणखी जागा करून दिली. पण आतां मात्र भलतंच ! आजचं सुख तिच्या सांगती असलेल्या त्या दाढीवाल्या थेरड्याला मुळींच पाहवलं नाहीं. वर्धाचं ठाणं येतं न येतं तों तिला पलीकडे करून तोच माझ्यापाशीं येऊन बसला. आणखी मग रात्रभर मी त्याच्याच लाथा खात होतो. एकीकडून त्याच्या लाथा, आणि दुसरीकडून एका शीखाच्या लाथा !

बुरखापद्धत आणि स्त्रीवर्गाची पराधीनता ह्याविषयीं तेव्हां माझ्या मनांत अनेक विचारतरंग उठले. एखाद्या सुंदर मुलीला बुरख्यांत डांबून ठेवणं हा त्या मुलीवर व भोंवतालच्या मुलांवर केवढा अन्याय आहे ? (बुरख्यांतली ती बाई मुलगी आहे व सुंदर आहे ह्याविषयीं बुरख्याला न जुमानतां मी स्वतःची निश्चिती करून घेतली !) स्त्रियांचें बुरखे निर्बंधानं दूर कां केले जाऊं नयेत ? सौंदर्याची संपत्ति दडवून ठेवण्याचा हा चोरटा व्यवहार नव्या हिंदुस्थानांत कां सहन केला जावा ? इत्यादि...इत्यादि !

बाकी बुरखापद्धत निर्बंधानं नष्ट केली तर तो जितका वर ठरेल, तितकाच शापहि ठरेल म्हणा ! कारण सुंदर स्त्रियांचं कुरूप स्त्रियांशीं असणारं व्यस्त प्रमाण ध्यानांत घेतां, बुरख्यानं जेवढं सौंदर्य लपवलं, त्यापेक्षां कुरूपताच जास्त डोळ्याआड करून ठेवली त्यांत शंका नाहीं !

असो. एकूण काय कीं आमचा हा नागपूर-मुंबईचा प्रवास अगदीं अपघाताशिवाय पार पडला. प्रवासांतले शीर्षासन, मयुरासनाचे प्रकार सांगायलाहि मनोरंजक नव्हते आणि ऐकायलाहि मनोरंजक नाहींत. त्या यवनीची ती तशी Tragedy झाली ! आज ह्या मुंबापुरीच्या भूमीवर अगदीं आंबलेल्या अंगानं आणि ओसाड मनानं उतरलो. जेवणखाण केलं आणि तुला पत्र लिहायला बसलो. कॉलेज सुरू व्हायला अजून दोनचार दिवस अवकाश आहे. त्यापूर्वी कॉलेजची तोंडओळख करून घेण्यासाठीं तिकडे आजउद्यां फेरफटका मारून येईन. म्हणजे आतां गंमत पहा सायन्सचा पदवीधर झाल्यावरहि पुन्हा आतां आमचा पहिल्या वर्षापासून प्रारंभ. तुझंहि लॉचं प्रथम वर्ष सुरूं होणार म्हणा ! म्हणजे हे आपलं

अनुक्रमणिका




म्हातारपणांतलं पोरपण सुरु झालं म्हण. भेद इतकाच कीं तुझं लॉचं प्रकरण दोन वर्षांत आटोपणार आणि हें मेडिकल कॉलेजचं बाळंतपण मला साडेचार-पांच वर्षं पुरणार ! हा कोर्स कठीण असतो गोप्या ! परिक्षेंत एक दोन कच्चू खाण्यांत इथें कुणी कमीपणा मानत नाहींत ! म्हणजे, काय कीं तूं मोठा विधीज्ञ होऊन धंदा करशील तरी मी आपला राहीन विद्यार्थीच ! एका परीनं खूप वेळां विद्यार्थी राहणं हिती आनंदाचं आहे ! पुढें तूं लक्षाधीश होशील, उच्च न्यायालयाचा न्यायाधीश होऊं शकशील, देशाचा पंतप्रधानहि होऊं शकशील कदाचित, पण पुन्हां जन्मांत कॉलेजचा विद्यार्थी मात्र कधींच होऊं शकणार नाहींस. हा आनंद एकदा संपला कीं संपला ! माणूस पुढच्या आयुष्यांत काय वाटेल ते होऊं शकेल. परीक्षेला न बसतां मोठेपणाच्या बळावर विश्वविद्यालयाकडून चोपून वाटेल त्या पदव्याहि मिळूं शकतील, पण त्याला कधीं विद्यार्थी होतां यायचं नाहीं. समजलास गोप्या, म्हणूनच मेडिकलची हीं चारपांच वर्षं जितक्या परींनीं मला भोगून घेतां येतील तितक्या परींनी तीं मी भोगून घेणार आहे. पुन्हां कोण लेकाचा तरुण होऊं शकेल ! Cheerio गोपू ! •

वटाट्या, जिराफ देशपांडे, डेंगरुं, गोंद्या, प्रभाकर सार्‍यांना नमस्कार सांग. आणि त्यांना म्हणावं मला पत्र पाठवीत चला.

वहुत काय लिहिणें ?

स्नेहांकित
मधू.

---

व्हिन्सेंट रोड, दादर
२४ जून १९३७

प्रिय गोपू,

तुझं पत्र पावलं वर्गांत प्रत्यक्ष न जातांच तुझी उपस्थिति लागतेस म्हणतोस ? मग काय् तुम्ही बाहेर बालेंदाच्या चहाच्या दुकानांत् वसून नुसत्याच चकाट्या पिटत असता कीं काय ? नागपूरचं लॉ कॉलेज म्हणजे खरंच मोठी गंमत आहे ! आमच्या मेडिकल कॉलेजचा खाक्या मात्र फार वेगळा आहे. फिजिऑलॉजी आणि ॲनॉटोमीचा आमचा रामरगाडा चांगला जोरानं सुरूं झाला आहे. थोडंहि दुर्लक्ष झालं कीं संपलंच ! अगदीं मानेवर खडा ठेवून आणि पूर्वजांना स्मरुन अभ्यास केला तरी इथं पुष्कळदां गोता बसतो. मग चालढकल केली तर मुडदाच पडेल. आपल्या नागपूरचा सोहोनी आठवतो तुला ? गेली बारा वर्षं तो मेडिकल कॉलेजांत आहे. म्हणजे एकाद्या मुलाची इंग्रजी पहिलीपासून बी. ए. पर्यंतचा सगळा अभ्यास पुरा व्हावयास पुरेल इतका वेळ सोहोनीनं नुसत्या मेडिकल कॉलेजांतच काढला आहे.

मी आजपर्यंत सारखा पहिल्या श्रेणींत येतो हा एक मोठा जाचच होऊन बसला आहे. नापास व्हायचीं तर त्यामुळें सोय नाहींच. पण खालीं यायची देखील सोय नाहीं. त्यामुळें अभ्यासाच्या घाण्याला मी प्रथम-पासूनच स्वतःला जुंपून घेतला आहे. अभ्यास संभाळून करतां येईल तेवढी जिवाची मुंबई केल्याशिवाय मात्र मी कधींच राहणार नाहीं. ह्या विषयांत मन्मथ बॅनर्जीला मी गुरुस्थानीं ठेवला आहे. मन्मथ आठवतो कीं नाहीं तुला ? आपल्याला तो दोन वर्षांनीं पुढं होता. इथं मेडिकल कॉलेजांत त्यानं चांगलं नांव केलं आहे. मन्मथचा कपड्यांचा, सफाईदार इंग्रजीचा, डौलदार वागण्याचा झोंक मेडिकल कॉलेजांतहि उठून दिसाव इतका आहे. पैसे तर

तो दोन्ही हातानीं उधळत असतो. "Spend more and you get more." (पैसे वेचा म्हणजे अधिक पैसा मिळेल.) हे त्याचं ब्रीदवाक्य आहे.

कर्ज आणि पोरी मन्मथच्या जणूं पांचवीला पूजल्या आहेत. आकंठ कर्जांत उभ्या असलां तरी त्याच्या तोंडावर कधीं चिंतेची रेषा नसते. खावं, "प्यावं" कर्ज करावं, चैन करावी पण कधीं नापास मात्र होऊं नये असा त्याचा खाक्या आहे. वाटेल तितकं हुंदडून पुन्हां परीक्षा तो चांगल्या रीतीनं कसा पसार होतो हें पुष्कळांना मोठं कोडं वाटतं. पण तो मुलगा जितका उनाड तितकाच बुद्धीवान् आहे, आणि जितका चैनी तितकाच निश्चयी नी उद्योगी आहे. आजपर्यंत मी पुष्कळच सरळपणानें वागलो व त्या सरळपणाचीं फळंहि भोगलीं. ह्यापुढें आपण मन्मथला गुरु मानणार. पण अजून "कशाला" कांहीं पत्ता नाहीं. नुसती सुडदेगिरी करतो आहे. आम्हां प्रथमवर्षीयांचा नर्सेसशीं ओढून ताणून आणल्याशिवाय कांहीं संबंधच येत नाहीं. वर्गांत पोरी आहेत त्या बहुतेक "क्विनाइन" सारख्या आहेत आणि त्यांचीं लग्नं झालीं नाहींत म्हणूनच त्या मेडिकल कॉलेजांत आल्या आहेत. त्यांनीं लग्नं केलीं असलीं तर एकच माणूस निकालांत निघाला असता. पण त्या डॉक्टर झाल्यावर शेंकडों माणसं निकालांत निघणार आहेत, त्यांच्या औषधामुळं आणि औषधासारख्याच चेहऱ्यामुळं. मेडिकल कॉलेजचं नांव तुम्ही पुष्कळ ऐकलं असाल. तशी गंमत पुढें येणाऱ्या वर्षांत पुष्कळशी असतेहि, पण अजून माझं आयुष्य अगदीं उजाड आहे. मी सुद्धां ऐकत होतो की मुंबईला खूप गंमती आहेत पण माझ्या वांट्याला अद्याप कांहींच येत नाहीं.

तुझा
मधु

✦

व्हिन्सेंट रोड, दादर
३ जुलै १९३७

डियर गोप्याजी,

तुझं उपदेशात्मक पत्र पावलं. घरून मला कमी कां उपदेश मिळतो म्हणून तूंहि मला उपदेश करायला निघालास! वकीली सल्ला द्यायची इतकी घाई कशाला करतोस गोप्या! मी मन्मथ बॅनर्जीला गुरु करणार आहे म्हणजे मी मोकाट सुटणार आहे अशांतला बिलकूल भाग नाहीं. मन्मथसुद्धां लोकांना वाटतो तितका मोकाट मुलगा नाहीं गोप्या. त्याची वेडंतसुद्धां "पद्धत" आहे. तो दारू पितो पण कधीं झिंगत नाहीं, पोरींबरोबर झिम्मा खेळतो पण लग्नाच्या फंदांत फसत नाहीं आणि मनसोक्त उनाडक्या करतो पण कधीं नापास होत नाहीं. तो ऋण करतो पण कधीं कोणाचे पैसे बुडवीत नाहीं. आणि "अधिक पैसे वेचा म्हणजे अधिक पैसे मिळतील" हे त्याचं धोरण त्याच्या विषयांत तर एकशेंदहा टक्के यशस्वी आहे! अगदीं नाहीं तिथें आणि नाहीं तसे त्याला पैसे मिळतात. "'रमी' आणि 'ब्रिज' च्या खेळाचा तर तो विजेता बाजीरावच आहे पण इतरांना नेहमीं खड्यांत घालणारीं कोडीं आणि घोडीं ह्याला मात्र अचूक करभारहि देतात! पोरींचं तर कांहीं विचारूं नकोस. हसत्या धांवतात त्याच्यामागें. अर्धांगली काय अन् पारशी काय अन् काय काय! मन्मथ खरोखरच मोठा आकर्षक, मोहक आणि बुद्धिमान् पोरगा आहे. नुसत्या गुणांच्या बळावरच नव्हे तर आपल्या अवगुणांच्या बळावरसुद्धां तो इथं लोकप्रिय आणि यशस्वी झाला आहे. आणि तसाच तो पुढेंहि आयुष्यांत चढत गेला तर त्यांत मला मुळींच नवल वाटणार नाहीं. म्हणून म्हणतो कीं कांहीं एका अर्थानं मन्मथचा आदर्श डोळ्यापुढं ठेवण्यांत मुळींच धोका नाहीं गोप्या. एरवीं मी तरी मोठ्या सरळपणानं आणि सोवळेपणानं वागून काय मिळवलं रे? अगदीं कादंबरींतल्या नायकासारखं त्या कमू प्रधानवर जीव तोडून प्रेम केलं, लग्नाच्या आणाभाका केल्या, उसासे सोडून रात्रीं बेरात्रीं उशा भिजवल्या, दिवसाला दोन ह्या हिशेबानं प्रेमपत्रं लिहिलीं तिच्यासाठीं, माझ्या डॉक्टर होण्याच्या ध्येयावर पाणी सोडून तिच्याशीं तावडतोब लग्न करायलासुद्धां तयार झालों, त्याचं पारितोषक मला शेवटीं काय मिळालं? तर पदरीं नुसता गाढवपणा आला. दत्तु भुस्कुटेवर माझ्यापूर्वीं तिचं प्रेम होतं. त्या विषयींसुद्धां मोठ्या पुरोगामी औदार्यानं तिला आम्हीं क्षमा करून चुकलो. तिच्या निरागस सुंदर मुखड्याकडे पाहून तिचं ते Calf love (काफ लव्ह) असेल अशी मी स्वतःची भोळी समजूत करून घेतली आणि स्वतः बैल ठरलो. माझंहि तिच्याशीं झालेलं प्रकरण "काफ लव्ह" मधेंच जमा करायला पाहिजे असं आतां म्हणणं सोपं आहे. माझ्या








आयुष्यांतल्या त्या पहिल्याच पोरीवर मी किती जाव ठेवला होता ते कसं सांगू तुम्हांला ? बरोबरच त्या उमाळ्यांत मी जगावर लाथ मारायला निघालो होतो ! बाबांच्या इस्टेटीवर पाणी सोडायला तयार झालो होतो ! त्यांची अवज्ञा करणं, जन्मभर त्यांचा शब्द शिरसावंद्य मानत आलेल्या मला नुसता पोरखेळ वाटत होता. यशस्वी डॉक्टर होण्याच्या कल्पनेवर मी क्षणार्धात तिलांजली सोडली होती, एवढंच नव्हे तर अगदीं शांतपणें दुमच्या गवर माणसाशीं प्रेमलग्न जमवून तिनं मला निरोप दिला तेव्हां जीव द्यायला सुद्धां निघालो होतो ! ह्या साऱ्या गोष्टी आठवल्या कीं हंसावं कीं रडावं तेंच मला कळत नाहीं. By Jove ! लेका गोप्या, एका गोड भावड्या चेहऱ्याच्या Baby-faced पोरीसाठीं माझ्यासारख्या अभ्यासी, शाबूत डोक्याचा पोरगासुद्धां कायकाय करायला तेव्हां तयार झाला होतारे ! एका फटक्यांत प्रेमलग्न, आंतर्जातीय लग्न, दुरुसटलेल्या मातापित्यांविरुद्ध बंडखोरी, एकुलतेएकपणाची चिंता न करतां त्यांच्या लाख दीडलाखाच्या संपत्तीवर लत्ताप्रहार ! आयुष्यांतल्या पुरुषार्थाच्या, यशाच्या, साऱ्या कल्पनांवर पाणी सोडून तिच्या पाणी-ग्रहणार्थ घरबाहेर पडणं ! पंचमहाभूतांना व आपल्या वडिलोपार्जित मिळकतीला साक्षी ठेवून आर्धी ती कांहींहि बहकली असली तरी माझ्या वडिलांनीं मला दिलेल्या अंतिमोत्तराला, आणि माझ्या अकिंचन अवस्थेंत घराबाहेर पडून, "दूर वहांत दू ऽ र" कुठेंतरी रानावनांत "प्रेमनगर" वसविण्याच्या कल्पनेलाच ती चतुर छोकरी खरीखुरी घाबरली. आणि मग आम्हीं एखाद्या रोमियोच्या अवसानांत घराण्याचा निर्वंश होण्याची तमा न बाळगतां आत्महत्येच्या विचाराला लागलो ! छेः—छे छे ! जातिवंत कपटावर भाबडेपणाचा Make-up करणाऱ्या एका Baby faced पोरीसाठीं काय करुन बसणार होतो मी ?

गोप्या—माझ्या वडिलांनीं अतिशय धिम्या चातुर्यानं मला वागवलं नसतं आणि तुम्ही मित्रांनीं मला सांवरून घेतलं नसतंत, तर ह्या क्षणीं मी मुंबईत असण्याऐवजीं स्वर्गात असतो. तुझी सूर्याजी मालुसऱ्याच्या अवसानात मारलेली आरोळी अद्याप मला आठवते. मध्या पळतोस कुठें ? तुझ्या ह्या मरणोन्मुख बापाला इथेंच टाकून मृत्यूच्या दोरीवरुन तूं पळून जाणार ? चल, फिर मागें. तुझ्या खोलींत ती फांसाची दोरी आम्ही कायमची कापून टाकली आहे ! We will just laugh out your silly senseless love.

—आणि तुम्ही सारे घोड्यासारखे खिदळून उठलांत. तुमच्या त्या हंसण्यानं, त्या बेछूट थट्टामस्करीनं, त्या सतत निर्दय विनोदानंच खरोखर मला तेव्हां माणसांत व जगांत ठेवलं. माझा अहंकार चेतविण्याचं, माझ्यांतला पुरुषार्थ जागा करण्याचं श्रेय, गोप्या, माझ्या वडिलाइतकंच तुलाहि आहे. तुझ्या लेखकाच्या जातीला शोभतील अशा स्फूर्तिदायक उपरोधानं तूं म्हणाला होतास—"मध्या, तूं एका पोरीसाठीं मरणार ? अरे जिनं तुला फसवलं, ती प्रेम करण्याच्या योग्यतेची नव्हतीच मुळीं ! लग्नानंतर तिनं तुला फसविण्याऐवजीं लग्नाआधींच तिनं तुला फसवलं हेंच फार चांगलं झालं ! अशा कपटी पोरीसाठीं तूं जीव देणार ? तुझ्या आईबापानीं एवढ्या प्रेमानं वाढवलं, आणि आम्ही साऱ्या मित्रांनीं तुला आपला म्हटलं, ते काय एका छटेल पोरीनं तुला सहज मरणाच्या खाईंत लोटावं म्हणून कीं काय ? मध्या, त्या पोरटीला तुझ्याशिवाय जगतां येते नाहीं का ? केवढी लज्जेची गोष्ट आहे ! खरंच, तूं इतका मित्रा, अभिमानशून्य, आणि वीर्यहीन्या कसा ? त्यापेक्षां आयुष्यांत असा कांहीं पुरुषार्थ करून दाखव कीं ज्यामुळें त्या कारटीलाहि वाटावं कीं अशा पुरुषाशीं एके काळीं लग्न करणं मला शक्य होतं पण तें मी मूर्खपणानं केलं नाहीं. रडण्याची आणि पश्चात्तापाची पाळी कुणावर यायची असेल तर ती तिच्यावर येऊं दे. तिच्या त्या डोंबल्या नवऱ्यापाशीं नुसताच पैसा असेल, पण तुझ्यापाशीं पैसा आहे, बुद्धी आहे, रूप आहे, कर्तृत्व आहे. मध्या, तूं यंदा मिळव, खूप यश मिळव कीं त्या 'कमळासारख्या शेवड्या पोरी' तुझ्या पायावर लोळण घेतील ! ज्याला पोरगी पटवितां येत नसेल त्या गाढवानं प्रेम करावं कशाला ? त्यानं नुसतीच पुस्तकं घोकावीत आणि पहिला वर्ग मिळवावा !......"

म्हणूनच म्हणतो गोप्या, कीं मन्मथ बॅनर्जींचं वचन साधारणपणें डोळ्यासमोर ठेवायला मला चिंता दिसत नाहीं. माझ्या हातून एखाद्या मोहापायीं अभ्यासाकडे दुर्लक्ष होईल असं तूं स्वप्नांतहि आणूं नकोस. कमू प्रधाननं त्या विषयांत मला अगदीं जन्माचा धडा शिकवला आहे. तिनं मला मोठ्या आस्थेवाइक आपुलकीनं पाठवलेली तिच्या लग्नाची पत्रिका मी येथें जपून ठेवली आहे. एका अर्थानं मोहाच्या भुतबाधे-पासून माझं रक्षण करणारा तो "ताईत" आहे. त्या पत्रिकेपासून वेगळ्याच अर्थानं मी आतां स्फूर्ति घेत असतो. मला कसं वागलं पाहिजे व काय केलं पाहिजे हें त्या "पत्रिके"वरून मला बरोबर कळतं.

तूं मला उपदेश केलास म्हणून मला एवढं गंभीर चऱ्हाट वळणं भाग आलं. "लॉ कॉलेजच्या वायुमानांत वाजवीपेक्षां फाजील रुक्ष होऊं नकोस ! लॉ कॉलेजांत पोरी नसल्यामुळें ते रुक्ष कॉलेज आतां जास्तच रुक्ष झालं असेल. कुरूप पोरी असण्यापेक्षां मुळींच पोरी नसलेल्या बऱ्या, कीं मुळींच पोरी नसण्यापेक्षां प्रसंगीं कुरूप पोरीहि चालतील. काय तुझं मत आणि अनुभव आहे ? इथं मुंबापुरींत मात्र बायकांचा एकूण सुकाळ आहे. जिथें जाल तिथें आपल्या बायका आहेतच. मुंबईचं वायुमानच म्हणे बायकांच्या प्रकृतीला अधिक मानवतं ! इथलं भौगोलिक वायुमान कांहीं पुरुषांना मानवण्यासारखं नाहीं, पण बायकांनीं नियंत्रित केलेलं वायुमान मात्र कदाचित् त्यांच्या पथ्यावर पडत असेल" बाहेर असा पाऊस कोसळतो आहे म्हणतोस आणि आयुष्याची अशी कांहीं चाकोरी होऊं लागली आहे ! समुद्राजवळ असून मी कोरडाची आहे. मुंबईला पुष्कळशी गंमत असते म्हणतात. पण माझ्या वांट्याला अजून कांहींच येत नाहीं. हें असंच चालू राहिलं तर मन्मथचा एकदां गुरुमंत्र मी घेऊन टाकणार आहे. साऱ्या बाबालोकांना नमस्कार.

तुझा
मधू

---

व्हिन्सेंट रोड, दादर
१८ जुलै १९३७

चि. गोपाळ यास अनेक आशीर्वाद,

उपरी विशेष,

गोप्या, उशीरा पत्र पाठविण्याविषयीं उगीच कां कोकलतोस ? पंधरा दिवसांनीं मित्राला पत्र म्हणजे खूप झालं कीं ! दिवसाला एकपत्र पाठवायला तूं काय कमू प्रधान आहेस ? आणि लग्न होऊन एकदां प्रियेची पत्नी झाली कीं माणूस पत्रलेखनाची कला अगदीं विसरुनच जातो. आमच्या कॉलेजांतल्या लग्न झालेल्या मुलांचं पाहतो आहे मी. स्वतःच्या बायकोपेक्षां दुसऱ्या बायकांना पत्र पाठविण्याचीच त्यांची तडफड. त्या हिशेबानं तुला पत्र पाठवायचा माझा 'वेग' काय कमी झाला ? तुला लेखक माणसाला बारसं काय नि बारावं काय सारखंच ! तुला

माझ्याकडून मेडिकल कॉलेजांतलं 'मटीरिअल' पाहिजे आहे, पण इथें कशाचा कशाला पत्ता नाहीं. तर तुला लिहूं तरी काय कपाळ Life is so dull so very dull. मुंबईला पुष्कळशा भानगडी होत असतात. इटोव्हनं साड्या पेटणं, सुरामारी, पळवापळवी प्रणयभंग ! अरे माझ्या वाट्याला कांहीं येतच नाहीं ना ! कसं अगदीं थंड थंड आयुष्य चाललं आहे. तुझ्या आयुष्यांत थोडी Thrill उत्पन्न करायला माझ्या जवळचा हाडांचा सांगाडा देऊं का पाठवून ? तो एका दाईचाच सांगाडा आहे गड्या ! कां पहिला मुरदा फाडतांना मला काय वाटलें ते तुला कळवूं ? तेहि वाटलं तर कळवीन कधीं तरी. त्याविषयी वर्णनच पाहिजे असेल तर कॉनन डॉईलच्या " राऊंड दि रेड लॅम्प " च प्रास्ताविक वाच ! तूं लेखक आहेस, आहे तें माझ्या लक्षांत आहे. कांहीं विशेष घडलं तर अवश्य तुला सगळ साग्र संगीत ऐकवीन. अरे तुला नाहीं सांगणार तर कुणाला ? अगदीं केवढीहि रहस्यमय कथा असली तरी तिला वाचक किंवा श्रोता लागतोच ! अगदीं लग्नासारख्या रहस्यालासुद्धां भटाचीं मध्यस्ती लागतेच. पण गोप्या, अजून विशेष कांहीं तरी घडलं तर तें मला नको कां आहे ? तूं नुसतीं त्याची नांवंगावं लपवून वर्णनच करशील, पण मला तें सारं अगदीं At first hand भोगायला मिळेल ना. पण काय करणार ? ॲनाटॉमी, फिजिऑलॉजी, तंगड्या, हात, (ह्यालाच विद्वत्तापूर्ण वैद्यकीय परिभाषेत Extremeties म्हणतात.) फॉर्मेलीन ह्यांविना तूर्त दुसरी गोष्ट नाहीं. आयुष्य कसं सपाट, अळणी चाललं आहे. Oh, it is so dull, so very dull. लांब पत्र पाठवायलासुद्धां उल्हास शिल्लक नाहीं. आतां तूंच नागपूरची एकादी नवी गंमत कळवशील तरच ह्या अळणी आयुष्यांत थोडा रुचीपालट होईल. I feel so very bored. जीव अगदीं आंबून गेला आहे.

तुझा
**मध्या**

—※—※—※—

व्हिन्सेंट रोड, दादर
दि. २८ जुलै १९३७

राजमान्य राजेश्री गोपाळराव यांसीं—
सप्रेम नमस्कार विनंति विशेष.

पत्रांत लिहिण्यासारखं फारसं नाहीं म्हणून मायना लांबवला आहे. तूं मागितलेलं 'टॉड'चं "ॲनल्स ऑफ राजस्थान" तूर्त इथें मिळत नाहीं. कोटांतलीं बहुतेक दुकानं पाहून झालीं. इतिहासाला विचारतो कोण बाबा आजकाल ? 'प्रेमळ' वाङ्मय पाहिजे तर माग. गिबनचं डिक्लाइन अँड फॉल मात्र मिळालं. तें आजच पाठवीत आहें. फारशी इतिहासाचीं पुस्तकं मागवतो आहेस ? ऐतिहासिक कादंबरी खरडण्याचा विचार आहे कीं काय ? बाकी वर्तमानांत कांहीं नसलं कीं इतिहासाकडे वळणं बरं. आणि वर्तमानांत तर तूर्त कांहीं नाहीं. निदान माझ्या तरी कांहीं नाहीं. Cheerio !

—मधू

—※—※—※—

व्हिन्सेंट रोड, दादर
६ ऑगस्ट १९३७

प्रिय गोपाळ,

..............................
........................
..........
..........

तुझा
मधू

पुनश्च : Fill in the blanks. पत्रांतून साधारणतः असतं तसंच कहींतरी वर लिहिलं आहे असं समज.

मधू

---

व्हिन्सेंट रोड, दादर
८ ऑगस्ट १९३७

माय डियर गोप्याजी,

आज सकाळीं मोठी गंमत झाली. तुझ्या लेखकांच्या भाषेंत सांगायचं म्हणजे ती पंचपंच उषःकालची वेळ होती आणि ढगांची पासोडी फेंकून (कीं रात्रीची घोंगडी भिरकावून) भगवान सहस्त्ररश्मी नुकताच डोकं वर काढत होता. मी आपला कनींगहॅमचं विच्छेदन शास्त्रावरचं पुस्तक घेऊन बसलों होतों. जुलै अखेर मी माझी तंगड्यांची आणि हातांची कापकूप संपविली होती; थोरॅक्सहि (Thorax) निकालांत काढलं होतं आणि आजपासून मी 'मान कापायला' मोकळा झालों होतों. मान कापण्याचं हें काम जरा किचकट असतं आणि चांगल्या होतकरू मुलालासुद्धां पूर्ण मान कापून ठेवायला महिना-दीड महिना तरी लागतोच. ह्या नाजुक विषयांत मी कनिंगहॅम साहेबासारख्या सुयोग्य गुरुशीं सल्लामसलत करत असता आमचा नामदेव स्टोव्ह पेटवून चहा करण्याच्या खटाटोपांत गुंतला होता.

हें सारं मी तुला पार्श्वभूमिदाखल म्हण, नमनादाखल म्हण, सांगतों आहें. एकदम विषयाला यायचं तर मनांतल्या मनांत इकडे मी मानेवर स्कॅलसेल आणि फ़ॉरसेप्स चालवत असतांच तिकडे माझ्या दारावर ठोके पडायला सुरवात झाली. मी चिडून पुटपुटतच दार उघडलं, आणि त्या उघडलेल्या दारांत दैत्त म्हणून एक अनोळखी पोरगी उभी असलेली मला दिसली!

—पोरगी?...हो—हो...गोप्या पोरगी! एक अतिशय देखणी, आकर्षक कपडे केलेली, सतरा अठरा वर्षांची पोरगी! क्षणभर माझा विश्वासच बसेना. सकाळच्या रामप्रहरीं एका विद्यार्थ्याच्या दारांत त्यांतून गांवभर डंका वाजत असलेल्या वैद्यकीय विद्यार्थ्याच्या नुकतीच वेणीफणी स्नान आटोपून ताज्या फुलासारखी टवटवीत झालेली एक पोरगी उभी राहते याचा अर्थ काय ?

"दारांत कां उभ्या? आंत या!"

आपोआपच मी बोलून गेलों. तिनं स्मित केलं. (आणि तेव्हांच तिच्या सांवळ्या गालावरच्या खूप खोल खळ्या आणि खडीसारखे शुभ्र दांत माझ्या डोळ्यांत भरले.) आणि ती आंत आली. अगदीं साहजिकपणें ती आंत आली. हातांतली बायकी छत्री नी पर्स तिनं खुर्चीवर ठेवली, तीहि इतक्या साहजिकपणें कीं जणूं तो ब्लॉक जितका माझा तितकाच तिचाहि होता. मी नुसता डोकं खाजवीत राहिलों. मला कांहीं तिची ओळख पटेना. एकट्यानं माझ्या खोलीवर येण्याइतकी इथं तर माझी कोणत्या पोरीशीं ओळख नव्हतीच, पण नागपूरलाहि (एक अपवाद सोडून) नव्हती.

"क्षमा करा पण..." मी म्हणालों. क्षमा करा पण मी तुम्हाला ओळखत नाहीं असं मी म्हणणार होतों तेवढ्यांत तीच म्हणाली,

"क्षमा करा मी तुम्हांला त्रास देतें आहें. पण आपल्याला कांहीं स्नो, सावण, व्रिलियन्टाइन पाहिजे आहे का?"

अद्याप माझ्या डोक्यांत मुळींच प्रकाश पडेना. अजून तरी आपल्या नागपूरला एखाद्या तरुण मुलीनं एखाद्या तरुण मुलाच्या खोलीवर बेधडक जाऊन स्नो, सावण, व्रिलीयन्टाइनविषयक चवकशी करण्याची पद्धत पडलेली नाहीं. मी चांगलाच गोंधळलों, आणि मला थोडंसं Outrage झाल्यासारखंहि वाटलं. तेवढ्यांत बाहेरच्या हेलकऱ्यानं दारांतून एक पेटी आंत आणली. त्या पेटीवर लिहीत होतं. "मस्तानी प्रॉडक्ट्स् लि. मुंबई."

"मी मस्तानी प्रॉडक्ट्सची विक्रेती आहे. हा आमचा मस्तानी स्नो, फारच गोड वास आहे." तिनं माझ्या समोर बाटली उघडून ठेवली.

"मी स्नो वापरीत नाहीं." मी म्हणालों.

"आपण स्नो वापरीत नाहीं?" तिनं आश्चर्यानं विचारलं "पण पुष्कळ मुलं आजकाल स्नो वापरतात: जवळ जवळ सर्वच!"

"वापरत असतील! पण मी वापरत नाहीं!"

"आपण स्नो वापरण्याविरुद्ध आहांत?"

"अगदीं विरुद्ध आहें. मुलींनीसुद्धां स्नो वापरूं नये असं मला वाटतं. मग मुलांची काय कथा?"

"बरं मग हें हेअर ऑइल चालेल आपल्याला?"

"मुळींच नाहीं!"

"आपण तेलहि वापरत नाहीं?" माझ्या डोक्यावरील राखीव कुरणाकडे पहात ती म्हणाली.

"तेल वापरतों, पण तें शुद्ध कॅस्टर ऑइल!"

तिचा चेहरा पडला. तरीहि व्यावसायिक स्मित करून ती म्हणाली, "तर मग मी आपल्याला ग्लिसरीन सोप दाखवतें. तो निश्चितच आपल्याला आवडेल."

"मुळींच आवडणार नाहीं" मी म्हणालों, "कारण मी सावण सहसा वापरतच नाहीं."

"आपण सावण वापरत नाहीं!" आपले काळेभोर टपोरे डोळे आणखीनच टपोरे करून तिनें मला विचारलं.

"नाहीं. मी सावण वापरत नाहीं. शिकेकाई वापरतों, नाहींतर हरभऱ्याच्या डाळीचं पीठ वापरतों.

"पण आपण दाढीसाठीं तरी निश्चित सावण वापरतच असाल." थोड्या विजयी स्वरांत ती म्हणाली. "आमची मस्तानी शेव्हिंग स्टिक आपण पहा एकदां वापरून."

"दाढीसाठीं सुद्धां मी सावण वापरत नाहीं. दाढीसाठीं मी शेव्हिंग क्रीम वापरतों" मी मख्खपणानं म्हणालों. आतां मात्र तिचा चेहरा पुष्कळच पडला. मी मनांतल्या मनांत हंसत होतों. कारण तिच्या नामावळीपैकीं सावण, तेल, शेव्हिंग स्टिक, स्नो, ब्रशून सर्व मी वापरत होतों. घाईघाईनं मी कपाटाकडे पाहून सुद्धां घेतलं. कपाटाचं दार सुदैवानं बंद होतं. कांहीं वेळ गोंधळून ती माझ्याकडे पहातच राहिली. चुकलों. तिच्या दृष्टींत नुसता गोंधळच नव्हता. ज्याचं नांव सांगतां येणार नाहीं असं आणखी कांहीं



मासा नेहमीं पाण्यांत डुंबतो, साप वारा पितो, मेंढा पानें खाऊन राहतो, चातक नुसतें पाणीच पितो, उंदीर, नेहमीं बिळांत एकान्तवासी असतो, गाढव राखेनें भरलेला असतो आणि बगळा ध्यान लावून बसतो—मग हे सर्व मोक्षास जातात काय ?

छटा होत्या. मी तिला दिलीं त्या प्रकारचीं उत्तरं कां दिलीं तें तूं शोधत बस. तूं लेखक आहेस. तेंवढाच तुला व्यायाम होईल. पण माझ्या उत्तरांचा तिच्यावर कांहीं तरी चमत्कारिक परिणाम झाला. बायका निवडेत बदल्या म्हणजे त्यांची होते तशी तिची दृष्टी झाली. ती रागावली नाहीं पण थोडी म्लान झाली. "आलें पाहिलें आणि जिंकलें " असा कदाचित् तिचा आजपर्यंतचा अनुभव असेल. " "My face is my fortune sir" हेंच नाहीं तरी तिचें ब्रीदवाक्य असणार. नाहींतर विचारतो कोण ह्या भिकार मस्तानी सेन्ट, ऑईल, ब्रिलीयटाइन आणि शेव्हिंग स्टिकला ? प्रथम त्या मस्तानीकडे पाहून मगच कोणी केला तर त्या मस्तानीला आश्रय देण्याचा विचार करणार! बाकी हे मस्तानी प्रॉडक्टवाले जे कोण असतील ते मोठे चतुर लोक दिसतात. बायकाविषयींचा आपला उदार 'राष्ट्रीय दृष्टिकोण' त्यांना चांगला समजला आहे. मस्तानी स्नो, पावडर, ऑईल, सोप इत्यादीच्या वेष्टणावर तर बायांचीं मस्त चित्रं, त्यांनीं लावलींच होता. पण शेव्हिंग स्टिकवरसुद्धां चित्रं होतं तें एका तुफान तरुणीचं म्हणजे बोला आतां! दाढीच्या अवजारावरसुद्धां बाईचं चित्र! ( बाकी पुरुषांच्या दाढीशीं बायकांचा तसा अगदीं जवळचा संबंध आहे म्हणा! ) आणि बायकांचीं चित्रं असलेलं हें सारं प्रसाधनसाहित्य विकायला त्यांनीं बाईची निवड केली होती. आहे कीं नाहीं योजना-चातुर्य ? बाकी मस्तानी प्रॉडक्टसवाल्यांचा हिशोब उघड आहे म्हणा! नुसत्या बाईच्या चित्राकरितां जर पंचांग, मासिकं, पुस्तकं तडाख्यानं खपतात तर प्रत्यक्ष एखाद्या वस्तुची चित्रासारख्या बाईलाच पुढं उभें करून विक्री केली तर ती धडाकेबंद कां होऊं नये ?

—अरेच्या विसरलोंच! माझें हें Aside चालूं असतां माझ्या खोलींत बसलेल्या त्या अज्ञात तरुणीला मी विसरूनच गेलों. बा लेखका! तरुणीला विसरण्याइतकें मूर्खपणाचं, अरसिकपणाचं काम दुसरं कोणतं असूं शकेल ? 'मस्तानी प्रॉडकटस'चे तेलकट बनियेसुद्धां जिथं तरुणींना विसरले नाहींत तिथं तुझी माझी काय कथा? कोणी तरुणींना विसरो न विसरो पण नामदेवनं चहाचं तबक आणलं तेव्हां तो मात्र माझ्या खोलींतल्या तरुणीला विसरला नव्हता. त्यानें तिच्यासाठीं तबकांत कप ठेवण्याचं दाक्षिण्य दाखविलं होतं.

" घ्या " कप पुढें करून मी म्हणालों.

" नको " ती म्हणाली.

" कां ? मी मस्तानी स्नो, पावडर, सोप घेतला नाहीं म्हणून तुम्ही चहा घेत नाहीं कीं काय? कीं तुम्ही चहाच घेत नाहीं ? "

" पण मी चहा बाहेर कधींच घेत नाहीं."

" म्हणजे इराण्याकडे सुद्धां घेत नाहीं ? "

" इराण्याकडे घेतें."

" मग इराण्यापेक्षां आमचा नामदेव चांगला चहा देतो."

" पण मी......"

" समजलों! " बाहेर " म्हणजे आमच्यासारख्यांच्या " घरांत " तुम्ही चहा घेत नाहीं. दूरदर्शीपणाच्या दृष्टीनं ठीक आहे. पण मी त्या चहांत मॉर्फिन वगैरे कांहीं टाकलेलं नाहीं."

तिचीं कानशीलं लाल झालीं.

" मॉर्फिन म्हणजे ? " तिनं विचारलं.

" तो एक अकूचा महत्त्वाचा घटक आहे.—पण ते कांहीं मी चहांत टाकले नाहीं. " घ्या " मी पुन्हां चहाचा कप पुढें केला. नकारार्थी मान हालवून ती म्हणाली.

" मी घरून घेऊन आलें आहें. "

" तर मग आपण जा. " मी म्हणालों. ती गोरीमोरी होऊन माझ्याकडे पाहूं लागली. ती आसनावरून अर्धवट उठलीसुद्धां पण संकोचामुळें जणूं ती पुन्हां खिळून राहिली.

" हें पहा " मी पुढें म्हणालों, " दाक्षिण्यामुळं कांहीं मी तुम्हांला चहा घ्यायला म्हटलं नाहीं. तुमच्या जागीं एखादा पुरुष असता तरी त्याला चहा घेतल्याविना मी चहा घेतला नसता. एखाद्या माणसाच्या समोर एकट्यानं चहा घ्यायची पद्धत मी मुंबईला पहात आहे पण आमच्या गांवाला असं कोणी करीत नाहींत. "

" कोणतं आपलं गांव ? " तिनं विचारलं.

" नागपूर ! तिथं कुणी पाहुण्यासमोर एकट्यानं चहा पीत नाहींत. म्हणून म्हणतों तुम्ही एकतर चहा घ्या नाहींतर जा तरी. कारण तुमच्या समोर मला एकट्यानं चहा घेवणार नाहीं ! "

तिच्या डोळ्यांत मला घायाळ व आर्त भाव दिसले. ( असे भाव घरोघर दाखवणं हेंच मुळीं तिचं काम असेल ! ) तिनं चकार शब्दहि न बोलतां तोंडाला कप लावला, आणि एखादं औषध प्यावं तसं कष्टानं घोट घेत तो पिऊन टाकला. त्या कोमल स्त्रीला चहा पिण्याचे कष्ट होत होते कां माझ्या बोलण्याचे कष्ट झाले होते परमात्मा जाणे !

चहा पिणं संपताच ती व्यग्रपणें उठून उभी राहिली. आणि म्हणाली, " जातें. "

जातें म्हणून म्हणत असतांच तिनं ' मस्तानी उदवत्ती ' अशीं अक्षरं आणि अर्थात् एका मस्त तरुणीचं चित्रं ) असलेल्या पुड्यांतून एक उदवत्ती ओढून काढली ती माझ्या मेजावर खोचली. मेजावरची पेटी उचलून काडी ओढली, ती उदवत्तीला लावली आणि तिच्या टपोऱ्या डोळ्यांत उजळणाऱ्या काडीची ज्योत ओठानं फुंकून पुन्हां म्हणाली, " जातें. "

तिनं ओठांनीं काडी फुंकली तेव्हां मला कळलं कीं तिचे ओठहि अतीशय मादक आहेत.

" मी उदवत्ती आपल्याला न विचारतां पेटवली." ती म्हणाली.

" कशाला उगाच फुकट उदवत्ती वेंचलीत ? " मी म्हणालों.

" मासला म्हणून कांहीं वस्तू आम्हांला देतां येतात. " ती म्हणाली, " बरं जातें. आपल्याला पुष्कळ त्रास दिला. क्षमा करा."

" बरं या ! " मी म्हणालो.

आणि मग ती गेली. तिच्यावरोबरचा तो हेलकरी गेला. आणि तिनं पेटवून ठेवलेल्या उदवत्तींतून निघणाऱ्या धुराच्या सुगंधि वर्तुळांकडे मी पाहात राहिलों ( By the way स्नो, पावडर सोप वगैरे कशाहि असोत, पण मस्तानी उदवत्तीचा सुगंध मात्र खरोखरच एखाद्या फुललेल्या जाईच्या वेलीसारखा होता. ).

—ती म्हणाली.-पुन्हां ती म्हणाली-पुन्हां मी म्हणालो आणि मग ती गेली आणि तिनं पेटवून ठेवलेल्या उदवत्तीच्या वलयांकडे मी पहात राहिलों......वा लेखका ! एकूण हा प्रसंग ठीक आहे नाहीं ? सूचक सुपीक... उदवत्तीच्या सुगंधासारख्याच सुगंधी भावनांच्या लहरी माझ्या हृदयांत उमटल्या ! तिनं उदवत्तीला नव्हे जणूं माझ्या काळजाला काडी लावून 'पेटवलं....काय अन् काय काय ? पण काळजी नको. माझं काळीज अगदीं थंड आहे. शरीर मात्र थोडंसं तापलंय ! पण शरीर तापणं वेगळं आणि मन जळणं वेगळं ! शरीर तापलं तर त्याला माझा आक्षेप मुळीं नाहींच आहे ! बाकी माझ्यानंतर आतां घरोघर ती अशाच उदवत्त्या पेटवत जाणार आहे. तो तिचा दैनंदिन कार्यक्रमच आहे !

हा घडला हा कांहीं मोठा ' प्रसंग ' घडला अशांतला भाग नाहीं, पण गेल्या दीडदोन महिन्यांत दिवसाचे जे ठराव प्रारंभ होत होते तसा आज झाला नाहीं इतकंच ! बाकी ती गेल्यावर मला असंहि वाटतं कीं मी इतकं तोडून बोलला नसतो तरी चालण्यासारखे होतं. पोरगी कांहीं नुसती शेंकडा तेहतीस नाहीं. संस्कृतप्रमाणं मनुसुंदरी





## मी ही घरांतली

कवि :—पु. शि. रेगे

मी ही घरांतली
खुशाल झुरते भरांतली,
अन् ती त्या तिथली
खुशाल झुलते मनांतली,

मी ही लग्नाची
कधींच झालें विघ्नाची,
अन् ती परक्याची
वात पचविते चरक्याची,

मी ही चंद्रमुखी,
तोंड लपवितें सुखासुखी,
अन् ती अवसेची
कुब्जा मिरवी हौसेची.

मी ही रतिमंजरि
मोकळि झुरते या पंजरिं,
अन् ती ऋतुवंत
माझा चळवी गुणवंत.

नसेल पण ज्याला ' व्यक्तित्वाचा गोडवा ' म्हणतात तो ध्यानांत घेतला तर तिला शेंकडा साठ गुण द्यावयाला मुळींच चिंता नाहीं. म्हणजे प्रति-दिवशीं तिनें प्रभातफेरी टाकली तरी दूरदृष्टीची Investment म्हणून ' मस्तानी प्रॉडक्टस् 'चा संबंध सेट प्रत्येक वेळीं घ्यायला चिंता नाहीं, अशी ही पोरगी आहे असेंच निर्विकार मनानं विचार करणाऱ्या म्हणावं लागेल. आणि जो सविकार नेमार्थी लावेल तो तर नुसत्या तिच्या गालावरच्या खळग्यांनाच शेंकडा पन्नास गुण देऊन टाकील! तिच्या चितळणाऱ्या टपोऱ्या डोळ्यांना देईल आणखी पन्नास! तिच्या रेखीव मांसल आकृतीला, सतेज सांवळ्या रंगाला, जवळ जवळ पोटरीपर्यंत पडणाऱ्या वेणीला, टंच खरी हालचालींना, तो धडाधड सुसते पन्नासावारी गुण देत जाईल. बोल किती झाली बेरीज? नकट्या नाकाचे दहा गुण वजा करून सुद्धां—

—छे!—छे! छे:! तुकलंच माझं. हें तोंड कांहीं मला आवरत नाहीं. मन्मथ बॅनर्जी आज माझ्या जागीं असता तर तो इतका कांहीं मखमली-मर्यादेनं आणि आकर्षक दाक्षिण्यानं वागला नसता. अरे अभाग्या घरीं गंगाभागीरथी येऊनहि जो तिच्यात चारदोन बुचकळ्या मारणार नाहीं तो पापीच म्हणायचा. जाऊं द्या! ' सांडलेल्या दुधाविषयीं ओरडूं नका ' असं आपल्या फिरंगी बंधूचं वचन आहे. पुन्हां वेळ येईल तेव्हां पाहूं.

पत्र फार लांबलं. नागच्या वेळेचं उद्घ निघालं. तुला पत्र लिहितांना नागपूरला येऊन मी तुझ्याशीं बोलतों आहें असंच मला वाटतं—अच्छा!

— मधू

पुनश्च:

ही ' मस्तानी उदबत्ती ' खरंच झकास आहे. (त्या दुसऱ्या मस्तानी सारखीच!) अर्धी जळल्यावर वुद्वया मी ती रात्रीसाठीं विझवून ठेवली तरी अजून वास दरवळतो आहे.

—मधू

पुन्हा पुनश्च:

मी मघी तिला तोडून बोललों तेव्हां मला वाटत होतं कीं जणूं कांहीं माझ्यापुढं कमू प्रधानच उभी आहे आणि तिलाच मी बोलतों आहें.

—मधू

पुनश्च पुनश्च:

गोप्या, सगळेंच मुसळ केरांत! ह्या ' मस्तानीचं ' नांव काय असेल रे? जाऊं द्या! प्रयोगाच्या सोयीसाठीं तूर्त आपण तिला मस्तानीच म्हणूं!

—मधू

---

व्हिन्सेन्ट रोड, दादर
८ ऑगष्ट १९३७
रात्री १०॥ वाजतां,

मित्रोत्तम गोपाळराव यांस सप्रेम नमस्कार. वि. वि.

गोप्या, अरे मोठी गंमत झाली आहे बघ. सकाळीं माझ्याकडे आलेल्या पाहुणीची वायकी छत्री इथेंच राहून गेली आहे. म्हणजे बहुधा छत्री घ्यायला ती पुन्हां इथं येणार. बाकी असलल्या छत्र्या तिच्या खिजगणतींतहि नसतील म्हणा! पुन्हां कशाला एकाद्या क्षुल्लक छत्रीसाठीं ती येथें यायला बसली आहे: एकदां माझा तसा अनुभव घेतल्यावर! गोप्या अगदीं ' भवानीच्या ' प्रहरीं ती माझ्याकडे आली होती. शिवाय ' भवानी ' तर माझ्याकडे झालीच नाहीं. पण उलट छत्री मात्र राहिली; बाकी असंच पाहिजे या पोरींना!

# राष्ट्राच्या उभारणींत औद्योगिक विकासाचें स्थान!

## यंत्रतज्ञ श्री. दिनकरराव कृष्णाजी चापनेरकर यांची भव्य योजना



स्वातंत्र्य—प्राप्ती—नंतर आपल्या राष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीची धुरा आपणांलाच वाहावी लागत आहे. सुदैवानें खंबीर वृत्तिचे व विशाल दृष्टि असणारे नेते आम्हांला लाभले आहेत; देशाचा औद्योगिक विकास व्हावा, देशांत आर्थिक स्थैर्य निर्माण होऊन जनता सुखी व्हावी व अशा रितीनें जगांतील महान राष्ट्रांच्या मालिकेंत मानाचें स्थान आपल्या राष्ट्राला लाभावें म्हणून आमचे राष्ट्रनेते प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहेत. राष्ट्राचें हें इच्छित साध्य होण्यासाठीं जनतेनें संपूर्ण सहकार्य आपल्या सरकारला दिलें पाहिजे.

—परंतु औद्योगिक विकास साधण्यासाठीं देशांतील तरुणांना आज तांत्रिक व यांत्रिक ज्ञान प्राप्त करून दिले गेले पाहिजे. परकीय सत्तेच्या अंमलांत अशा शिक्षणासून जनतेला दूर ठेवण्याचा प्रयत्न केला गेला आणि त्याचीं कटु फळें आज आम्हांला भोगावी लागत आहेत.

मुंबईतील एक यंत्रतज्ञ श्री. दिनकरराव कृष्णाजी चापनेरकर यांनीं देशाच्या या निकट प्रश्नाचा उकल करणारी एक अति भव्य योजना तयार केली आहे.

स्त्री-पुरुष आबाल वृद्ध प्रत्येकाला थोडे फार यांत्रिक शिक्षण हें मिळालेंच पाहिजे अशा महान तत्त्वावर या योजनेचा पाया उभारून पुढें देशाच्या औद्योगिक विकासाच्या सर्व यांत्रिक योजना सफल करण्यासाठीं लागणारे यांत्रिक शिक्षणतज्ञ अशा व्यक्ति पुरविणें हा या योजनेचा मध्यवर्ति गाभा आहे.

गेल्या विजया दशमीच्या दिवशीं श्री. दिनकरराव यांनीं या योजनेची मुहूर्तमेढ रोवली. तत्पूर्वी आपल्या योजनेच्या यशापयश विषयींची चर्चा त्यांनीं अनेक मित्र, धनवान, उद्योगपति, व कामगार यांच्याशीं केली. सर्वानुमतें ही योजना वास्तववादी आहे असें ठरलें. इतकेंच नव्हें तर अनेक धनिकांनीं त्यांना आर्थिक साहाय्य देण्याचीं आश्वासनें दिलीं आहेत.

यांत्रिक शिक्षण देणारी त्यांची नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी या संस्थेतर्फे त्यांनीं आतांपर्यंत हजारों तरुणांना मोटार-यंत्रतज्ञ केलें आहे ही एकच गोष्ट त्यांच्या भावी योजनेच्या सफलतेची निदर्शक आहे.

आम्ही श्री. दिनकरराव यांचे हे राष्ट्रसेवेचे स्वप्न साकार होवो अशी मनःपूर्वक इच्छा प्रदर्शित करतो.








मनांत उगीच आपला विचार येऊन जातो, कीं त्या पोरीनं बुद्धयाची तर ती छत्री इथें ठवली नसेल? म्हणजे आयतीच पुन्हां यायची सोय झाली. बायका कोणती 'फेक' कशी टाकतील ह्याचा अगदीं नेम सांगता येत नाहीं. बाकी टाकूं दे म्हणा तिला वाटेल ती फेक! चांगला सावध झालों आहें मी आतां. अशी उलटवून ठेवीन तिला कीं तीहि माझी जन्माची आठवण ठेवील. अरे हो! बरं का गोप्या! त्या छत्रीवर नांव पण आहे तिचं. काय नांव आहे माहित आहे? 'कु. सुरंगा शिरोडकर' म्हणजे एकूण ती कुमारी आहे. गड्या त्या गोप्याकडल्या आटनांवांना मी फार दचकतो. काय भानगड आहे कोण जाणे. नाहींतर कोण एवढ्या धीटपणें परक्या पुरुषांच्या खोल्यांत जाऊन अशी वसवट करील रे? धंदा पण धंदा शोधून काढला पोरीनं! होतात. गोप्या अगदीं साळसूद पांघरुणाखालीं मुंबईला अशाहि गोष्टी होतात. ठीक आहे. तर मग पाहतोंच मी आतां.

तिची छत्री इथें विसरल्याचं रात्रीं घरीं आल्यावर नामदेवनं मला सांगितलं. आणखी लागलीच तुला पत्र लिहायला बसलों. एका दिवसांत तुला पाठविलेलं दुसरें पत्र! मेडिको डाइनींग हॉलमध्यें खूप जड जेवण झालं होतं. झोप येत होती सारखी. पण ती छत्री पाहिल्यावर अशा झिणझिण्या आल्या म्हणतोस! आतां हॅलिबर्टन नाहीं तर हॉबेल साहेबाशीं थोड्याशा गुजगोष्टी करतों आणि मग कढं "पडपड कुडी!" Good night गोप्या!

—मधु

पुनश्च:

'गुड नाइट गोप्या' हें नांव एखाद्या बोलपटाला नाहीं तर कादंबरीला चांगलं शोभेल नाहीं?

—मधू

---

व्हिन्सेंन्ट रोड, दादर
९ ऑगष्ट ३७

मेरे गिरिधर गोपाल!

खडान् खडा भविष्य! गोप्या, आज पुन्हां ती आली. स्थळ तेंच, पात्रें तेवढीच! दारावर कांकणांची साथ घेऊन टिचक्या वाजल्या तेव्हांच मला खूण पटली,

"माझी छत्री राहिली आहे इथं?"

"राहिली आहे कां ठेविली आहे?" मी म्हणालो. तिचा चेहरा गोरामोरा झाला.

"मला माहित आहे; इथेंच राहिली आहे."

"अहो, पण दुसऱ्या घरीं पाहून आलांत का?

"नाहीं!"

"कां बरं? रुस्तानी प्रॉडक्टस्‌चं शुभवर्तमान सांगायला दुसऱ्या कुठं नंतर तुम्हीं गेलांच नाहींत कां?" (बोलणं जरा तिखट झालं पण तिच्या घरोघर जाण्याच्या कल्पनेनं मी क्षणभर थिरलोच.)

"नाहीं."

"पण माझ्यापासून तर तुम्ही आपल्या कामाचा प्रारंभ केला होता.

"तिथेंच संपलं माझं काम!"

"कां हो?"

"मला कसंसंच वाटायला लागलं." (कसंसंच वर गोप्या! शब्दप्रयोग नीट ध्यानांत ठेव!)

"मग आहे का माझी छत्री इथें?"

"ही घ्या आपली छत्री सुरंगाबाई, आणि आलाच आहांत तर थोडासा चहाहि घ्या."

"अय्या! माझं नांव कसं कळलं तुम्हांला?"

"तुमच्या छत्रीनं सांगितलं!"

"आणखी काय काय सांगितलं माझ्या छत्रीनं तुम्हांला?"

"तुम्ही लबाड आहांत म्हणून सांगितलं!"

"आमचे शेटजी तर म्हणतात कीं मी भोळसट आहे, कुचकट आहे, मूर्ख आहे."

"तोहि तुमच्या लबाडीचाच भाग आहे. आणि तुमच्या शेटजींचाहि! (हिचे शेटजी वर कां गोप्या! हिचे शेटजी!)

"ते म्हणतात, माणसानं इतकं वेंधळं Impulsive आणि Sentimental असणं बरं नव्हे,"

"म्हणजे तुमचं म्हणणं काय कीं तुम्ही Impulsive आणि Sentimental आहांत!"

"काय जण! शेटजी म्हणतात कीं हळवा, moody स्वभावसुद्धां धंद्याला चांगला नव्हे!"

"सांगण्याचं तात्पर्य, तुम्ही हळव्या moody आहांत!"

"काय जण! पण शेटजी म्हणतात कीं प्रचाराच्या आणि विक्रीच्या धंद्याला तर हळवेपणा मुळींच कामाचा नाहीं. शेटजी म्हणतात—"

"शेटजी कांहीं म्हणत नाहींत. आणि ते जे कांहीं म्हणतात ते खोटं असलं पाहिजे."

"नाहीं बरं कां!" तिनं डोळे किंचित् विस्फारले. "आमचे शेटजी तसे चांगले आहेत."

"बायकांच्या विषयांत शेटजी लोक तसे चांगलेच असतात. पैंग डावा हाति नाचवणाऱ्यांच्या चांगुलपणाविषयीं तुम्ही मला कांहीं सांगू नका!"

माझं बोलणं तिला आवडलेलं दिसलं नाहीं. तिचे ओठ कांपले, डोळे विस्तारले, नाकपुडीच्या पाकळ्या थरथरल्या.. (हा तिचा आविर्भाव खरोखरच पाहण्यासारखा होता.) मला वाटलं या गोप्याकडल्या पोरीला शेटमंडळींविषयीं आस्था वाटणं साहजिक आहे. ती कांहींतरी बोलणार होती तेवढ्यांत My man Jeeves नामदेवनं चहाचं तबक पुढें आणून ठेवलं. त्यात अर्थात तिच्यासाठीं दुसरा कप होताच.

"तुम्हांला हा धंदा आवडतो?" मी तिच्या हातांत चहाचा कप देणार होतो, पण तिनंच माझ्या हातांत दिलेला चहाचा कप घेत विचारलं.

"त्यांत आवडीचा प्रश्न कुठें आहे? आपण करतो त्या सगळ्याच गोष्टी आपल्याला आवडतात म्हणून थोड्याच आपण करतो?"

"बरे वाईट अनुभव बरेच येत असतील!" मी दुहेरी अर्थाचा चतुर प्रश्न विचारला.

"वाईट अनुभव पुष्कळ येतात. एकदां तर एकानं खरोखरच मला चहांतून कांहींतरी देण्याचा प्रयत्न केला होता. तेव्हांपासून मी कोणाकडे चहा घेत नाहीं."

"माझ्याकडे कशा घेता आहांत?"

"तुमच्यावर माझा विश्वास बसला!"

"कां बुवा?"







अनुक्रमणिका

"तुम्ही माझ्यापासून कांहीं विकत घेतलं नाहीं. इतर पुरुष बोलतात त्या तऱ्हेनं बोलला नाहींत!" (स्त्रिया स्तुति करण्याचा प्रकार मात्र पाहून ठेव गोपाळ!)

"हा उलटा न्याय झाला. तुमची स्तुति केली नाहीं. तुमच्यापासून कांहीं विकत घेतलं नाहीं, म्हणून तुम्ही मला सरळ माणूस समजलात? अगदींच भोळ्या दिसता!"

"शेटजी तसंच म्हणतात!"

"शेटजी झक् मारतात!"

"शेटजीविषयीं असें बोलूं नका!"

"कां? ते कोण लागतात तुमचे?"

"धनी लागतात. मला त्यांच्याकडून बरं कमिशन मिळतं. नाहींतर माझ्यासारख्या शिक्षण नसलेल्या मुलीला कोण काम देतो?"

"तुमचं किती शिक्षण झालं आहे?"

"गेली दोन वर्षं मॅट्रिक नापास होते आहे."

"कां?"

"सगळं जमत नाहीं एकदम! आपण मेडिकल कॉलेजांत आहांत?"

"कशावरून?"

"ती हाडं दिसताहेत तिथं. आपण ब्राह्मण?"

जातीय प्रश्न विचारणं वास्तविक हराम आहे पण तिनं तो विचारल्यावर मीहि प्रश्नात्मक उत्तरांत तोच प्रश्न विचारला. "मी ब्राह्मण. आपणहि ब्राह्मणच ना?"

तिचा चेहरा लालबुंद झाला. मान खालीं गेली. आणि अस्पष्ट स्वरांत ती म्हणाली, "हो, तसंच..."

गोप्या मी पैज मारून सांगतो, ती खोटं बोलत होती. तिचा चेहराच सांगत होता तें. त्या शेटजीविषयीं, तिच्या शिक्षणाविषयीं, तिच्या धंदाविषयीं, तिच्या कमाईविषयीं, कशा कशाविषयीं ती खोटं सांगत होती देव जाणे!

"तर मग तुम्ही सुद्धां ब्राह्मण!" मस्तानी अगरवत्तीच्या अर्ध्या तुकड्याला काडी लावत पुन्हां म्हणाली. आणि पुन्हां ती लाल झाली.

"ती उदवत्ती आवडली तुम्हांला?" विषय पालटत ती म्हणाली.

"आवडली. एक डझन पुडे द्या मला."

तिनं मला एक डझन पुडे काढून दिले, पण ती त्याचे पैसे घेईना!

"असूं द्या. मला पुष्कळ पैसे मिळतात." असं तीच मला उलट सांगू लागली. म्हणजे एखादा पुरुष एखाद्या बाईशी वागेल तसंच ती माझ्याशीं वागूं लागली. अखेर मोठ्या कष्टानें ते पैसे मी तिच्या पर्समध्यें कोंबले आणि निमंत्रणपूर्वक तिला निरोप दिला. So long?

—मधू

**पुनश्च:**

गोप्याचे छत्रीचं प्रकरण मला कांहीं सरळ नाहीं दिसत. जो छत्री न्यायला ती आज सकाळीं एवढी धडपडून आली तीच छत्री ती पुन्हां इथें विसरून गेली आहे. आपण वेधळ्या असल्याविषयींच "शेट"चं मत पार्श्वभूमी म्हणून तिनं माझ्यापाशीं नमूद करून ठेवलं आहे, आतां या पोरीला मूर्ख म्हणावं कां धूर्त म्हणावं? कां दोन्ही म्हणावं. कांहीं असो. त्या वाहत्या गंगेत आतां मी हात धुतले नाहींत तर माझ्यासारखा गाढव मीच!

—मधू

व्हिन्सेंट रोड, दादर
१० ऑगष्ट १९३७

प्रिय गोपू,

आजहि सकाळीं ती पुन्हां अचूक आली हें काय सांगायलाच पाहिजे? मी एकदम प्रारंभ केला.

"कां हो सुरंगाबाई?"

"माझ्या छत्रीला इथेंच राहावसं वाटत आहे."

"नुसतं तुमच्या छत्रीलाच?" मी माझं वाक्य दोन क्षण अधांतरी ठेवलं. मला अपेक्षित परिणाम आणि रंग तिच्या चेहऱ्यावर दिसला. मग मी समस्यापूर्ति केली. "रुची पालट म्हणून तुमच्या पर्सला नाहीं कां आतां इथें एकदा राहावसं वाटत?" माझ्या अपेक्षेप्रमाणें तिचा चेहरा पडला. माझी चढाईची दिशा आज मी आधींपासूनच ठरवून ठेवली होती. (डावपेंच काय पोरींनाच खेळता येतात होय!)

"मस्तानी" अगरवत्तीचा एक जुडगाच्या जुडगा मी पेटवला आणि म्हटलं, "इजा, बिजा आणि तिजा! आज तुम्ही तिसऱ्यांदा इथं पायधूळ झाडलीत—"

"म्हणून काय उदवत्त्यांचा सगळा जुडगा पेटवायचा?"

"हो, आजचा प्रसंग विशेष रीतीनं साजरा करतो आहे. तुमची-आमची आतां कांहीं नुसती तोंड ओळख राहिली नाहीं."

मी उदवत्त्या तिच्या चेहऱ्यासमोर धरतो न धरतो तोंच तिला ठसका लागला आणि तिच्या डोळ्यांतून पाणी गळूं लागलं. अगदीं न विचारतां मी तिला पाणी दिलं, तिच्या पाठीवरून हात फिरवला, तिचे डोळे टिपले. आणि तिचा ठसका गेला तरी तिचे हात माझ्या हातांतच राहिले. माझ्या स्पर्शानं ती अगदीं पेटून गेलेली उघडच दिसत होती. (स्त्रियांच्या कामुकतेचं हे स्पष्ट प्रत्यंतर होतं.) तिचा वेगानं सुरूं झालेला श्वास, थरथरणारा देह, कपाळावरचा घाम, आणि हातांची पकड यांनीं मला तिच्याविषयीं जे कांहीं सांगावयाचं ते सांगितलं होतं. तिचे हात मी सोडले आणि तिच्या खांद्यावर...

तोच चमत्कार झाला. एकाएकीं ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. व म्हणाली "नको! तुमच्या पाया पडते. अशानीं माझा सत्यानाश होईल, असाच आजपर्यंत आमचा सत्यानाश झाला आहे हो."

—मी एकदम तिला माझ्यापासून दूर केली. तिचा हा सतीत्त्वाचा पवित्रा अगदींच अनपेक्षित होता. नुसती हाताची हूल देऊन नाकास तूर न लागूं देता दोन हात दूर झुलवत ठेवायचा तिचा विचार असल्यास तो मला मुळींच सम्मत नव्हता. नुसतं 'प्लेटॉनिक' 'अध्यात्मिक' किंवा 'बौद्धिक' प्रेम करत बसण्या इतका मला आतां धीरहि नव्हता आणि वेळहि नव्हता. त्या साऱ्या गोष्टी भाबडी पोरं पहिल्या पोरीच्या विषयांत करतात. दुसऱ्या पोरीच्या विषयांत त्यांची वृत्ति अगदीं रोखठोक आणि वास्तववादी बनलेली असते म्हणून या चतुर मस्तानीला सत्त्वस्थ कारण्याचा जास्त घोळ घालण्यास मुळींच अवधि न देतां मी









म्हणालों, “आपल्यापैकीं कुणीच कुणाचा सत्यानाश करण्याचं कारण नाहीं. एका दुष्ट माणसाकडे तुम्ही पुन्हां पुन्हां आलांत हेच मुळीं चुकलं.”

“पण मी तुम्हांला दुष्ट म्हणत नाहीं.”

सगळ्या गोष्टी बोलूनच दाखवाव्या लागत नाहींत. त्या कृतीनेंहि सुचवितां येतात. आणि तशा त्या तुम्ही सुचविल्याहि आहेत.”

“नाहीं–नाहीं, खरंच नाहीं.”

ती आवेगानं पुढं आली आणि तिनें जवळ जवळ माझ्या हाताला स्पर्श केला. मी थंडपणें माझा हात मागें घेतला (चालवण्या केवळ तिलाच दाखवतां येतात असं थोडंच आहे ?) आणि म्हणालो,

‘ज्या गोष्टींत कुणालाच सुख नाहीं त्या टाळलेल्याच बऱ्या. पुढचा आठवडाभर मी खूप अभ्यास करणार आहे.”

“बरं, पुढच्या आठवड्यांत मी नाहीं येणार तुमच्याकडे. मग तर झालं ?” तिनं टचकन् डोळ्याला पाणी आणलं.

“आणि यायचं असेल तेव्हां छत्रीचा आधार शोधण्याचं मुळींच कारण नाहीं. भीति बाळगण्याचं कारण नाहीं.” पुढला मार्ग मोकळा ठेवण्याच्या दूरदर्शी धोरणानें मी मवाळ स्वरांत म्हणलों.

“पण मी तुम्हांला भीत नाहीं” ती म्लानपणें म्हणाली.

“पण मी तुम्हांला भितो. ही आपली छत्री—ही पर्स—ह्या चपला. इथें तुमचं आतां कांहीं राह्यलं तर नाहीं ना ?”

‘राहिलं आहे पुष्कळ राहिलं आहे.” ती थांबली, हंसली आणि झटक्यानें म्हणाली, “माझ्या वाईट आठवणी राहिल्या आहेत मागें.”

आणि ती गेली. गोष्या, ती गेली, पण ती पुन्हां परत येण्याकरतांच गेली आहे. सापाचं आकर्षण मुंगुसाला टाळतां येत नाहीं, सापानं मुंगुसाला भेटलंच पाहिजे आणि त्या दोघांपैकीं कुणाचातरी अवतार संपला पाहिजे—जसा कमू प्रधाननं माझा अवतार संपविला. पण तसाच विचार केला तर ह्या पोरीला मी एकटाच गिऱ्हाइक थोडाच असेन ? खरंच हिची फेक तरी काय आहे तेंच मला पहायचं आहे.

तुझा

—मधू

---

व्हिन्सेंट रोड, दादर
१३ ऑगस्ट १९३७

प्रिय गोपाळ,

नव्या आघाडीवर तुर्त सामसूम आहे. नाटकी पोर! Suspense चं महत्त्व तिला चांगलं माहित असावं. काल मन्मथ बॅनर्जींची स्वारी बीअरच्या अर्ध्या डझन बाटल्या घेऊन अकस्मात् आमच्याकडे अवतरली. माझी आणि त्याची फारशी ओळख नव्हतीच. पण नागपूरला दूरची वाटणारी माणसं इथें मुंबईला भेटली कीं एकदम जवळची वाटूं लागतात. आणि तशीच ती वागतात. माझी जास्त जानपछान करून घेण्यासाठींच तो आला होता. आणि ओळखीच्या समारंभाला ‘दारुसारखा मध्यस्थ नाहीं’ असं त्याचं म्हणणं. मलाहि काल त्यानं दीक्षा दिली. मी एकच पेला घेतला. आणि बाकीच्या साडेपांच बाटल्या बोल म्हणतां मन्मथनं लंबे केल्या. मला कांहीं बीअरची चव विशेष आवडली नाहीं. मन्मथ म्हणाला, ‘बीअरची चव’ उत्पन्न करावी लागते. तसच म्हटलं तर कारलें किंवा कांदा तरी काय मोठासा चवीला चांगला असतो! पण एकदां आवड उत्पन्न झाली कीं बीअर मला अमृतासारखी लागेल असं त्याचं म्हणणं. दारू म्हटली कीं बायकांनर, पोरींशी आल्याच. माझं आणि कमूचं प्रकरण, आमचा हृदयभंग यांचा त्याणें नटाप् नाडा माहिती असलेली पाहून मी सदैच झालो. पोरींकडून एकदां तरी फार चांगलं असतं असो तो म्हणाला पहिली पोरगी भेटण्यापूर्वी, पुरुष पोरींपेक्षांहि हवे, आणि मूर्ख असतात आणि पुरुषाला शहाणपणा, कमनपणा आणि फॅशन देण्याचं खरं श्रेय त्याला वयाविशाच्या पहिल्या पोरींचंच असतं असा त्याचा सिद्धांत! “तुला एखाद्या पोरीनं बनवलं होतं का ?” असं मी त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला, अर्थात् बनवलं होतं! पण त्यानं तें कर्ज आतां मी अगदी सव्याज फेडून टाकलं आहे. पोरींची जात जितकी धूर्त, तितकीच मूर्खी असते. Feminine—Foolishness—बायकी बेवकूफी हा मूर्खपणाचा एक वेगळाच प्रकार आहे असं तो म्हणतो. दोघींच्यांतली शहाणी या तिच्या ह्या ‘जातीच’ मूर्खपणापासून अलिप्त नसते म्हणे!

---



## कमळ निळें

कवि : श्री. बा. रानडे

तळ्याच्या कोनाशीं भुंग्यांच्या कानाशीं
लागून सांगतें कमळ निळें—
“सारया जणी मला म्हणती त्यांचे हसरे काळे टपोर डोळे
अजून नाहीं नाहीत बाई, भिडत नाहींत डोळ्यांशीं डोळे!

समोर येतां खिळते नजर
पायाच्या रंगीत नखाग्रावरती
गुलाबी पाकळ्या ओठांनीं झुलतां
पापण्या-पाकळ्या बाई मिटती;
आनंदी अश्रूंच्या दंव बिंदूवर”
थरथरे त्यांची अंधुक छाया
कोण, कसे ते, असूं दे अज्ञात
रोमांचित माझी जोवर काया!

भिडले नाहींत डोळ्यांशीं डोळे पण मला जें हवें तें मिळे!
तळ्याच्या कोनाशीं, भुंग्यांच्या कानाशीं
लागून सांगतें कमळ निळें!!







अनुक्रमणिका

" तुझा बायकोंच्यावर राग आहे का " असं मी त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला, " I love them wholesale. the dear creatures and they love me too." तो बायकांवर सरांस 'प्रेम' करतो. (लग्न नव्हे अं!) तरीहि (म्हणूनच) बायका त्याच्यावर सरांस प्रेम करतात. हें उघडच दिसत आहे. जो पुरुष पराक्रमावर, यशावर आणि कर्तृत्वावर प्रेम करतो त्याच्यावर बहुतेक बायका आपोआप प्रेम करतात. कर्तृत्वशालि पराक्रमापेक्षां बायकांवर अधिक प्रेम करणाऱ्यावर बायका कधींच प्रेम करीत नाहींत, अशासारखं कितीतरी सूत्रमय शहाणपण त्यानं मला ऐकवलं. ह्या विषयांतला अधिकारी पुरुषच तो! भक्तिपूर्वक मी त्याचं प्रवचन ऐकत होतो. त्याचं बोलणं मला पटतंहि होतं. परीक्षेपेक्षां, यशापेक्षां, पैशापेक्षां मिस् प्रधानवर मी जास्त प्रेम केल्याबरोबर तिनं मला लाथाडलं!

" तुझ्या रंगेलपणा विषयीं फार बोंब आहे." असं मी त्याला म्हटलं तेव्हां तो म्हणाला, सिनेमा, सिगरेट इतकाच बायकांच्याहि आहारीं गेलो आहे किंवा नाहीं. माझ्या यशाआड किंवा परीक्षेआड त्यांना मी कधींच येऊं दिलेलं नाहीं. सिनेमासारखं एक करमणुकीचं स्थान, विश्रान्तीचं साधन इतकंच महत्त्व मी त्यांना देतो. अर्थात् बायकांशीं बोलतांना ही भाषा मी कधींच वापरत नाहीं. तिथें मुखचंद्र, तारे, आकाश, गुलाब ह्यांच्याशींन गांठ ठेवतो. कारण पुरुषांच्या मानानें खरं ऐकण्याची बायकांची सिद्धता आणि इच्छा फार कमी असते. त्यांना गोड थापा मारणं आणि गोड थापा ऐकणंच जास्त आवडतं.

मन्मथ मला सांगत होता की नागपूरच्या मानानं " मजा " करायला मुंबईत खूपच सोय आहे. मी कांहीं 'मजा' केली का नाहीं म्हणून त्यानं विचारलं. मला अद्याप संधीच आली नाहीं असं मी म्हणालो. तेव्हां तो म्हणाला, संधि येत नसते, ती आणावी लागते आणि घ्यावी लागते. कांहींच नाहीं तर एखादी सेल्स गर्ल पकड असाहि सल्ला त्यानं मला दिला. विक्रेत्या मुलींची गोष्ट निघाल्याबरोबर माझं कुतूहल जागं होऊन ह्या ज्ञानी पुरुषाला मी विचारलं, " ह्या सेल्स गर्ल्स काय विकतात ? "

" अरे स्नो, पावडर, तेल बिस्कुटापासून अनेक गोष्टी. पण त्यांच्या जवळची सर्वांत महत्त्वाची वस्तू कोणती माहीत आहे ? "

" कोणती ? "

" अरे ह्या स्वतः ! "

" काय म्हणतोस ? "

" खरं सांगतो. नाहींतर विक्रीच्या कमीशनवर कां त्या संतुष्ट असतात म्हणतोस ? त्यापैकीं कांहीं जास्त महत्त्वाकांक्षी पोरी तर विक्रीच्या निमित्तानं चक्क वर संशोधन करतात ! आणि जन्माचं तुम्हांला फुकटांत पाडण्याची त्यांची इच्छा असते. पण येवढ्यानं संपलं नाहीं. पुरुषांना गुंतवून मग त्यांना ब्लॅकमेल करणाऱ्या कांहीं सेल्स गर्ल्सची उदाहरणं मला माहीत आहेत ! "

" बापरे ! म्हणजे त्यांच्याशीं संबंध न येऊं देणंच बरं म्हणायचं ! "

" जरुर संबंध येऊं द्यावा. संबंध कां येऊं देऊं नये ? इतकंच कीं त्यांना आपल्याला बनविण्याऐवजीं आपणच त्यांना बनवावं म्हणजे झालं. त्या आपल्याला Black mail करूं शकतील अशा रीतीनं आपण त्यांच्या हातीं सांपडूं नये म्हणजे संपलं. महा नाटकी, चलाख, ढोंगी असतात ह्या 'पोरट्या'! बारा ठिकाणचं पाणी प्यालेल्या असतात. पण त्यांनाहि आमच्या सारखे गुरु भेटतातच ! "

" पण ह्या विक्रेत्या मुलीहि कांहीं अपवादासाठीं, चांगल्या मुली असतीलच. " मी विचारले. " हें पहा बवें, हें अपवादाचं तत्त्व मोठं फसवं असतं गड्या. प्रत्येकाला वाटतं कीं स्वतःला भेटलेली सेल्सगर्ल तेवढी परिस्थितीनं नाडलेली, संधि मिळाली तर देवता होऊं शकेल अशी आहे. आणि आपण अपवाद आहोंत, नाडलेल्या आहोंत, झाल्या त्या भानगडी परिस्थितीमुळें झाल्या, संधि मिळाली तर आपण देवता पदापर्यंत सुधारूं असं ढोंग करुन एखाद्या झकास श्रीमंत पोराला गुंतवणं हें तर सामान्यतः ह्या पोरींचं ठरीव तंत्र असतं. असतील कदाचित्, त्यांच्यांतही अपवादानं चांगल्या मुली असतील. पण स्वतःच्या सुरक्षितपणाच्या दृष्टीनं विचारशील तर त्या बाजारु पोरी सगळ्या सारख्याच वाईट आहेत, असच समजणं शहाणपणाचं आणि बरोबर आहे. तेव्हां त्यांच्या चातुर्यावर मात करील अशा सावध चातुर्यानं आपल्याला त्यांच्याशीं वागावं लागतं. साप तर मेला पाहिजे आणि काठी तर न मोडली पाहिजे ! "

" म्हणजे कसं काय ? "

" म्हणजे असं, कीं आपणापासून ह्या पोरी जें घेऊं इच्छितात तें तर आपण त्यांना न दिलं पाहिजे आणि त्या जें आपल्याला देऊं इच्छित नाहींत तें तर आपण त्यांच्यापासून घेतलं पाहिजे. "

"काय देऊं इच्छित नाहींत त्या आपल्याला ?"

" गड्या बवें, तें एकेका पोरीवर अवलंबून असतं. आणि ज्या पोराला त्या बनवायला निघाल्या आहेत. त्याच्यावरहि अवलंबून असतं. पण सामान्यतः ह्या पोरी तुम्हांला एका मर्यादेपर्यंत भुलवत नेतात आणि मग तिथेंच झुलवत ठेवतात. त्या तुम्हांला वोट देतील, मनगटहि










देतील आणि मग तिथंच तुम्हांला खेळवत ठेवतात. वोट आणि मनगटापेक्षां तुम्हांला कांहीं तरी जास्त पाहिजे असतं, पण तें कांहीं त्या तुम्हांला देत नाहींत. Then it becomes a war of nerves तुम्हीं. अगदी पिसाळत जातां आणि त्या भरांत तुम्हांला पाहिजें तें त्यांच्याकडून घेण्याऐवजीं त्यांना पाहिजें तें देऊन बसतां ! ”

“ त्यांना काय पाहिजे असतं ? ” मीं विचारलं

“ तें पुन्हां एकेका पात्रावर अवलंबून आहे. कुणाला चैन, कुणाला नुसतीच मालाचें भक्कम विक्री, आणि पुष्कळ जणींना लग्न ! हीं लग्नवाली कुळं सगळ्यांत जास्त नाठाळ असतात ! लग्न करून जें घेण्याच्या योग्यतेचं नाहीं तें लग्नाच्या मोलानं त्या तुम्हांला देऊं इच्छितात, आणि माझ्यासारख्याला पाहिजे असतात लग्नाच्या भारी मोलाविना लग्नाचें लाभ ! ”

“ असं आहे एकूण ! ”

“ असं आहे हें सेल्स गर्ल महात्म्य ! आजकाल ह्या पोरी मुंबईत खूप मोकळ्या सुटल्या आहेत. ”

“ त्यांच्या घरच्या मंडळींना आवडत हें ? ”

“ घरची मंडळी राहिली घरीं ! ती नुसती खिशांत पडणारा “ किंगजॉर्ज ” पहातात ! पुष्कळदां हीं माणसं चांगलीं बनेल असतात आणि पुष्कळदां गरजू असतात ! अगदीं भाऊबापाच्या सहाय्यानं ह्या पोरींनीं माणसांना ठकवल्याचीं उदाहरणं माहित आहेत मला. त्यांनाहि जो ठकवूं शकेल त्या माणसाला कर्तृत्त्वान् म्हणेन मी. ” बॅनर्जी थोडा थांबला, त्यानं बीअरची नवी बाटली फोडली आणि एखाद्या हातखंडा परिचारकाप्रमाणें पेल्याच्या आंतल्या कांठावरून बीअर पेल्यांत ओतत तो म्हणाला—“ Taking of sales girls मला एका फक्कड पोरीची आठवण झाली. आहे काळी सांवळीच पण चांगली झक्क आहे अगदीं ! तिचे केस तर आमच्या बंगाली पोरींना लाजवतील असे लांबसडक आणि मऊ आहेत. बंगाल देशांतहि क्वचितच सांपडतील असे आहेत तिचे टपोरे डोळे ! and what a stately supple figure too ! Oh boy, she is a peach. ती नकटी आहे थोडीशी, पण त्या दोघांच्या गालखोटामुळें तिचा एकंदर गोडवा जास्तच उठून दिसतो ! Terrible sex appeal. Devasating ! त्याचें हें वर्णन ऐकून माझ्या छातींत एकदम धुसफुसल्यासारखं झालं आणि मी विचारलं, “ काय मन्मथ, ह्या पोरीशीं गांठ कुठें पडली तुझी ? आणि तूं नि तिची गांठ पडली असेल तर संपलंच सारं काम असं मी समजतो ”

“ काम संपलं तर नाहींच पण, नीटसं सुरुहि झालं नाहीं. अपमान सांगावा मनाला म्हणा, पण ती पोरगी म्हणजे माझं Waterloo आहे. तिच्या विषयांत चुकलंच माझं तंत्र. झाली काय गंमत कीं अशाच साबण, क्रीम वगैरे वस्तू विकायला ती एकदां तुझ्या खोलीवर आली. तिनं आपल्या वस्तूंची स्तुति केलीं आणि त्याहिपेक्षां जास्त मी तिची स्तुति केली. तिनं मला वस्तू दाखवल्या, त्या वस्तूंपेक्षां जास्त नीट मी तिला पाहून घेतली. आणि तिच्याकडे पाहूनच तिच्या साऱ्या वस्तू विकत घेतल्या. मला वाटलं ही बोलून चालून सेल्स गर्ल तर आहे, अशी कोणती मोठी ही सीता–सावित्री लागून गेली आहे. म्हणून पन्नास रुपयांच्या नोटा तिच्या हातांत ठेवतां ठेवतांच मी तिचा हात पकडला, ओढली तिला जवळ अन् केलं किस् ! पण बापरे बाप ! असं कांहीं बोचकारलं आहे तिनं मला अन् अशी कांहीं ती फुत्कारूं लागली आहे ! ती जेव्हा धमक्या देऊं लागली तेव्हां मी तिला सांगितलं कीं हें पहा, तूं माझ्या खोलींत आहेस, मी कांहीं तुझ्या खोलींत नाहीं. तुम्हां पोरींची कीर्ति चांगली माहित आहे लोकांना ! तूंच मोझ्या गळ्यांत पडून मला लुबाडायला निघाली आहेस असं सांगून बाजू उलटवणं मला कांहीं फारसं कठीण जाणार नाहीं !

ही भाषा मात्र तिला समजली आणि मग संतापानं रडत ती निघून गेली. वाटेत अजूनहि कधीं कधीं मला ती दिसते आणि मी दिसलों कीं अद्याप ती लाल होते. ”

“ ह्या पोरीच्या विषयांत तुझा अंदाजा कसा चुकला बॅनर्जी ? ”

“ चुकला खरा. नुसत्या स्तुतीनं बहुतेक पोरी बनतात, पण कांहींना दांडगेपणानं वागवलेलं जास्त आवडतं. कांहींना कुरवाळून घेणं आवडतं. कांहींना थोबाडीत खाणं आवडतं, ह्या पोरीच्या विषयांत मी घाईच केली जरा. मी गेलो माझ्याच गर्वात ! पण ती पोरगी असं फुटकळ काम करणारी नाहीं दिसत. मोठी कुरें बाज

पोरटी आहे. पहा कधीं तुझ्याकडे आली तर सोडूं नको."

"तिचं नांव माहित आहे का तुला!"

"अर्थात्! तिचं नांव सुरंगा शिरोडकर आहे. माझ्या Who is who मध्यें तिचें नांव सांपडणार नाहीं असें कधीं होईल?"

"कोण ब्राह्मण आहे का ती?"

"ब्राह्मण?" मांठमोठ्यानें खिदळत बॅनर्जी म्हणाला, "हो-हो ...अगदीं पुजारी, प्रासादिक पवित्र ब्राह्मण आहे ती! अगदीं थेट देवस्थानाशीं संबंध ठेवणारी!"

"म्हणजे, काय म्हणतोस काय तूं?"

"म्हणायचं काय? रक्तानं ब्राह्मण आहे ना ती! पण जातीनं नाहीं. तिच्या जातींत लोळयाला एक मासाभर कमी आहे केवळ!"

"आणि तरी ...."

"आणि तरी सुद्धां मिजास केवढी आहे पहा ना! आजकाल काय झालं आहे, कीं ह्या अकुलीन बायका तडफडताहेत लग्न जमवण्यासाठीं. आणि कुलीन बायका तडफडताहेत जमलेलीं लग्नं मोडण्यासाठीं! आतां ह्या पोरीच्या जागीं जर एखादी कुलीन सेल्स गर्ल असती आणि तिच्या अंगाला मी हात लावला असता तर तिनं कांहीं केल्या निश्चित एवढा तमाशा केला नसता. पण ह्या अकुलीन पोरींना आपलं पावित्र्य अट्टाहासानं सिद्ध करून दाखवायचं असतं ना! म्हणून करावे लागतात त्यांना हे नखरे!"

"नखरे? नाहीं तर काय! आतां ह्या पोरीच्या घरांत कुणी धंदा नसेल करत पण हिची एक बहीण आहे सिनेमांत अभिनेत्री. ही आहे सेल्स गर्ल. म्हणून एकूण एकच झालं कीं नाहीं?"

—गोप्या, मन्मथ बॅनर्जींची आज गांठ पडली हें एकूण बरंच झालं. त्याच्या बोलण्यानं मी थोडासा सुन्न झालों आणि चांगलाच सावध झालों. आतां तर मला कशाविषयीं कांहींच वाटण्याचं कारण नाहीं. Now I know my grounds better. गोप्या, माझीं हीं सारीं पत्रं तूं जपून ठेवणार म्हणतोस? अवश्य ठेव. कादंबरींत शोभेल असं थोडंतरी आतां व्हायला लागलं आहे खरं. तुला शक्य तेवढे सारे तपशील मी लिहून पाठवतों. पण पुष्कळदां लिहितां लिहितां अगदीं कंटाळा येतो बघ. आणखी ढोबळ गोष्टींचीं वर्णनं देतां येतात. पण आपल्या मनांत ज्या उलट सुलट अशा अनेक असंबद्ध आणि सूक्ष्म घडामोडी चालू असतात, त्यांचं वर्णन करून सांगणं मात्र मला नाहीं जमायचं. कारण त्या पुष्कळदां आपल्या आपल्यालाच नीटशा कळत नाहीत कीं उलगडत नाहींत. विसंगतींतहि सुसंगति शोधण्याचं काम तुझं! शरीर हा माझा प्रांत, मन हा तुझा!

—मधू

**पुनश्च:** आतां हेंच पहा ना! मन्मथ बॅनर्जीविषयीं माझ्या मनांत मधूनच एक कुसळ सलून जातं. सुरंगाचा त्यानं मुका घेतला त्यांत मला वाईट वाटायचं कारण काय? मी कांहीं तिच्याशीं लग्न लावणार नाहीं. आणि कुणाची तरी अगदी लग्नाची बायको झालेल्या कमू प्रधानला मी अगणित वेळां Kiss केलें होते त्याचं काय?

—मधू

---

व्हिन्सेंट रोड, दादर
दि. २२ ऑगस्ट १९३७

प्रिय गोपाळ,

तुझं पत्र पावलं. वटाट्या, जिराफ, वुमनराव, ह्यांचीहि पत्रं मिळालीं. त्या साऱ्यांना मी उत्तरं धाडलीं आहेत. तुला शेवटीं उत्तर धाडतों आहे.

कारण तुझं पत्र चार इतर मित्रांच्या पत्रासारखं नव्हतं. आतां " News " एक आठवड्यानंतर सुरंगा निश्चयानं माझ्याकडे आली नाहीं आणि मग लागोपाठ तीनदां आली. मधल्या आठवड्यांत तिनं कांहीं कामधंदा केला कीं नाहीं ह्याचीच मला शंका आहे. कारण पहिल्या दिवशीं ती आली तेव्हां तिनं माझ्यासाठीं स्वतःच्या हातानं विणलेला पुलओव्हर आणि पायमोजे भेट म्हणून आणले. वाटेल तर मी असंहि धरून चालतों कीं, ह्या वस्तू तिनं विकत घेतल्या आणि स्वतःचं नांव सांगून त्या मला दिल्या. पण तिनं खरंच त्या वस्तू माझ्यासाठीं स्वतः विणल्या असतील तर त्या विणायला एखादा आठवडा तिला रात्रंदिवस खपावं लागलं असेल. अर्थात् Entertainment म्हणून माणूस वाटेल ते श्रम करायला तयार असतो. ( कमू प्रधानला भेटी देण्यासाठी आणि भेटी निवडण्यासाठीं मी किती खपलों तें एक माझ्या जिवाला माहित! पुलओव्हर आडून एखाद्याच्या हृदयावर हल्ला आणि कबजा करण्याचा प्रेमशास्त्रांतला ठरीव पवित्रा आहे कीं काय कुणास ठाऊक? कारण कमू प्रधाननंहि आपल्या मोहिमेचा प्रारंभ असाच " पुल ओव्हर " पासून केला होता. एकूण काय कीं इतिहासाच्या पुनरावृत्तीला सुरुवात झाली आहे ) मी मात्र ही संकटाची सूचना समजतो. तिनं माझ्यासाठीं ताप, वेळ, पैसा किंवा तिन्ही पणाला लावून मोहिमेसाठीं कंबर कसावी, ह्याचाच अर्थ असा कीं संरक्षणाची कडेकोट सिद्धता मीहि केली पाहिजे, कारण पुलओव्हर, पायमोजे वगैरे पायापासून पुढें ताबा घेत जाणारी मंडळी अखेर अखेर अचूक हातावर लग्नाची बेडी आणि गळ्यांत माळेची तान अडकविण्याची ईर्ष्या ठेवूनच पुढें सरसावतात? म्हणून हातांत पुलओव्हर घेऊन ती पुढें आली तेव्हांच मीं हा डाव तिच्या अंगलट नेण्याचा निश्चय करून बसलों. " आपणापासून पोरी जें घेऊं इच्छितात, ते तर आपण त्यांना न दिलं पाहिजे. आणि त्या जें आपल्याला देऊं इच्छित नाहींत तें तर आपण त्यांच्यापासून घेतलं पाहिजे हें मन्मथचं महावाक्य तेव्हां मला आठवलं.

" हें मी काय आणलं आहे, पाहिलंत ? ती गालाला खळ्या पाडत म्हणाली.

" पाहिलं. त्या वस्तूला पुलओव्हर म्हणतात."

" कसा आहे ? "

" गर्द निळ्या रंगाचा आहे. "

" तुसं नव्हें कांहीं ! "

" मग कसं ? "

" मी म्हणतें चांगला आहे कीं वाईट आहे ?"

" सगळेचं पुलओव्हर मला वाईट दिसतात."

तीं थोडी हिरमुसली झाली आणि म्हणाली, " आठवडाभर ह्या पुलओव्हरसाठीं मीं दिवसाची रात्र केली आहे. "

" आणि मग दिवसा काय केलंत ? "

" दिवसासुद्धां बहुतेक वेळ पुलओव्हर आणि पायमोजेच केले. "

" तर मग धंदा केव्हां केलात ? "

" फारसा केलाच नाहीं. हाच धंदा केला !"

" हा कुठं धंदा होऊं शकतो ?"

" होऊं शकतो. मी केलाच आहे ना ! " ( The irony of it गोप्या ! खरंच, किती खरं बोलत होती पोरगी ! )

" म्हणजे त्याचा अर्थ असा कीं तुम्ही आठवडाभर अगदीं आंतबट्ट्याचा धंदा केलात. लोकरीसाठीं पैसे वेचलेत. कामाचा वेळ गमावलात पैसे गमावलेत."

" मला नाहीं एवढी पैशांची चिंता ? "

" चिंता नाहीं तर मग ही " मस्तानी प्रॉडक्टस्ची सेवा कशापायीं ? परोपकारासाठीं ?"

तो थोडीशी वरमली. ( मी पाहून ठेवलं आहे, ज्यांच्यापाशीं पैसे नसतात आणि पैशांचीच ज्यांना चिंता असते, ते नेहमींच आपण पैशाला कःपदार्थ मानतों असे तरी दाखवतात किंवा आपल्यापाशीं कामापुरता पुष्कळ पैसा आहे असं तरी दाखवतात. ) आणि म्हणाली,

" उगाच भलते विषय कां काढतां ? हा पुलओव्हर तुम्हांला खरंच नाहीं का आवडला ? मीं तो तुमच्यासाठीं आणला आहे."

" मी तो घेणार नाहीं ! "

" कां पण ? " आधींच पाणीदार असलेल्या डोळ्यांत पाणी आणून ती म्हणाली, " तुमचा–तुम्हीं तो घ्यालच असा विचार करीत मीं ह्या पुलओव्हरचा प्रत्येक टांका घातला आहे. "

" पण मी म्हणतों, एका लबाड, अविश्वासू माणसासाठीं एवढे श्रम तुम्हीं कां घेतलेत ? "

" मीं कधीं तुम्हांला अविश्वासू म्हटलं ? कधीं लबाड म्हटलं ? "

" म्हणायला कशाला पाहिजे, पण तुम्हांला तेंच वाटतं. "

" नाहीं वाटत. "

" नाहीं वाटत ? तर मग सिद्ध करा. "

" मी सिद्ध केल्यावर घ्याल तुम्हीं पुलओव्हर ? "

" पुलओव्हर देतांनाच तें सिद्ध करायचं आहे ! "

" म्हणजे काय बाई ! मला नाहीं समजलं."

" मी सांगतों समजावून ? पुलओव्हर देण्याच्याही पद्धति असतात ! "

" म्हणजे ? लहान मुलासारखा तो मी तुमच्या अंगांत घालून देऊं का काय ? "

" बरोबर ओळखलंत. तरच तो पुलओव्हर मी घेईन. तरच तो तुम्हीं माझ्यासाठीं विणलात असं मी समजेन ! "

" मी नाहीं असं भलतंच कांहीं करायची !"

" तेंच मी म्हणतों. तुमचा विश्वास कुठं आहे माझ्यावर ? "

( गोप्या, " तुमचा विश्वास नाहीं माझ्यावर " ह्या वाक्याच्या रुपानं नकळत कमू प्रधान माझ्या तोंडानं बोलते आहे. त्राग्यानं डोळ्यांत पाणी आणून ती माझ्या तोंडावर हें निर्वाणीचं वाक्य नेहमीं फेकत असे. अगदीं दुसऱ्याशीं लग्न ठरवायच्या आधीं दोन दिवस " तुमचा विश्वास नाहीं माझ्यावर " ह्या मंत्राचाच प्रयोग माझ्यावर केला. )

" माझा तुमच्यावर विश्वास आहे. "

" तुमचा माझ्यावर विश्वास नाहीं. मला तो पुलओव्हर नको, तो पुलओव्हर मुळीं तुम्हीं माझ्यासाठीं केलेलाच नाहीं; तुमच्या त्या शेटसाठीं केला असाल "—" तें कार्ट माझं नाहीं, रामलालचं आहे " ह्या वाक्याच्या अवसानांत मी रागावलों. ह्या वाक्याचा परिणाम मात्र गोळी मारल्यासारखा झाला. तिचा चेहरा पांढरा पडला, मग लाल झाला आणि कांपऱ्या स्वरांत ती म्हणाली, " होऊं द्या. तुमच्या मनासारखं. मग माझं काय वाटेल तें होईना ! "

तिनं पुलओव्हर उचलला. आणि डोळ्यांत पाणी आणून अडखळत ती माझ्या जवळ आली. पुढं काय झालं तें तुझ्यासारख्या लेखकाला सांगायलाच पाहिजे का ? कल्पना कर, पुलओव्हर माझ्या अंगावर चढवतांना तिचे हात माझ्या अगदीं मानेभोंवतीं पडले. आणि त्या दिवशीं जें मला करतां आलं नाहीं तें आज मी केलं. मी तिला जवळ घेतली आणि घट्ट कवटाळली. प्रथम माझ्या मिठींत ती एखाद्या निर्जीव पुतळीसारखी पडली पण चार दोन क्षणांत ती शरीरभर कांपूं लागली तिनं आपले हात माझ्या मानेभोंवतीं आवळले, आणि हुंदके देत ती पुटपुटली. " कशाला माझ्या हातून हें करवलंत ? " . आणि नंतर माझ्या ओठांनाहि तिच्या ओठांनीं आवेगाचे पडसाद दिले. पण तरहि ती रडत होती. कांहीं अतिशय भयप्रद अशा अज्ञान वेदनेमुळें तळमळून रडावें. तशी ती मधूनच अगदीं फुटून रडत होती.

कांहीं क्षण, अगदीं कांहींक्षण, मी देहभान विसरलों. तिच्या स्पर्शांत, तिच्या शरीराच्या गंधांत कसली तरी अतिशय मादक, अतिशय उत्कट, अतिशय सुगंधित, अशी जिवंत धुंदी आहे. स्त्री शरीराच्या सुगंधा विषयींची सारीं संस्कृत वर्णनं म्हणजे मला इरसाल थापा वाटत होत्या. ( कमू प्रधान अगदींच निर्गंध, अगदींच मचूळ होती हें आतां तुलनेमुळें मला कळत आहे. ) पण तें तसं नाहीं. केवळ ह्या गंधामुळंसुद्धां एखादी मुलगी एखाद्या पुरुषाला जन्माचा भारून ठेवूं शकत असेल. त्या गंधाच्या जादूमुळें, त्या स्पर्शाच्या थरारत्या माधुर्यामुळें क्षणभर माझं देहभान गेलं असलं तर नवल नाहीं. ( नाटक पाहतांनाहि माणसाचं देहभान विसरणं ह्यालाच तर कला म्हणतात ना ? ) पण कां कोण जाणे, उन्मत्त समाधीच्या दहापांच क्षणांतच मला मन्मथ बॅनर्जीची आठवण झाली. याच्या भाषणाची आठवण झाली आणि आमची मिठी अद्याप तशीच असली तरी माझी गुंगी मात्र खाडकन् उतरली. माझ्या उभं राहण्याचा पवित्रा, तिचा विन्यास, तिचीं तीं रडवीं अडखळत वाक्यं, तें

साऱं कंपित, रोमांचित प्रकरण, मला एकाएकीं नाटकी, खोटं, हास्यास्पद वाटूं लागलं. इंग्रजी सिनेमांतून असे चुंबनाचें ठराविक प्रसंग पाहिले, "I love you, Oh how I love you!" हें नायक नायिकेचें सद्गदित वाक्य आणि "चक्" चा आवाज ऐकला कीं मला खदखदून हंसू येतें. असे ते सिनेमांतले दीर्घ चुंबनाचे सारे हास्यास्पद फिरंगी प्रसंग मला आठवले आणि मी चांगला भानावर आलों. माझा धोका मला कळला. मन्मथला जें शक्य झालं नव्हतं तें मला सहज साधलं होतं. हाच माझा धोका होता. तिनं मला व्होट दिलं होतें. मनगटहि दिलं होतं. आणि येवढ्या मोलावर मला सबंधच्या सबंध गिळण्याचा तिचा विचार होता निश्चित. माझ्या मानेभोंवतीं हळुहळू लग्नाचो पाश आवळण्याचा तिचा विचार होता. तिचे अश्रू, तिच्या शब्दांतला अति असहाय कंप, ह्यानीं मी कांहीं क्षण निस्संशय हलून गेलों होतों; पण कोणती स्त्री अश्रू ढाळत नाहीं? कोणती बाई कांपऱ्या स्वरांत बोलत नाहीं? बायकांचा हा पवित्रा ठरीव आहे. कदाचित हो Strategy माझ्या विषयांत कित्येकदां वापरली होती. त्यामुळें मी फसलोहि होतों. ह्यांतलं खरं कोणतं. आणि नाटक कोणतं हें कसं ओळखायचं? अपवादाचं तत्त्व मोठं फसवं असतं. प्रत्येकाला वाटतं कीं आपल्याला भेटलेली मुलगी तेवढी अपवाद आहे. ती देवतास्वरुपापर्यंत जाऊं शकेल. कांहींना कुरवाळून घेणं आवडतं,...ह्या बाजारू पोरी सगळ्या सारख्याच वाईट आहेत असं समजून चालणंच स्वतःच्या दृष्टीनं सुरक्षित असतं.

मन्मथ बॅनर्जींचीं वाक्यच्या वाक्यं मला आठवूं लागलीं आणि एखाद्या कांटेरी फांदीसारखीं खुपूं लागलीं. मन्मथ बॅनर्जी...मन्मथ...!

मी तिला दोन्ही हातांनीं दूर केलं, तिचे खांदे तसेंच धरुन ठेवले आणि सरळ तिच्या डोळ्यांकडे पहात तिला विचारलं—

"जें झालं तें तुम्हांला नको होतं का? खरंच मनापासून नको होतं का?"

तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. नुसतीच मान खालीं घातली. मी पुन्हां म्हणालों—

"ह्यापूर्वी असं कधींच झालं नव्हतं का?"

"कधींच नाहीं." तिनें ताड्‌कन उत्तर दिलं.

"अगदीं खरं सांगतां?"

"अगदीं खरं सांगतें?"

—ती माझ्याशीं अगदीं खोटं बोलत होती—आणि तेहि अगदीं सात्त्विक आवेशानें!—बायका जेव्हां बोलतात तेव्हां त्या नेहमीं सात्त्विक आवेशानं खोटं बोलतात. त्यांचा हा आवेश इतका कांहीं सात्त्विक दिसतो कीं समोरच्या माणसाला क्षणभर वाटावं, कीं जणूं आपणच सत्याचे पुतळे आहोंत. क्षणभर मलाहि वाटलं कीं जणूं मन्मथ माझ्यापाशीं कांहीं बोललाच नव्हता. मन्मथच्या आठवणीनं माझ्या रक्तांतील उष्णता वाढली असली पाहिजे. मी घाईघाईनं अंगांतला पुलओव्हर काढूं लागलो.

"पुलओव्हर अंगांत राहूं द्याना जरा!" ती म्हणाली.

"मला उकडूं लागलं आहे"

"पण मी असेपर्यंत राहूं द्या."

"बापरे! म्हणजे झालंच—कम्प!" अशा काव्यमय संदर्भात हें वाक्य मी कसा बोलून गेलों कोण जाणे. निदान नुकताच घडलेला रोमांचकारी प्रसंग तरी मी लक्षांत ठेवायला पाहिजे होता. पण मी अगदीं फट्‌कन बोलून गेलो खरा. तिच्या डोळ्यांत पुन्हां पाणी आलं. (बहुतेक बायकांना "वरुणास्त्रा" ची ही विद्या अवगत असते. कांहीं कांहींना तर फारच! पुरुषाच्या जिवाचा उन्हाळाच नव्हे तर पावसाळाहि करून सोडतात) ती म्हणाली—

"शेळी जाते जिवानिशी आणि खाणारा म्हणतो वातड!"

"अग पण शेळी जिवानिशी जावला निघाली तर बोकडाचा जीवसुद्धां कांहीं ठिकाणावर रहात नाहीं!"

ती एकाएकीं प्रसन्न झाली. माझ्या अकस्मात् निघून गेलेल्या, एकवचनामुळें प्रसन्न झाली. माझ्या वाक्यांतील अगदीं हेतुवाचक सूचनेमुळेंहि प्राय: ती प्रसन्न झाली असावी आणि त्याच प्रसन्न अवस्थेत ती निघून गेली.

आणि त्यानंतर ती पुन्हा पुन्हा आली. प्रत्येक खेपेस ती माझ्यासाठीं कांहींतरी घेऊन येते. माझ्या बोलण्यांत सहजगत्या आलेल्या त्या माझ्या बारीकसारीक आवडीहि तिनं काळजीपूर्वक ध्यानांत ठेवल्या. एक दिवस तिनं माझ्यासाठीं बकुळीच्या फुलांची माळ आणली. एक दिवस केवड्याचं फुल आणलं. कपड्यांत केवडा ठेवणं मला आवडतं हें सुद्धां तिच्या दृष्टीतून निसटलं नव्हतं. एक दिवस तर तिनं माझ्यासाठीं तळलेले मासेच आणले! (ही भेट मात्र बकुळीची माळ आणि केवडा यांच्या मानानं फारच गद्य झाली नाहीं? पण तिला उपयुक्ततावादाचा भक्कम आधार आहे. शिवाय लग्नापूर्वीच प्रेम फुलांवर चढून संतुष्ट होत

असलं तरी लग्नानंतर तेंच प्रेम आमटी भात चांगला वेंकावून खाऊं लागतं आणि आमटी बिघडल्याविषयीं आरडाओरड सुद्धां करतं.) तें मासे पाहिल्यावर मी तिला म्हटलं—

"तूं माझ्यासाठीं मासे आणलेस?"

ती म्हणाली–"घ्या! घरीं केलेले आहेत. तुम्ही हॉटेलमध्यें खात असता त्यापेक्षां चांगले आहेत!"

"अग पण तुम्ही ब्राह्मण ना?"

"ब्राम्हण आजकाल सगळं कांहीं खातात वर. आणखी आम्हीं आहोंत सारस्वत ब्राह्मण."

आणि ती हंसली. तें हसणं मला विचित्र, विषादानं ~~भरल्यासारखं~~ [वाटलं]. सारस्वत ब्राह्मण–? सारस्वत ब्राह्मण Indeed!

माझ्या स्पर्शाविषयींचा संकोच तिनं आतां सोडला आहे. मी तिला त्या माशांचे घास दिले ते तिनें मुकाट्यानं घेतले. एवढेंच नाहीं तर तिनंहि मला घास दिले. तें घास घेतांना मला मोठ्या गुदगुल्या होत होत्या. (तिचीं बोटं मोठीं कोंवळीं, सडक, सुंदर आहेत.) लग्नाचें मोल न देतां मी लग्नाचे सोहाळे भोगत होतों. बरोबर प्रवास करणाऱ्या, एका दिव्हनांत खेटून बसणाऱ्या, एकत्र जेवणाऱ्या तरुण जोडप्याच्या चित्राचा लहानपणापासून मला मोठा मोह वाटत आला आहे. आपलंहि लग्न व्हावं, आणि एखाद्या तरुण फुललेल्या बाईला बरोबर घेऊन अधिकारानं आपणहि मिरवावं, असा लोभ वयाच्या अगदीं चवदा पंधराव्या वर्षापासून मला वाटत आला आहे. आतां लग्नाचा तर तूर्त प्रश्नच नाहीं, पण ती हौस मात्र मी कोणतंहि विशेष मोल न देतां पुरी करून घेणार आहे. अरेच्चा, आमचं तें "मत्स्यपुराण" अर्ध्यावरच राहिलं कीं.

"आवडले तुम्हांला मासे?" तिनं मला विचारलं.

"मीनाक्षीनं आणलेले मासे कां नाहीं आवडणार?" अगदीं एखाद्या गचाळ कादंबरींत शोभेल अशी मी कोटी केली. पण तिला हंसण्यांला तेवढी पुरेशी ठरली. (उच्च विनोदामुळें बायका गंभीर होतात. किंवा रागावतात. कारण त्यांना तसला विनोद समजतच नाहीं. आणि पोरकट कोट्यांमुळें मात्र त्यांची बालबुद्धी खदखदून हंसते असा माझा नेहमींचा अनुभव आहे.)

"बरं, मग मी पुन्हां आणीन हं. आतां वेगळ्या प्रकारचे आणीन."

"कां, पैसे जास्त झाले आहेत वाटतं?" मी विचारलं.

"पुष्कळ आहेत" ती म्हणाली.

आपल्यापर्लां पैशाची उणीव नाहीं. आपण पैशाच्या दृष्टीनंसुद्धां अन्य मुलींच्या आणि माझ्याहि तोलाच्या आहोंत, असं दाखवण्याचा तिचा जाणता किंवा नेणता प्रयत्न असावा. ह्या महागामोलाच्या प्रयासापायीं सामान्य मुलीला कुठें कुठें आणि कसे कसे चिमटे काढून घ्यावे लागले असते त्याची कल्पना कर. पण हिच्यापाशीं कुणाला न दिसणारीं उत्पन्नाचीं साधनं असतील अंधेरांतलीं. म्हणून तर एकदां माझ्यासाठीं सोन्याच्या गुंड्या भेटीदाखल आणून तिनं मला चकित केलं.

"कशाला आणलंत हें?"

"तुमच्यासाठीं."

'तें कळलं. पण सोन्याच्या गुंड्या मी तुमच्यापासून कां घेऊं? माझ्याजवळ गुंड्या आहेत–गुंड्या घ्यायला पैसेहि आहेत."

"तुम्ही श्रीमंत आहांत तें माहित आहे मला. मी तुम्हांला काय देऊं शकणार बापडी?" तिच्या डोळ्यांत आसवं आलीं. माझी वृत्ति विरघळली. मी म्हणालों, "मग मला ह्या गुंड्या तुम्हीं कां देतां?"

"मला आपलं वाटतं, कीं मी दिलेली कोणती तरी वस्तू नेहमीं तुमच्यापाशीं माझी आठवण म्हणून असावी?"

"तो पुलओव्हर आहे ना? तें पायमोजे आहेत."



















" पण तुम्हीं यांपैकीं कांहींच घालत नाहीं. "

" मला नागपूरच्या वायुमानाची संवय आहे / मुंबईच्या उकडीया पावसाळ्यांत मी पुलओव्हर घातलं तर शिजून निघेन ! "

" म्हणूनच त्या गुंड्या मी आणल्या आहेत. त्या तुम्हांला नेहमीं वापरतां येतील. "

माझ्या अनुमतीची वाट न पाहतां माझ्या शर्टची वटन्स काढून तिनं आपल्या गुंड्या तिथं लावल्या सुद्धां ! ( एकूण काय कीं तिनं आपली मोहिम जोरांत सुरू केली आहे ! " पुलओव्हर " ची नेम हृदयाच्या प्रांतावर ! गुंड्यांचं निशाणहि तेंच ! सगळा मारा तिथं आहे. पण तिला कल्पनाहि नसेल कीं भेटीगांठीसकट हे सारे डाव मला चांगले माहित आहेत म्हणून. प्रेम दाखवायच्या पद्धतींत सुद्धां किती कंटाळवाणा तोच तोचपणा असतो ! तेंच रडणं भेकणं, तेंच सद्गदित होणं, त्याच भेटीगांठी, तें सारं नाटक ! नाटक तेंच पण पात्रं वेगळीं ! )

मला एका परीनं मोठं संकोचल्यासारखं होत आहे. कोणत्याहि पोरीनं माझ्यासाठीं पैसे वेचणं मला मोठं कमीपणाचं वाटतं. पण ही तर ज्या वेगानं मी कमूवर भेटींची वरसात केली, त्याच वेगानं माझ्यावर वस्तूंचा वर्षाव करते आहे ! अंतर इतकंच कीं ह्या वेळीं आमच्या भूमिकांची उलटापालट झाली आहे. कमूच्या जातीची भूमिका मी करतों आहें आणि माझ्या जातीची भूमिका सुरंगा करते आहे ! कमूनं आपल्या "शिक्षेचा प्रसाद" मला दिला आणि तिच्या दीक्षेचा तोच "शिक्षान्त प्रसाद" मी सुरंगाला देतों आहें.

कांहींही असलं तरी एक गोष्ट करणं मात्र भाग झालं. ह्या पोरीनं ज्या मोलाच्या भेटी मला दिल्या त्यापेक्षां अधिक मोलाच्या भेटी मला तिला दिल्या पाहिजेत; वास्तविक भेटींचं हें लफडं आतां मला करायचं नव्हतं. त्यापेक्षां तिला सरळ तिच्या भेटींच्या मोलाचे पैसेच देतां आले असते तर किती बरं झालं असतं. पण तें अगदींच अशक्य आहे. आणखी तिच्या ह्या असल्या ऋणांत राहणं तर मला स्वप्नांत सहन व्हायचं नाहीं ! तिच्या श्रमाच्या पैशांनीं घेतलेल्या भेटी ( मग कोणते का "श्रम" असेनात ते ! ) प्रतिभेटीविना मी घेऊं ? छीः ! तें नाहीं आपल्याच्यानें होणार. कांहीं कांहीं पुरुष निर्लज्यासारखे बायकांच्या जिवावर कसे चरतात तेंच मला कळत नाहीं.

तिच्या " भेटी "मुळें आतां दोन्ही अर्थांनीं मला अवघडल्यासारखं वाटतं. सहामाही परीक्षा डोक्यावर येऊं लागली आहे. ह्या भेटीगांठी म्हणजे तिच्या जन्माचा धंदा होऊं शकेल, पण माझा कांहीं तो धंदा होऊं शकत नाहीं. ती माझी करमणूकच राहणार. लवकरच तिच्यापाशीं परीक्षेविषयीं थोडंसं रडून मला कांहीं काळ तरी विरहसागरांत लोटून देण्याविषयीं मी तिला गुडघे टेंकून विनंति करणार आहें. आणि गोप्या, तुलाही पण इतकीं लांब पत्रं मी पाठवणार नाहीं, असो. आतां मुंबईला माझं मन हळुहळू रमूं लागलं आहे. विद्यालयांतहि माझ्या बुद्धीचा प्रकाश थोडाबहुत फांकूं लागला आहे. मी नुसताच कांहीं रुपेरी झूल घातलेला नागपुरी टोणगा नाहीं, हें बऱ्याच जणांना पटूं लागलं आहे. बाकी इथल्या ह्या वैद्यकीय विद्यालयांत नागपुरी विद्यार्थ्यांचं कर्तृत्त्व अगदीं अक्षरक्षः पहिल्या प्रतीचं आहे. गेलीं कित्येक वर्षं पहिला क्रमांक सामन्यतः त्यांनींच अगदीं मिरासदारीनं मिळवून ठेवला आहे. अगदीं पूर्वी वऱ्हाड-नागपूरकडच्या विद्यार्थ्यांच्या ज्या पिढ्या येथें येऊन गेल्या त्यांनीं मोठी चमत्कारिक कीर्ति आपल्यासाठीं मिळवून ठेवली आहे पहा ! विलायतेंत जाणारे कांहीं सोकाजी जसे नुसते पैसा उडवण्याला आणि यथेच्छ हुंदडायला म्हणून तिथें जायचे तशाच कांहींशा हिशेबानं वऱ्हाडी नागपुरी इथें यायचे ! त्यामुळें नागपूरचा माणूस म्हणजे खूप श्रीमंत, खूप मूर्ख आणि खूप धटिंगण अशी इकडे कल्पना होऊन बसली. हिंदुस्थानांत साप, गारुडी, वाघ आणि संस्थानिक काय ते आहेत ह्या फिरंगी कल्पनेइतकीच नागपूरकरांविषयींची ही कल्पना पुण्यामुंबईला लोकप्रिय आहे. अस्तु. सगळ्या मित्रांना साष्टांग दंडवत माझ्यावतीनें प्रविष्ट कर. कळावें. पत्रोत्तर यावें.

आपला

—मधू

**वन्स मोअरः** माझं " मान " कापण्याचं काम खूप धडाक्यानं चालू आहे. विच्छेदनाच्या ह्या कामांत मला आतां मौजहि वाटूं लागली आहे. माझं डिसेक्शन तसं सायन्स कॉलेजांतहि बऱ्यपैकीं होतं म्हणा ! मानेची ही चिरफाड मला शक्य तितक्या वेगानें आणि सफाईनें संपविली पाहिजे.

—मधू

व्हिन्सेंट रोड, दादर,
२० ऑगस्ट ३०

प्रिय गोपू,

सुरंगा माझ्याकडे आली नाहीं असा एकहि दिवस जात नाहीं. तिला मी सांगितलं कीं ८ सप्टेंबरला माझी सहामाही आहे, तुला पाहिल्यावर ग्रे, हॅलिबर्टन, हॅवेल असल्या रुक्ष लोकांकडे माझं लक्ष लागत नाहीं. ती म्हणते, मी तुम्हांला त्रास देणार नाहीं. नुसती मुकाट्यानं वसेन. मी तिला म्हटलं कीं, तुझा चेहरा समोर असतांना पुस्तकांत तोंड खुपसून बसण्याइतका मी अरसिक नाहीं. ( वास्तविक तिच्या नुसत्या चेहऱ्यावर संतुष्ट रहाण्यास आतां मी तयार नाहीं. माणसानं नेहमीं प्रगति करीत राहिलं पाहिजे. पण माझ्या पुरोगामी धोरणाला तिच्याकडून प्रोत्साहन तर नाहींच पण कडवा विरोध आहे. ) देवदर्शनाला जावं तसं निदान पांच मिनिटांसाठीं तरी प्रतिदिनीं इथें येऊन जाण्याची तिची इच्छा असते. हें तर तें चाळवून चाळवून कांसौंदर्याच्या कांचन मृगासाठीं बेभान केलेल्या पुरुषाला धांवता ठेवत अखेर त्याला लग्नाच्या खड्ड्यांत घालण्याचं नायकांचं प्रसिद्ध तंत्र आहे. पुष्कळदां मी बुद्ध्याच वर्गातल्या मुलींचे नाहीतर स्वरुप सुंदर नर्सेसचे उल्लेख बोलण्यांत सोडून देतों. तेव्हां ती अस्वस्थ होते आणि तिचा दिवसांतून मला एकदां तरी भेटून जाण्याचा आग्रह जास्तच वाढतो. तिला तिच्या क्षेत्रांत स्पर्धा नको आहे. तिला वाटत असेल, करतां काय ! मध्येंच तिचा डाव एखादा चलाख नर्सनं उधळून दिला तर ? ( पण त्या मूर्ख मुलीला हें माहित नाहीं कीं नर्सेसशीं तर अद्याप तसा आमचा संबंध येत नाहींच पण स्टेथेस्कोपशीं सुद्धां येत नाहीं. )

आठ आणि नऊ सप्टेंबरला आमची सहामाही आहे. ( अर्धी अधिक पोरं ह्या परीक्षेला बसतच नाहींत म्हणा ! ) त्यानंतर ही टर्म संपते व मग महिनाभर सुटी. ह्या सुटींत इथेंच राहण्याचं आणि पुष्कळसा वेळ तिच्याबरोबर काढण्याचं आश्वासन मी दिलं तेव्हां कुठं एक सप्टेंबरपासून आमची आठवड्याची रजा तिनं मान्य केली. जोडप्याचं सुख अनुभवण्याची माझी फार दिवसांची हौस पूर्ण करण्याची ही संधि मी तरी कशाला घालवूं ? तिला वाटत असेल माझ्यावरची मोहिम येत्या पहिल्या दीड महिन्यांतच तिला निकालांत काढतां येईल म्हणून ! माझाहि विचार तोच आहे, पण निराळ्या अर्थानं. तिच्या घरीं मला नेण्याविषयीं आजकाल पुष्कळदां बुद्ध्याच मी तिच्यामागें टुमणं लावत असतों. ( तिच्या घराचं नांव काढलं कीं तिचा





चेहेरा असा कांहीं उतरतो म्हणतोस ! ) हिच्या घरीं मला नेण्याची ती नेहमीं टाळाटाळ करीत असते. म्हणते, माझ्या घरच्या माणसांना तें आवडणार नाहीं ! जशी कांहीं हिच्या घरचीं माणसं म्हणजे संतमंडळीच ! पण कधीं झालं तरी हिच्या घराचा भेद कधीं तरी घेतल्याशिवाय मी राहणारच नाहीं.

माझ्या ब्लॉकची व माझ्या शेजाराची माहिती सांगविण्याची आठवण तुला करी लवकर झाली म्हणायची. माझा ब्लॉक तीन खोल्यांचा आहे. Parlour, Bed and Bath ! ( प्रथम प्रथम ती बेडरूम मधीं अगदीं खायला उठायची; पण आतां माझी दृष्टी वरीच आशावादी बनली आहे. ) व्हिन्सेंट रोडवर एका उद्यानवजा आवारांत एकाच धर्तीचे चार सहा इमले आहेत, त्यांपैकीं एकाच्या दुसऱ्या माळ्यावर माझा ब्लॉक आहे. ( मुंबईचा दुसरा मजला म्हणजे नागपूरचा तिसरा मजला ! आपण तळमजल्याला पहिला मजला समजतों आणि पहिल्या मजल्याला दुसरा मजला समजतों ! ) पूर्वेला एक लहान जोडपें आणि त्यांची तितकीच लहान प्रजा. पश्चिमेला एक रोड कुटुंब आणि त्यांची तितकीच रोड वंशावळ. डोक्यावर नाकांत चुका मारलेल्या तामिळी " काळा आजार " आणि पायाखालीं खडखडणारी कानडी " सांवळा गोंधळ. " असा माझ्या खोलीचा ढोबळ भूगोल आहे. लिंगभेदानें माझ्या शेजाऱ्यांकडे पहावं असं तिथें कोणीच नाहीं आणि सुरंगाशीं तुलना करतां येईल असं कोणी हा इमारतींत नाहीं, कॉलेजांत नाहीं, आणि दोनचार फर्लांगांच्या टापूंत नाहीं.

सोबत सुरंगाचं छायाचित्र पाठवित आहें. कमू आणि सुरंगाची तुलना नाहीं म्हटलं तरी मनांत येतेच. पेटती पणती आणि पेटती फुलबाजी यांच्या रूपांत जें अंतर आहे तेंच ह्या दोघींच्या रूपांत आहे. सिनेमा तारकांचा दृष्टांत देऊन सांगायचा तर न्यू थियेटर्सची जमना आणि काननबाला ह्यांच्या रूपांत आणि व्यक्तित्वांत जें अंतर आहे तेंच कमू आणि सुरंगांत आहे. जमनाचा शांत, गंभीर, सोज्वळ चेहेरा मला फार आवडतो हें तुला माहित्ये आहे. कानन जास्त अनुपळ, जास्त चमकती जास्त लचकती वाटते. काननकडे पहात असतांना स्त्रीत्त्वाच्या आकर्षणाची जाणीव पावलों पावलीं होते, पण जमनाकडे एक तरुण स्त्री म्हणून त्या दृष्टीनें पहावयाचं नाहीं. एकीच्या पायांना स्पर्श करावासा वाटतो. तर दुसरीचा हात धरावसा वाटतो. आपली बायको असावी तर ती जमनासारखी सोज्वळ, शांत रूपाची असावी असं मला वाटत होतं. म्हणूनच कमू प्रधानकडे मी एकदम ओढला गेलों. पण शांत आणि सोज्वळ दिसणाऱ्या मुली शांत आणि सोज्वळ असतातच असं नाहीं. ( त्या अगदीं शांतपणें एखाद्याचा गळा कापूं शकतात आणि सोज्वळपणें एखाद्याचं मन मारूं शकतात. ) ह्या उलट नटकचकराचमकत्या पोरी मात्र हाडाच्या सरळ असतील, असं समजणं मात्र फार कठीण आहे. सुरंगा थिल्लर दिसते असं म्हणणं कठीण आहे. पण तिच्या हालचाली लवलवत्या आहेत, तिच्या डोळ्यांत चमक आहे, बोलण्यांत ठिणगी आहे, ती केसांना अनेक वळणं देत असते, कपडे फारच नीटनेटके करते, आणि फारच लाडिक वागते. आपल्या मराठी नाटकांतलं उदाहरण पाहिजे असेल तर तिला पाहिल्यावर कांहींशी " भावबंधनां "तल्या " लतिके "ची आठवण होते आणि कमूला पाहिल्यावर " मालती "ची आठवण होतं असे ! पण चेहेरा म्हणजे कांहीं काळीज नव्हे. मला वाटतं वायकांचे केवळ चेहेरे वेगळे असतात, पण साऱ्यांचं काळीज मात्र सारखंच असतं !

असो ! कारुण्यापुरताच ह्यापुढें माझा काळजाशीं संबंध येणार आहे. काळजांचे अन्य गुणधर्म तूं शोधीत बैस. माझा संबंध ह्यापुढें शरीराशीं ! मनाच्या ह्या भानगडी मला काय करायच्या आहेत ? पुन्हां पोटभर कोटी करायची तर, जिवंत मनाचं अस्तित्व गृहित धरायला आतां माझं मनच घेत नाहीं. मन हें तुझ्या वकीलीच्या धंद्याचं भांडवल होऊं शकेल. तुम्हां वकीलांना धंदा तरी एक असतो का ? राजकारणांत आणि साहित्यांतहि तुमची अतिशय लुडबुड चाललेली असते. माझ्यासारखा डॉक्टर केवळ शरीर पाहणार. शरीर हेंच त्याचं भांडवल. बाकी अगदीं तसंच कांहीं म्हणतां येणार नाहीं म्हणा. शेकॉव, क्रॉनिन, मॉम, हे सारे प्रसिद्ध लेखक डॉक्टरच होते. पण त्यांनीं डॉक्टरी स्कालपेलपेक्षां साहित्यिक लेखणीच जास्त वापरली, आणि शरीराऐवजीं मनंच तपासलीं. जाऊं द्या. मला मात्र कुणाच्या मनाशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं येवढें खरं. आतां थांबतों.

तुझा

—मधू

पुनश्च:

एवढी महत्त्वाची गोष्ट तुला प्रथमच कशी सांगितली नाहीं कोण जाणे ! गोप्या, It no more only rains, it pours, आज एका दुसऱ्याच पात्राचा आमच्या आयुष्यांत ( म्हणजेच आमच्या खोलींत ) प्रवेश झाला. ह्या मुलीचें नांव हिरा वाडकर. सुरंगाच्या शेटनं जें स्त्रीसैन्य बाळगलं आहे, त्या पैकींच ही देखील एक विनीवरची सैनिक आहे ! मला वाटतं ही गुप्त हेराचंहि काम करत असली पाहिजे. कारण सुरंगाच्या अंगदीं मागोमाग असल्यासारखी आज ही अकस्मात माझ्या उंबऱ्यांत येऊन उभी राहिली. सुरंगाचं पाऊल पुरतं दाराबाहेर पडण्यापूर्वींच त्या दोघींची उंबरठ्यावर भेट झाली. दोघीहि उद्गारल्या, " अय्या ! तूं इथं ?" पण सुरंगाचा चेहेरा पार पडून गेला होता, आणि ती दुसरी विजयी दिसत होती. सुरंगापेक्षां ह्या हिराची दृष्टि माझ्यावरच सारखी लागली होती, आणि गोप्या, तिच्या डोळ्यांत काय होतं असं विचारण्यापेक्षां काय नव्हतं हे विचार ! ही पोरगी गोरी, सडपातळ, आणि सारखी माना मुरडणारी आहे. तिच्या डोळ्यांतल्या थिल्लर फिरकीचा अर्थ एखाद्या योग्यालाही कळण्याइतका उघड होता. Vamp अगदीं मूर्तिमंत Vamp ! मी साहजिकच त्या उंबऱ्यावरच्या बालिकेला ' आंत या, तिथें कां उभ्या ? " असं म्हटलं आणि सुरंगाचा चेहरा इतका कांहीं कष्टी झाला म्हणतोस ! My man Jeeves नें पुन्हां चहाचं तबक समोर आणलंच ! आणि ह्या दुसऱ्या पोरीचं माझ्याकडे स्वतःसारखंच स्वागत व्हावं ह्या कल्पनेनं सुरंगा अगदींच पेटून गेलेली दिसली.

" अय्या, सुरंगा, शेट केव्हांपासून तुझ्या–' असं कांहींसं एक वाक्य ह्या हिरानं माझ्याकडे पहात उच्चारलं पण तेव्हां सुरंगाचा चेहेरा असा कांहीं झाला कीं ह्या नव्या धिटुकलीनं आपला चेहेरा, जीभ आणि वाक्य वळवून, " शेट केव्हांपासून तुझी वाट पहाताहेत " असा कांहीं तरीच समारोप केला. त्या दोन पोरी माझ्या खोलींत दहा पांचच मिनिटं होत्या. पण तेवढ्यांत त्या एकमेकींकडे प्रिसकारणाऱ्या मांजरींच्या आविर्भावांत बघत होत्या. सुरंगाचा पवित्रा Defensive होता आणि हिराचा Offensive होता. " चला आतां निघूं या " ह्या मंत्राचा सुरंगानं जो जप चालविला होता त्यावरून ह्या Vamp चं माझ्या खोलींतलं अस्तित्व तिला किती असह्य झालं होतं तें स्पष्ट दिसत होतें. मी कांहीं मुळींच घाईचं चिन्ह दाखवत नव्हतों, त्यामुळें सुरंगा आणखीनच रडकुंडीस येत होती. (Vamp असो कां कोणीही असो, आपण आपलं स्वागतशील असावं ! Vamp चं स्वागत करणं तर जास्तच सोपं, सरळ, आणि स्वस्त ! ) ती छटेल पोरटी मात्र सुरंगाला मुळींच न जुमानतां तशी बसून होती. अखेर सुरंगा तिरीमिरीसरशीं " मी जाते. तूं बैस वाटलं तर इथेंच " म्हणून उठली, तेव्हां कुठं माझ्याकडे भिरभिरत्या दृष्टीनं पहात हिनं आपलं आसन हलवलं. पण येवढ्यानं सारं संपलं नाहीं. त्या दोघींना साधारण दारापर्यंत पोहोंचवून ( आणि " या पुन्हा " असा संयुक्त संदिग्ध निरोप देऊन ) मी खोलीचं दार बंद करणार तोंच जिन्याच्या वळणावर फुंकलं गेलेलं कुजबुजत्या लढाईचं शिंग माझ्या कानीं पडलं, आणि अंग चोरून मी जिन्याच्या तोंडाशीं जाऊन उभा राहिलों. सुरंगाची सांडलेली-




पिशवी खालीं वांकुन त्या गोळा करीत होती.

"तुला कुणी इथें निमंत्रण दिलं होतं?" –सुरंगा.

"आपल्याला कुणी निमंत्रण थोडंच द्यावं लागतं? मला शेटनीं सांगितलं होतं तूं कुठें दडी मारली आहेस तें पहायला!"

"मी वाटेल तिथें दडी मारीन! त्याची पंचाईत कुणाला कशाला पाहिजे!"

"वा ग! कार्यालयांत आली नाहींस, तरी तुझी त्यांनीं चवकशी करूंच नये वाटतं? आबली खुशाल घंटोगणती इथें येऊन बसतेस!"

"मी घंटोगणती बसेन नाहींतर रात्रंदिवस बसेन-तुला काय त्याचं?"

"रात्रंदिवस?" फिदीफिदी हांसत चावऱ्या स्वरांत हिरा म्हणाली, "म्हणजे इथपर्यंत आली कां पाळी? बरी बाई तुला एकेक श्रीमंत कुळं भेटतात! पण संभाळ हो सुरंगा, मागं त्या एका कॉलेजांतल्या मुलामागें तूं अशीच लग्नासाठीं हुरळून लागलीस आणि शेवटीं बसलीस कोकलत! तसाच तो दुसरा बंगाली—"

"हिरा—!" दबलेल्या संतापानं सुरंगा म्हणाली.

"माझं काय बाई—मी आपलं तुला खरं तें सांगतें." शक्य त्या मानभावी स्वरांत हिरा म्हणाली व गोळा केलेल्या वस्तू पिशवींत भरून तशीच फुसफुसत त्या पायऱ्या उतरून गेली. So that is that Gopya!

—मधू

**पुनश्च :** खोलीबाहेर पडतांना हिराची पुन्हा पुन्हा माझ्यावर पडणारी दृष्टी बहुधा हेंच म्हणत होती कीं, "निरुपायानें आतां जावं लागत आहे. पण मी पुन्हा येईन बरं का!" हिरानं वेळ तर खूप अचूक शोधून काढली. पुरता एक आठवडा मधें तिला मोकळा सांपडणार आहे.

—मधू

दादर, ३१ आगष्ट ३७. रात्रौ ११॥

प्रिय गोपाळ,

अखेर आज हिरा माझ्याकडे आलीच. तिनं वेळ कोणती शोधली माहित आहे?–रात्रीं साडे-नवाची. तिनं माझ्याकडे यायला हा जो मुहुर्त शोधला त्यावरूनच मी ओळखलं कीं She is sporting girl! सुरंगाच्या जवळ जाण्यासाठीं सुरुंग दुसऱ्याला प्रयास करायला लावते. ह्या बिचारीचं धोरण ह्या विषयांत फारच उदार आहे. ती जी आंत आली, तीच मुळीं कोचावर मला खेटून बसली. मग मी तरी कशाला संकोच करायला बसलों आहें? साहेबलोक जसे चंद्र-नाला मुखशुद्धीपलीकडे किंमत देत नाहींत तसंच हिचंही धोरण दिसलं–अल्पसंतोषी आहे बिचारी. सुरंगासारखी आकाशांतल्या चंद्राला हात घालू पाहणारी नाहीं. संगत असावी तर अशा पोरीची असावी! म्हणजे त्यांत तिलाहि त्रास नाहीं नी दुसऱ्यालाहि नाहीं!

सुरंगाच्या गोष्टी अर्थात् निघाल्याच. त्या तिलाहि काढायच्या होत्या आणि मलाहि नकोशा नव्हत्या.

"सुरंगाबाई भोळ्या आहेत, नाहीं?" मी म्हणालों.

"हो, भोळीच नाहींतर काय!" छद्म स्वरांत ती म्हणाली, "ती मुळीं कुणाला फसवूंच शकणार नाहीं, तिनं प्रयत्न केले तरी!"

"म्हणजे? फसवायचा प्रयत्न करूनहि तो तिला साधत नाहीं कीं ती कुणाला फसवतच नाहीं?"

"कसंही समजा! लग्नाचं जमवण्यासाठीं तिनं थोडे का प्रयत्न केले? पण बिचारी नाहीं गळ्यूं शकली कोणाला!"

"लग्नाचे प्रयत्न?" मी म्हणालों.

"म्हणजे?" तिनं आश्चर्यचकित झाल्याचा अभिनय करीत म्हटलं, "तुम्हांला तिनं आपलीं अफेअर्स कांहींच का सांगितलीं नाहींत? मग उगीच बोललें मीं."

"बोलल्याचे आहांत तर बोलून टाका पुरतं."

"आतां मी जास्त कांहीं सांगणं बरं नाहीं. मला वाटलं तिनंच सारं तुम्हांला सांगितलं असेल. विशेष कांहीं नाहीं, देशमुख नांवाच्या एका विद्यार्थ्याकडे तिचं पूर्वी जाणं येणं असे. जोशी नांवाचा आणखी एक होता. एका बंगाल्याचीही कांहीं भानगड झालीच होती......"

"ह्या देशमुख, जोशी वगैरेकडे जाऊन ती काय करीत असे?"

"तें मी तरी काय सांगूं?" फिदीफिदी हंसत ती म्हणाली, "वाटेल तें करून तिला आपलं लग्न जमवायचं आहे."

"पण लग्नासाठीं तिचा येवढा हट्ट कां?"

"तिला आपली जात सोडायची आहे, घर सोडायचं आहे, चांगलं मोठं कुलीन व्हायचं आहे...!"

"घर सोडायचं ठीक, जात सोडायची?"

"हो ना!"

"आपली ब्राह्मण जात कशी काय सोडणार ती?"

"ब्राह्मण! म्हणजे आपण ब्राह्मण आहोंत असं तुम्हांलासुद्धां सांगितलं का तिनं?" हिरानं डोळे विस्फारले, जीभ चावली व ती म्हणाली, "छे! भलतंच बोललें मी!"

"पुढें बोला!"

"नको–नको!"

"माझी शपथ आहे तुम्हांला. बोला पुढें!"

मोठं संकट पडल्यासारखा चेहरा करून हिरा म्हणाली, "बोलूं काय माझं कर्म! मी म्हणतें कुणाला आपल्या जातीची लाज वाटण्याचं काय कारण? जात काय कुणाच्या हातची असते? पण सुरंगाचं हें नेहमींचंच आहे! तिच्या जातीचं नांव निघालं कीं तिच्या [illegible] कांहीं कांटा येतो. खुपते अगदीं तिला तिची जात!"

"पण येवढी खुपण्यासारखी तिची जात आहे तरी कोणती?"

"एकदां तुम्हीच तिच्या घरीं जाऊन पहा! म्हणजे तुम्हीं कांदेवाडींत आहांत का दादरला, तेंच तुम्हांला कळायचं नाहीं." कांदेवाडींत उत्तम प्रकारें उठून दिसेल असा मुरका मारून हिरा म्हणाली.

"आणखी तुमची जात कोणती हो हिराबाई?"

सुरंगाची जात तीच माझी जात. ती एक ब्राह्मण असेल तर मी सात ब्राम्हण आहें!"

"मग तुम्हांला नाहीं का एखाद्या मोठ्या, चांगल्या, कुलीन घराण्यांत लग्न करावंसं वाटत?"

"मला नाहीं कांहीं वाटत. माझ्या घरच्या माणसांचा आग्रह आहे मी लग्न करावं म्हणून, पण मलाच तें नको आहे. सुरंगाला लग्न पाहिजे आहे, पण तिनं लग्न करावं असं तिच्या घरच्या माणसांना नाहीं वाटत!"

"मग त्यांना काय वाटतं?"

"त्यांना वाटतं सुरंगानं धंदाच करावा."

"कोणता धंदा?"

"त्यांना वाटतं तिनं सिनेमांत जावं. तिची एक बहीण आहे सिनेमांत. सिनेमांत जायचं नसेल तर हाच धंदा शहाणपणानं करावा, पण लग्न करूं नये."

"सुरंगाबाईनं लग्न केलं तर त्यांत तिच्या बापाचं काय जातं?"

"वा! असं कसं. बरं म्हणतां? तिच्याकडून होईल तें सहाय्य तिच्या आईबापांना आतां ह्या वयांत हवंच आहे. मुलींच नाहीं त्यांचं करायचं तर कुणी करायचं? पण सुरंगाला मुळीं

आईबापांचा संबंधच नको आहे! म्हणून तिची धडपड सारी लग्नासाठीं आहे. लग्नासाठीं काय वाटेल तें तो करेल."

"वाटेल तें म्हणजे? फसवेल? खोटं बोलेल?"

"तें नाहीं मी सांगणार. वाटेल तें करेल एवढेंच सांगतें."

"तुम्हांला मात्र लग्न अगदीं नको ना हिरावाई?"

"मला नको बाई लग्न! कोण मेली एका पुरुषाची जन्मभर सेवाचाकरी करत बसेल?"

"त्यापेक्षां अनेक पुरुषांची सेवाचाकरी पत्करली! बाकी अनेकांची सेवा म्हणजे मुळीं कुणाची [illegible] खरं कीं नाहीं?"

माझ्या ह्या बोलण्यामुळें सुद्धां उदार मनस्क हिरा रागावली नाहीं. "अशी काय हो थट्टा करतां?" असं म्हणून तिनं सुसता माझ्या खांद्यावरून गाल घासला! आहे कीं नाहीं Sport? (आणि ही प्रगति केवळ दसऱ्या भेटींत!)

बाकी हिरा काय नी सुरंगा काय, प्रकार वेगळे पण जात एकच! आपल्याला नुसतं "स्पोर्ट" शीं काम! सुरंगाचं देशमुख–जोशी प्रकरण आज नव्यानंच कळलं. आणखी जें काय कळेल तें थोडं आहे. तिच्या लग्नाच्या मोहिमेविषयीं तर शंकेला आतां जागाच नाहीं. हिरा, सुरंगा माझ्याकडे यायला नको आहे. आपल्याला काय, दोघींहि हव्यातच. एकसे दो भले! नमस्ते गोप्या!

तुझा

—मधू

पुनश्च:

आतां पुढचा आठवडा तुझ्या पत्रांना सुटी. सुरंगा विचारी येणार नाहीं. आणि ही हिरा मात्र पुन्हां आल्याशिवाय सोडणार नाही.

दादर,
११ सप्टेंबर ३७

प्रिय गोपू,

कॉलेजची माझी सहामाही संपली. अधोगत भाषेंत सांगायचं तर मी "चांगलं केलें." वास्तविक ह्या परीक्षेला फारसं महत्त्व नाहीं. एवढंच नव्हे तर एप्रिलमधल्या वार्षिकमध्येंहि विशेष अर्थ नाहीं. बहुतेक मुलं दुसऱ्या वर्षांत पाठविली जातातच. बोलून चालून माझंहि हे पहिलं वर्षच! पण दोन पोरींना तोंड देऊनहि मी काय करूं शकतों तें माझं मलाच पहायचं आहे आणि तुलाहि दाखवायचं आहे.

आतां मात्र दोन पोरींच्या Cross-fire चं दारूकाम धडाक्यानं उडूं लागलं आहे. Things are moving fast. कांहींना कांहीं झाल्याविना दिवस म्हणून सुना जात नाहीं. सुरंगा मध्यें येत नव्हती तर हिराच्या चार दोन फेऱ्या झाल्याच! अर्थात् हें सुरंगाला कळलं. (बहुधा त्या बनेल हिरानं सुरंगाला दुखवायचं तें तिखटमीठ लावून सांगितलं असेल!)

माझी परीक्षा संपते न संपते तोंच काल सुरंगा मुसमुसत माझ्याकडे आली आणि तिनं एकदम प्रारंभच केला—

"हिरा तुमच्याकडे येत होती?"

"येत होती."

"तुम्ही तिला कां येऊं दिलंत?"

"मी तिला कसा थांबवणार? तसं करायचं तर सभ्यपणा सोडावा लागला असता सुरंगा. तुला तरी मी तसं कधीं थांबवलं?"

"तुम्हीं मला आणि तिला सारखंच समजतां?" तिनं ओठ चावला. "ती तुमच्याकडे एकदां रात्रीही आली होती ना?"

"आली होती."

"कां?"

"तिचा माझ्यावर विश्वास असेल. कदाचित् तुझ्यापेक्षांही जास्त विश्वास असेल!"

"मी तुमच्यावर कोणता अविश्वास दाखवला?" तिच्या पापण्या थरथरूं लागल्या. "करूं नये तें मी तुमच्यासाठीं केलं! आणखी मी काय करायला पाहिजे सांगा!"

"काय करायला पाहिजे तें तुला माहीत आहे!" तिला जवळ घेत मी म्हणालों.

"मला नाहीं माहित!"

"तुला माहित आहे!" तिला पुन्हा जवळ ओढून तिच्या दृष्टीला दृष्टी भिडवीत मी म्हणालों. तिची मान खालीं गेली व भयग्रस्त स्वरांत ती म्हणाली, "नाहीं–नाहीं–नको!"

"तेंच तर मी म्हणतों!" मी म्हणालों, "तुझ्यावर माझा विश्वासच नाहीं. हिरा येथें येते त्याविषयींसुद्धां तुला अविश्वास वाटतो!"

"मला तिचा अविश्वास वाटतो. ती सरळ मुलगी नाहीं. तिनं इथें यावं हें तुम्हांला तरी कसं चालतं?"

"कां चालूं नये?"

"मला माहित आहे, तुमची मतं जुन्या वळणाचीं आहेत."

"मग त्या जुन्या वळणांत तुझं इथें येणं सुद्धां बसणार नाहीं. तुझा घरोघर फिरण्याचा धंदा बसणार नाहीं. पुष्कळच गोष्टी बसणार नाहींत."

"माझी आणि हिराची जात एक समजतां कां तुम्ही?" तिच्या डोळ्यांतून सरीनें अश्रू ओघळूं लागले. "नाहीं–नाहीं–मी तिच्यासारखी नाहीं–खरंच तिच्यासारखी नाहीं!" ती हुंदक्यामागून हुंदके देऊं लागली.

पुढं मी काय केलं तें विचारायचं कारणच नाहीं. "तोंड बंद" करण्याविषयींचीं तीं वाक्यं साऱ्यांनाच तोंडपाठ आहेत. पण ह्या तोंडदेखल्या गोष्टींवरच मी कुठपर्यंत समाधान मानायचं? माझं "प्रागतिक धोरण" तर ती शपथ घेतल्यासारखं मोडून काढते! ह्या stagnation चा मला कंटाळा येत चालला आहे.

दहा आक्टोबरपर्यंत आतां मला सुट्या आहेत. अगदीं चिमणाजी अप्पासारखा निर्धार करून वेढ्याचं काम चालू ठेवणार आहें.

तुझा

—मधू

व्हिन्सेंट रोड, दादर
१४ सप्टेंबर ३७

प्रिय गोपू,

सध्यां सुटीचा कार्यक्रम अगदीं ठरून गेला आहे. सुरंगा आणि हिरा ह्या दोघींनीं माझी "फाळणी" करायचंच काय तें शिल्लक ठेवलं आहे. दोघी एकमेकींना चुकवून येतात, तरी त्यांची माझ्या खोलींत भेट होण्याचे प्रसंग येतातच. हिराच्या चेहेऱ्यावरच "विजयी हास्य" रुंदावत चाललं आहे आणि सुरंगाचा चेहरा जास्त जास्त रडवा (आणि कडवाहि) होत चालला आहे. सुरंगानं हिराविषयीं तोंड उघडलं कीं मी नेहमी पुरोगामी कल्पनांचा आश्रय घेतो. दोन तरुण स्त्रीपुरुष निर्विकार मनानं एकमेकांना भेटूच शकत नाहींत कां? (वास्तविक भेटूं शकत नाहींत हें आपल्याला चांगलं माहित आहे!) काळी आरशी लावून तूं हिराच्या इथें येण्याकडे कां पाहतेस? एखादा अगदीं वाईट मुलगा माझ्या खोलींत वारंवार आला तर त्याचं तुला कांहीं वाटणार नाहीं; मग हिराविषयींच तुझी दृष्टी अशी कलुषित कां? तरुण तरुणी एकत्र दिसतांच त्यांच्याकडे लैंगिक दृष्टीनं पाहणं हें मनाच्या कोतेपणाचं लक्षण आहे इत्यादि "कॉनिटकर" मासिकांतली आप्तवाक्यें मी तिच्या तोंडावर भराभर फेकत सुटतो, धावरून

या दीपावलींतील
तुम्हांला आवडलेलें
चित्र इथें डकवा.




# स्वास्तिक रबर प्रॉडक्टस् लि. पुणें २

1950

| JANUARY | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 |
| 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 |
| 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 |
| 22 | 23 | 24 | 25 | 26 | 27 | 28 |
| 29 | 30 | 31 | | | | |

| FEBRUARY | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | 1 | 2 | 3 | 4 |
| 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 |
| 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 |
| 19 | 20 | 21 | 22 | 23 | 24 | 25 |
| 26 | 27 | 28 | | | | |

| MARCH | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | 1 | 2 | 3 | 4 |
| 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 |
| 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 |
| 19 | 20 | 21 | 22 | 23 | 24 | 25 |
| 26 | 27 | 28 | 29 | 30 | 31 | |

| APRIL | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | | | | 1 |
| 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 |
| 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 |
| 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 | 22 |
| 23/30 | 24 | 25 | 26 | 27 | 28 | 29 |

| MAY | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 |
| 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 |
| 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 |
| 21 | 22 | 23 | 24 | 25 | 26 | 27 |
| 28 | 29 | 30 | 31 | | | |

| JUNE | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | | 1 | 2 | 3 |
| 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 |
| 18 | 19 | 20 | 21 | 22 | 23 | 24 |
| 25 | 26 | 27 | 28 | 29 | 30 | |




1950

| JULY | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | | | | 1 |
| 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 |
| 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 |
| 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 | 22 |
| 23/30 | 24/31 | 25 | 26 | 27 | 28 | 29 |

| AUGUST | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | 1 | 2 | 3 | 4 | 5 |
| 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 |
| 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 |
| 20 | 21 | 22 | 23 | 24 | 25 | 26 |
| 27 | 28 | 29 | 30 | 31 | | |

| SEPTEMBER | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | | | 1 | 2 |
| 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 |
| 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 |
| 17 | 18 | 19 | 20 | 21 | 22 | 23 |
| 24 | 25 | 26 | 27 | 28 | 29 | 30 |

| OCTOBER | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 |
| 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 |
| 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 |
| 22 | 23 | 24 | 25 | 26 | 27 | 28 |
| 29 | 30 | 31 | | | | |

| NOVEMBER | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | 1 | 2 | 3 | 4 |
| 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 |
| 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 |
| 19 | 20 | 21 | 22 | 23 | 24 | 25 |
| 26 | 27 | 28 | 29 | 30 | | |

| DECEMBER | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| S | M | T | W | T | F | S |
| | | | | | 1 | 2 |
| 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 |
| 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 |
| 17 | 18 | 19 | 20 | 21 | 22 | 23 |
| 24/31 | 25 | 26 | 27 | 28 | 29 | 30 |

TOM & BAY, (ADVTS.) POONA 2

विशेष माहितीसाठीं मागें पहा.

अनुक्रमणिका








जाते विचारी! (खरं सांगायचं तर जवळचा नातेसंबंध नसलेला तरुण स्त्रीपुरुषांचा सहवास आला तर लैंगिक भावना चांगली डोळे वटारून जागी होते हा सगळ्यांचाच अनुभव आहे. निदान ती झोंपी जात नाहीं हें निश्चित. फ्राईडसाहेबानें तर अगदीं मातृप्रेमापर्यंत ह्या कामुक भावनेला नेवून पोहोंचवलं आहे. म्हणूनच आपल्या पूर्वजांनीं अगदीं जवळच्या नातेवाईक स्त्री-बरोबर सुद्धां एकटं न बसण्याविषयीं आपल्याला कंठशोष करून सांगितलं होतं. परंतु हिरा किंवा सुरंगाबरोबर खोलींत घंटोगणती एकटं बसणाऱ्या माझ्याविषयीं कुणी काय कसं केलं तर मी ताड-कन् काय उत्तर देईन माहित आहे! मी त्याला सांगेन कीं तुझी दृष्टी संकुचित आणि बुरसटलेली आहे! कामुकतेविना तरुण तरुणींत शुद्ध मैत्रीचे संबंध असूंच शकत नाहींत काय? जुनाट काळांत विश्वामित्रासारखे तपस्वीहि ह्याविषयांत विश्वास-पात्र नसत. आतां निर्विकार स्त्रीपुरुषसंबंधापुरतं पाहिलं, तर कोणताहि कॉलेजयुवक शुक किंवा भीष्म ह्यांच्या पदवीला पोंहोंचलेला आहे. जशी दोन मुलांची शुद्ध मैत्री असूं शकते तशीच मुलांमुलींचीहि असूं शकते. मुलगा व मुलगी ह्याकडे समानदृष्टीनें पहायला आतां आपण शिकलं पाहिजे वगैरे. वास्तविक मुलगा आणि मुलगी समान असतील कशी! आणि त्यांच्याकडे समानदृष्टीनें पहातो कोण लेकाचा आणि ते कसं पहातां येईल? पण त्याच्याशीं आपल्याला काय करायचं आहे! पुरोगामी कल्पना माझ्या सार-ख्याला मोठ्या सोयीच्या वाटतात येवढं खरं!)

आणखी सुरंगा फारच ईर्षेला पेटली तर मी एकदम तिच्या तोंडावर तिचा घरोघर फिरण्याचा धंदा फेकतो. मग मात्र ती एकाद्या ढेंकळासारखी विरघळते मी माझा हल्ला तसाच पुढें चालू ठेवतो आणि म्हणतों "मग सुरंगा, कुणाला बरं वाईट म्हणायचं तुला काय अधिकार आहे! हिराला तूं वाईट म्हणतेस. पण तूं जशी अनोळखी माणसांच्या घरी जातेस तशीच तीहि जाते. तूं इथे घंटोगगती बसतेस तशीच तीहि कुठें तरी बसत असेल. इथेहि बसत असेल. मी वावगी वागत नाहींस असें तूं म्हणतेस आणि तीहि म्हणते. उलट ती वांकडी वागते असं तूं म्हणतेस आणि तसंच तिलाहि म्हणतां येईल. नसेल, वर-वर सारं सारखं दिसतं असेल तरी तूं तिच्या पेक्षां अगदीं वेगळी असशील! पण हें सिद्ध कसं होणार? आणि तिच्याहृताला तें पटणार कसं? सगळ्याच गोष्टी कांहीं सिद्ध करतां येत नाहींत." पण त्या झालेल्या समजतात, असं ती म्हणते तेव्हां मी तिला सांगतों कीं जे सिद्ध करतां येत नाहीं ते गृहित धरणं अनुदारपणाचं आहे! पुन्हां तिला गप बसावं लागतं. पण तरीहि हिराच्या इथे येण्यामुळें ती जास्त जास्त अस्वस्थ होते आहे. काल पुन्हां ती मला हिराविषयीं टोंचून बोलली. (लग्न न करतांच बायका येवढं Nag करतात तर लग्न झाल्यावर त्या काय कहर करत असतील!) मी पुन्हां तिचा धंदा काढला, तेव्हां रडव्या स्वरांत ती म्हणाली—

"तुम्हांला नाहीं माझा धंदा आवडणार. मी तुम-च्याकडे येते त्याची तुम्हांला लाज वाटते कां?"

"मला कशाला लाज वाटेल? पण तूं हा धंदा करावासच कां?"

"मला पैसे मिळतात."

"म्हणजे पैशासाठीं तूं हा धंदा करतेस!"

"सगळींच जणं नाहीं का पैशासाठीं काम करत?"

"मग दुसरं कांहीं काम कर कीं!"

"मी दुसऱ्या कोणत्या कामाची आहे? येवढेंही पैसे मला दुसरे कुठे नाहीं मिळणार."

"पण येवढे पैसे तुला लागतात कशाला? नटायला थटायला? चांगले कपडे घालायला?"

"चांगले कपडे घालूनच आम्हीं कामासाठीं निघालं पाहिजे असं शेटचं सांगणं आहे. नट-ण्याची कांहीं मला हौस नाहीं!"

"मग पैशाचं काय करतेस!"

"घरीं देते!"

"घरीं! कां बरं?"

"कसं सांगू मी तुम्हाला?" गुदमरलेला श्वास घेऊन ती म्हणाली, "मला नाहीं सगळं सांगता येणार! कसंहि करून मला पैसे द्याय-लाच पाहिजेत. मी हा धंदा करून नाहीं दिले तर...नाहीं—नाहीं सांगता येत मला कांहीं!"

"समजलं! म्हणजे प्रचाराच्या धंद्यासाठीं तुझं रूप हे तुझं qualification आहे. ह्याचा अर्थ कळतो कां तुला?"

माझ्या वाक्यानं एकाद्या बाणासारखा तिच्या वर्मीवर घाव केला. कांहीं वेळ तिचे ओठ दुसतेच थरथरत राहिले, डोळे डबडबून गेले आणि एका-एकीं फुंदून रडत ती म्हणाली, "कळतो, साऱ्याचा अर्थ मला कळतो. पण ह्यांतून कुठं मार्ग दिसत नाहीं. तुम्हीं दाखवता कां दुसरा मार्ग!"

—दुसरा मार्ग! बापरे! तिचा दुसरा मार्ग मला माहित होता, आणि तिथेंच मला पाऊल टाकायचं नव्हतं. ती हुंदके देत देत बोलतच होती, "घाणींत पडलेल्याला हंसणं सोपं आहे. रागावणं सोपं आहे. पण त्यांना बाहेर कोण काढतो? हात कोण देतो? कुणी हात देईल तर त्याच्याही अंगाला थोडी घाण लागेलच! तेव-ढ्यालाही लोक भितात! मग घाणींतच जन्मलेले आणि घाणींतच जगणारे ती घाण कशी सोसत असतील? काय करावं त्यांनीं? सगळे त्यांना दगड मारायला, हंसायला आणि परत त्या घाणींत परत लोटायला तयार असतात. पण त्यांना कोणी हात देत नाहीं मात्र. सांगाना कस करावं मग त्यांनीं? कसं त्या घाणीबाहेर निघावं!"

ती हुंदके देतच होती! Dangerous Moment that! हें भाषण कोणत्याही नाटक कादंबरींत सहज सांपडेल असंच होतं She delivered it so damned well, त्या क्षणापुरता तरी परिणाम होईल अशा रीतीनं ती बोलत होती. तिची "हात देण्याची" सूचना मला भयप्रद वाटली. मी स्वतःला सांवरून घेतलं आणि म्हटलं "रडूं नकोस! इथे आल्या-मुळें तुला नेहमीं दुःखच होतं कां?" "नाहीं" डोळे पुसत ती म्हणाली, "इथं येणं येवढेंच माझं सुख आहे. घाणीनं माखलेल्या माणसांच्या अंगावर स्वच्छ पाण्याचे झोंत पडावेत, तसं मला तुमच्याकडे आल्यावर वाटतं!"

## आभार व अभिनंदन

मागल्या 'दीपावलीं'त प्रसिद्ध झालेल्या आमच्या विनंतीला अनुसरून साडेसातशें वाचकांनीं पत्रें पाठविलीं. त्या सर्वांचे आम्हीं मनःपूर्वक आभार मानतो आणि त्यांपैकीं पुढील दहा पत्रलेखकांना जाहीर झालेलें शंभर रुपयांचें पारितोषक मिळालें याबद्दल 'दीपावली'च्या असंख्य वाचकांतर्फे आम्हीं त्यांचें अभिनंदन करतों.

—संपादक 'दीपावली'

१ सुमन काळकर, धुळे.
२ आनंदराव व्ही. आर. लक्ष्मण, मुंबई.
३ श्री. शं. हेवाळकर, कोल्हापूर.
४ नी. य. रब्ब, बेळगांव.
५ पा. शा. शिंदे, राहाटगांव, औरंगाबाद.
६ प्र. श्री. गाडगीळ, नागपूर.
७ मनोहर अनंत देशपांडे, पुणे.
८ चंद्रप्रभा मुतालिक, सातारा.
९ रा. द. सहकारी, रानखोल, गोवा.
१० मनोहर देखणे, सोलापूर.












बायकांना ज्या ठरीव लडिवाळ उपायांनीं शांत करतात तसं त्या दिवशीं मी तिला अखेर शांत केली. त्या दिवशीं तरी पुन्हां तिनं हिराचं नांव काढलं नाहीं. पण हिराविषयीं तिला अतिशय भय वाटतं, अतिशय मत्सर वाटतो. समस्या तें पथ्यावरच आहे म्हणा! Set a woman against woman. एक नोकर, दोन पोरी, तीन खोल्या, आणि रिकामा वेळ! एकूण तूर्त आनंद आहे.

तुझा

—मधू

व्हिन्सेंट रोड, दादर

१६ सप्टेंबर ३७

प्रिय गोप्या,

तोच कार्यक्रम चालू आहे. सुरंगा–हिरा–हिरा–सुरंगा. सुरंगा हिराविषयीं आतां फारसं बोलत नाहीं. पण मनांतून ती सारखी धुमसते आहे. केव्हां स्फोट होतो त्याचीच मी वाट पहातों आहें. चोवीस तास आणि दोन पोरी! त्यांतल्या रात्रीच्या वेळेचा उपयोगच नाहीं. दिवसाचे तास वाढवून नाहीं का घेतां येणार? हिरा यायची वेळ झाली. थांबणं भाग आहे.

—मधू

दादर, १८ सप्टेंबर १९३७

मित्रोत्तम गोपाळ यांस सप्रेम नमस्कार. वि. वि. कुठं कांहींच प्रगति नाहीं. अष्टौप्रहर या पोरींशीं बोलायचं तरी काय असा पुष्कळदां प्रश्न पडतो. आपले विषय त्यांना झेंपत नाहींत आणि त्यांचे आपल्याला आवडत नाहींत. साहित्य, कला, शास्त्र, राजकारण, सारं त्यांना वर्जच असतं! एकूण बुद्धीची धांवच तेवढी. हास्यविनोद करून पोटभर हसूं म्हटलं तर त्यांना चांगला विनोद कळत नाहीं. म्हणजे तिथेंहि त्यांच्या पोरकट पातळीवर जाऊन माणसानं कांहीं पाणचटपणा केला तरच त्याची धडगत! नुसत्या निरर्थक गुळचट गोष्टी घंटोगणती व खंडोगणती बोलत बसायला पहिल्यावहिल्या मूर्खपणाची धुंदी लागते. माझी तर धुंदी पार उतरून गेली आहे. प्रेमांत पडलेले लोक, एक मुद्याची गोष्ट सोडून वाटेल तेवढा पाल्हाळ लांवत बसतात. आणि त्यांतच मोठी गंमत मानतात! मला तर या पोरीनं एकदम मुद्याला गांठ घालावी असं वाटतं आणि तेवढंच ती करत नाहीं. कमू प्रधानच्या वेळीं 'केळ्याचीच कढी! खूप औरपली आहे म्हणावं आम्हीं! आतां तेवढ्यावर नाहीं आपलं समाधान होत. त्यांतं शेवटीं नुसता मूर्खपणाच पदरीं येतो. ह्या निर्बुद्ध पोरीशीं एक सामना म्हणूनच खेळायचा इतकंच. या मृगयेच्या कल्पनेंत Sense of pursuit मध्येंच काय असेल ती मौज आहे. एरवीं बौद्धिक सहवास वगैरे म्हणशील तर That is nonsense. मला सध्यां तुझ्याच सहवासाची तहान लागली आहे. गड्या, पुरुषांच्या सहवासाची राकट मौज ज्याला माहित आहे, तो नुसत्या सहवासासाठीं बायकांना जवळ करणार नाहीं. आणि तूर्त मला जवळपास मिळतो आहे नुसता सहवासच! नुसत्या सहवासाला त्रासलों बुवा आपण.

तुझा दुःखित

—मधू

दादर, २०–९–३७

गोप्या,

सारखा सुरंगाच्या कानाशीं धोशा लावला होता कीं तुझा माझ्यावर विश्वास नाहीं. तूं माझ्यापासून पुष्कळसं लपवते आहेस असं तिला मी म्हटलं. तेव्हां फारच चिडली ती. 'काय लपवतें आहे मी तुमच्यापासून?' असं तिनं विचारलं तेव्हां मी तिला म्हटलं, 'तुझं घर लपवते आहेस, तुझी माणसं लपवते आहेस. त्या हिरानं मात्र किती तरी वेळां मला आपल्या घरीं बोलावलं. तिनं उत्सुक होऊन मला विचारलं कीं गेलांत का तुम्हीं तिच्या घरीं?' 'मी तिला सांगितलं कीं 'अजून गेलों नाहीं पण तूं मला असंच दूर ठेवलंस तर तिच्याकडे जावंसं वाटेल मला कधीं तरी!'

तिचा चेहरा पांढरा पडला. आणि ती म्हणाली. होऊं द्या तुमच्याच मनासारखं, चला. आत्तांच चला माझ्या घरीं!'

तिचं घर, नि तिच्या घरांतलीं माणसं पाहून माझ्या अंगावर शहारा आला, तिचा तो म्हातारा बाप फोरासरोड-वरच्या एखाद्या छाकट्या सारंगीवाल्यासारखा दिसतो. तिची ती अर्ध्या वयांतली आई, विशींतहि अफलातून वाटेल असं बोलणं–चालणं, चाळीशींतहि विसरायला तयार नाहीं! ह्या दांपत्याला शोभून दिसेल अशीच सुरंगाची सिनेमांत 'एक्स्ट्राचं' काम करणारी वहीण आहे. या साऱ्या कंगाल चित्रावर किळसवाणा कळस ठेवायला तिचे भाऊ घरीं नव्हते, ही दैवाची मी मोठी कृपा मानतों. घर नव्हे, नुसता उकीरडा होता उकीरडा! ही सुरंगा आपल्या वेषांतली आणि रीतिभातींतली झळझळीत झिलाई कुठं शिकली कोण जाणें? तिच्या बोलण्यांत, तिच्या नातेवाईकांच्या बोलण्यांतला तो अशुद्ध हेलसुद्धां नाहीं. हा सारा बोलण्याचालण्यांतला अभिनय ती आपल्या 'अधिक' वहिणीपासून शिकली म्हणावें तर तेंही कठीणच! त्या भडक वयेला शुद्ध भाषेचा किंवा चांगल्या रीतिभातींचा मुळीं फारसा गंधच नाहीं! म्हणजे असंच म्हटलं पाहिजे कीं आहे ती सुरंगाची सारी स्वकष्टार्जित कमाई आहे. खरंच सुरंगाच्या वहिणीच्या ऐवजीं सिनेमांत सुरंगानंच जायला हवं होतं!

आतां जेव्हां जेव्हां मी सुरंगाला पाहीन तेव्हां तेव्हां मला ती तिच्या नातलगांची भुतावळ आणि तिचं तें दोन अंधाऱ्या खोल्यांचं उकीरड्यासारखं घर आठवेल. तिच्या घरांतल्या त्या शेवाळाच्या पार्श्वभूमीवर सुरंगाच तेवढी एकाद्या शुभ्र, सुगंधित फुलासारखी दिसत होती, पण अखेर तें फूल ह्या उकीरड्यावर वाढलेलें आहे. तिथली घाण आणि विषार रोमरोमांत घेऊन वाढलेलें आहे. चार दिडक्यांच्या सावणानं माणसाला आपलं बाह्यांग सजवितां येईल, पण तेवढ्यावरून त्याच्या अंतरंगाच्या निर्मळतेची ग्वाही कशी पटावी?

सुरंगानं आजवर बुद्ध्याच मला आपल्या घरीं नेत नाहीं, ह्याविषयीं आतां शंकेचं कारणच उरलं नाहीं. "तुझ्या बर्वे शेटना एकदां आपल्या घरीं घेऊन ये कीं ग असं मी कितीदां सुरंगाला सांगितलं." असं तिची आई म्हणाली सुद्धां. (ते लोक मला 'शेट' म्हणत होते बरं गोप्या! शेट!) मुंबई हा बोलून चालून एक हाट आहे. तिथं नागपूरचे "महाराज" नाहींत, "गृहस्थ" नाहींत, आहेत ते वंदनीय पुरुष सारे 'शेट' आहेत. मुंबईचे हमाल, विक्तुरियावाले, भाजीवाले, झाडून सारे तुम्हांला ही 'शेट'ची वंदना देतात. सुरंगाच्या संदर्भात, तिच्या घरच्या माणसांनी मला 'शेट' म्हणून संबोधावं ह्या गोष्टीची मला एकदम किळस आली! माझ्यासारख्या विशींतल्या माणसाला कुणी शेट म्हणायचं म्हणजे काय? मी काय डाव हात नाचवणारा, लांब, पांढरा डगला आणि उलट्या कासोट्याचें तलम धोतर वापरणारा, सोन्याचे दांत व सोन्याचीं बटणं लावून पंचापच पान थुंकणारा एखादा ढेरपोट्या आहे







म्हणून कुणी मला शेट म्हणावं? पण सुरंगाच्या त्याच गद्य व तुपकट विशेषणानं माझी कितीवार संभावना झाली.

सुरंगा माझ्याकडे येते हें त्या लोकांना माहित असावं असं दिसत. (हिरा वाडकरला ते चांगले ओळखतात.) मग तिचं माझ्याकडे येणं सम्मत आहे कीं नाहीं कुणास ठाऊक? सुरंगाला लग्न करायचं असलं आणि तिच्या घरच्या माणसांना तें मोडायचं असलं तरी त्यासाठीं त्यांना वेगळा प्रयास करायला नको. तिच्या नातलगांचा हा भयंकर घोळका पाहिल्यावर कोणत्या मायेचा पूत ह्या लोकांशीं संबंध जोडण्याचं स्वप्नांत आणील! सुरंगाच्या गोड आमिषाच्या लोभानं सुद्धां त्या अवगुंठणांतलं हें विष गिळायची छाती कुणी करणार नाहीं. तो छटेल थेरडा सासरा म्हणून, ती रंगेल बाई सासू म्हणून, ती शिसारी आणणारी 'एक्स्ट्रा' मेहुणी म्हणून कोण पत्करेल? स्त्री रत्नं दुष्कुलादपि वगैरे गोष्टी सांगायला ठीक आहेत. पण उकीरड्यावर पडलेला अगदीं मिष्टान्नाचा घाससुद्धां कुणी सुखासुखी तोंडांत नाहीं घालत!

सुरंगाचं घर, आणि तिचं दिव्य कुटुंब मी एकदांच पाहून टाकलं. हे माझ्या दृष्टीनें चांगलंच (पण तिच्या दृष्टीनं वाईट) झालं. माझे आधींच उघडे असलेले डोळे आतां अगदीं पांढरे होण्या-इतके उघडले. ह्या सौंदर्याच्या छवकड्या नदीच्या अगदीं मुळापर्यंत जाण्याचा म्हणूनच माझा आग्रह होता. तिचं घर पाहून मला काय वाटेल ह्याची तिला चांगली कल्पना होती. तिच्या घरचा गढूळ चहा पिऊन एकदांचा मी मोकळ्यांत आलों तेव्हां सुरंगा मला दुखऱ्या स्वरांत म्हणाली,

'पाहिलंत माझं घर? पाहिलेत माझे आईबाप? अजून येत जाऊं कां मी तुमच्याकडे?'' ''हें काय विचारणं झालं सुरंगा! एकाद्याची मैत्री त्याच्या आईबापांकडे पाहून करायची नसते. त्या माणसाकडे पाहून करायची असते.''

''खरंच तुम्हांला असं वाटतं!''

''अर्थातच! तूं कुठें माझे आईबाप आणि घर अजून पाहिलं आहेस? तरी तूं माझ्याकडे अजून येतेसच कीं नाहीं!''

''तुमची गोष्ट वेगळी, माझी गोष्ट वेगळी!'' सुरंगानं उसासा सोडला

''अग तुझी आणि माझी वेगळी गोष्ट कशी असेल? तुझी गोष्ट ती माझी गोष्ट, आणि माझी गोष्ट ती तुझी गोष्ट! पण तुला असं वाटत नाहीं इतकंच.''

''मला असं वाटत नाहीं?'' ती चकित स्वरांत म्हणाली.

''नाहीं वाटत. तुझा माझ्यावर मुळींच विश्वास नाहीं. तूं मला शक्य तेवढं दूर ठेवतेस.'' खोलीचं दार लावून तिच्याजवळ जात मी म्हणालों. माझ्या दृष्टींत आज तिला कांहीं विशेषच दिसत असलं पाहिजे (तिच्या घरचं वळण पाहिल्यावर, माझी तिच्याकडे पाहण्याची दृष्टि खरोखरच आणखी पालटली होती.) कारण दचकून मागें सरत ती म्हणाली.

''नाहीं—नाहीं! नको!''

''नको, कां म्हणून नको?'' एक प्रकारच्या चिडीनें पुढें झेंपावून तिचे हात बळानें दाबत मी म्हणालों,

''माझ्यावर दया करा. एवढं तरी माझं ऐका! आईऽऽ!''

तिनें आपले हात सोडविण्यासाठीं धडपड केली. मीं तिच्या तळव्यावर अधिकच दाब दिला आणि म्हटलें, ''मी तुझं ऐकूं? पण तूं माझं ऐकणार नाहींस. माझ्यापासून नेहमीं दूर राहण्याचा हेका करशील!''

''नका ना, नका! सोडा मला.'' ती धडपडत विव्हळली.

''सोडतों. तूं म्हणशील तर या क्षणापासून अगदीं नेहमींकरितां सोडतों.'' ज्या चिडीनें मी तिला जवळ ओढलें त्याच चिडीनें तिला दूर ढकलीत मी म्हणालों.

''असं नका ना बोलूं!'' विनवणीनें पुन्हां माझ्यापाशीं येत ती म्हणाली.

''नुसतं बोलून काय होतं म्हणा? पण तुझ्या जागीं हिरा असती तर ती अशी वागली नसती. अधिक विश्वासाई वागली असती.''

माझ्या तोंडून हिराचं नांव निघतांच मत्सरानें, दुःखानें, अपमानानें तिचा लवचिक चेहरा टच-टचला. आणि किंचित् तीक्ष्ण स्वरांत ती म्हणाली, ''माझी आणि हिराची बरोबरी तुम्हीं नाहीं केली तर नाहीं का चालणार? तिच्या मार्गानं मला जायचं नाहीं, ती करते तें करायचं नाहीं!''

''पण माझ्यासाठीं सुद्धां नाहीं? इतका माझ्यावर अविश्वास?''

''नका ना असं बोलूं! नका असे मला छळूं!''

''हा छळ वाटतो तुला?'' तिरशिंगरोवा-सारखे आविर्भाव करीत मी म्हणालों, ''मग तूं इथें येतेस कशाला?''

''मी इथें कशाला येतें!'' व्यथित स्वरांत ती म्हणाली. आणि हळूहळू तिच्या डोळ्यांत पाणी जमूं लागलें. ''तर तर, नको का येऊं मग?''

आतां तर हुंदक्यामागून हुंदके देऊं लागली. आणि तिची समजूत घालण्याची पाळी उलट माझ्यावर आली. ''अग, पण सुरंगा, तूं इथें येऊं नको, असं कसं म्हणेन मी?'' मी म्हणालों.

—खरंच गोपू, असं मी कसं म्हणेन निदान यावेळीं.

तुझा

—मधु

दादर

२१ सप्टेंबर १९३५

चि. गोपाळ यास अनेक आशीर्वाद, वि. वि. पत्र लिहिण्यास कारण कीं पत्रांत लिहिण्यासारखं कांहींच नाहीं. त्याच त्याच गोष्टी त्याच त्याच तऱ्हेनें होत आहेत. एकादी भानगड उगीच रेंगाळूं लागली म्हणजे ती मोठी त्रासदायक वाटते बुवा! मला तर हें सारं प्रकरण शक्य तितक्या लौकर निकालांत काढायचं आहे.

उपकारी तरुणी हिरा बिचारी निष्कामकर्म वाली आहे. तिला फलाची अपेक्षा नाहीं. फल मिळालें तरी भलें, नाहीं मिळालें तरी भलें! पुन्हा फल अमुकच प्रकारचें मिळालें पाहिजे असा तिचा आग्रह नाहीं. ती नियमानं येत असते. सुरंगाची तिच्याकडून होणारी वाढती कोंडी अर्थात् तिला माहीत आहे. सुरंगा येते हें का सांगायला पाहिजे? पण ती नुसती येते आणखी कांहीं नाहीं. अगदीं वेड्यासारखी माझ्याकडे येते. पण तिच्या वेडांतली पद सोडायला कांहीं ती अजून तयार नाहीं.

नागपूरची काय वार्ता? नागपूरला, सांगायचं तर चांगलं सिनेमा थिएटरच न आणि चांगलं पुस्तकांचं दुकानही नाहीं. It rearly a shame. धुमन, जिराफ, गों वगैरेंची पत्रं मधूनच केव्हां तरी येतात. बालगोपालांना माझे आशीर्वाद सांग.

—मधु






अनुक्रमणिका

व्हिन्सेंट रोड, दादर
२५ सप्टेंबर ३७

My dear गोप्याज्जी,

बहुतेक सारं मागील अंकांवरून पुढें चालू आहे. सुरंगाच्या मनांत पुष्कळसा धूर धुमसूं लागला आहे. ही चतुर सुंदरी हिरा तिला भडकवण्यासाठीं नाना प्रकारचे किस्से सांगत असली पाहिजे, "अग मी त्यांच्याकडे गेलें होतें ना, तेव्हां काय झालं" असा बहुतेक कथनकाचा प्रारंभ. तिचं माझ्याकडे येणं ही मध्यवर्ती कल्पना. ह्या प्रचारतंत्राचे कांहींसे परिणाम दिसूं लागले आहेत. हिराचं नांव काढायचं तिनं बहुतेक सोडून दिलं आहे. पुष्कळदां ती आपल्याच विचारांत असते. ती इतकी कीं माझं बोलणं तिला ऐकूंच येत नाहीं. "अं? काय?" म्हणून पुन्हां विचारते. कसला विचार करते आहे कोण जाणे?

तुझा "कायदा" काय म्हणतो? बाकी Law आणि Medicine ह्यांचा औषधापुरताहि संबंध नाहीं असं म्हणतां येणार नाहीं. Medico Legal cases मध्यें त्या दोघांची गांठापट होतेच. विधिज्ञ हा तर सर्वज्ञच असतो म्हणा! तो डॉक्टरांची न्यायालयांत त्याच्याच विषयांत उलटतपासणी करायला निघतो आणि डॉक्टरलाहि तेव्हां कायद्याशीं तोंडओळख करून घ्यावी लागते. सुरंगाच्या विषयांत तुझ्या पत्रांतून कांहीं नवाच सूर उमटल्याचा भास होतो. कां बावा?

तुझा
—मधू

---

रात्रौ ११॥ वाजतां व्हिन्सेन्ट रोड, दादर
२७ सप्टेंबर १९३७

प्रिय गोपाळ,

सुरंगा आजकाल बरीच Moody असते आणि त्याच प्रमाणांत हिरा प्रसन्न असते. मग काय त्यांचीं बोलणीं होतात कोणास ठाऊक? आज सुरंगा फारच 'Down' होती. मी तिला म्हटलं; 'चल आपण सिनेमाला जाऊं. Desire' ची स्तुति मी पुष्कळ ऐकली आहे. गॅरी कूपर आणि मार्लीन डीट्रीचचीं कामें आहेत. डीट्रीच आणि कूपर असल्यावर चित्र टाकाऊ असेल हें शक्यच नाहीं.' (खरंच गोप्या I love Gary Cooper! आणि तुझ्या त्या नटांपेक्षां मला तर मार्लीन डीट्रीच आणि नॉर्मा शिअरर दोघीहि जास्त आवडतात.) मी सिनेमाची गोष्ट काढल्याबरोबर सुरंगाचा चेहरा उजळला आणि 'डिझायर' पाहिल्यावर तर तिला अशा कांहीं आनंदाच्या ऊर्मी आल्या म्हणतोस! ('डिझायर'ची गोष्ट माहीत आहे ना तुला? अपराध्यांच्या गराड्यांत राहून स्वतः अपराधी बनलेल्या एका मुलीचा एका सभ्य तरुणानं कसा उद्धार केला, त्याविषयींची तींत गोष्ट आहे.) तें चित्र, चित्र म्हणून मलाहि आवडलं, पण एकादं कितीहि सुंदर आणि भावनाप्रधान चित्र मी पाहिलं किंवा कादंबरी वाचली तरी आतां मी पूर्वीसारखा हुरळून जात नाहीं. अखेर चित्र म्हणजे चित्रच! चित्रांत जे कांहीं दिसतं तें जगांत नसतं हें कळण्याइतका शहाणपणा आतां मला आला आहे. म्हणून मला Desire आवडलं असलं तरी चित्र पाहिल्यावर मी "आह!" "ओ!" "Great" "Splendid" वगैरे उद्गारवाचकं मुळींच वापरलीं नाहींत. माझा मख्खपणा सुरंगाला अखेर अगदीं असह्य झाला आणि ती म्हणाली,

"चित्र फार छान होतं नाहीं?"

"चांगलं होतं; पण वस्तुस्थितीचं चित्र असेलच असं नाहीं!"

"वा:! कां बरं? त्याच्यांतला नायक किती चांगला दाखवला आहे? दरोडेखोरांनीं नाडलेल्या त्या बिचाऱ्या पोरीची तो कशी सुटका करतो आणि लग्नसुद्धां करतो तिच्याशीं!"

"असं–अस्सं! चित्राच्या शेवटीं लग्न आहे म्हणून तें तुला आवडलं होय? आणि नायक नायिकेची सुटका करतो आणि तिच्याशीं लग्न करतो म्हणून तो चांगला!"

"होयच मुळीं! चोरांच्या संगतींत राहून ती भावडी पोरगी स्वतः चोऱ्या करायला लागली. तरी तो तरुण तिच्याशीं लग्न करतो. हा त्याचा किती मोठेपणा आहे?"

"अग पण त्या चोर पोरीचं नायकाशीं लग्न झालं तिथेंच चित्राचा शेवट आहे. पुढें काय झालं हें आपल्याला माहितच नाहीं!"

"पुढें काय व्हायचं? त्या पोरीनें त्याच्याशीं चांगला संसार केला असेल!"

"किंवा कदाचित् त्याचे पैसे लंपास करून ती पळूनही गेली असेल आपल्या जुन्या साथीदाराकडे!"

"शक्यच नाहीं मुळीं!" ती फुरंगटून म्हणाली.

"तेंच जास्त शक्य आहे." मी म्हणालों, "भाबड्या तरुणाशीं लग्न लावून मग त्यांचीं घरं फोडण्यासाठीं मुलींचा उपयोग चोर पुष्कळदां करतात."

"पण ती मुलगी तशी नव्हती. संधि मिळाली तर चांगल्या मुली चांगल्याच होतात!"

"पण ज्या मुली चांगल्या दिसतात त्या चांगल्या असतातच असं नाहीं. अपराध चांगल्या रीतीनं करण्यासाठीं मुलींना भाबडं आणि चांगलं दिसावं लागतं. पण जन्माच्या संवयी त्यांच्या! त्या काय नुसत्या लग्नानं सुटत असतील!"

"मग काय त्या नायकानं चोर नायिकेशीं लग्न केलं हें फार वाईट केलं असं तुम्हांला वाटतं?"

"मला एवढंच वाटतं कीं व्यवहारांत एकंदरींत चोर नायिकेशीं लग्न लावण्यापेक्षां साव नायिकेशीं लग्न लावणंच बरं! जिला एकदां चोरीचा सराव झाला, तिच्याशीं उघड्या डोळ्यानं लग्न लावणं म्हणजे विस्तवाशीं खेळ! नुसतें हृदय चोरूनच थांबेल असा कांहीं विश्वास देतां येत नाहीं!"

बस्स! एवढं मी बोललों आणि लागलीच सुरंगा उदास झाली. नुसती उदास झाली एवढेंच नव्हे तर तिच्या डोळ्यांना पाणी आलं. (तिच्या त्या एवढ्या तेवढ्या कारणावरून रडण्याच्या तंत्रापायीं मी अगदीं जेर झालों आहें पहा.) तेवढ्यांत तिच्यासाठीं आणून ठेवलेल्या बंगलोरी साडीची आणि आंगठीची मला आठवण झाली. मी तिच्यासाठीं अगत्यानं आणलेल्या त्या दोन सुंदर वस्तू पाहून मात्र तिची कळी खुलली. (मी त्या वस्तू आणल्या होत्या तिच्या ऋणांतून मोकळं व्हायला!) अशा काव्यमय प्रसंगीं करावा लागतो तेवढा चावटपणा मी केला.

"साडी नेसून दाखव" मी म्हणालों.

"आत्तांच कशाला?" ती गालाला खळ्या पडून खुदकन् हंसत म्हणाली.

"नाहीं; आत्तांच!" मी बाजीरावाच्या आवेशानें आज्ञा सोडली, "नेसतेस कीं नाहींस?"

"बरं नेसते—नेसते" असं म्हणून ती दुसऱ्या खोलीकडे पळाली. मी पुन्हां किंचाळलों; "अग ए........" (तेव्हां मला लग्नाचं मोल न देतां लग्नाचं सुख भोगल्यासारखं वाटलं).

"काय म्हणतां?" ती पटकन् म्हणाली.

"तिकडे कुठें चाललीस? इथें नेस साडी!"

"इश्श!" तिनें मान हिसडली.

"इश्श नाहीं! इथें नेस! 'साडी नेसतां-







अनुक्रमणिका

नाच सुंदर दिसते' हें खाडिलकरांचं वाक्य माहित आहे कीं नाहीं तुला?"

"मला नाहीं कांहीं माहित" म्हणून ती दुसऱ्या खोलींत गेली. आणि ती "क्रीम" रंगाची उत्कृष्ट साडी नेसून परत आली. लागलीच मी तिच्या बोटावर आंगठी चढवली.

"ख्रिस्ती लोकांत आंगठीचा अर्थ काय होतो माहित आहे?" तिनें तिरप्या दृष्टीनें पहात विचारलें. मला तो अर्थ माहित होता. पण माझी माहिती माझ्याचपाशीं ठेवणं मला अधिक सोयीचं वाटलं व मी म्हणालों,

"पण ख्रिस्ती कुमारिका पुरुषावरोबर किती विश्वासानं—Er—मोकळेपणानें वागतात, हें माहीत आहे तुला!"

"मला नाहीं तें माहित. आणखी माहिती पण करून घ्यायची नाहीं."

"मग मलाहि अंगठीचा किरिस्तांव अर्थ माहित नाहीं. आणि माहित पण करून घेणें नाहीं. मी आपली तुला हिंदू अर्थानंच ही अंगठी देतों आहें असं समज."

"अंगठीचा हिंदू अर्थ कोणता?" तिनें मान कलवून विचारलें.

"कोणताच नाहीं!" मी म्हणालों. आणि पुन्हां तिच्या डोळ्यांत पाणी आलं. असो; हें पाणीदार पत्र आतां आवरतं घेतों!

**पुनश्च:** **—मधु**

सिनेमाच्या मध्यंतरांत आम्ही बाहेर आलों. तेव्हां विडयानं थोबाड रंगविलेल्या दोन गुजराथ्यांनीं सुरंगाली मोठ्या सलगीनं हांक मारली, एवढंच नाहीं पण सुरंगा त्यांच्याशीं बोलूनसुद्धां आली. त्या लोकांचे ते चेहरे मला आवडले नाहींत, सुरंगाला त्यांनीं हांक मारावी हें आवडलं नाहीं आणि तिनं त्यांच्याशीं बोलायला जावं हेंहि आवडलं नाहीं. पण हें सारं न आवडण्याचं कारण मात्र कांहींच नाहीं. अखेर सुरंगा माझी कोण?

**—मधु**

व्हिन्सेन्ट रोड, दादर
२ सप्टेंबर १९३७

मित्रवर्य गोपाळराव पंडित ह्यास सप्रेम नमस्कार, वि. वि.

सुरंगाच्या पावसाळ्यांतल्या ऊनसावलीसारख्या Moods चं प्रमाण वाढलं आहे. अखंड सौभाग्यकांक्षिणी हिरा अविकृत संतुष्ट दिसते आहे. माझा असंतोष वाढत्या प्रमाणावर आहे. माझ्या दिनांक २७ च्या पत्राला तूं उत्तर पाठवलें असशीलच. असलीं पत्रें Cross होणार. एरवीं या पत्रांत विशेष कांहीं नाहींच म्हणा. विशेष कांहीं घडावं म्हणून नुसताच धडपडतों आहें. "It is a lesson you should heed, try again! If at first you do'nt succeed try again and again हेंच ब्रीदवाक्य तूर्त समोर ठेवून समाधान मानणं भाग आहे!

**—मधू**

व्हिन्सेंट रोड, दादर
१ ऑक्टोबर १९३७

मित्रवर्य गोपाळराव पंडित, धनतोली, नागपूर यास मधुकर गणेश बर्वे ह्यांचे मुंबईहून दोन्ही हात जोडून नमस्कार! गृहस्था, अरे तूं लिहितो तरी काय आहेस! आतां तूं मला कसला कर्माचा 'नीट विचार करुन' वागायला सांगतो आहेस! अविचार व्हायचा तो पूर्वीं एकदां होऊन गेला. आतां ह्यापुढें पुन्हां अविचाराची गोष्ट नाहीं! जें चाललं आहे तें सारं विचारानंच चाललं आहे. सुरंगाचे ते डोळे, तो चेहरा, तो भावडा आविर्भाव, आणि ते अश्रू पाहिले कीं कधीं कधीं हातून अविचार घडेल कीं काय असं वाटतं. पण अशा वेळीं कमू प्रधानची लग्नपत्रिका एखाद्या जहाल औषधासारखी माझ्या उपयोगी पडली आहे. "आमची कन्या चि. सौभाग्यकांक्षिणी कमू हिचा विवाह, गुरुवार दिनांक—मिति—घटिका—पळें—या दिवशीं × × × × करण्याचे योजिले आहे. शरीरसंबंध (हो शरीरसंबंधच नाहीं तर काय?) श्री. × × × × ह्यांचे चिरंजीव (दिवाण बहादूर × × × ह्यांचे नातू) ह्याशीं योजिला आहे. कार्य सिद्धीस नेण्यास श्री भैरवनाथ समर्थ आहे. आपण आल्यानें मंडपास विशेष शोभा येणार आहे. तरी इष्ट मित्रांसह...!"

गोपू ह्या पत्राचा उपयोग करून घेतल्यावरहि माझ्या हातून पुन्हां अविचार घडेल असं तुला वाटतं का रे? तुला म्हणायचं तरी काय आहे? तुझ्या दि. २९ च्या पत्राचा मला नीटसा अर्थच कळला नाहीं. खलिल जिब्रान, (कीं गिब्रान?) लिन युटांग वगैरे मोठ्या तत्त्ववादी मंडळींनीं लिहावं तसं कांहीं तरी लिहिलं आहेस. अर्थात् जें लिहिलं आहेस, तें चांगलं बोधप्रद आहेच, पण मला त्याचा अर्थ कळला नाहीं. तुझ्या लिहिण्याचा संदर्भ काय, रोख कोणता, तें तर स्पष्ट स्पष्ट सांगशील? तुझं पत्र मला फारच vague वाटलं बुवा! त्या गुणामुळं तूं मोठा लेखक झाला असशील कदाचित, पण मोठा विश्विझ मात्र होणार नाहींस. तुझांस बहुत काय लिहिणें? अधिकोत्तराची क्षमा असावी. कळावें.

आपला नम्र,

**—मधुकर गणेश बर्वे**

दादर, मुंबई
५ ऑक्टोबर, १९३७

प्रिय गोप्या,

अस्सं-अस्सं! तर मग आपली स्वारी चार दोन दिवसांत कलकत्ता, जगन्नाथ, दिल्ली, आग्रा, मथुरेच्या वारीला निघणार काय? आपली दिवाळीची सुटी काय महिना तीनवार अशी नुसती भटकून काढणार तूं? It is really an idea! आम्हांला मात्र दिवाळीची अशी आतां विशेष सुटीच उरली नाहीं. पहिल्या टर्मच्या शेवटीं महिनाभर झाली हीच आमची दिवाळी. म्हणजे आतां महिनापंधरा दिवस मी तुला पत्र पाठवायचं कांहीं कामच नाहीं म्हणायचं! तूं मात्र तुझं यात्रावृत्त मला पाठवीत जा, जिथं असशील तिथून; आणखी हे पाहा, यात्रेंत तूं जें कांहीं पुण्य जोडशील त्यांत माझाहि थोडा वाटा असू दे! म्हणजे शेवटीं तूं स्वर्गात स्पेशल गाडीनं गेलास तर निदान 'सर्व्हंटस् कंपार्टमेन्ट'मध्यें बसायची तरी माझी व्यवस्था झाली पाहिजे. तुझ्या मागच्या पत्राचा अर्थ अगदीं स्पष्ट होता हे तुझं म्हणणं मुळींच खरं नाहीं. तो अर्थ तुला स्पष्ट असेल (तुला तरी असेल कीं नाहीं कोण जाणें?) पण मला नाहीं. तुझं पत्र माझ्यासारख्या सामान्य जनासाठीं आहे हें विसरूं नकोस. तसं तर काय, खलिल गिब्रान (कीं जिब्रान?) लाही वाटत असेल कीं आपण फार सुबोध आणि स्पष्ट लिहितो म्हणून. पण तसं असतं तर दुसऱ्या विद्वानांनीं गिब्रानवर मल्लिनाथी कशाला केली असती? (आणि गिब्रानच्या स्वप्नांतही नसेल असा गिब्रानच्या अर्थ लोकांच्या गळीं कां उतरविला असता?) मात्र पहिल्या पत्राच्या अर्थाच्या निमित्तानं दुसरं जास्तच घोटाळ्याचं पत्र लिहूं नकोस म्हणजे मिळवलीं!







अनुक्रमणिका

हो, प्या काय! आधींच लेखक आणि त्यांत विधिज्ञ! असो. प्रवासांत तुला पोरींना भेट देण्यासारख्या कांहीं चांगल्या वस्तू दिसल्या तर अवश्य घेऊन ठेव. पुढंमार्गी कामीं येतील! (माझ्याच नव्हे तुझ्याहि कामीं येतील.) Wish you "Bon Journey" (बरोबर आहे ना?) 'Bon Journey Au Revoir' वगैरे लफड्यांचा नीटसा अर्थ मला अजूनही माहित नाहीं. साधारण अंदाजानं देतो ठोकून झालं!"

-मधू

पुनश्च :

सुरंगाच्या कपड्यालत्त्यांत (म्हणजेच "वेषभूषेंत") गेल्या कांहीं दिवसांत पडत गेलेला पालट मोठा ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. मला प्रसन्न करण्याच्या ती आतां अगदीं इरेला पेटल्यासारखी दिसते. प्रथम मीं तिला पाहिली, तेव्हां ती कुंकुवाची बारीक टिकली लावीत असे आणि कधीं तर ती कुंकूंच लावत नसे. पण माझा कुंकवाविषयींचा कटाक्ष तिच्या ध्यानांत आला आणि मग लागला तिच्या कुंकवाचा आकार वाढायला. टिकलीवरून ती चवली-पावलीवर आली. पुढं अधेलीवर आली. आणि हाच कुंकवाचा आकार तुझ्या चेहऱ्याला शोभतो असं म्हणून मी तिला थांबवलं नसतं, तर ती लौकरच "रुपयावर" गेली असती. एवढंच नाहीं तर माझ्याकडे कपाळभर मळवट भरून सुद्धां आली असती. (वायकांनीं एकदां कुंकवाच्या धन्यासाठीं मोहिम उघडली म्हणजे त्या कोणत्या थराला जातील कांहीं सांगतां येत नाहीं.) इकडं तिनं कुंकवाचा आकार विस्तारला आणि तिकडे नखांवरच्या रंगाला फांटा देऊन टाकला. पूर्वी तिला थोडीशी नखं वाढवून तीं रंगवायची अद्यायावत् संवय होती. मी कधीं तरी बोलून गेलों कीं नखं उंदीर मारायला निघालेल्या मांजरीसारखी दिसतात म्हणून. लगेच तिनं नखांना चाट दिला. आणि 'नेलपेण्ट'ला निरोप घेतला. एकदां एक हिरवीपान असलेली गुलाबी साडी ती नेसून आली. मी गुलावी रंग कुरंग असतो असं केव्हां तरी बोलून गेलों. त्यानंतर त्या साडींत तिला कधीं मीं पुन्हां पाहिली नाहीं. (वास्तविक ती साडी तिला खुलून दिसत होती.) माझ्या बोलण्याचा नुसता कल पाहूनच तिनं उंच टांचेचे जोडे सोडले, कानांतले टॉप्स काढले. आणि भांगाची वांकडी रेघ जी केव्हां तरी मर्यादेबाहेर आणून ठेवली ती नेहमीं करितांच.—"नऊ वारी पातळ सगळ्याच दृष्टीनं सुंदर असतं," असं मी म्हणायचाच अवकाश कीं तिनं नुसतीं नऊवारी पातळंच नेसायला प्रारंभ केला. नऊवारी पातळ, मोठं कुंकू, मधोमध विंचरलेले केस, साध्या चपला, ना पावडर ना नेलपेण्ट, ना लिपस्टिक अशा वेषांत तूं तिला पाहशील तर थक्कच होऊन जाशील. मीं वल्कलं चांगलीं असतात असं म्हटलं तर ती साडीसुद्धां सोडून देईल! (गोप्या, हें वाक्य अगदीं सहज लिहून गेलों आहें, बरं का!) आतां ती अगदीं संतीण बनत चालली आहे संतीण! केवळ चिपळ्या हातांत घ्यायच्याच काय त्या शिल्लक राहिल्या आहेत. आणि तिकडे हिराचा नखरा मात्र चालला आहे वाढत. दोघींची दोन तंत्रं आहेत!

मधू

पुन्हां पुनश्च

पुन्हां एकदां "Bon voyage" (आगगाडीच्या प्रवासाला "व्हॉयेज" म्हटलं तर चालेल का?) आतां तीन चार आठवड्यानंतर!

दादर-मुंबई

---

रात्रौ ९ वाजतां ३ नोव्हेंबर ३७

गोप्या,

It is done. तिकडे तुझी यात्रा सफळ झाली आणि इकडे माझीहि तपश्चर्या फळास आली. (पूर्वी मांडलेली तपश्चर्या मोडण्यासाठीं रंभा येत असत. त्या काळांत आपण असतो तर कुणी रंभा तप मोडायला तरी येईल एवढी लालुच आपल्याला तपस्वी बनवायला पुरेशी होती. आजकाल मात्र स्वच्छ बायकांसाठींच तपश्चर्या करायचा काळ आहे.) तुला तिकडे देव पावला असेल, तर मला इकडे कामदेवाचा कृपाप्रसाद लाभला. बाकी तुम्ही लेखक लोक म्हणजे अवसानघातकीच. गेल्या महिन्यांत तूं नागपुरला असतास, तर अशा अशा वर्णनांनीं भरलेलीं पत्रं तुला माझ्याकडून मिळालीं असतीं कीं बंब! पण बरोबर त्याच वेळीं गाशा गुंडाळून तूं घराबाहेर धडपडलास. म्हणजे आपला कथाभाग (आणि कार्यभाग) ऐन Climaxला गेला, तेव्हां तुझा जागेवर पत्ता नाहीं! देव तुझं भलं करो. आतां जें जें जसं जसं आठवेल तसं सांगतों. अरे, दोन पोरींनीं Double front उघडल्यावर घडलेल्या कांहीं गोष्टी अशा कांहीं घडतात कीं कांहीं सांगायची सोय नाहीं. कुठवर आला होता बरं आपला कथाभाग! कुठवर का आलेला असेना त्याचं कांहीं आतां फारसं महत्त्व नाहीं. कौशल्यानं साधलेली अखेरं पाहा म्हणजे झालं (तसंच म्हटलं तर मी साधलेली अखेर माझ्या कौशल्यापेक्षां दुसऱ्यांच्या मूर्खपणावरच आधारलेली आहे. माझ्यां मूर्खपणाचं भांडवल करून एकदां दुसऱ्यांनीं चातुर्य दाखवलं; आतां दुसऱ्या कुणाच्या मूर्खपणाचं भांडवल वापरून मी चातुर्य दाखवतों आहें. ह्यांत कांहीं नवीन नाहीं. पूर्वापार हा खेळ असाच चालत आला आहे.)

हें पत्र लिहितांना माझी लेखणीं आणि (डोकं) जरा तापलेलंच आहे. थोड्याच वेळापूर्वी सुरंगा रडून बोलून आणि गोंधळ घालून गेली. (आतां तर तिला वाटेल तें कीं तिचा तो अधिकारच आहे.) विशेष कांहीं झालं असं त्यांतला भाग नाहीं. मागं हिराच्या विषयांत जें झालं, तेंच आज मिस् दस्तुरच्या विषयांत झालं. पेरिन दस्तुर माझ्या खोलींतून बाहेर पडायला आणि सुरंगा आंत यायला एकच गांठ पडली. त्यांची जवळ जवळ टक्करच झाली म्हणेनास! दोघींनांही क्षणभर एकमेकींकडे पाहून घेतलं. साहेब लोक 'काला आदमी' कडे पाहतात तसं पेरिननं सुरंगाकडे पाहिलं. आणि काला आदमी शेवटीं शेवटीं ज्या त्वेषानं साहेबाकडे पाहायला शिकला होता, तसं सुरंगानं पेरिनकडे पाहिलं. अरे हो! पण पेरिन दस्तुर हें कोण नवंच पात्र आहे असा तुला प्रश्न पडला असेल. ती आमच्याच कॉलेजांत तिसऱ्या वर्गात आहे. मन्मथ बॅनर्जीबरोबर ती मला एकदां भेटली. बॅनर्जीनं आपली ओळख करून दिली. ह्या फ्रॉकवालीला मी पहिल्या दृष्टि-भेटींतच आवडलों, हें स्पष्टच दिसलं. मलाही दिसलं आणि बॅनर्जीलाही दिसलं. पण बॅनर्जी is a great great sport! तो म्हणाला, This wench is quite a character. तूं तिला तूर्त आवडलेला दिसतोस, go ahead. I gladly make room for you तिला कच्चीं पोरं जास्त आवडतात. She has a weakness for raw kids. मात्र लक्षांत ठेव, She is a girl of passing fancies. Make hay while the moon shines! आणि त्यानंतर मधूनच केव्हां तरी ती माझ्याकडे येऊं लागली. ती गोरी आणि आकर्षक आहे. पण सुरंगा इतकी गोड नाहीं. पण ह्या फ्रॉकचं,








उघड्या पोटऱ्यांचं, कापलेल्या केसांचं आणि लाडक्या इंग्रजी उच्चारांचं आकर्षण काहीं वेगळंच असतं बाबा !

सुरंगा आजकाल इतकी कटकट करते कीं माझं डोकं दुखूं लागतं. पेरिन दृष्टीआड होते न होते तों सुरंगानं कटकटीला प्रारंभ केला. “ ही कोण पारशीण ?” ती म्हणाली.

“ बरोबर ओळखलंस. ती पारशीणच आहे. ”

‘ टॅटॉलॉजींत ’ जमा होणाऱ्या सुरंगाच्या प्रश्नाला मी उत्तर दिलं.

“ पारशीण आहे हे दिसतंच आहे. पण कोण ? कुठली ? ”

“ ती मूळची इराण देशांतली आहे. आतां हिंदुस्थानांत असते.”

“ उगीच लपवाछपवीची उत्तरं देतां !”

“ मीं कुठं कांय लपवलं ? चांगली दिवसा उजेडी ती माझ्याकडे आली होती !”

“ कशाला ?”

“ येते अभ्यासाला ! भेटायलाहि येते !”

“म्हणजे ती तुमच्या वर्गांत आहे म्हणायची.’

“ वर्गांत नाहीं, पण कॉलेजांत आहे. ”

“ ती तुमच्या वर्गांत नाहीं, तरी बरोबर अभ्यासाला येते ? ”

“ मला शिकवायला येते असें समज पाहिजे तर ! ती मुलगी बुद्धिवान् आहे. ”

“ तिची बुद्धी कळली मला. मला नाहीं तिचं इथं येणं सरळपणाचं वाटत. तुम्हांला ती शिकवायला येते त्यावर नाहीं माझा विश्वास बसत. ”

“ विश्वास ठेव, कीं ठेवूं नको. पण ती मला शिकवते. ”

“शिकवत असेल, पण वेगळयाच गोष्टी शिकवत असेल. ”

“ सुरंगा–! ”

“ ह्या पारशिणी मुळींच सुष्या नसतात. तिच्यीं लक्षणंच दिसत होतीं. ”

“ कसलीं लक्षण ? ” मीं स्वर चढवला.

“ तिचे डोळे–तिचं ठुंबकत चालणं. बायकांना बायकांचीं लक्षणं बरोबर ओळखायला येतात. वाईट मुलगी आहे ती. ”

“ हिरालाहि तूं वाईट म्हणतेस, पेरनिलाहि वाईट म्हणतेस ! जगांत तुझ्याविना सगळ्या पोरी तुला वाईटच दिसतात. ”

“ तुमच्याकडे येणाऱ्या ह्या पोरी वाईट आहेत, फसव्या आहेत. ”

“ माझ्याकडे येणाऱ्या पोरींतच तूंही जमा आहेस. त्यांनीं कधीं इथं केलं नाहीं तें तूं केलं आहेस. ”

“ त्याविषयीं तुम्हींच मला दोष देणार ? देवा रे ! ” ती पांढरी पडली व मग लाल होऊन म्हणाली, “ माझ्या हातून जें घडलं, तें कां घडलं तें तुम्हांला माहित आहे. मी तुम्हांला नको आहे का ? मला तुम्हीं फसवणार आहांत का ? ” कांट्याकुट्यांनीं भरलेल्या एखाद्या भयंकर दरीकडे पाहतांना करावा तसा चेहरा करीत ती म्हणाली. “ उलट तूंच मला फसवणार होतीस आणि फसवणार आहेस ! ”

“ काय बोलतां आहांत तुम्हीं हें ? ”

“ बरोबर बोलतों आहें. प्रथम तूं मला तुझ्या कुटुंबाविषयीं फसवलंस. घराविषयीं फसवलंस. जातीविषयीं फसवलंस ! ”

तिची मान खालीं गेली आणि चेहरा अधिकच फटफटीत पडला. मी ठिगोपाठ गोळ्या झाडाव्यात तसे शब्द झाडूं लागलों. “ तूं मला सांगितलस कीं तूं ब्राह्मण आहेस. पण तूं ब्राह्मण नाहींस. तूर्त पितृसावर्ण्याची पद्धत हिंदुस्थानांत आतां नाहीं. हें तुला माहित नसेल, पण तुझी जात तुला माहित होती. जन्माच्या मोठेपणाला मी मानतों अशांतला मुळींच भाग नाहीं. ” कर्त्या समाजसुधारकाच्या अवसानानं मी म्हणालों, “ पण तूं माझ्याशीं खोटं बोललीस. मला फसवलंस, माझ्यापासून आपली जात लपवून ठेवलीस. ” माझ्या भाषणाचा अचूक परिणाम पाहात मी दोन क्षण थांबलों. घाबऱ्या स्वरांत ती म्हणाली, “ नाहीं–नाहीं. तुम्हांला फसवायचा माझा उद्देश नव्हता. माझं ऐका...एकदम तुम्हाला माझी जात सांगायचा मला धीर होईना. मला वाटलं माझी जात कळती तर तुम्हीं मला एकदम दूर कराल. म्हणून मी खोटं बोलले. खरंच तुम्हाला मी फसवणार नव्हतें ! ”

“ फसवणार होतीस, फसवत होतीस. तुझ्या मी नुसता जवळ आलों, तर प्रथम तूं अंगांत पंच-पतिव्रता संचारल्यासारखी मला दूर लोटायचीस ! केवढं पण मर्यादेचं नाटक ? ही मर्यादा त्या जोशी आणि देशमुखांच्या वेळीं आठवली होती का तुला ? हीं नांवं तरी स्मरणांत आहेत का ? ”

तिचे ओंठ थरथरू लागले आणि चेहरा केविलवाणा झाला.

“ अस्सं !” ती कडू जहर स्वरांत म्हणाली. “ एकूण हीं नांव तरी तूं विसरली नाहींस म्हणायची. पुन्हां तो एक बंगाली पोरगा आहेच–तो बॅनर्जी.” तिनं माझ्याकडे डोळे उचलून पाहिलं.

“ त्यानं तुझ्या अंगावर तशी इच्छा नसतांना हात टाकला, असंच ना ? पण जोशी, देशमुख आणि मंडळींनीं ? त्यांनीं तर तसं कांहीं केलं नव्हतं ना ? उलट तूंच त्यांच्याकडे गेलीस. जशी माझ्याकडे आलीस तशीच. तूंच त्यांना बनवण्याचा प्रयत्न केलास, जसा मला बनवण्याचा घाट घातलास तसाच. तुझ्याशीं लग्न लावण्याविषयीं आमिष म्हणून कोणतंहि मर्यादशील आणि कुलीन मुलगी कधींहि देणार नाहीं अशी लांच तूं मला हप्त्याहप्त्यानं दिलीस. खरं कीं नाहीं ? ”

“ नाहीं–नाहीं देवाशपथ नाहीं.” ती रडत म्हणाली. “ पूर्वी माझ्या हातून वाईट वर्तन कधींच घडलं नाहीं.”

“ जोशी देशमुख मंडळींना तूं जास्तींत जास्त लांच दिली नसशील पण कमींत कमी लांच तुझ्यापासून त्यांना मिळाल्याशिवाय सुटींच राहिली नसेल. काय खोटं आहे हें ?”

ती कांहींच बोलली नाहीं. भयचकित दृष्टीनं माझ्याकडे नुसती पहात राहिली. मी माझ्या जिभेचा परजलेला पट्टा पुन्हां तिच्यावर चालवूं लागलों, “ अर्थात् हें खोटं नाहीं. तीं पोरं तुझ्या हातीं लागलीं नाहींत. कारण तीं चांगलीं चलाख पोरं होतीं. पण तुझ्याकडून त्यांना गंडवण्याचा प्रयत्न करण्यात तूं चुकली नाहींस. जोशी आणि देशमुख तुझं आमिष आणि तुझी गळ दोन्हीं घेऊन सुखरूप सटकले ही वेगळी गोष्ट झाली. पण त्या प्रकरणाविषयीं तूं मला अवाक्षरानं कधीं कांहीं सांगितलं नाहींस. पूर्वी कधीं तुझ्या हातून कांहीं घडलंच नाहीं कां असं मी तुला एकदां विचारलं होतं, आठवतं ? ”

मी तिच्याकडे दृष्टि रोखली. तिनं माझ्या दृष्टीला दृष्टी दिली नाहीं. मी बोलूं लागलों,

“ माझा हात लागेल तर जणूं तुला चटका बसेल, असं सोंग जेव्हां तूं करत होतीस तेव्हां मी तुला हा प्रश्न विचारला होता. जोशी देशमुखचं नांवही तेव्हां तूं काढलं नाहींस. त्या बंगाल्याचंहि काढलं नाहींस. तिथेंहि तूं मला सरळ सरळ फसविण्याचीच बुद्धि ठेवलीस...! ”

“ नाहीं हो, तुम्हांला फसवायची माझी बुद्धि नव्हती. ” ती मुसमुसून हुंदके देत म्हणाली. “ मला फार भीति वाटत होती. माझी जीभ तुम्हांला तें सांगायला उचलतच नव्हती. पुष्कळदां मी प्रयत्न केला, पण मला नाहीं तें तुम्हांला सांगतां आलं. ”

“ हां न सांगतां वेश्याळाच फसवणं असं म्हणतात. एकदां सिनेमांत तुला दोन छाकटे

गुजराथी भेटले होते. त्यांनीं तुला बोलूं कलं आणि तूं त्यांच्यापाशीं जाऊन बोलत बसलीस–"

"ते आमच्या शेटचे नातलग आहेत."

"हें तूं मला सांगतेस म्हणूनच मी खरं मानायचं. एरवीं असं कोण सहजासहजीं खरं सांगतो म्हणा? माझा आणि तुझा कोणता संबंध आहे, तूं येथें कशाला येतेस आणि काय करतेस, हें थोडंच तूं कुणापाशीं कबूल करणार आहेस? आणि मला कुणी कांहीं विचारलं, तर मीसुद्धां कानावर खडाच ठेवणार कीं नाहीं? म्हणून काय आपलं तें सांगणं खरं समजतां येईल?"

ती एखाद्या थिजलेल्या पुतळीसारखी स्तब्ध होती. जणूं कांहीं आपण खरोखरच सर्वस्वी अपराधी आहोंत असंच तिला माझं बोलणं ऐकून वाटूं लागलं होतं. तिची त्रासदायक कटकट काय-मची थांबवण्याच्या निश्चयानं आज मी पुरताच बोलून घेणार होतों. मला भुरळ घालून वनवण घोपं जावं म्हणून तूं प्रत्येक बारीक सारीक विषयांत माझा कल संभाळूं लागलीस. तुझ्या कुंकवाचा आकार, तुझी निळी वारी साडी, तुझे मघोमध विंचरलेले केंस, सारं ढोंग होतं. सारी फसवणूक होती!"

"नाहीं नाहीं!" ती आर्तपणें म्हणाली, "तें ढोंग नव्हतं. मी तें सारं मनापासून केलं!"

"तूं मनापासून ढोंग केलंस!" कठोरपणें मी म्हणालों. "आणि तूं हिराला वाईट म्हणतेस. पेरीनलाहि वाईट म्हणतेस..."

तिच्या मनाचा जणूं आतां असह्य कोंडमारा झाला व काळीज तडकून गेलं. तिनं बोलण्याचा प्रयत्न केला पण तिला शब्द सांपडेनात. अकस्मात् ती माझ्यापाशीं आली. एखाद्या बुडणाऱ्या माणसानं मारावी तशी तिनं मला घट्ट मिठी मारली आणि ती वारंवार हटकूनच म्हणत राहिली, "तुम्हीं माझे आहांत. मी नाहीं तुम्हांला कधीं सोडणार. तुम्ही माझे आहांत..."

तिची माझ्याभोंवतीं पडलेली मिठी सारखी घट्ट होत होती. जणूं कांहीं ह्या क्षणींच मी तिच्यापासून निसटून जाणार होतों. ती सारखा माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करत होती. माझा जीव गुदमरून चालला होता. तिच्या स्पर्शांत आता मला ती जुनी जादू वाटेनाशी झाली होती, आणि ह्या सत्याची जाणीव झाल्यामुळेंच तिच्या जिवाचा आकांत चालला होता. तिचा प्रयत्न मला धरूनच ठेवण्याचा होता; नेहमीं करितां धरून ठेवण्याचा होता; पण मी जाणारच होतों. आणि ह्यातोहात निसटण्याचं हें निमित्त मला पेरीन दस्तुरनं न कळत मिळवून दिलं होतं. जें मला सहजासहजीं बोलतां आलं नसतं तें आतां बोलतां आलं. जें सुलभपणें तोडतां आलं नसतं तें आतां तोडतां आलं. मला स्वतःशी बांधण्याचा चिडखोर प्रयत्न करून एका परीनं सुरंगानंच माझा मार्ग मोकळा करून दिला. स्वतःशीं बांधून ठेवण्याचा निकराचा प्रयत्न म्हणूनच ती जें कांहीं करणार नव्हती ते तिनं केलं. मला जें कठीण वाटूं लागलं होतं, ते अकस्मात् शक्य झाल्याचं माझ्या अनुभवास आलं. आज पेरीन माझ्याकडे आली म्हणून मला ही संधि मिळाली. आणि तेव्हां हिरा माझ्याकडे आली म्हणून मला ती संधि मिळाली. अगदीं असाच प्रसंग! सुरंगा माझ्या उंबऱ्यांत पाऊल टाकत होती आणि हिरा दाराबाहेर पडत होती. हिराचा चेहेरा फुललेला होता, विजयी दिसत होता. तिचे केस विसकटले होते, डोळे सुस्तावले होते आणि तरीहि चकाकत होते. क्षणार्धांत सुरंगानं तिला नीट पाहून घेतलं आणि मग एखाद्या घायाळ हरिणीसारखी माझ्याकडे पहात ती म्हणाली, "काय चाललं होतं?"

"कांहीं तर नाहीं!"

"तुमचा चेहरा असा कां दिसतो?"

"मला तर तुझा चेहरा आजारी दिसतो आहे. तुला कांहीं होत आहे कां?"

"पुष्कळच होतं आहे. तुम्हांला माझी दया येत नाहीं कां?"

"तुलाच माझी दया येत नाहीं. तुझा माझ्यावर विश्वास नाहीं." मी माझं ध्रुपद आळवूं लागलों.

"हिरावर तुमचा विश्वास आहे कां?"

"असं कांहीं नाहीं. पण तिचा माझ्यावर विश्वास असावा."

"तीहि तेंच म्हणत होती. तिचं म्हणणं खरं आहे एकूण."

"कोणतं म्हणणं?"

"ती म्हणत होती कीं तुम्हीं तिला आवडता. तिचा तुमच्यावर विश्वास आहे. ती तुमच्यासाठीं काय वाटेल ते करूं शकेल."

"आणखी?"

"आणखी म्हणत होती कीं ती तुमच्यासाठीं जें करूं शकेल तें मीं तुमच्यासाठीं करूं शकणार नाहीं–तुम्हांलाही असंच वाटतं कां?"

"तसं नाहीं. पण तूं मला दूर ठेवायला बघतेस." मी तिच्याजवळ गेलो आणि तिचे हात धरले. माझं शरीर तापूं लागले, माझी दृष्टी जळूं लागली.

"दूर व्हा, दूर व्हा ना!" ती गुदमरलेल्या स्वरांत म्हणाली.

"माणसाला दूर ठेवलं तर ते पुष्कळदां जास्तच दूर जातं, हें नाहीं कां हिरानं सांगितलं तुला?" मी म्हणालो आणि तिला अधिकच जवळ ओढली. ती बावरली, तिनं प्रतिकार केला. पण आज तिच्या प्रतिकारांत तो जुना निश्चय नव्हता. तिचा नकार हा जणूं केवळ भयाचा आणि मर्यादेचाच भाग होता. आत्मार्पण करण्याचीच जणूं आज तिची अबोल इच्छा होती.

लग्नाचं मूल्य दिल्याविना लग्नाचा लाभ! तो अखेर आज माझ्या पदरांत पडला होता. इतक्या सहज–इतक्या अकस्मात्! सुरंगाच्या आजच्या वर्तनाचा अर्थ मला माझ्या परीनं कळतो. हिरा तिला खिजवीत होती. हिराबद्दल तिला काय वाटत होतं. मत्सर तारुण्य, मोह, आशा! आणि नंतर माझ्या मूर्खपणाविषयीं भाबडा विश्वास. ह्या अंतिम बंधनानं जणूं ती मला स्वतःशीच बांधून टाकीत होती. ह्यापुढें जणुं तिचा माझ्यावर वेगळाच आणि एकमेव अधिकार चालणार होता. दुसऱ्या कोणाहि मुलीला जणूं आता माझ्या विषयांत कांहीं करतां येण्यासारखं नव्हतं. सुरंगाचे मनोव्यापार कदाचित् असेंच कांहींसे असतील पण पण मी तुला सांगितलंच आहे कीं मनोव्यापार आणि मन ह्यांची आतां मला चिंता नाहीं. केवळ शरीर हाच माझा एकमेव विषय आहे.

नंतर सुरंगा खूप रडली. तिचा जन्माचा ठेवा नाहींसा झाल्यासारखं रडली. आणि मग सारा संकोच सोडून तिनं मला मिठी मारली; माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला. अगदीं अगदीं आपण होऊन केला! जणूं आतां मी पूर्णपणें तिचाच झालो होतो—माझ्याविषयीं संकोच बाळगण्याचं आतां तिला जणूं कांहीं कारणच नव्हतं. माझ्यावर लग्नाचा अधिकार नसतांहि जणू लग्नाचाच तिचा माझ्यावर अधिकार असल्यागत तिनं मला जखडायला प्रारंभ केला. प्रत्येक ठिकाणीं मला वाकविण्याचा प्रयत्न ती करूं लागली. Nagging ची कला तिनं इतक्या लौकर आत्मसात् केली कीं तिचा मला कंटाळा येऊं लागला. लग्नाच्या बायकांची पिरपिर जिथें पुरुषाला असह्य होते तिथें बिनलग्नाच्या बायकांची पिरपिर कोण

सहन करील? आणि मग आज पेरीन दस्तुर प्रकरण झालं. तुला काय वाटतं गोप्या?

पत्र लांबलं. कांहीं आठड्यांचा इतिहास कसा-तरी मी तात्पर्यरूपानं इथं गुंडाळला आहे. Flash back वगैरे निवेदनांच्या ज्या पद्धती ऐकल्या असतील त्या आल्या असतील. बस्स्! दमलो आतां. सुरंगालाहि कंटाळलो. आणि तिच्या-विषयीं लांबलचक पत्र लिहायलाहि कंटाळलो. पेरीन दस्तुर Comes as a very refreshing change though.

तुझा

—मधू

विन्सेंट राड, दादर

७-११-३७

प्रिय गोपाळ,

अद्याप सुरंगा येते. अगदीं हृदयभंग झाल्या-सारखें उसासे सोडते. शून्य दृष्टीनें पहात रहाते. आणि मधून मधून रडते. उगीच आपल्या अश्रूंचा अपव्यय करते आहे ही मूर्ख पोरगी. दुसऱ्या कुठं हे अश्रू कारणी तरी लागतील कदाचित्, अश्रूंनीं विरघळायला माझं मन काय ती खडी-साखरेसारखें बनलेलं आहे असं समजते? मी विरघळणारा असतों तर पूर्वींच नसतो का विर-घळलो? पण तिला कांहीं हें कळत नाहीं; आणि कळत असेल तर वळत नाहीं.

तिला कसं तोडायचं ते मला माहित आहे. ती आली तरी मी तिच्याकडे लक्षच देत नाहीं. वाचायला लागतो नाहींतर दुसरीकडेच पाहतो. पुष्कळदां पेरीन आणि सुरंगा एकाच वेळीं येतात, तेव्हां मी पेरीनशीच बोलत राहतो. सुरंगाकडे लक्षच देत नाहीं. I just ignore her. बस्स्! इतकंच मी करणार आहे आणि करतो आहे. ठीक आहे ना?

—मधू

मुंबई १४

११ नोव्हेंबर ३७

मेरे गिरिधर गोपाल,

धन्य आहे गड्या तुझी! तुला काय झालं आहे काय? पोरगी पचवितां येत नसेल त्यानं प्रेम करूं नये म्हणून थोड्याच दिवसापूर्वी मला सांगणारा तूं, आतां प्रेम न करतांच पोरगी पच-विण्यासाठीं बोल देतोस! तुझ्या कांहीं बोलण्यांत बोलणं आहे की नाहीं! खरंच तुला वेड तर लागलं नाहीं? ती मुलगी चांगली असावी असं तुला वाटत, आणि म्हणून मी तिला सोडूं नको! आणखी काय शेवटीं लग्न करूं! असंच की नाहीं तुझं म्हणणं? धन्य गुरुमहाराज! तों चांगलीं आहे कीं वाईट आहे! तिथं पाँचशेवीस मैलांवर माझीं नुसतीं पत्रं वाचून तुला कसं कळलं? अगदींच लेखक आहेस झालं! तूं मला काय लिहिलंस हे तुझं तुला तरी कळतं का? का झाला तुझाहि आतां (जि) गिव्रान?

तिला आयुष्य नव्यानं सुरू करायची संधि देणं हें काय माझं काम आहे? दुसऱ्या कुणातरी महाशंख उदारात्म्यांसाठीं राहूं दे कीं शिल्लक हें काम. उगीच आपल्या मित्राच्या जिवावर कां उठतोस? तिला मी आयुष्याची संधि देऊं आणि माझ्या आयुष्याच्या संधीची मात्र होळी पेटवूं. असाच कीं नाहीं तुझ्या लिही-ण्याचा अर्थ? कमू प्रधानच्यावेळीं हुकलेलं आंतर्जातीय समाजसुधारणेचं श्रेय मीं आतां सव्याज पदरांत घ्यावं असाच ना तुझ्या उप-देशाचा सूर! आणि त्यासाठीं मीं माझ्या वडिलांची इच्छा, माझं Career माझी महत्त्वा-कांक्षा, पैसा, यश, कीर्ति. ह्या साऱ्यांना बळी देऊं? मित्रा फार छान उपदेश केलास तूं! उद्यां तिला "आयुष्याचं नवं पान" उलटण्याची संधि देण्यासाठीं केलं मी तिच्याशीं लग्न, आणि लग्नानंतर तिच्या जुन्या यारांचे जोडे लागले माझ्या दारांशीं पडायला. तर तोंड कुणाचं काळं होईल? पूर्वी तिच्या हातून जे जवळपास झालंच तें पुढें तिच्या हातून होणारच नाहीं ह्याविषयीं काय निश्चिति? येवढा मोठा जुगार आता मीं खरोखरच कां म्हणून खेळायचा! तिच्या आयुष्याचा तिच्यामुळें नाश झालेला पत्करेल का तुला? आणि माझ्यामुळें तिच्या आयुष्याचा नाश होण्यापेक्षां तिच्यामुळं माझ्या आयुष्याचा नाश होण्याचा संभवच उघड उघड अधिक नाहीं का? आम्हां दोघांपैकीं कुणाचा नाशच व्हायचा असेल तर मग तो तिचाच होऊं दे. माझा कां म्हणून? कदाचित् आमच्या दोघां-चाहि नाश होणार नाहीं हेंच जास्त शक्य आहे. कमू प्रधाननं मला सोडलं म्हणून का माझा नाश झाला? तूंहि मला उपदेश करणारा खूप मूर्ख दिसतोस!

अर्थात मी लग्न करणार आहे. पण ते चार चौघांसारखं लग्न करणार आहे. प्रेमाचं खातं आतां बंद! प्रथमच कमू ऐवजी सुरंगा मला भेटली असतीं तर केलं असतं मी तिच्याशीं लग्न! पण आतां! कमूच्या अपराधाचं प्रायश्चित्त मी अगदीं भलत्या निर्दोष मुलीला देतो आहे असा तुझा आरोप! तों लिहीस कशावरून रे! मला-मानस शास्त्राच्या उलट्या लिहिल्या किंव-कट भानगडी कांहीं कळत नाहींत. पण तिनं वारंवार मला फसवलं असं हे मात्र खरं. त्याचीं कारणं आणि उद्देश राहिले नसतील, ते कांहीं कुणाला दिसत नाहींत! सांगावं तें कारण आणि म्हणावा तो उद्देश! तें सगळं बरंच बरं आहे. पण कोणत्याहि कारणानं म्हणा, तिनं पुन्हां पुन्हां माझ्यापासून काय गोष्टी दडविल्या हें निश्चित! मग तिच्याशीं अगदीं धर्मराजासारखं वागायला मी कुठं बांधला गेलो आहे! माझा कोणताच अपराध नसतांना कमूनं मला प्रायश्चित्त दिलं. आणि असं समजा कीं सुरंगाचा कोणताच अपराध नसताना मीं तिला प्रायश्चित्त दिलं. झाली फिट्टंफाट! एका पोरीनं माझ्या विषयांत जें केलं तेंच दुसऱ्या एका पोरीच्या विषयांत मींही केलं, येवढंच फार तर तुला म्हणतां येईल. कमूनं मला प्रायश्चित्त दिलं, मी सुरंगाला दिलं, नि सुरंगा आणखी कुणाला प्रायश्चित्त देईल. असंच तर जगांत चालत आलं आहे ना! मग जगावेगळं मी तरी काय केलं! कुणाचा तरी अपराध, कुणाला तरी प्रायश्चित्त! हें असं चाला-यचंच. माझं पाहणं इतकंच कीं आतां पुन्हां मला प्रायश्चित्त नको आणि मिळणार नाहीं. तेंच तूं माझ्यासाठीं नाराजला झालाहेस. ह्यांस अधिक काय लिहिणें! कळावें लोभ असावा हे विनंति.

आपला

—मधू

विन्सेंट रोड, दादर

५ जाने ३८

प्रिय गोपाळराव, सप्रेम नमस्कार

फार दिवसांनीं तुमचं पत्र मिळालं. तुला विनाकारणच आलेला राग विनाकारणच गेला असं मी समजतो. लेका, एका पोरीवरून माझ्याशीं भांडतोस! आणखी ती पोरगीहि अशी कीं जिला तूं कधीं काळीं गोरी तरी पाहिलं नाहींस. अरे जुन्या मित्रांनीं एकमेकांवर रागावं, अशा योग्यतेची का ही वस्तू आहे! आणखी हे पहा, रेंगाळत रेंगाळत कां होईना, पण ती पोरगी अखेर माझ्या आयुष्यांतून गेली. माझाच अंदाज अखेर बरोबर ठरला. कितीतरी दिवस सुरंगा माझ्याकडे येत राहिली माझं





तिच्या विषयांत एकच धोरण होतं. मी तिच्याकडे मुळीं लक्षच देत नसे. प्रथम प्रथम मोठ्या अति उत्सावळीनं ती माझ्यापाशीं येई. पण तिच्या स्पर्शाविषयीं मी उदासीन आहे, एवढंच नव्हे तर त्या स्पर्शाविषयीं मला नावडहि उत्पन्न झाली आहे, यांविषयीं तिची निश्चिती पटल्यावर तिचा धीर इतका खचला, कीं पुन्हां ती फारशी कधीं माझ्या जवळहि आली नाहीं. ती माझ्याकडे नुसतीच यायची, कधीं हताशपणें, कधीं आर्जवानें, कधीं धिक्कारानें. माझ्याकडे पहात बसायची आणि उसासे सोडत नाहीं तर अश्रू ढाळत निघून जायची. नंतर केवळ एकदांच तिनं अक्षरशः माझ्या गळ्यांत पडण्याचा प्रयत्न केला, आणि छाती फुटल्यासारखं रडत ती म्हणाली, "असाच शेवट व्हावयाचा का माझा? मी तुमचा अपराध केला म्हणून मला तुम्हीं दूर करतां?"

मी कांहींच बोललो नाहीं.

"अखेर तुमच्या हातून माझा सत्यानाश व्हावयाचा होता का?"

मी कांहीच बोललो नाहीं.

"बोला, बोला" माझे खांदे हलवीत ती ती म्हणाली, "माझ्या हातून काय घडलं म्हणून ही शिक्षा तुम्हीं मला देतां?"

तिचा स्पर्श मात्र असह्य वाटला.

तिरमिरीसरशीं मी उत्तर दिलं.

"तुझ्या हातून इथें जें झालं, तें सारं तूं पूर्वीहि कशावरून केलं नसशील. तुझं इथं झालेलं वर्तन कुलीनपणाचं नव्हतं. तुझं अजून इथं येणं माझा पाठलाग करणं, कांहींच कुलीनपणास धरून नाहीं."

"आणि तुमचं वर्तन! मी पाप केलं असलं तर त्यांत तुमचा वाटा मुळींच नाहीं कां?"

"कुलीन मुलीशीं मी कुलीनपणानं वागलो असतो. तुझ्यासारखीशी एखादा कुलीन पुरुष तरी दुसरं कसं वागणार?"

कांहीं क्षण ती माझ्याकडे एका अवर्णनीय दृष्टीनं पहात राहिली. तिच्या डोळ्यांत एकाच वेळीं आग आणि पाणी उसळत होतं. कांहीं क्षण ती त्याच दृष्टीनं ती मला न्याहाळत राहिली, तिनं विलक्षण स्वरांत एक दबलेला चित्कार केला, आणि पाहतां पाहतां ती जिना उतरून अदृश्य झाली.

तिची ती दृष्टी, तो चेहरा, तो चित्कार त्यामुळें क्षणभर मी हलून गेलो. मला वाटलं धांवतच निन्यापाशीं जावं आणि पूर्वीसारख्या हांका मारून तिला म्हणावं, "सुरंगा... सुरंगा... इकडे ये सुरंगा..."

...धाड धाड जिना उतरून जाणारी नायिका, आणि विव्हळून हांका मारत सुटणारा नायक. अगदी नाटकी देखावा! कोणत्याहि फडतूस बोलपटांत दिसणारा! मी अकस्मात भानावर आलो. सुचलेल्या कल्पनेच्या सवंग हास्यास्पदतेची मला स्पष्ट जाणीव झाली. मी अगदीं सहीसलामत वाचलो.

गोप्या, वरं हें सारं प्रकरण येवढ्यावरच आटोपलं. एप्रिलमध्यें माझी परीक्षा आहे. मला "गच्चू" न खातां साऱ्या परीक्षा पार पाडायच्या आहेत, विलायतेला जायचं आहे. आणि इथें, ह्या मुंबईतच स्वतःचं "नर्सिंग होम" उघडायचं आहे! अशी पोरींची वाळंतपणं मी करत बसलो तर कामच झालं म्हणायचं!

—मधू

---

वर्वेज नर्सिंग होम
शिवाजी पार्क, मुंबई
८ जून ४७

प्रिय गोपाळ,

तूं पाठविलेल्या तुझ्या कादंबऱ्या पावल्या. अकस्मात् आलेलं तुझं पत्र आणि पुस्तकं पाहून आश्चर्याचा धक्का बसला. कितीतरी वर्षांनी आज तुझं पत्र आलं. तुझं पत्र मिळाल्यावर I felt like old times. आयुष्याची कशी गंमत आहे पहा. एकमेकांना इतक्या जवळ असलेले आपण आतां महिनोगणती आणि वर्षोगणती एकमेकांना पत्रहि पाठवत नाहीं. तूं तुझ्या धंद्यांत गुंतलास आणि मी माझ्या. (पण तूं वकीली करण्यापेक्षां लेखनच जास्त करतोस असं दिसतं.) मला तर अगदीं दम घ्यायला फुरसत नाहीं पहा. माझं औषधालय आणि शुश्रुषालय फार चांगली चालली आहेत. शिवाय आमच्या मेडिकल कॉलेजच्या हॉस्पीटलमध्येच 'ऑनररी' म्हणून नेमणूक झाली आहे. आठवड्यातून तीन दिवस तिथें जातो. (त्यांत पैसा नाहीं पण मान आहे. प्रॅक्टीसलाहि त्या position चा उपयोग होतो.) मी ऑनररी कशाचा आहे ठाऊक आहे? गुप्तरोगांचा आणि चर्मरोगांचा? (माझा फ्रेंच डिप्लोमा त्याच विषयांतला आहे.) असो. तुझ्या कादंबऱ्या माझ्या बायकोनं वाचल्या. तिला त्या आवडल्या. हळूहळू मीहि वाचून टाकीन. माझं आयुष्य असं कांहीं धांवपळीचं आहे कीं अगदीं शांतपणानं जेवायला सुद्धां वेळ मिळत नाही पटा. मग वाचणंसवरणं तर दूरच राहिलं तुझ्या सौभाग्यवतीला माझे आणि माझ्या सौभाग्यवतीचे नमस्कार. मुलांना आमचे दोघांचे आशीर्वाद. बहुत काय लिहिणें?

तुझा

—मधू

पुनश्च

तुझ्या कादंबरीवरून आठवण झाली. सरासरी दहा वर्षांपूर्वी मी तुला पुष्कळशीं पत्रं पाठविली होती. तू म्हणाला होतास कीं पत्रांचा विषय कादंबरीसाठीं चांगला आहे. मग लिहीलीस कां त्या विषयावर कादंबरी?

—मधू

---

बर्वेज नर्सिंग होम        १० ऑगस्ट १९४९
शिवाजीपार्क, मुंबई        रात्रौ ११॥ वाजतां

गोपाळ,

काय झालं असेल असं तुला वाटतं? काय झालं असेल? तूं लेखक आहेस ना गोपाळ, मग करून पहा कल्पना. Oh the irony of it all–the tragedy of it! तुला हें पत्र कोण लिहितो आहे माहित आहे गोपाळ? एक यशस्वी डॉक्टर एक संभावित मनुष्य? नाहीं—नाहीं—! एक अधम, निरपराधी! एक निरपराध पापी आणि एक खुनी हत्यारी—हो, हो खुनी हत्यारी. देशाचा कायदा मला निरपराध मानत असेल पण मी अधमांतला अधम आहे, अपराध्यांतला अपराधी आहे. मी खुनी आहे, हत्यारी आहे. ह्या क्षणीं मला वाटतें कीं चौकाचौकांत जाऊन ओरडून सुटावं कीं लोकहो, ह्या माणसाच्या तोंडाला डांबर फासा! गांवभर ह्याची धिंड काढा. माणसाच्या वस्तीपासून याला दूर फेका! ह्याचे हाल हाल करा. जितके तिचे हाल झाले असतील तितकेच ह्याचेहि हाल करा! हा यशस्वी डॉक्टर बर्वे नव्हे; हा एक नीच अपराधी आहे! किळसवाणा वंचक आहे. निरपराध रक्तानं ह्याचे हात रंगून गेले आहेत. लोकहो या, आणि थुंका ह्याच्या तोंडावर! अरे तुमचे न्यायबुद्धी मेली कां? तुमचे डोळे आंधळे झाले? अद्याप तुम्ही याला महारोग्यासारखं दूर लोटलं नाहीं? अद्याप हा मोठ्या डौलानें तुमच्यांत वावरतो? हा स्वतःला अद्याप संभावित म्हणवितो? या सारे आणि थुंका ह्याच्या तोंडावर. कारण हा पापी आहे, अपराधी आहे, उलट्या काळजाचा आहे, हत्यारी आहे. ह्याचे हात रक्तानं रंगून गेले आहेत.








मला वेड लागलेलं नाहीं गोपाळ, स्वतःला आवरण्याचा मी आटोकाट प्रयत्न करतो आहे. मला वेड लागणारहि

नाहीं. मी जीवहि देणार नाहीं. माझ्यांत तितकें धैर्य नाहीं. मी भेकड आहे. स्वार्थी आहे, मला आयुष्याचा लोभ आहे, पैशाचा आहे, यशाचा आहे. पांघरुण घेऊन पुढेंहि मी असाच जगत राहणार आहे लोक मला संभावित म्हणूनच ओळखणार आहेत. यशस्वी म्हणूनच ओळखणार आहेत. पोटभर रडून घ्यावसं वाटतं. माझी बायको सारखी मला विचारते आहे, मला आज काय झालं आहे म्हणून? काय झालं आहे म्हणून? काय झालं, ते मी तिला सांगितलं तर तिच्या अंगावर कांटा येइल. पुन्हा स्पर्श करावासा वाटणार नाहीं तिला!...तिच्याहिपासून अपराध लपवून ठेवणार. तिलाहि मी पुन्हां फसवणार. गोपाळ, माझ्या मनाला जणूं इंगळ्यां लागल्या आहेत. ज्याच्या जवळ मन मोकळ करावं असं तुझ्याशिवाय दुसरं मला कुणी नाहीं माझं पाप मुकं आहे. माझी वेदना मुकी आहे. माझ्या पापाला वाचा नाहीं आणि वेदनेला औषध नाहीं. Oh the irony of it all- the Irony of it मी सारं विसरूनच गेलो होतों. जणूं कांहीं माझ्या हातून कधी कोणतं पाप घडलंच नव्हतं. जणूं सुरंगा नांवाच्या मुलीला मी नांवानंहि कधी ओळखत नव्हतो. जणूं अगदीं शांतपणं मी तिचा गळा कापलाच नव्हता. जग मला संभावित मानत होतें आणि मलाहि पण सभ्यतेविषयीं कधीं शंका उत्पन्न झाली नव्हती. बरोबर आहे! पाप सांपडलं, पकडलं गेलं, त्याविषयीं शासन झालं तो अपराधी, पण पाप पकडलंच गेल नाहीं, निर्बंधाच्या चौकटींत सांपडलंच नाहीं तर ते पाप नव्हे. मग जग तर तुम्हांला संभावित समजतंच. पण स्वतःचं पाप खिजगणतींत नसलेले तुम्हींहि आपले आपणाला अगदीं निर्दोष अगदीं पुण्यवान मानूं लागता. शासन घडलं तरच अपराध्याची गणना, एरवी अपराधाच्याच पारितोषार्थ निर्दोष सभ्यता?

एरवी सुरंगाचं मोडकं तोडकं प्रेत आज आमच्या हॉस्पीटलच्या 'कोल्डरुम', मध्यें जाण्याऐवजीं माझं प्रेत तिथें जायला हवं होतं. सुरंगाचं प्रेत? होय गोपाळ, सुरंगाचं प्रेत!

मी जिवंत आहे, श्रीमंत आहे, मुंबईच्या एका मोठ्या हॉस्पिटलचा 'ऑनररी' आहे, आणि त्याच हॉस्पिटलच्या 'कोल्डरुम' मध्यें जिला एके काळीं मी वारंवार हृदयाशीं धरलं, आणि अखेर तिच्या हृदयांत सुरी खुपसली, त्या सुरंगाचं जर्जर अनाथ प्रेत आहे. तिच्या आयुष्याच्या आरंभी ती माझ्याकडे आली. आणि आतां आयुष्याच्या शवटीं ती माझ्याकडे आली. माझी आणि तची जेव्हां भेट झाली तेव्हांच जणूं तिच्यावर सर्व नाशाच्या आणि मृत्यूच्या सावल्या पडल्या. आणि माझी आणि तिची आतां भेट झाली तेव्हां तर मी तिचा मूर्तिमंत मृत्यू होऊनच आलो. सुरंगाच्या मृत्यूचं पाप माझ्या मस्तकावर आहे गोपाळ! तिला प्रायः माणसांतून भिन्न उठवलं आणि आज जगांतूनहि तिला सीमापार करायला मीच कारणीभूत झालो किती सहज माझं पाप मी विसरून गेलो होतो! किती पूर्णपणें गेली. दहा वर्षं मला सुरंगाचं विस्मरण झालं होतं!

हॉस्पीटलमधल्या वरच्या माळ्यावरील माझ्या गुप्तरोग-विभागाकडे मी नेहमीप्रमाणें फेरी मारायला निघालो तेव्हां मला कल्पनाही नव्हती कीं आज माझं पुरातन पाप माझ्या मार्गात मला दिसणार आहे, कीं आज सुरंगा पुन्हां मला एका भयंकर अवस्थेत भेटणार आहे, कीं आज तिला मृत्यूच्या मार्गावर लोटण्यासाठींच तिच्या दिशेनं माझीं पावलं पडत आहेत.

—बारा क्रमांकाचा बिछाना! कुणाला उपदंश कुणाला प्रमेह, कुणाला शँक्रॉइड, कुणाला तिन्ही! ज्याला आपण शृंगार म्हणतो, रसिकता म्हणतो, प्रेम म्हणतों, त्या वाया गेलेल्या विकाराला आलेली विषारी फळं! इथें कांहींच सुंदर नव्हतं, कांहींच आकर्षक नव्हतं! ज्यासाठीं तरुण स्त्री-पुरुषांची शतकं वेडावून जातात, जीव देतात, जीव घेतात, आणि परस्परांचें गळे कापतात. त्याचं हे अगदीं उघडं, नागडं, गलिच्छ, पाशवी, किळसवाणं स्वरूप होतं! बारा क्रमांकाचा बिछाना! माझ्या स्वप्नांतही नव्हतं कीं त्या बिछान्यावर बिछान्यांतल्या अघोरी पापांची बळी झालेली सुरंगा मला दिसणार आहे. माझं शरीर तर पुष्ट होतं, तुष्ट होतं, निरोगी होतं. मी तर ह्या साऱ्यांची कींव करूं शकत होतो, त्यांना उपचार करूं शकत होतो, त्यांना तुच्छहि लेखूं शकत होतो. आंधळ्या पापाचे ते बळी झाले असतील, पण पापाच्या खातेऱ्यांतहि पापाच्या परिणामापासून अलिप्त राहण्याची कला मला तर अवगत होती. माझ्या आयुष्यांत त्या देखाव्याला विशेष कोणताच अर्थ नव्हता. प्रतिदिवसाच्याच होत्या ह्या गोष्टी. बारा क्रमांकाचा बिछाना! सराईत घाईनें मी त्या बिछान्यावर "केसशीट" पाहिला. माझ्या लेखीं तो केवळ एक बिछानाच होता. बिछान्यावरचं माणूस माझ्या खिजगणतींतच नव्हतं. बिछानाच खरा. माणसं तर किती तरी येतात आणि जातात पण तो बिछाना मात्र खरा, त्याचा क्रमांक खरा! बिछान्याचा केसशीट मला फार मनोरंजक वाटला. वा! बिछान्यावरची व्यक्ति फारच पटाईत असली पाहिजे. स्वैरप्रेमाच्या आघाडीवरची तिन्ही पदकं तिनं मिळविलीं होतीं, शँक्रॉइड, उपदंश, प्रमेह! कहान टेस्ट प्लस, मझा वासरमन तिरकीच! रोगाच्या 'ओरिजन' 'डयुरेशन' आणि 'प्रोग्रेस' विषयीं कांहीं विचारायचं कामच नव्हतं! किती एकाचा प्रोग्रेस, आणि दुसऱ्याचं ओरीजिन सारी एकामेकांत मिसळून गेली होती. "न्युवीज" कण्हत होते. अंगांत कामज्वर कायमचाच संचारलेला होता. आणि आतां अंगांत ताप होता एकशे दोन अंश! क्रमांक बाराचा "केस शीट" आणि "चार्ज शीट" पाहून माझ्या सराईत मनालाहि किंचित् गुदगुल्या झाल्या आणि शेजारच्या 'असिस्टन्ट ऑनररी'ला मी विचारलं,

"तुम्हीं ॲडमिट केलीत ही केस?"

"हो. आपण नव्हतत."

"केव्हां?"

"कालच!"

"Oh! Very interesting!" मी म्हणालो आणि केस शीटवरचे दुसरे रकाने सहज पाहिले. नांव–वय–जात–......! आणि मी चमकून उठलो. माझी मुख्यतः बिछान्यावरून फिरलेली दृष्टी आतां शोधकपणें बिछान्यावर पडलेल्या व्यक्तीकडे लागली. नांव...सुरंगा शिरोडकर ...सुरंगा शिरोडकर...वय २०...कहान टेस्ट प्लस सिक्स, टेंपरेचर एकशें दोन! नांव सुरंगा शिरोडकर! माझे डोळे विस्तारले. डोकं गरगरूं लागलं. बिछान्यावरचा तो मलीन काळवंडलेला अकालवृद्ध चेहरा माझ्या डोळ्यांसमोर वर्तुळें घेऊं लागला.

"Anything wrong with you, Doctor?" माझ्या असिस्टंटनं मला विचारलं.

"Nothing at all" मी म्हणालो. आणि कांहीं तरी करायचं म्हणूनं सहज बिछान्यावरच्या बाईचा हात हातांत घेऊन मी तिच्या नाडीवर बोटं ठेवलीं. मी तिचा हात हातांत घेतांच सुरंगा हंसली. फार मोठ्यानं नव्हे पण अमर्यादेनं, निर्लज्जतेनं, सवंग बायका ओठांतल्या ओठांत फिदी फिदी हंसतात तशा. माझी दृष्टी तिच्यावर गेली तेव्हां तिची दृष्टी माझ्यावर लागलेलीच होती. तिचे विपुल केस विरळ झाले होते. डोळ्यांभोंवती वर्तुळें उमटलीं होतीं. मखमली कातडी आतां जुनाट मुर्दाड बनली होती. पण मी मात्र दहावर्षांपूर्वी होतो तसाच पुष्ट, तसाच तकतकीत, जास्तच यशस्वी अधिकच श्रीमान्! मला तिनं ओळखूं नये असा फरक माझ्यांत पडला नव्हता. तो पालटली होती, कर्दमांत लोळत होती, आणि मी सभ्यतेच्या, वैभवाच्या शिखरावर आरूढ झालो होतो. ती एक जर्जर, डागळलेली, नादार, रुग्ण होती. आणि मी तिचा त्राता होतो. आरोग्यदाता

होतो. मी तिला पाहण्यापूर्वीच तिनं मला पाहिलं होतं आणि माझ्याकडे मेलेल्या दृष्टीनं टक लावला होता. त्या दृष्टींत शोक नव्हता, संताप नव्हता, पश्चात्ताप नव्हता, ओळखही नव्हती. माझी छाती धडधडत होती. माझं मस्तक गरगरत होतं. मी तिचा हात हातांत घेतला, अनेकदां थरारत्या उत्कटतेनें पूर्वी हातात घेतलेला तिचा हात आज दहा वर्षांनंतर पुन्हा मी हातांत घेतला. आणि ती केवळ हंसली. तिनं मला ओळख दिली नाहीं. एका शब्दानंही ती मला बोलली नाहीं. ती केवळ हंसली—थोडीशी अमर्यादेनें, किंचित् निर्लज्जपणें...!

माझी फेरी मी जणूं कांहीं एका तंद्रींत संपविली. आणि जातां जातां सुरंगाकडे एक चोरटी दृष्टी टाकली. संवयीनें कष्ट पचनीं पडलेल्या माणसासारखी ती निर्विकारपणें बिछान्यावर त्याच: विवर्ण अवस्थेंत पडली होती. तिच्या दृष्टीची टक्क अगदीं तशीच होती. आतां केवळ तिच्या गालावर मला स्तब्ध शांततेनें वाहणारे अश्रूंचे ओघळ दिसले. तिच्या चेहऱ्यावर दुःखाचे भाव नव्हते. पण जणूं एका अनिवार प्रक्रियेनें तिच्या डोळ्यांतून तेवढे अश्रू झिरपत होते.

भान नसल्यासारखा मी वॉर्डबाहेर पडलो. भान नसल्यासारखा मी घरीं आलो. एका सार्वजनिक औषधालयांतील अनेकांनीं वापरलेल्य बिछान्यावर विसावणाऱ्या सुरंगाचा चेहरा सारखा माझ्या दृष्टीसमोर फिरत होता. नांव... सुरंगा शिरोडकर...कहान टेस्ट... प्लस सिक्स ... वासरमन... प्लस सिक्स... टेंपरेचर... एकशेदोन. बिछाना क्रमांक बारा... नांव सुरंगा शिरोडकर...

—गोपाळ, गोपाळ धांव! अरे मी तिचा सत्यानाश केला! एखाद्या उमलणाऱ्या फुलाइतकी ती सुंदर, अकलंक आणि प्रफुल्ल होती. तेव्हां मी तिला पाहिली होती. तेव्हां ती झगडत होती. आपल्या दैवाशीं झगडत होती, कुणा दुसऱ्यांनीं तिच्या मस्तकावर रचून ठेवलेल्या पापांच्या राशीशीं ती झगडत होती. आणि शरण येऊन करुणा भाकून मी मागितलेलं निर्लज्ज मोलदि देऊन ती माझा हात मागत होती. वर येण्यासाठीं माझ्या हाताचा आधार घेण्याचा तिचा जिवापाड प्रयत्न होता. मी तिला हात तर दिला नाहींच, पण विटलेल्या भोगाच्या अमानुष क्रौर्यानां मी तिला ल्हाथ दिली. ह्या पतनाच्या खातेऱ्यांत तिला गडगडत धाडणाऱ्या अगणित प्रहारापैकीं गोपाळ, पहिला प्रहार माझा होता.

सद्गुणांचा मार्ग शोधण्यासाठीं तेव्हां जिवापाड धडपडणाऱ्या त्या भावड्या मुलीचा हात तेव्हां मी अट्टाहासानें धरला,—तिला ह्या नरकाच्या मार्गावर लोटण्यासाठीं. आणि आज पुन्हा मी तिला मृत्यूच्या खाईंत ढकलण्यासाठीं प्रथम तिचा मी हात धरला आणि ती रडली, आज तिचा मी हात धरला आणि ती हंसली. किंचित् अमर्यादेनें, किंचित् निर्लज्जपणें ...!

—निर्लज्ज? होय, होय. कदाचित् झालीहि असेल सुरंगा निर्लज्ज. कदाचित् तिचं मन पूर्णपणें मरूनही गेलं असेल. तिनें इतके घाव घेतले असतील कीं मी दिलेला पहिला घाव तिच्या आतां स्मरणांतहि राहिला नसेल. मी तरी कुठें तिचं स्मरण ठेवलं होतं! गेल्या दहा वर्षांत सुरंगाचं मी कधीं स्मरण केलंच असेन तर तें केवळ स्वतःच्या चातुर्याचं आणि पौरुषाचं कौतुक करण्यापुरतंच! पण हा अपराध काय माझ्याविना कुणी दुसरे पुरुष करतच नसतील! निश्चित करतात आणि अपराधाची जाणीवहि विसरतात. सुरंगाहि बहुधा माझा अपराध विसरून गेली असेल. जसा मी स्वतःच माझा अपराध विसरून गेलों होतों. तिचं तें विचित्र हंसणं त्याचंच द्योतक होतें. तिच्या हृदयांत माझ्या विषयीं विशेष प्रकारचं शल्य असण्याच फारसं कारण नव्हतं. तसंच म्हटलं तर शल्यांनींच तिचं सारं हृदय भरून गेलं असेल. आणि म्हणून बहुधा तिला आतां शल्यांची जाणीवहि उरली नसेल.

तिच्या हृदयाचा अर्थ असाच असेल.

गोपाळ, किती स्वार्थी आहे माणसाचं मन. खरंच किती क्रूर आहे, किती मुर्दाड आहे. त्याहि अवस्थेंत स्वतःसाठीं समाधान शोधण्याचाच प्रयत्न मी करत होतों. सुरंगा निर्लज्ज बनली असेल, माझ्या इतकीच निर्लज्ज आणि मुर्दाड बनली असेल, ह्या भयंकर कल्पनेंतच मी समाधान शोधत होतों.

आणि मग सायंकाळीं मला कळलं. मला अकस्मात् कळलं कीं रोगी क्रमांक बारानं तिसऱ्या मजल्यावरून उडी घेऊन आत्महत्या केली.

सुरंगानं आत्महत्त्या केली, गोपाळ, सुरंगानं आत्महत्त्या केली. तिच्या बोटांत माझी आंगठी होती आणि क्रीम रंगाची बंगलोरी साडी ती नेसली होता. आज सकाळीं तिनं मला पाहिलं आणि आज सायंकाळीं तिनं जीव दिला. मी दिलेली साडी नेसून आणि मी दिलेली आंगठी घालून जीव दिला. " माझ्या मृत्यूचं दायित्त्व कुणावरहि नाहीं. जगायला कंटाळलें म्हणून मी आत्महत्त्या करीत आहें!" तिनं लिहून ठेवलं होतं. पण ही आत्महत्त्या नव्हती, तो खून होता. तो खून मी केला होता. माझ्या अपराधाचं प्रायश्चित्त मला कोण देईल?

—मधू

अनुक्रमणिका


अधिक






MODERN














मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



